# नि वे द न

नागपूरचे साहित्याचार्य श्री. बाळशास्त्री हरदास याची पुण्यास दि. १९ एप्रिल ते ११ मे १९५६ या कालावधीत वेदातील राष्ट्रदर्शन (उत्तरार्ध) या विषयावर वीस व्याख्याने झाली, ती या ग्रथद्वारा प्रसिद्ध करण्यात येत आहेत.

आधल्या वर्षी त्याची याच विषयाच्या अतरग दर्शनावर व्याख्यानें झाली होती, व ती ग्रथरूपाने प्रसिद्धही झाली आहेत. आता त्याच विषयाच्या बहिरगदर्शनावरील व्याख्यानांचा हा ग्रथ प्रसिद्ध होत असून भारताच्या राष्ट्रीय व सांस्कृतिक जीवनाचें सम्यक् दर्शन घडविणाऱ्या पाच व्याख्यानमालाचा व ती ग्रंथ-रूपाने साहित्यात स्थिरपद करण्याचा सकल्प सिद्धीस गेला आहे. ही व्याख्याने प्रसिद्ध करण्याचे भाग्य मला लाभले हे मी माझे सुदैवच समजतो.

हा ग्रथ पूर्ण होण्यास कांही अनपेक्षित व अपरिहार्य अडचणी-मुळे फार विलब झाला त्याबद्दल ग्राहक क्षमा करतील अशी आशा आहे.

सौर वैशाख १२, शके १८७९ प्रकाशक

# अनुक्रमणिका

# प्र स्ता व ना

साहित्याचार्य व्याख्यानवाचस्पति बाळशास्त्री हरदास यानी महाराष्ट्राचे केन्द्र असलेल्या पुण्याच्या वाक्पीठावर पचवर्षात्मक ज्ञानसत्र चालवून त्यात वेदापासून ते महाभारताच्या काळा-पर्यंतच्या सास्कृतिक इतिहासाचे व्याख्यानमालेच्या रूपाने सकलन केले. त्यात १९५५ व १९५६ या शेवटल्या दोन वर्षातील त्याच्या व्याख्यानाचा विषय 'वेदातील राष्ट्रदर्शन' हा होता त्यातील ५५ साली दिलेली व्याख्याने 'वेदातील राष्ट्रदर्शन'पूर्वार्ध या नावाखाली प्रसिद्ध होऊन वर्ष दीड वर्ष झाले प्रस्तुत ग्रथात १९५६ साली जी व्याख्याने त्यानी दिली ती त्याच विषयाचा उत्तरार्ध म्हणून प्रसिद्ध करण्यात येत आहेत.

साहित्याचार्याची व्याख्याने ही पुण्यातील विद्वान् व रसिक श्रोत्यानी प्रवेशशुल्क देऊन ऐकली. व्याख्यानाचें विस्तीर्ण पटागण श्रोत्यानी नेहमी फुललेलेच असे त्या श्रोतृवर्गात विश्वविद्यालयात संस्कृतभाषा, इतिहास, सस्कृति, समाजशास्त्र, भाषाशास्त्र, प्राचीन वस्तु सशोधन शास्त्र इत्यादि विषयाचा अभ्यास करणारे विद्यार्थी, त्याना शिक्षण देणारे, व सशोधन कार्यांत मार्गदर्शन करणारे आचार्य प्राचार्य आणि शहरातील सस्कृत भाषाभिज्ञ पडित वर्ग हेही उपस्थित असत. त्या सर्वाच्या मुखातून साहित्याचार्याची मुक्तकठाने झालेली प्रशसा रुग्णशय्येवर पडलो असता जेव्हा जेव्हा मी ऐकत होतों तेव्हा तेव्हा जो आनद वाटला त्याचे वर्णन मला करता येत नाही. या व्याख्यानमालेच्या शेवटल्या व्याख्यानात मालेचा उपसहार करताना ग्रथकर्त्याने पुण्याच्या वाक्पीठाच्या अधिकाराचा उल्लेख मोठ्या गौरवयुक्त शब्दात केलेला आहे व तो यथार्थही आहे. त्यामुळेच या वाक्पीठावर येणे हे जसे साहसाचे आहे तसेंच दायित्वाचेंही आहे असे जे उद्गार साहित्याचार्यांनी काढले आहेत, त्यावरून ही व्याख्याने देण्यापूर्वी आपणावर फार मोठी जबाबदारी आहे अशी जाणीव मनाशी ठेवून परिपूर्ण तयारी

करूनच ते व्याख्याने देत होते. मी जरी व्याख्यानास जात नव्हतो तरी काही एका दैवयोगामुळे पुण्यालाच त्या वेळेला रहात होतों. व्याख्यानास गेलेल्या श्रोत्याच्या मुखातून निघणारे प्रशसोद्गार मला ऐकण्याचा सुयोग वारवार येत होता त्यावरून मी असे म्हणू शकतो की, पुण्यातील अभिज्ञ, रसिक व मार्मिक श्रोत्याना ती व्याख्याने पसत पडली, इतकेच नाही तर व्याख्यात्याच्या अगाध ज्ञानाने, तेजस्वी प्रतिपादनाने आणि अखडित गगौघाप्रमाणें वाहणाऱ्या त्याच्या वाक्प्रवाहाने ते आश्चर्यचकित झालेले दिसले. गभीर विषयावर प्रदीर्घ व्याख्यानमाला गुफून गेल्या ५-७ वर्षात साहित्याचार्यानी जो लौकिक मिळविला व जी लोकप्रियता सपादन केली तो लौकिक व ती लोकप्रियता गल्या ३०-३५ वर्षात तरी पुण्याच्या वाक्पीठावरून मिळविल्याचे दुसरे एकादे उदाहरण दाखविता येण्यासारखे आहे की नाही याची मला शकाच आहे. कै. आहिताग्नि राजवाडे यानी अशा प्रदीर्घ व्याख्यानमाला गुफल्या होत्या पण त्या साहित्याचार्याच्या इतक्या लोकप्रिय झाल्या नव्हत्या असे मला वाटते ही व्याख्याने विद्वानाच्या परितोषाच्या दिव्यातून तावून सुलाखून बाहेर पडलेली असल्यामुळे ती ग्रथरूपाने लोकासमोर माडताना प्रकाशकाना त्याचा लोक कसा आदर करतील याबद्दल शका घेण्याचे कारण नाही. त्यातील सर्व ' सुवर्ण, शुद्ध बावनकशी आहे, हे पूर्वीच पुण्यपुरीच्या श्रोत्यानी मार्मिकतेचा निकष लावून घोषित केले आहे

साहित्याचार्यानी पूर्वार्ध व उत्तरार्ध मिळून ७-८ शे पानाच्या ग्रथात वाचकाना 'वैदिक राष्ट्रदर्शन' करून देण्याचा जो प्रयत्न केला आहे तो प्रशसनीय आहे इतकेच नव्हे तर मराठी भाषेपुरतेंच बोलायचे म्हटल्यास एका अर्थी अपूर्व आहे असेच म्हणावे लागेल.

वैदिक सस्कृतीचा इतिहासदृष्टीनें विचार करून तिच्या स्वरूपाचे साकल्याने निरूपण करणारे ग्रथ मराठीत फार थोडे आहेत. त्यात मी कै. नानासाहेब पावगी व त्यानी लिहिलेल्या 'भारतीय साम्राज्य' या अकरा बारा खण्डात्मक ग्रथमालेचा निर्देश करू इच्छितों. त्याचप्रमाणे महाराष्ट्र ज्ञानकोशांतील वेदखड हा

विभाग या विषयावरील अत्यत महत्त्वाचा ग्रथ म्हणता येईल. याशिवाय आणखी काही ग्रथ असतीलही, पण मला त्याचे ज्ञान नाही. वेदातील काही समस्यासबधी, एकाद्या वेदातील काही मत्रासबंधी, किवा विषयासबधी चर्चा करणारे ग्रथ आहेत हे सर्व ग्रथ संशोधनात्मक व चर्चात्मक स्वरूपाचे असल्यामुळे वेदाभ्यासकास महत्त्वाचे आहेत. परतु चारी वेद व त्याची ब्राह्मणे, अगे व सूत्रे इत्यादि प्रचण्ड वेदवाङमयाचें मथन करून त्यातून वैदिक राष्ट्राचे काय स्वरूप दृष्टीस पडते याचा विचार प्राय· त्या ग्रथातून नसतो. किबहुना अर्वाचीन सुशिक्षित वेदशब्दात फक्त सहिता ग्रथ अभिप्रेत आहे असे समजून चालतात, व त्यासबधीच्या विवेचनात ब्राह्मणादि ग्रथास ते फारसे महत्त्व देत नाहीत. वेदार्थ समजण्यास त्याची आवश्यकता नाही असे ते आग्रहाने प्रतिपादन करितात. 'मत्रब्राह्मणयोर्वेद नामधेयम्' ही वेदाची आपस्तबादि सूत्रकारानी केलेली व्याख्या ते मानीत नाहीत तसे करणे अनैतिहासिक दृष्टीचे लक्षण आहे असे ते मानतात आर्यसमाजाचे पूज्य सस्थापक महर्षि दयानद सरस्वती हे फक्त चार वेदाच्या सहिताच प्रमाण मानीत होते, ब्राह्मण ग्रथ प्रमाण मानीत नव्हते त्यानी सत्यार्थप्रकाशातून जे वैदिक धर्माचे विवेचन केले आहे, त्यात ही गोष्ट प्रामुख्याने दृष्टीस पडते अर्वाचीन पाश्चात्य सशोधनप्रणालीचा अगीकार करणारा विद्वान् हा प्रत्येक सहिता ही स्वतत्र समजून तिच्या अर्थासाठी दुसऱ्या वेदसहितेचाही उपयोग करू इच्छीत नाही अशा या एकदेशीय विचारसरणीमुळे मोठमोठ्या विद्वानाचे हातून वैदिक जीवनाचे चित्र काढताना अनेक प्रमाद घडले आहेत. व त्याच्या कुचल्यातून वैदिक राष्ट्ररूपी विनायकाच्या चित्राऐवजी वानराचे चित्र चित्रित झाले आहे असे साहित्याचार्य मोठ्या खेदाने पण साक्षेपाने जे प्रतिपादन करितात, त्यात पुष्कळ तथ्य आहे. चारी वेद हे यज्ञार्थच निर्माण झाले व एका यज्ञकर्माचाच निर्वाह ते करीत असल्यामुळे ते कसे कसे परस्परावलबी व परस्परपोषक आहेत याचे ऋग्वेदातील १० व्या मडळातील ७१ व्या सूक्ताच्या ११ व्या मत्रात फार निःसंदिग्धपणे प्रतिपादन केले आहे तो मत्र असा :

"ऋचा त्व पोषमास्ते पुपुष्वान् गायत्र त्वो गायति शक्वरीषु ।
ब्रह्मा त्वो वदति जातविद्या यज्ञस्य मात्रा विमिमीत उ त्व. ॥
(ऋग्वेद १०-७१-११) या मत्रावर यास्काचार्यानी निरुक्तात जें व्याख्यान केले आहे त्याचा साराश असा की, ऋग्मत्रानी यज्ञाची पुष्टि होते, साम मत्रानी त्याचे स्तवन होते अथर्वण वेदाने त्याचें सपूर्णतेने यजन केले जाते, व यजुर्वेदाने त्याचे शरीर निर्माण होते. त्याचप्रमाणे १० व्या मडळातील पुरुषसूक्तात विराट पुरुषरूपी पुरुष यज्ञाच्या अलकारिक पण गूढार्थद्योतक वर्णनातही ऋग् साम छद व यजुर्वेद हे या 'सर्वहुत' यज्ञातून उत्पन्न झाले असे स्पष्ट वचन आहे. 'तस्माद्यज्ञात्सर्वहुत ऋच सामानि जज्ञिरे छंदासि जज्ञिरे तस्माद्यजुस्तस्मादजायत॥' गीतेतील 'सहयज्ञा. प्रजा सृष्ट्वा पुरोवाच प्रजापति । अनेन प्रसविष्यध्वम् एष वोऽस्त्विष्टकामधुक् ॥' या श्लोकात भगवताने वेदाचे व यज्ञाचे 'सहजत्व' स्पष्टपणे सागितले आहे यज्ञाला जर चारी वेदाची आवश्यकता आहे, असे श्रुति प्रतिपादन करते तर या चारी वेदाच्या सहिता व यज्ञप्रक्रियेचे विवरण व मीमासा करणारे ब्राह्मण हे यज्ञाबरोबरच निर्माण झाले हे अगदी उघड आहे तसे नसते तर यज्ञ करा व आपले कल्याण करून घ्या या प्रजापतीच्या वचनाला काही अर्थच निष्पन्न होऊ शकला नसता, व ते गीतावाक्य निरर्थक आहे असे म्हणण्याची आपत्ति उत्पन्न झाली असती

प्रत्येक मत्राचे अध्ययन हे त्याचे छद, ऋषि, देवता व विनियोग यासह केले पाहिजे असा वेदाध्ययनाचा सप्रदाय अनादिकालापासून चालत आला आहे. मत्रासबधाचे हे ज्ञान ब्राह्मणग्रथाच्या अध्ययनाशिवाय होऊ शकत नाही त्यामुळे वैदिक सस्कृतीत वेद व ब्राह्मण परस्पराशी अत्यत सलग्न असे आहेत त्याचे विलगीकरण करून वेदार्थाचा प्रयत्न असाप्रदायिक तर आहेच पण सभ्रमोत्पादकही आहे म्हणून अट्टहासाने काही पाश्चात्य पडितानी वर निर्देश केलेल्या एकदेशीय वेदार्थप्रयत्नातून वेदपुरुषाचे अथवा वैदिक राष्ट्राचे यथार्थ ज्ञान होण्याची फारशी शक्यता नाही असे साहित्याचार्यांप्रमाणे कोणाही नि:पक्षपाती व्यक्तीला वाटेल असे मी समजतो.

दुसऱ्या व्याख्यानांत मातृभूमिविषयक भावनांचें वर्णन केलें आहे. त्यांत अथर्वण वेदातील पृथ्वीसूक्ताचे बरेच सविस्तर विवेचन करून 'वैदिक लोकाची प्रखर देशाभिमानाची दीप्तिमान् धारणा अन्तःकरण मुग्ध केल्याशिवाय रहात नाही असें ग्रंथकर्त्यानें मोठ्या आवेशाने नमूद केले आहे. या भागात उद्धृत केलेली पुष्कळशी वचनें देशभक्तीपेक्षा पृथ्वी देवतेच्या स्तुतिपर आहेत दुर्लभ भारते जन्म इत्यादि पौराणिक वचने जशी स्पष्ट, जन्मभूमि भारतवर्षाच्या प्रशंसापर आहेत तशी वैदिक वचने फार कमी आहेत.

याशिवाय काही वचनातून शत्रूपासून आमचे रक्षण कर, सकटांपासून आम्हास वाचीव (स्वस्ति भूमे नो भव मा विदन् परिपथिनो वरीयो भाव मा वधम्) या ३१ व्या पानावरील वचनात वाचकास मत्र म्हणणाऱ्याच्या देशभक्तीच्या प्रत्ययापेक्षा भीतिग्रस्त मन स्थितीचाच प्रत्यय येतो असे मला वाटतें. "यस्या गायन्ति' 'अहमस्मि' 'यद्वदामि' या ४१–५४ व ५० क्रमाकाच्या ऋचातून मात्र वैदिक आर्यांच्या देशाभिमानी गर्जनाचे निनाद वाचकाचे कानावर स्पष्टपणे येतात

ही पहिली दोन व्याख्याने काही अशी उपोद्घातरूपीच आहेत. बाकीच्या १८ व्याख्यानाचे मी खालीलप्रमाणे वर्गीकरण करतो. ३ ते ८ वैदिक समाजरचना व त्यातील ब्राह्मण व क्षत्रिय या वर्गासबधाने विशेष विचार; पाने ३२ ते १३५ ही समाजरचनेच्या विचारास दिली आहेत. व्याख्यान ९ ते ११ यात वैदिक राज्यसस्थाचा विचार पान १३७ ते १७९ पानापर्यंत आहे. १२ ते १७ या सहा व्याख्यानात वैदिक युद्धविषयक व्यवस्थेची बरीच विस्तृत चर्चा करण्यात आली आहे. पान १८१ पासून तो ३११ पर्यंत युद्धविषयाच्याच प्रपचाचे वर्णन आलें आहे. व्याख्यान १८ व १९ मधील विषय हे आर्थिक स्थितीसबधी आहेत. ३१२ ते ३७९ ही पाने या चर्चेत खर्ची पडली आहेत. २० वें व्याख्यान भारतीय संस्कृतीच्या जागतिक प्रसाराच्या व प्रतिष्ठच्या वर्णनाकरिता लिहिले आहे. वरील वर्गीकरणावरून शास्त्रीबोवांनी वैदिकराष्ट्ररूप पुरुषाच्या शांता आणि घोरा अशा

दोन्ही तनूचे दर्शन वाचकास व्हावे अशा रीतीने आपल्या ग्रथाची रचना केली आहे. वैदिक समाजाची शाततेच्या कालांत प्रगति करण्याची स्थिति कशी होती याची कल्पना, वैदिक समाजरचना वर्णाश्रम सस्था, ब्राह्मण-नेतृवर्ग, ब्राह्मण, क्षत्रिय आणि क्षत्रियाची कर्तव्ये, या शीर्षकाखालील अध्यायातून केलेल्या विवेचनावरून वाचकास येऊ शकते. युध्यमान स्थितीत आपल्या राष्ट्राची प्रतिष्ठा अप्रतिहत राहावी म्हणून ज्या योजना होत्या त्याचे वर्णन काही अशी वेदाचे आधाराने, काही अंशी रामायण, महाभारतादि काव्याच्या आधाराने व काही अशी शुक्रनीति व कौटिल्य याच्या अर्थशास्त्रविषयक ग्रथाच्या आधाराने बऱ्याच विस्ताराने केले आहे. ते वाचकाना मनोरजक व उद्बोधक वाटेल

परतु वैदिक राष्ट्रातील राजकीय सस्था या सवधाने ९-१० व ११ या व्याख्यानातून त्यानी केलेल्या विवेचनातून तत्कालीन राजसत्तेचे स्वरूप, मत्र्याचे व राजाचे अधिकार, समिति व तिचे अधिकार या प्रश्नावरील त्याची मते प्राचीन वैदिक राजसत्तेच्या व राज्यकारभाराच्या स्वरूपावर नवा प्रकाश टाकणारी आहेत या विवेचनात त्यानी पाश्चात्य देशातील प्रसिद्ध अर्थशास्त्रविषयक सिद्धान्ताचे आणि विशेषत समाजवाद व हुकुमशाहीवाद, कम्युनिझम, नाझीझम् फॅसिझम् वगैरेचे बऱ्याच विस्ताराने परीक्षण करून असा निष्कर्ष काढला आहे की, वार्ताशास्त्रात भोक्ता व भोग्य या दोघाचाही विचार केल्याशिवाय विचार परिपूर्ण होत नाही पण पाश्चात्याच्या विचारात केवळ भोग्याचाच काय तो विचार केला आहे भोक्त्याचा अशत ही केलेला नाही (पान ३५४). भारतीय अर्थशास्त्राचे हे वैशिष्ट्य आहे की, त्यानी विभजन व विनिमय याचा विचार करताना केवळ भोग्याचा विचार न करता भोक्त्याच्या विचाराला प्राधान्य दिले आहे. (पान ३५५) त्याच पानावर ते पुढे म्हणतात, ग्रथकर्त्याचा कटाक्ष स्वामित्वाची प्रेरणा दडाच्या भयाने नियत्रित न होता स्वयंप्रेरणेनेच नियत्रित होईल अशी अर्थव्यवस्था पाहिजे भारतीय अर्थशास्त्रज्ञानी स्वत्वाची व्याख्या जी केली आहे ती अशी --

यावत् भ्रियेत जठरं तावत्स्वत्वं हि देहिनाम्।
अधिकं योऽभिमन्येत स स्तेनो दण्डमर्हति ।।

पान ३६९ वर व्याख्यात्यानी भारतीय अर्थशास्त्राच्या उभारणीचे तीन मूलभूत सिद्धान्त सागितले आहेत ते असे —

(१)सर्वजीवनिर्वाहपूर्वक अवशिष्टत्व (२) ईशस्वत्ववाद व (३)यज्ञप्रकृतिकता अथवा त्यागात्मक कर्तव्यपरायणता त्याच प्रमाणे राजा व प्रजा याच्यामधील सबधाचे अर्थोत्पादन व अर्थ विभाजन व बलिग्रहण अर्थात् कर बसविण्याचा अधिकार या दृष्टीने ग्रथकर्त्यांने प्रदर्शित केलेले विचार मननीय आहेत पान ३७८ वर त्याच्या विचाराचा साराशरूपाने जो उल्लेख आहे तो वाचकानी अवश्य वाचावा धन हे धनिकाजवळ जनकल्याणार्थ निधि म्हणून आहे आणि धनिक हा केवळ त्याचा विश्वस्त आहे असा भाव धनिक लोकात निर्माण झाल्यास वर्गकलहादि सकटापासून संस्कृतीचा बचाव होऊ शकतो असे म गाधी म्हणत असत. हल्ली पूज्य विनोबाजी भावे हे सर्वोदयामार्फत आणि भूदानादि कार्यक्रमद्वारा ज्या विचारप्रणालीचा पुरस्कार करतात त्यात राज्यनियत्रणाऐवजी ग्रामीण जनतेने स्वनियत्रित राहून आपले आर्थिक जीवनाचे व्यवहार करावे हेच अधिक योग्य आहे असे प्रतिपादन करतात. त्या विचारप्रणालीच्या मुळाशी जे सिद्धान्त आहेत ते व बाळशास्त्रीनी या व्याख्यानात भारतीय अर्थशास्त्राचे म्हणून सागितलेले सिद्धान्त याच्यात माझ्या दृष्टीने तरी फारसा भेद नाही शेवटल्या विसाव्या व्याख्यानात त्यानी भारतीय संस्कृतीच्या प्रसाराचा भव्य व विस्तृत नकाशा वाचकापुढे ठेवला आहे त्यात त्यानी ख्रिस्ती धर्माचे सस्थापक येशू ख्रिस्त हे भारतात येऊन गेले, तिबेटातील लामाच्या सान्निध्यात त्यानी बरीच वर्षे काढली, तेथूनच त्यानी भारतीय व बौद्ध धर्माच्या तत्त्वाची प्रथम सथा घेतली व त्यावर आपल्या ख्रिस्ती धर्माची उभारणी केली असे प्रतिपादन केले आहे पण त्याला आधार म्हणून जे उल्लेख आहेत त्या सबधी विद्वानात एकवाक्यता नाही हेही येथे नमूद करून ठेवणें अवश्य आहे. प्लेटो व इतर ग्रीक तत्त्वज्ञाच्यावरही वैदिक तत्त्व-

ज्ञानाचा परिणाम झाला होता हें शेवटल्या व्याख्यानांत दाखविण्याचा शास्त्रीबोवांनी प्रयत्न केला आहे. ४०७–४०८ पानांवरील विवेचनांत शास्त्रीबोवानी बरीच कल्पकता दाखविली आहे. पण या तुलना फार तुरळक व त्रोटक आहेत, हें आपण लक्षांत ठेवणें जरुरीचें आहे असे मला वाटते. त्यावरून धनको कोण व ऋणको कोण हे ठरविणे ज्ञानाच्या प्रस्तुत स्थितीत तरी शक्य नाही, एवढेंच मी म्हणू इच्छितो शास्त्रीबोवाच्या या महत्त्वाच्या ग्रथास प्रस्तावनेदाखल चार शब्द लिहिण्यास त्यानी मला सागितले याबद्दल मी त्याचे आभार मानतो. वेद व वैदिक वाङमय आणि वैदिक संस्कृतीविषयी जी सुशिक्षित समाजात उपेक्षावृत्ति दृष्टीस पडते व त्यामुळे त्या सबधात जे भयकर अज्ञान व विपर्यस्त समज परकीय लोकाना निर्माण करता आले व येत आहेत, त्यातून आपल्या धर्मबाधवाची मुक्तता करण्याकरिताच वेद, धर्म व सस्कृति यांचे यथार्थज्ञान व त्याविषयीचा यथार्थ अभिमान त्याच्यात निर्माण करण्याचा जो प्रयत्न साहित्याचार्यानी व्याख्याने देऊन व ग्रथ लेखन करून चालविला आहे त्याबद्दल त्याना अखिल मराठीभाषी जनतेतर्फे मी धन्यवाद देतो. त्याच्या या अगीकृत महान् कार्यांत अल्पकाळांतच यशस्वी होण्याचे सद्भाग्य त्याना लाभो ही शुभेच्छा व्यक्त करून व परमेश्वराची त्याकरिता अनन्य भावानें प्रार्थना करून मी लेखणीस विश्राति देतो.

दि. १६।४।५७<br>सौर चैत्र दि. २६ शक १८७९<br>नागपूर

**माधव श्रीहरि अणे**

*

व्याख्यान पहिलें

# वेदवाङ्मयाचा विस्तार

वेदातील आदर्शवादाचे मूर्तिमत प्रतीक असलेल्या मर्यादा-पुरुषोत्तम भगवान् श्रीरामचंद्राच्या या सुमगल जन्मदिवशी वेदातील राष्ट्रदर्शनाच्या व्याख्यानमालेच्या या उत्तरार्धास प्रारभ करताना माझ्या मनाला अतिशय समाधान वाटते मागच्या व्याख्यानमालेत या विषयास प्रारभ करताना आजच्या जीवनाच्या उभारणीसाठी आपल्या राष्ट्राच्या मृत्युजय ठरलेल्या शाश्वत जीवनमूल्याची ओळख करून घेणे कसे आवश्यक आहे व ती ओळख वेदवाङ्मयाविना दुसऱ्या कोणत्याही साधनाने होण्याची कशी शक्यता नाही हे मी दाखवून दिले आहे या व्याख्यानमालेचे हि तेंच सूत्र आहे या उत्तरार्धास प्रारभ करताना पूर्वार्धाचे थोडे सिहावलोकन करण्याची आवश्यकता आहे. पूर्वार्धात वेदाचे प्रागैतिहासिक काळापासून आपल्या राष्ट्रजीवनात असलेले महत्त्वाचे स्थान, व अज्ञान, न्यूनगड, आपले सिद्धात सिद्ध करण्यासाठी बुद्धिपुरस्सर करण्यात येत असलेले मिथ्याचार याची प्रतीके असणाऱ्या पाश्चात्य सशोधकापासून तर कम्युनिस्ट सप्रदायापर्यंतच्या लोकानी वैदिक जीवनाचे विकृत दर्शन कसे केले आहे हे पुराव्यानिशी दाखवून दिले आहे तसेच या विकृत दर्शनाची तपासणी करून, त्याच्या दबकावणीला भीक न घालता स्वतत्र सशोधनाची किती व कशी आवश्यकता आहे हेहि प्रतिपादन केले आहे. तसेच कालनिर्णयाचा प्रश्न सोडविताना त्यासबधीच्या प्राचीन व अर्वाचीन अनुमानाची तपासणी करून लोकमान्याच्याच भाषेत ‘ अनादि ’ या शब्दानेच हा प्रश्न सुटू शकतो हेहि दाखवून दिले आहे. अत्यंत वादाचा विषय असलेले आर्य आणि अनार्य हे

शब्द तपासणीसाठी घेऊन त्या शब्दाचे जातिवाचक व वशवाचक करण्यात येणारे अर्थ कसे चुकीचे आहेत व ते गुणवाचकच करणें कसे आवश्यक आहे यासबधाने प्रतिपादन केलेले आहे; त्यानंतर वैदिक आर्याच्या मूलस्थानासबधीच्या सर्व सिद्धान्ताची व तर्काची तपासणी करून ' भारत हे आर्याचे मूलस्थान नाही हे सिद्ध करणारा कोणताही पुरावा ऋग्वेदात नसून उलट भारत हेच आर्याचे मूलस्थान असावे, असे मानावयास ऋग्वेदातच आधार सापडतात हे दाखवून देऊन मी बहिरगपरीक्षण सपविले आहे

त्यानतर वेदवाङमयाच्या अतरगाकडे मी वळलो वैदिक आर्याचा तेजस्वी जीवनवाद, त्याची अत्युच्च नीतिकल्पना, व स्थिरसमाजरचना सिद्ध करणाऱ्या विवाहसस्थेसारख्या सस्था याचे निरीक्षण करून पशुत्वविरहित श्रेष्ठजीवन निर्माण करण्यासाठी त्यानी कोणती शिक्षणपद्धति अवलविली होती हे मी प्रचलित शिक्षणपद्धतीचा आढावा घेऊन तौलनिक दृष्टीने व विस्ताराने प्रतिपादन केले आहे त्यानतर स्त्रीजीवनासंबंधीच्या वैदिक आर्याच्या अत्युच्च धारणाकडे वळून वासनागधहीन मातृत्व हा स्त्रीजीवनाचा ध्येयवाद कसा होता हे मी दाखवून दिले आहे यानतर मी वैदिक तत्त्वज्ञानाकडे वळलो जीव, जगत् व जगदीश्वर यांच्या सबधीच्या उपनिषदे व तदुत्तरकालीन भगवत्पूज्यपाद श्रीमदाद्यशकराचार्यादि भाष्यकाराच्या सिद्धान्ताचे सम्यक् दर्शन ऋग्वेदातील 'अस्य वामस्य' नासदीय इत्यादि सूक्तावरूनच कसे होते हे दाखवून असे सिद्ध केले आहे की भारतीयाचे श्रेष्ठ तत्त्वज्ञान व जीवनविषयक सिद्धान्त ऋग्वेद सस्कृतीतच सिद्ध स्वरूपात असलेले आढळतात भारतीयाच्या तत्त्वज्ञानाचे सर्वात महत्त्वाचे वैशिष्टच हे आहे की, तत्त्वज्ञान हा केवळ चर्चेचा व बौद्धिक मल्लयुद्धाचा विषय नसून तो प्रत्यक्ष अनुभूतीचा व जीवन घडविण्याचा विषय आहे व तेवढ्यासाठी तत्त्वज्ञानाला त्यानी योग, भक्ति, ध्यान, उपासना इत्यादि साधनप्रक्रियेच्या (प्रॅक्टिकल सायन्सेस) शास्त्राची जोड दिली आहे म्हणून अनुभूतिवाद (रिअलायझेशन) हा भारतीय

तत्त्वज्ञानाचा आत्मा आहे हा अनुभूतिवादहि ‘ अह मनुरभव सूर्यश्च ’ ह्या वामदेवाच्या ऋग्वेदातील उद्गारापासून श्रीरामकृष्ण परमहस इत्यादि आधुनिकतम द्रष्टयाच्या जीवनापर्यंत कसा एकरूपच आहे हे दाखवून देऊन मी पूर्वार्ध सपविलेला आहे तो सपवीत असतानाच मी असे म्हटले होते की ‘ या देदीप्यमान भावजीवनाचा हा समाज प्रत्यक्ष जीवन कसे जगत होता, देश-भक्तीच्या व राष्ट्रीयत्वाच्या भावनाचे आविष्कार त्या समाजात होते काय, त्याची राज्ये व राज्यघटना याचे स्वरूप काय होते, अर्थव्यवहाराचे त्याचे सिद्धान्त कोणत्या स्वरूपाचे होते, भौतिक जीवनाच्या समस्या सोडविण्यातील त्याचे कौशल्य कोणत्या प्रकारचे होते, त्याच्या राजनीतिशास्त्राचे व युद्धशास्त्राचे स्वरूप काय होते व समाजरचनाशास्त्राची त्यानी कोणत्या प्रकारे उभारणी केली होती याचा विचार उत्तरार्धात करण्यात येईल.’ त्यासाठीच प्रस्तुत व्याख्यानमाला गुफण्यात येत आहे

वैदिक राष्ट्राच्या सामाजिक राजकीय व सास्कृतिक जीवनाचे स्वरूप पाहिल्यावाचून आपण आपल्या राष्ट्राच्या ऐतिहासिक विकासाची व पतनाची नीट मीमासा करू शकणार नाही हे सूर्यप्रकाशाइतके स्पष्ट आहे. पण वेद म्हणजे नुसती मत्रमय सहिता अशी जर आपण कल्पना केली तर आपल्या राष्ट्राचे प्राचीन काळचे राजकीय व सामाजिक जीवन आपणास समजण्याची यत्किञ्चितहि शक्यता नाही. कारण मत्रमय सहिता हे विशेष प्रकारचे पण त्रुटित स्वरूपाचे सग्रहग्रथ आहेत हे मी पूर्वार्धातच दाखवून दिले आहे हा सिद्धान्त मान्य करूनसुद्धा ज्ञानकोशकार डॉ. केतकरापासून तो डॉ. विटरनिट्झपर्यंतच्या मोठमोठ्या धुरधर सशोधकानी प्रत्यक्ष सशोधनात मात्र वेद म्हणजे मत्रमय सहिता असा अपुरा दृष्टिकोन स्वीकारल्यामुळे वेदवाङमयावर व आपल्या प्राचीन पूर्वजाच्या इतिहासावर असहनीय अन्याय झालेले आहेत. आपल्या विषयास सुरुवात करण्यापूर्वी वैदिक वाङमयाची व्याप्ति किती मानण्याची आवश्यकता आहे हे प्रथमच स्पष्ट करणे

आवश्यक आहे वैदिक राष्ट्रदर्शन घडविताना मी आधारभूत म्हणून जे वाङमय घेणार आहे त्याची स्पष्ट कल्पना प्रारभीच देणे मला आवश्यक वाटतें

वेद शब्दाचा अर्थ विशद करताना महर्षि आपस्तबानी असे म्हटले आहे की 'मत्रब्राह्मणयोर्वेदनामधेयम्।' मत्रवाङमय व ब्राह्मणवाङमय मिळून वेद होतो ब्राह्मण ग्रथाकडे आपण दुर्लक्ष केले तर वेदाचा उलगडा होण्याचा यत्किचितहि सभव नाही ब्राह्मण म्हणजे वेदाचा गद्यात्मक विभाग होय वेदाची कोणतीहि मत्रमय सहिता ही ब्राह्मण ग्रथाविना अपूर्ण आहे वेदाचे सहिती-करण मुख्यत यज्ञक्रियेसाठी झालेले असल्यामुळे आणि वेगवेगळ्या आख्यायिकासह यज्ञक्रियेचे प्रतिपादन मुख्यत ब्राह्मण ग्रथात केलेले असल्यामुळे शरीर व आत्मा याचा जो सबध तोच ब्राह्मण ग्रथ व वैदिक संहिता याचा आहे कित्येकानी ब्राह्मण शब्दाचा अर्थ अतिशय चुकीचा केलेला आहे त्याच्या मते ब्राह्मण पुरोहिताचे कर्म ज्यात सागितले आहे ते ग्रथ होत पण हा अर्थ अपसमज उत्पन्न करण्यासाठी करण्यात येतो. वस्तुत ब्रह्म म्हणजे यज्ञ व त्या यज्ञाचे प्रतिपादन करणारे व यज्ञक्रियेचा विस्तार सागणारे जे ग्रथ त्याना ब्राह्मण असे म्हणतात

मत्र व ब्राह्मण याना विलग करणे अत्यत कठीण आहे कर्माच्या वेळी उपयोगात आणले जाणारे जे वाङमय ते म्हणजे मत्र व क्रियेची निर्णायक असणारी जी वाक्ये ती म्हणजे ब्राह्मण या जुन्या व्याख्येप्रमाणे मत्रवाङमय व ब्राह्मण हे एकमेकावर किती अवलबून आहेत हे ध्यानात येते विशेषत कृष्ण यजुर्वेदाच्या मैत्रायणी व काठक या सहिताकडे पाहिले तर मत्र व ब्राह्मण हे एकमेकात किती मिसळून गेलेले आहेत याची कल्पना येते शुक्ल यजुर्वेदाला जे शुक्ल असे नाव पडलेले आहे ते वस्तुत मत्र आणि ब्राह्मण याची कृष्ण यजुर्वेदात झालेली सरमिसळ काढून टाकून सहिता वेगळी आणि ब्राह्मण वेगळे अशा स्वरूपाची जी रचना करण्यात आली तिच्यामुळेच होय याज्ञवल्क्याचे म्हणून जे

कार्य म्हणतात ते वस्तुत हेच आहे. त्यानी नवा वेद उत्पन्न केला असे जे म्हणतात ते केवळ अलकारिक अर्थाने घेतले पाहिजे. आपले कृष्णयजुर्वेदी गुरू वैशपायन याच्यावर रागावून व त्याचा वेद ओकून टाकून सूर्याकडून नवा वेद मिळविण्यासाठी प्रार्थना करताना याज्ञवल्क्यानी जे शब्द उच्चारले ते भागवतकारानी पुढीलप्रमाणे सागितले आहेत –

'भगवन् तव चरणनलिनयुगुल अह अयातयामयजु काम उपसरामि।' (हे भगवता, सूर्यनारायणा, आजपर्यत कोणीहि न वापरलेले अर्थात् शिळे न झालेले असे नवे (अयातयाम) यजुर्मत्र मी आपल्यापासून मिळविण्याच्या इच्छेने आपल्या चरणकमलासन्निध आलेलो आहे )

पुढे श्रीमद्भागवतात (स्कद १२) म्हटले आहे —
एव स्तुत स भगवान् वाजिरूपधरो हरि ।
यजूष्ययातयामानि मुनयेऽदात् प्रसादित ।। ६–७३
यजुर्भिरकरोच्छाखा दशपचशतैर्विभुः।
जगृहुर्वाजसन्यस्ता कण्वमाध्यदिनादयः ।। ६–७४

(याप्रमाणे याज्ञवल्क्यानी स्तवन करताच अश्वाचे रूप धारण करून आलेल्या सूर्यनारायणाने प्रसन्न होऊन नव्या अव्यामिश्र व वैशपायनाना अज्ञात अशा शुक्लसज्ञक मत्राचा याज्ञवल्य मुनीन उपदेश केला सूर्याकडून मिळालेल्या नव्या यजुर्मत्राच्या याज्ञवल्क्यानी १५०० शाखा केल्या अश्वरूपधारी सूर्याने ज्या यजु शाखा याज्ञवल्क्याना दिल्या त्याना वाजसनि असे नाव पडले याज्ञवल्क्यानी कण्व माध्यदिन इ शिष्याच्या द्वारा त्या यजु शाखाचा सर्वत्र प्रसार केला ) भागवतातील या आख्यायिकेमुळे शुक्लयजुर्वेद म्हणजे एक नवाच कोरा करकरीत वेद आहे अशी रूढ समजूत आहे पण ती खरी नाही. आख्यायिकेत केलेले वर्णन अलकारिक असून ते वाच्यार्थाने घेणे योग्य होणार नाही 'यच्या जागी ज' अथवा 'ष' च्या जागी 'ख' अशी होणारी शब्दरचना व स्वरानुरोधाने हाताचें होणारे आन्दोलन यापेक्षां शुक्लयजुर्वेदात

कृष्णयजुर्वेदाहून मत्राच्या सबघात कोणताहि नवेपणा अथवा कोरा करकरीतपणा नाही. काही थोडे इकडे तिकडे शब्दरचनेचे फेरफार सोडले तर कृष्णयजुर्वेदातीलच मत्र शुक्ल यजुर्वेदात जसेच्या तसे आहेत याज्ञवल्क्याची कामगिरी म्हणजे कृष्णयजुर्वेद संहितेत ब्राह्मण वाङमयाची झालेली भेसळ त्यानी काढून टाकली हीच होय. कृष्णयजु सहिता ब्राह्मणमिश्र व भेसळीच्या स्वरूपाची असल्यामुळे तिला कृष्ण अथवा मलिन म्हणतात व शुक्ल यजुर्वेदात सहिता वेगळी आणि ब्राह्मण वेगळे असा ऋग्वेदासारखाच शुद्धपणा असल्यामुळे तिला शुक्ल असे म्हणतात ब्राह्मणातील ज्ञानाचाच पुढे पुराणात विस्तार झालेला आहे. तेव्हा 'वेदातील राष्ट्रदर्शनाचें स्वरूप ध्यानात घ्यावयाचे तर ब्राह्मण ग्रथाना टाळून चालणार नाही.

ब्राह्मणाबरोबरच आरण्यक ग्रथाचेहि, वेदवाङमयातील जीवन समजावून घेण्याच्या दृष्टीने अत्यत महत्त्व आहे आरण्यकात यज्ञाच्या रहस्यविद्येचे प्रतिपादन आहे. सायणाचार्यानी ऐतरेय ब्राह्मणावरील आपल्या भाष्यात वनात राहणारे वानप्रस्थ लोक जे यज्ञ वगैरे करीत त्याचे वर्णन या ग्रथात असून 'अरण्य एव पाठ्यत्वात् आरण्यकमितीर्यते।' म्हणजे अरण्यातच त्याचा पाठ होत असल्यामुळे त्याला आरण्यक असे नाव पडले असे म्हटले आहे. पण गोपथ ब्राह्मण व बौधायन धर्मसूत्र यात रहस्यग्रथ म्हणून आरण्यकाचे वर्णन केले आहे आरण्यक वाङमयात वर्णाश्रमधर्म सस्थेचा पूर्ण विकास व यज्ञसस्थेची तात्त्विक प्रणालि सागितलेली आहे. यानतरचा वेदात अतर्भूत होणारा सर्वांत महत्त्वाचा भाग म्हणजे उपनिषद् वाङमय होय त्याना वेदपुरुषाचे मस्तक (श्रुतिशिर·) असे म्हटले आहे भारतीय तत्त्वज्ञानाचे सर्वश्रेष्ठ ग्रथ म्हणून उपनिषदाचे महत्त्व अनन्यसामान्य आहे. त्याना टाळून केलेला वैदिक जीवनाचा कोणताहि विचार अपुराच ठरणार

वस्तुत वेदवाङमय म्हणजे हे वर उल्लेखिलेलेच वाङमय होय पण वेदागाच्या साह्यावांचून वेदाचा उलगडा होण्याचीच शक्यता

नसल्यामुळें वैदिक जीवनाचा विचार करताना वेदांगाना टाळून चालणार नाही. प्राचीन काळी ज्ञानसंपन्न पुरुषाला कोणकोणत्या विद्या याव्यात याचा निर्देश जेथे केला आहे, तेथे ब्राह्मणानी कोणताहि हेतु मनात न धरता षडग वेदाचे अध्ययन करावे असे म्हटले आहे (ब्राह्मणेन निष्कारण षडगो वेद अध्येतव्य ज्ञेयश्च) या षडगापैकी पहिले महत्त्वाचे अग म्हणजे शिक्षा हे होय. शिक्षा म्हणजे 'फोनेटिक्स' चे अथवा उच्चाराचे शास्त्र होय वेदाच्या अपौरुषेयत्वाचा विषय माडताना पूर्वार्धात स्वरप्रक्रिया व उच्चार शास्त्राचे वैदिकाना केवढे विलक्षण महत्त्व वाटत होतें हे दाखवून दिलेच आहे. प्राचीन काळी प्रत्येक वेदाचा स्वतत्र शिक्षा ग्रथ असे. प्राचीन काळच्या अनेक वेदसहिताचा जसा लोप झाला तसाच प्रत्येक शाखेच्या या शिक्षा ग्रथाचाहि लोप झाला आहे अलीकडे शुक्लयजुर्वेदाची याज्ञवल्क्य शिक्षा, सामवेदाची नारदशिक्षा व अर्थववेदाची माडुक्य शिक्षा एवढेच काय ते शिक्षा ग्रथ उपलब्ध आहेत ऋग्वेदासाठी पाणिनीय शिक्षेविना दुसरे कोणतेही साधन नाही.

दुसरे महत्त्वाचे वेदाग म्हणजे कल्पसूत्रे होत कल्प म्हणजे विधि, नियम अथवा न्याय, आणि सूत्र म्हणजे थोड्या अक्षराची साररूप निर्दोष अशी वाक्यरचना कल्पसूत्रे याचा अर्थ विधि, नियम व न्याय सागणारी, सक्षिप्त, सारवान् व दोषरहित वाक्ये होत कल्पसूत्र हे सर्वात महत्त्वाचे वेदाग आहे प्राचीन हिदु जीवनातील सर्व नित्य, नैमित्तिक, काम्य इ कर्मे आणि वैयक्तिक व सामाजिक स्वरूपाचा सर्व प्रकारचा व्यवहार याचे एकमात्र ज्ञापक ग्रन्थ म्हणजे ही कल्पसूत्रे होत वैदिक धर्मातील सर्व कर्मे, सर्व सस्कार, सपूर्ण व्रते व सामाजिक आणि धार्मिक रीतोभाती याचे यथार्थ स्वरूप केवळ या कल्पसूत्रामुळेच समजू शकत असल्यामुळे त्याच्या अध्ययनावाचून भारतीय सास्कृतिक जीवन समजू शकणे केवळ दुरापास्त आहे. कल्पसूत्रे चार प्रकारची असतात श्रौतसूत्र, गृह्यसूत्र, धर्मसूत्र व शुल्बसूत्र असे कल्पसूत्रांचे चार

विभाग आहेत. वेदात सांगितलेल्या यज्ञसंस्थेचे स्वरूप विधान-विवरणासहित सांगणारे जे ग्रन्थ त्यांना श्रौतसूत्रे म्हणतात. मनुष्याच्या जन्मापासून मृत्यूपर्यंतच्या त्याच्या गृहजीवनातील सर्व प्रकारच्या धार्मिक कर्तव्यांचे वर्णन व विवरण ज्या वाङमयात आहे त्यांना गृह्यसूत्रे म्हणतात राजा आणि प्रजा यांचे संबंध वैदिक राष्ट्राचा आर्थिक व्यवहार, वैदिक राष्ट्राचा सामाजिक स्वरूपाचा धार्मिक व्यवहार, परस्पर वर्णांचे चातुर्वर्ण्यात्मक समाज-रचनेत परस्पराशी असलेले संबंध, भिन्न भिन्न पारमार्थिक, सामाजिक राजनैतिक कर्तव्ये, चारहि आश्रमांची कर्तव्ये, विविध जातींची कर्तव्ये, विवाह, उत्तराधिकार इत्यादि सामाजिक जीवनाची पूर्ण कल्पना देणारे जे वाङमय त्याला धर्मसूत्रे असें म्हणतात. वैदिक राष्ट्राचे सामाजिक जीवन अभ्यासण्याच्या दृष्टीने या धर्म-सूत्रांचे महत्त्व अनन्यसामान्य आहे शुल्बसूत्रे म्हणजे यज्ञमंडप, वेदी, यज्ञकुंडाची रचना इत्यादि सर्व गोष्टींचे भूमिति-शास्त्राच्या व रेखागणिताच्या स्वरूपाचे ज्ञान देणारे वाङमय होय या शुल्ब-सूत्रापासूनच पुढे भूमितिशास्त्र व रेखागणिताचे शास्त्र विस्तारले असे संशोधकांचे मत आहे समाजशास्त्र, वैयक्तिक गृहजीवन आणि यज्ञप्रक्रिया यांचे ज्ञान होण्याचे मुख्य साधन ही चारहि प्रकारची कल्पसूत्रे असल्यामुळे त्यांचा उपयोग करून घेतलाच पाहिजे त्याविना होणारे विवेचन नेहमीच अपुरे व त्रुटित राहील.

यानंतर वेदाचे महत्त्वाचे अंग व्याकरण हे होय त्याचे पारि-भाषिक नाव प्रातिशाख्य असे आहे, व ते पडण्याचे कारण पूर्वी प्रत्येक शाखेचे एक स्वतंत्र व्याकरण असे हे आहे या प्रातिशाख्य वाङमयाचा पुष्कळच लोप होऊन हल्ली केवळ सहा प्रातिशाख्ये उपलब्ध आहेत

वेदाचे यानंतरचे महत्त्वाचे अंग म्हणजे निरुक्त होय वेदाचा निघंटु नावाचा शब्दकोश अथवा शब्दसंग्रह असून त्यावरची यास्काचार्यांची टीका निरुक्त या नावाने प्रसिद्ध आहे एवढें एकच निरुक्त आज उपलब्ध आहे. आचार्य यास्कांनी आपल्या

पूर्वी होऊन गेलेले औपमन्यव, वार्षायणि, गार्ग्य, आग्रायण शाकपूणि,आर्णवाभ,तैटिकी,गालव,स्थौलाष्ठीवि, क्रौष्टुकि,कात्थक्य इत्यादि निरुक्तकाराची नावे उल्लेखिली आहेत शिवाय अपरे, अन्य, आचार्या इ शब्दानीहि त्यानी अनेकाचा निर्देश केलेला आहे, यास्काच्या वेळी आधिदैवत, अध्यात्म, आख्यानसमय, ऐतिहासिक, नैदान, नैरुक्त, परिव्राजक, पूर्वयाज्ञिक, याज्ञिक इत्यादि वेदाचा अर्थ करणाऱ्याचे अनेक संप्रदाय होते आज यास्कानी आपल्या निरुक्तात इतराच्या नावाचा व मताचा उल्लेख केला आहे एवढ्याचमुळे केवळ आपल्याला त्याची अधुक कल्पना येऊ शकते वेदाच्या सहितेतून इतिहास काढावयास केवळ दोनच मार्ग उपलब्ध आहेत असे ज्ञानकोशकार डॉ केतकर यानी जे म्हटले आहे ते सत्य आहे ते म्हणतात, " वेदकालाची एकदर सास्कृतिक स्थिति कशी होती यावर पुरावा दोन प्रकारचा आहे एक पुरावा म्हटला म्हणजे वेदातील शब्द व वेदातील उल्लेख, आणि दुसरा पुरावा म्हटला म्हणजे महाभारतादि ग्रथातील प्राचीन इतिहास प्राचीनकालच्या परिस्थितीचा इतिहास जितका साकल्याने लिहिता येईल तितका लिहावा असे आपण मनात आणले आणि साहित्य शोधू लागलो म्हणजे एक मोठे साहित्य पुढे दृष्टीस पडते ते साहित्य म्हणजे सहितान्तर्गत शब्दसृष्टि होय" (महाराष्ट्रीय ज्ञानकोश खड ३ रा बुद्धपूर्व जग पृष्ठ १५३, १५४) पण या शब्दसृष्टीचा मन मानेल त्या पद्धतीने उपयोग करण्यानेहि फसगत होण्याचा बराच सभव असतो वेदातील शब्दाचा व त्यात अतर्हित असणाऱ्या कल्पनाचा उलगडा निरुक्ताच्या साह्यावाचून होण्याची शक्यता नाही वैदिक राष्ट्राचा इतिहास समजावयास निरुक्ताचा केवढा उपयोग आहे हे यावरून स्पष्ट होते. वर्णागम, वर्णविपर्यय वर्णविकार, वर्णविनाश व धात्वर्थसबध हे निरुक्ताचे मुख्यत: कार्य आहे निरुक्ति आणि व्युत्पत्ति यात थोडा फरक आहे व्युत्पत्ति केवळ शब्दाचे व्याकरण सागते पण निरुक्ति म्हणजे शब्दासबधाने जे जे काही म्हणावयाचे असेल ते ते सर्व सागणे (नि शेष उक्त) होय.

निरुक्तकार यास्काचार्यासबधीचा अलीकडच्या लोकानी उत्पन्न
ाेलेला एक समज किती चुकीचा आहे हे येथेच सागणे मला
ावश्यक वाटते कौत्स आणि यास्क हे दोन भिन्न विचारप्रणालीचे
वर्तक असे आचार्य होते असे निरुक्तावरून आढळून येते त्याच्या
की वेद हे मत्र असल्याकारणाने त्याचा अर्थ करण्याची काही
ावश्यकता नाही, केवळ उच्चाराने सर्व काम भागेल आणि
ीवाचे कल्याण होईल असे म्हणणारा जो संप्रदाय होता त्याचे
ढारी किवा आचार्य कौत्स हे होते रघुवशात कालीदासाने वर्णन
ाेलेले वरततुशिष्य कौत्स व हे कौत्स एकच होत की नाही या
बधी सशोधकात मतभेद आहे यास्क हे मात्र " स्थाणुरय भार-
ार किलाभूत् । अधीत्य वेदं न विजानाति योऽर्थ ॥ " ( जो
दाचें अध्ययन करून त्याचा अर्थ जाणीत नाही तो केवळ भार-
ाहक होय) अशा मताचे होते. पण येथे हे लक्षात ठेवले पाहिजे
ी ते केवळ अर्थवादी नव्हते वेदाचा अर्थ करणे आवश्यक आहे
ासे जरी यास्काचार्याचे मत असले तरी आज समजतात त्याप्रमाणे
वेदाच्या शब्दाच्या उच्चाराकडे आणि स्वरप्रक्रियेसह वैदिक
हिता कंठस्थ करण्याच्या पद्धतीकडे एक प्रकारे हेटाळणीनें
हाणारे अर्थवादी होते असे समजण्याचे कारण नाही यास्का-
ार्याची भूमिका नीट समजावून घ्यावयाची असली तर ते केवळ
र्थवादी नसून शब्दार्थवादी होते ही गोष्ट ध्यानात ठेवली पाहिजे.
ळबहुना यास्क हे वेदवाङमयाचे मत्रमय स्वरूप मान्य करणारे
ाेते म्हणूनच त्याना प्राचीन वाङमयात विशेष प्रकारचे महत्त्व
त्पन्न झालेले आहे

वैदिक सहिताची रचना यज्ञक्रियेसाठी झालेली असल्यामुळे
ाणि यज्ञ म्हटले की नक्षत्र, मुहूर्त, ऋतु इ सर्व गोष्टीशी सबध
त असल्यामुळे ज्योतिषालाही वेदागाचे महत्त्व प्राप्त झाले
ाहे वैदिक ज्योतिषविद्येचे आचार्य लगध याचे वेदाग ज्योतिषा-
रील एक ऋग्वेदावर व दुसरा यजुर्वेदावर असे दोनच ग्रन्थ
ाज उपलब्ध आहेत.

सर्वच वैदिक मत्र, छदामध्ये उपलब्ध असल्यामुळे छन्दाच्या ज्ञानावाचून वैदिक स्वराचा शुद्ध व योग्य उच्चार होण्याची शक्यता नाही एवढ्यासाठी छन्द नावाच्या वेदागाचा जन्म झाला आहे शौनकाच्या ऋक्प्रातिशाख्याच्या शेवटी छन्दासबंधी पुष्कळच विचार केला आहे छदोनुक्रमणी इ ग्रथातूनहि या विषयाचा काही विचार सापडतो परतु मुनि पिगलाचे छदःशास्त्र हा एकच या विषयावरील खरा महत्त्वाचा ग्रन्थ होय आज वैदिक छन्दाचा इतका सर्वकष आढावा घेणारा दुसरा कोणताहि ग्रन्थ उपलब्ध नाही ही षडगे पूर्णपणे आपल्या डोळ्यासमोर ठेवून मी माझ्या विषयाचे प्रतिपादन करणार आहे. त्यातहि विशेषतः कल्पसूत्र वाङ्मयाचा उपयोग करणार आहे. हे प्रारंभीच उल्लेखिणे मला आवश्यक वाटते. सपूर्ण वेद-वेदागाशिवाय वैदिक राष्ट्राचे सम्यक् दर्शन कोणालाहि केवळ अशक्य आहे.

वेदवाङ्मयाकडे पाहताना प्राचीन इतिहासातील आपल्या विकसनाची व पतनाची नीट कारणमीमासा करण्यासाठी या सर्व वाङ्मयामध्ये जे काही वर्णन आहे, ते यथावत् जसेच्या जसें पाहून व परीक्षून त्याच्यावरून आपण आपली अनुमाने काढली पाहिजेत अलीकडे एक मोठी अनिष्ट प्रवृत्ति उत्पन्न झाली आहे ती अशी की, आधी एक सिद्धान्त आपल्या मनात ठरवावयाचा व त्याच्या सिद्धीसाठी विशिष्ट प्रकारे कृत्रिम इतिहासाची निर्मिति करावयाची या इतिहासाच्या निर्मितीचा परिणाम ऐतिहासिक सत्याचा अपलाप करण्यात व यथार्थ घटनाच्या विकृतीकरणात होत असतो आपल्या राष्ट्राच्या ऐतिहासिक विकासाची व पतनाची कारणमीमासा आपण नीट करू शकणार नाही तर आपला भविष्यकाळ बनविणे आपल्याला अत्यत कठीण जाईल मुळातील कारणमीमासाच जर अनैतिहासिक व चुकीची असली तर त्यावरून काढण्यात येणारे निष्कर्ष, अनुमानें व घोषणाहि चुकीच्याच ठरतात या विकृतीना कृत्रिम इतिहासाचा आधार उत्पन्न करण्याचा हल्ली प्रयत्न चालू आहे, व

त्याचे एक अध्वर्यु भारताचे पतप्रधान प जवाहरलाल नेहरू हे आहेत असे मी उघडपणे म्हटले तर आपण आश्चर्य वाटू देऊ नये पडितजीचा अधिनायकवाद हल्ली अशा शिगेला पोहोचला आहे की नुसत्या राजकारणाच्याच नव्हे तर शास्त्राच्या, ज्ञानाच्या, इतिहासाच्या व समाजशास्त्राच्या क्षेत्रातहि त्याने एक प्रकारची दडपेगिरी चालविली आहे हैद्राबादला त्यानी घोषित केले की उर्दू ही सस्कृतोद्भव भाषा आहे बिचाऱ्या भाषापडिताची त्यामुळे कोण ताराबळ? हिंदू कोड बिल समत झाल्यावर त्यानी घोषणा केली की याने आदर्श समाजरचना उत्पन्न होईल असे आपणास मुळीच वाटत नाही मग त्यासाठी स्वत चे व्यक्तित्व पणाला लावून ते कायद्यात रूपातरित करण्याचा व भारतीय समाजरचनेच्या स्थिरपायाला अकारण सुरुग लावण्याचा उपद्व्याप पडितजीनी कशासाठी केला? भारतीय समाजरचनेमुळेच भारत राष्ट्राचे अध पतन झाले व भारतातील वर्णव्यवस्थेमुळेच भारतीय राष्ट्र हे एक प्रकारचे डबक्यातील कुजलेल्या पाण्याप्रमाणे झाले हा पडितजीचा एक आवडता सिद्धान्त आहे, हा अनैतिहासिक सिद्धान्त सिद्ध करण्यासाठी त्याच्या प्रेरणेने नवीन इतिहास निर्माण करण्याचे प्रयत्न सुरू झाले आहेत अमकी एक गोष्ट इतिहासात सिद्ध होत नाही काय? मग मी नवाच इतिहास लिहून ती सिद्ध करणार असा हा विलक्षण सिद्धान्त आहे! वर्तमानाप्रमाणेच भूत-कालावरहि स्वत चा अधिनायकवाद लादण्याची ही कल्पना अचाट आहे यांत शका नाही पडिजीच्याच शब्दात सागावयाचे म्हणजे त्याचे एक मित्र व साथी श्री रामधारीसिह दिनकर याचे अगदी अलीकडे प्रसिद्ध झालेले 'सस्कृतिके चार अध्याय' हे शतावधि पृष्ठाचे पुस्तक हे कृत्रिम इतिहास निर्माण करण्याच्या प्रयत्नाचे अगदी ताजे उदाहरण आहे या पुस्तकाला प जवाहरलाल नेहरू यानी स्वत प्रस्तावना लिहिली असून ते राष्ट्रपतीना समर्पण करण्यांत आले आहे असे ऐकतो की, या पुस्तकाच्या प्रकाशना-साठी सरकारी रीत्या भरपूर आर्थिक साह्यहि झाले आहे. प्रस्तुत

पुस्तकात भारतीय सस्कृति ही केवळ उसनवारीची आहे हे सिद्ध करण्यासाठी वेदापासून तर वर्तमानकाळापर्यंतच्या सर्व भारतीय इतिहासाचे यथेच्छ विडबन करण्यात आले आहे या पुस्तकासबधात मी दिल्लीच्या 'नवभारत टाइम्स' ला एक विस्तृत पत्र पाठविले होते ते पत्र मी मुळात हिदी भाषेत पाठविले होते, त्याचा मराठी अनुवाद मी येथे देतो म्हणजे त्यावरून या विकृतीकरणाची पाळेमुळे किती खोल गेलेली आहेत व हा एक प्रकारचा कटच कसा आहे याची कल्पना येईल

श्री. सपादक 'नवभारत टाइम्स' दिल्ली

माननीय महाशय,

भारताचे महामत्री प. जवाहरलाल नेहरू याचे एक मित्र व साथी श्री रामधारीसिह दिनकर यानी नुकताच लिहिलेला 'सस्कृतिके चार अध्याय' हा ग्रथ दिल्लीच्या राजपाल अॅण्ड सन्सच्या वतीने प्रकाशित झालेला आहे हा ग्रथ श्रद्धेय राष्ट्रपति डॉ राजेद्रप्रसाद याना समर्पण करण्यात आलेला आहे ग्रथाचे भूमिकालेखक स्वत महामत्री जवाहरलाल नेहरू हे आहेत. आणि या ग्रथाच्या प्रकाशनासाठी सरकारच्या वतीचे भरपूर द्रव्यसाह्य देण्यात आले आहे असे ऐकतो याचा अर्थ असा होतो की ग्रथ-कर्त्याच्या विचाराचा प्रसार होणे स्वत भारतसरकारला आवश्यक वाटते, इतकेच नव्हे तर भारत सरकारच्या विचाराचा पुरस्कार ग्रथकर्ता करीत आहे. हा ग्रथ इतिहासाचा नसता आणि त्याचे स्वरूप केवळ आज काय घडवावे एवढ्याचेच प्रतिपादन करणे हें असते तर गोष्ट वेगळी होती परतु दुर्दैवाने हा ग्रथ इतिहासाचा आहे आणि या ग्रथात आपल्या आजच्या मन पूत सिद्धान्ताना सिद्ध करण्यासाठी हव्या तशा कल्पना इतिहासावर लादून इति-हासाचे हवे तसे विकृतीकरण करण्यात आलेले आहे या प्रकारच्या इतिहासाच्या विटबनेचे महामत्री नेहरूच्या द्वारे समर्थन व्हावे आणि भारत सरकारच्या वतीने अशा गोष्टीचा पुरस्कार व्हावा ही सत्य व पावित्र्य याची निर्दय हत्या आणि देशाचे दुर्दैव होय.

या इतिहासग्रथात करण्यात आलेल्या इतिहासाच्या विटबनेची काही प्रत्यक्ष उदाहरणेच मी येथे देतो

(१) ग्रथकर्त्यांने वारवार जोर देऊन सागितले आहे की वेदामध्ये यज्ञ आणि भोगवाद याचाच केवळ पुरस्कार असून तत्त्वज्ञान, भक्ति व सयमशीलता याचे नावहि नाही एवढ्याचसाठी बुद्ध, जैन वगैरे प्रतिक्रिया वेदाविरुद्ध उत्पन्न झाल्या याचा अर्थ इतकाच आहे की जगाला संस्कृतीचे ज्ञान करून देऊ इच्छिणाऱ्या महामत्र्याच्या या मित्राने वेदवाङमयावरील काही अप्रामाणिक मते केवळ वाचलेली असून ऋग्वेद सहितेचे सुद्धा त्याने नीट अध्ययन केलेले नाही नाहीतर नासदीय सूक्त, अस्य वामस्य सूक्त इत्यादि वाचल्यावर वेदामध्ये केवढे गभीर तत्त्वज्ञान व केवढा उत्कट साक्षात्कारवाद आहे याची त्याला नीट कल्पना येऊन असली विधाने करण्यास तो धजला नसता योगी अरविद घोषाचे ऋग्वेदावरील भाष्य व गीतारहस्यात लो टिळकानी नासदीय सूक्ताचे केलेले स्पष्टीकरण वाचल्यावर कोणत्याहि सत्यनिष्ठ व्यक्तीला वेदामध्ये केवळ यज्ञ आणि केवळ भोगवाद आहे हे सागण्याचे धाष्टर्य होणार नाही ऋग्वेदातील अग्निसूक्तातून व इद्रसूक्तातून जे उत्कट भक्तीचे भावनात्मक आविष्कार आढळतात ते पाहिल्यावर वेदात भक्तीचा जिव्हाळा आढळत नाही, असे म्हणणे केवढे धाडसाचे आहे हे कोणीहि ओळखू शकेल.

(२) ग्रथकर्त्यांने डॉ. सपूर्णानदाचे गणेश अवैदिक देवता आहे हे मत उल्लेखिले आहे; पण बनारसचे विख्यात पडित गणपति शास्त्री हेब्बार यानी त्या मताचे जे सप्रमाण खडन केले आहे त्याचा त्यानी अशत सुद्धा परामर्श घेतलेला नाही वस्तुत· डॉ. सपूर्णानद यानीच हेब्बार शास्त्री याचे मत मान्य केले आहे.

(३) आर्य बाहेरून हिदुस्थानात आले हे सिद्ध करणाऱ्या मताचा तेवढा निर्देश करून डॉ अविनाशचद्र दास प्रभृति विरोधी मत प्रतिपादन करणाऱ्या पडिताच्या मताचा साधा समालोचनात्मक परामर्श सुद्धा लेखकाने घेतलेला नाही. याला प्रामाणिकपणा म्हणतां येईल काय ?

( ४ ) भारतीय सस्कृति ही अनेक प्रवाहानी बनलेली मिश्र सस्कृति आहे हे सिद्ध करण्यासाठी केवळ अनुकूल लेखकाचे परिच्छेद देणे, सुनीतिकुमार चटर्जी याच्यासारख्या ज्या लेखकाच्या मताचे खडण अनेकवार झालेले आहे त्याच्याच मताचा केवळ मिश्र सस्कृतीच्या सिद्धीचे साधन म्हणून उपयोग करणे हे प्रकार या ग्रथात पुष्कळच आहेत. अनेक भिन्नवशीय लोकाच्या विचार-प्रणालीच्या अस्तित्वाचा कोणताही पुरावा अस्तित्वात नसताना, व तो तसा नाही हे स्वत च कबूल करूनसुद्धा पुन्हा या विचारधाराचा सगम म्हणजेच भारतीय संस्कृति होय असे वारवार म्हणत राहणे याला प्रामाणिक इतिहासलेखन म्हणता येणार नाही

( ५ ) ग्रथकार लिहितात, ‘ यह आग्रह बिलकुल नि सार है कि हिदुओका सारा धर्म और सारी सस्कृति वेदोसे निकली है । ’ ग्रथकार पुढे स्वत च लिहितात की, ‘ ऋग्वेद आर्योकाही नही, समस्त विश्वका प्राचीनतम ग्रथ है । ’ अशा या प्राचीनतम ग्रथात आज ज्याला हिदू म्हणून ओळखण्यात येते त्या तत्त्व-ज्ञानाचे सिद्धान्त, विवाहसस्थादि सामाजिक सस्थातील नीति-सकेत व सभ्याचारादि गोष्टीची पदचिन्हे जर आढळत असतील तर हिदूच्या धर्माचे आणि सस्कृतीचे मूळ वेद ठरणार नाही तर दुसरे काय ठरेल ! बुद्ध सप्रदायापासून शीख सप्रदायापर्यंत व आर्यसमाजापर्यंतही सर्व सप्रदाय सुधारणावादी होते. याचाच अर्थ असा की मूळ धर्मातील उदात्त तत्त्वाचे त्यानी ग्रहण केले व जे त्यांना अहितकारक दिसले ते त्यानी काढून टाकण्याचा प्रयत्न केला ज्या उदात्त तत्त्वाचे त्यानी ग्रहण केले, ती जर वेद व उपनिषदे यात आढळतात तर हिदूचा धर्म आणि सस्कृति याचे मूळ वेदात सापडते हे म्हणणे असार कसे ठरेल ?

( ६ ) इस्लामच्या सबधी लिहिताना या ग्रथकाराने सत्याची जी निर्दय हत्या केली आहे त्याला उपमा सापडणेही कठीण आहे. ग्रथकार लिहितात, ‘जब इस्लाम आया उसे इस देशमे फैलने मे देर नही लगी । तलवारके भयसे अथवा पदके लोभसे तो बहुत

थोडे लोग मुसलमान हुए । ज्यादा तो ऐसेही थे जिन्होने इस्लामका वरण स्वेच्छासे किया ।' . 'धर्मकी विजय उसके नेताओके कारण होती है । इस्लामकी विजय जिस त्वरासे हुई वही इसका प्रमाण है कि मोहम्मदसाहब और उनके उत्तराधिकारी खलीफे अत्यत उच्च कोटीके व्यक्ति रहे होगे ।' . 'इस्लामसे हिदूओकी भयकर घृणा तव आरभ हुई जब मोहम्मद गझनीने इस देशमे आकर क्रूरता बरती कितु महमूद गझनी या महम्मद घोरी ये लोग अरबी या इरानी नस्लके नही थे और न इतिहासमे उन्होने सच्चे इस्लामका प्रतिनिधित्वहि किया है । उनमे दूसरोका धन लूटनेकी भावना प्रधान थी । जिस इस्लामका प्रवर्तन हजरत मोहम्मदने किया था और जिसका रूप अबू बक्र, उमर, उस्मान और अली जैसे खलीफाओने सवारा था, वह धर्म सचमुच स्वच्छ धर्म था । और उसके अनुयायी राच्चरित्र, दयालु, उदार और ईमानदार थे ।' हजरत महमद पैगबर याच्या लपटपणासबर्वी व स्वत च केलेले कायदे आपल्या वासनेच्या परिपूर्तीसाठी मोडण्यासबधी त्याच्या चरित्रात पुष्कळ गोष्टी आहेत. पण त्या लिहून मी व्यर्थ जागा अडवीत नाही ग्रथकर्त्याने एकवार मूर याचे महमदाचे चरित्र वाचावे पण त्याच्या वैयक्तिक गोष्टी सोडल्या तरी प्रत्यक्ष त्याचा कुराणात असलेला उपदेश या दृष्टीने अभ्यसनीय आहे कुराणाच्या इग्रजी अनुवादातून व गिबनसारख्या मुस्लिम पक्षपाती लेखकाच्या ग्रथातून त्यानी उमर इत्यादि खास अरबी रक्ताच्या खलिफासंबधी जे लिहिले आहे त्यातून काही परिच्छेद मी येथे उद्धृत करतो म्हणजे त्यावरून महामत्री नेहरूचे हे साथी किती खोटे व भ्रमपूर्ण इतिहासलेखन करतात हे स्पष्ट होईल त्यानी स्वत पुन एकदा प्रामाणिकपणाने मुस्लिम इतिहास वाचावा पुढील काही परिच्छेदच पहा महमदाच्या उपदेशासबधी मूर म्हणतो –

The Koran, in this matter of slavery, is the enemy of mankind and women as usual are the gratest sufferers.
–( Muir's life of Mohomet).

'आता प्रत्यक्ष कुराणातीलच पुढील उतारा पहा Captive women are to be reduced to slavery and though already married may be taken as concubines The faithful are forbidden to contract friendship with Jews, Christians and unbelievers

–(The Koran by E H Palmer, chapter IV p 193))

ग्रथकर्ता ज्याच्याविषयी खूप आदर दाखवितो त्या अरबी रक्ताच्या उमर नावाच्या खलिफाच्या वेळी अमरू नावाच्या एका सरदाराने अलेक्झाड्रियावर स्वारी करून विजय सपादन केला तेथील प्रचड ग्रथसग्रहालयासबधी त्याने खलिफाला विचारणा केली त्यावर या अरबी वशाच्या उमर खलिफाने जे उत्तर दिले ते गिबनने आपल्या विख्यात रोमच्या इतिहासात पुढीलप्रमाणे वर्णिले आहे –

The well-known answer of Omer was inspired by the ignorance of a fanatic 'If these writings of these Greeks agree with the book of God, they are useless and not be preserved, if they disagree, they are pernicious and ought to be destroyed' The sentence was executed with blind obedience The volumes of paper or parchment were distributed to the four thousand baths of the City, and such was their incredible multitude that six months were barely sufficient for the consumption of this precious fuel –( The Decline and Fall of the Roman Empire Vol V. P. 534)

गझनीच्या पूर्वी खास खलिफाच्याच आदेशावरून महमद बिन कासीमने सिध प्रातावर जे अत्याचार केले आणि राजा दाहिराच्या मुलीशी खलिफाने जे वर्तन करण्याची इच्छा प्रदर्शित केली त्याचा दिनकर महाशयांना पत्ताही नाही असे दिसते ! व्यर्थच गझनी आणि

घोरी याना दोष देऊन काय होणार? गिबन याने इस्लामच्या-रानटीपणाचा दोष जो त्याच्या प्रवर्तकावर दिला आहे तोच सत्य आहे ग्रथकर्त्याचे असे म्हणणे आहे की, 'यह सस्कृति रसायनकी प्रक्रियासे तैयार हुई है एव उसके भीतर अनेक ओषधियोका रस समाहित है।'

अशा एका रासायनिक सस्कृतीची निर्मिति करण्याची भारत सरकार वा अन्य कोणाची इच्छा असणे ही वेगळी गोष्ट आहे परतु प्राचीन भारतीय सस्कृति अशीच होती हे हट्टाने सिद्ध करण्यासाठी इतिहासाची विटबना व सत्याची हत्या करणे अत्यत गर्हणीय आहे याने एक दुष्प्रवृत्ति वाढेल आणि ती इतिहास-सशोधनाचे क्षेत्र विषमय केल्याविना रहाणार नाही [1]

आपला

**बाळशास्त्री हरदास**

वैदिक राष्ट्राच्या सामाजिक व राजकीय जीवनाचे सत्य स्वरूप पहावयाचे असले तर जिज्ञासू व्यक्तीने या गोष्टीपासून स्वत ला वाचविले पाहिजे

वैदिक लोकाचे सामाजिक व राजकीय जीवन पाहण्यासाठी वेदमदिराच्या दारांतून आपण आत प्रवेश केला की प्रखर देशाभिमानाची त्याची दीप्तिमान् धारणा अत करण मुग्ध केल्या-विना रहात नाही तिचे स्वरूप आपण उद्याच्या व्याख्यानात पाहू.

---

१ प्रस्तुत पत्र पाटण्याचा 'आर्यावर्त,' कलकत्त्याचा लोकमान्य,' नागपूरचा 'युगधर्म,' लखनौचे 'पाचजन्य,' इत्यादि नामवत हिंदी पत्रानी अग्रलेखाशेजारी स्थान देऊन प्रसिद्ध केले होते.

✦ ✦ ✦

व्याख्यान दुसरें

# मातृभूमिविषयक भावना

वैदिक राष्ट्र हे जीवनाचे सर्वकष तत्त्वज्ञान असलेलें सिद्ध राष्ट्र होते याचे दिग्दर्शन यापूर्वी पूर्वार्धात केलेलेच आहे. कोणत्याही सिद्ध राष्ट्रात देशाभिमान व मातृभूमीविषयीचा उत्कट जिव्हाळा नादत असतो हे काहीं कोणास सागावयास नको ज्या भूमातेच्या धनधान्यरूपी स्तन्यावर आपण जगलो, जिच्या अमृतमधुर पाण्याने आपले व आपल्या पूर्वजाचे जीवन तृप्त केले, जिच्या अकावर आपल्या पूर्वजानी व आपण विश्वासाने आश्रय मिळविला व जिच्या प्रत्येक रज कणाच्या दर्शनाने आपल्या पराक्रमशाली पूर्वजाचा इतिहास आपल्या अत:करणात स्फूर्तीचे ताण्डव उत्पन्न करतो त्या मातृभूमीविषयी उत्कट जिव्हाळा प्रत्येक जातिवत अत करणात असतोच शेक्सपियरने केलेले इग्लडचे वर्णन, जोसेफ मॅझिनीने इटालीच्या तरुणाना दिलेले स्फूर्तिशाली सदेश, स्कॉटच्या कविता, अर्न्स्ट अर्न्ट (Ernst Arndt) ची जर्मनीविषयीची उत्कट भावना व्यक्त करणारे त्याचे उद्‌गार ही जगाच्या वाङमयाची अमर लेणी म्हणजे स्वदेशभक्तीच्या भावनेची अत्युत्कट प्रतीकेच होत प्रगत राष्ट्राच्या ज्ञात इतिहासाचा असा कोणताही कालखड नाही की ज्या कालखडात या भावनेचा उत्कट आविष्कार या ना त्या स्वरूपात झालेला पहावयास मिळत नाही या भावनेसाठी मनुष्याने सघश व व्यक्तिश प्राणत्याग व सर्व प्रकारचा स्वार्थत्याग करून जगाचा इतिहास एक प्रकारच्या दिव्यतेने उजळून टाकलेला आहे केवळ भौतिक विचारापासून व क्षुद्र सुखोपभोगांपासून परावृत्त करून उच्च वातावरणात विहरण्यास मनुष्याच्या अत:करणास लागणाऱ्या विलक्षण सामर्थ्याचा पुरवठा या भावनेने अनेकवार

केलेला आहे मानवाची देहबुद्धि करपवून टाकून स्वत च्या शरीराहून व आपल्या ममतेच्या मर्यादित विषयाहून वेगळ्या असलेल्या अमूर्त गोष्टीसाठी सर्वस्वार्पण करण्याचे असामान्य धैर्य देशाभिमानाच्या या भावनेने मानवात वारवार उत्पन्न केले आहे अमेरिकन क्रांतीच्या वेळी नॅथॅम हेल याने काढलेले 'I regret that I have but one life to lose for my counntry' हे उद्गार याच गोष्टीचे निदर्शक आहेत.

भारतवर्षात मातृभूमीच्या अमूर्त प्रेमासाठी हृदयाची होणारी तगमग अपरिचित नाही 'रक्ताळले शरीर। भडका जिवात झाला। आईस सोडवाया। येणार कोण बोला॥' हा परतत्र भारतमातेच्या प्रत्येक पुत्राला सेनापति बापटानी विचारलेला हृदयाचे पाणी करणारा प्रश्न, अथवा मनोमय मातृमूर्तीच्या स्मरणाने भावसमाधीत मग्न होऊन "ने मजसी ने परत मातृभूमीला, सागरा प्राण तळमळला" अशी स्वातत्र्यवीर सावरकरानी चालविलेली सागराची विनवणी ही या तगमगीची अत्युत्कट उदाहरणेच होत आपल्या वहिनीना पाठविलेल्या एका पत्रात तर वीर सावरकर म्हणतात –

त्वत्स्थडिलावरि बळी प्रिय बाळ झाला।
त्वत्स्थडिली बघ अता मम देह ठेला॥
हे काम बधु असतो जरि सात आम्ही।
त्वत्स्थडिलीच असते दिधले बळी मी॥
हे मातृभूमि तुजला मन वाहियेले।
वक्तृत्व वाग्विभवही तुज अर्पियेले॥

सावरकर व बापट या देशभक्ताच्या अत करणांत वर्तमान युगांत जी भारतमातेविषयीची उत्कट भावना आढळते तिचा आविष्कार प्रागैतिहासिक काळापासून तर सस्कृत भाषेच्या नि साहित्याच्या काळापर्यत आणि प्राकृत भाषाच्या भरभराटीच्या काळापासून तर वर्तमान युगापर्यत सारखाच उत्कट असलेला आढळून येईल. प्राचीन भारताच्या साहित्यातील स्वदेशभक्तीच्या

उत्कट आविष्कारासबंधी लिहितांना डॉ. बर्नार्ड जोसेफ याने असे म्हटले आहे :-

' Love of home land, from time immemorial, through Sanskrit literature, homeland more sacred than heaven itself, pilgrimage, chosen land For the Hindus, at any rate, their country has been glorified into an object of worship ' ( Nationality, its Nature and Problems P 230)

( प्राचीनतम काळापासून भारतात स्वदेशभक्तीची भावना असल्याचे आढळून येते सस्कृत वाङमयाचा मागोवा घेतला तर देवाने आपल्यासाठीच निर्माण केलेली भूमि, सर्वश्रेष्ठ तीर्थस्थल, स्वर्गापेक्षाही अधिक पवित्रतम अशा तऱ्हेची स्वत च्या मातृभूमी-विषयी भारतीयाची धारणा असल्याचे दिसून येतें हिंदूना तर त्याचा देश पूजेची प्रतिमा वाटावी असेच त्याच्या मनावर सस्कार करण्यात आले आहेत )

याप्रमाणे जगातील सर्वच प्रगत राष्ट्रात देशभक्तीची धारणा उत्कट स्वरूपात आढळते. आमच्याही राष्ट्रात ती धारणा प्रागैतिहासिक काळापासून आढळते हे जरी खरे असले तरी या दोन्ही धारणाचे मूळ स्वरूप मात्र एक नाही. उत्तरकालीन भारतीय साहित्याचे सूक्ष्म निरीक्षण केले तर असे आढळून येईल की आमची देशविषयक अथवा भूमिविषयक धारणा ही जगातील स्वदेशभक्तीच्या धारणेहून मुळातच वेगळ्या स्वरूपाची आहे. जगातील इतर लोक आपल्या भूमीवर जे प्रेम करतात ते ती त्याची केवळ पितृभूमि, मातृभूमि व फार तर मर्यादित अर्थाने पुण्यभूमि म्हणूनच होय म्हणजे विशिष्ट भूभागात त्याचे पूर्वज नादले व त्या पूर्वजानी निर्माण केलेला इतिहास त्या भूभागाशी सबद्ध आहे, त्याचा स्वत चा जन्म त्या भूभागातच झाला व त्याचा विशिष्ट पद्धतीचा धर्म अथवा त्या धर्माचा प्रवर्तक तेथे जन्म पावला या कारणासाठी त्या भूभागावर प्रेम करावयाचे हे मातृभूमिविषयक प्रेमाचे इतर राष्ट्रातून आढळणारे स्वरूप आहे. भारतीयाच्या

भारताविषयीच्या धारणेचे केवळ एवढेच स्वरूप नाही. आम्ही केवळ पितृभूमि व पुण्यभूमि म्हणूनच भारतावर प्रेम करीत नाही, तर कर्म-भूमि म्हणून भारतावर प्रेम करतो पितृभूमि व मातृभूमि म्हणून भूभागावर असलेले प्रेम कितीही कृतज्ञतेचे द्योतक व उदात्त असले तरी ते भावनाधिष्ठित आहे. त्या भावनेला तत्त्वाचे अधिष्ठान नसले तर ती क्षणभगुर ठरते व इतिहासाच्या प्रबल गतीत त्या भावनेची अधिष्ठाने बदलत जातात. केवळ पितृभूमि व मातृभूमि या कल्पनेवर अधिष्ठित असलेले देशाभिमानाचे स्वरूप ऐतिहासिक व इतिहासनियत असते, व इतिहासाचा ओघ पाहिला तर कर्तृत्ववान् पुरुषाचे कर्तृत्व केवळ त्याच्याच पूर्वजाच्या देशाशी सबद्ध असतेच असे म्हणता येत नाही. नेपोलियन बोनापार्ट हा मूळचा कार्सिकन, पण त्याच्या कर्तृत्वाने भाग्य मात्र फ्रान्सचे उदयास आले इतके की आज फ्रेंच राष्ट्राच्या प्रेरणेचा परवलीचा शब्द 'नेपोलिअन' ठरावा. नाझीवाद व जर्मन राष्ट्र याची एकात्मता वर्तमान युगात कशी झाली होती हे काही कोणाला सागावयास नको पण या विचारप्रणालीचा तात्त्विक जनक अल्फ्रेड रोझेनबर्ग हा मात्र मूळचा बाल्टिक होता चिनी जीवनाचा विलक्षण ध्यास घेतलेली व त्यावर नोबेल प्राइज मिळण्यासारखे सर्वोत्तम ललित लेखन करणारी पर्ल बर्क ही ललितलेखिका वस्तुत अमेरिकन होय. अमेरिका राष्ट्राच्या देशाभिमानाचीच गोष्ट घेतली तर काय दृष्टोत्पत्तीस येते? वस्तुत अमेरिका ही आज ज्याच्या अधीन आहे त्याची ती पितृभूमि व मातृभूमि निश्चितच नव्हे हे काही कोणास सागावयास नको. ती पितृभूमि व मातृभूमि असलीच तर रेड इडियन्सची आहे आजच्या अमेरिकनाची खरी पितृभूमि म्हणजे पृथ्वीच्या पाठीवरील सर्वच विख्यात देश होत त्यातील बहुसख्याकाची खरी पितृभूमि तर इग्लडच आहे पण अमेरिकनाना त्याच्या मूळभूमीविषयी कसलेही सोयरसुतक उरलेले नसून पितृ-भूमि व मातृभूमि या शब्दातून व्यक्त होणाऱ्या साऱ्या उत्कट भावना त्यानी अमेरिकेच्या भूप्रदेशाशी निगडित केलेल्या आहेत

निव्वळ इतिहासजन्य व इतिहासनियत अशी देशाभिमानाची भावना अधिष्ठानाच्या दृष्टीने गतिमान् इतिहासाच्या ओघात कशी परिवर्तनशील ठरते याचे हे अविस्मरणीय उदाहरणच होय. भारतीयाची देशाभिमानाची धारणा अशी परिवर्तनशील असल्याचे भारतीयाच्या प्रागैतिहासिक काळापासून तर आजपर्यंतच्या इतिहासात कोणालाही दाखवून देता येणार नाही कारण ती जगातील भारतेतर राष्ट्रातील देशाभिमानाच्या धारणेप्रमाणे निव्वळ इतिहासजनित व इतिहासनियत नाही. तर ती निसर्ग-नियमावर अधिष्ठित, जीवाच्या विकासशास्त्राशी आत्मीयतेनें सबंधित असणारी व म्हणूनच तात्त्विक अधिष्ठान असलेली शास्त्रीय स्वरूपाची आहे. म्हणूनच भारतीयाचे देशाभिमानाचे अधिष्ठान इतिहासाच्या ओघात कधी बदलले नाही व भारतीय राष्ट्राची अस्मिता जोवर जिवत आहे तोवर ती बदलण्याची शक्यताही नाही कारण भारतीय राष्ट्रजीवनाच्या अस्मितेचे भारतवर्षाविषयीची श्रद्धा हे एक अविभाज्य अग होऊन राहिलेले आहे पितृभूमि व मातृभूमि हे देशाभिमान व्यक्त करणारे शब्द केवळ इतिहासजन्य व इतिहासनियत भावनेचाच आविष्कार करणारे आहेत म्हणूनच निसर्गनियमास धरून असलेल्या आमच्या देशविषयक शास्त्रीय धारणेला यथार्थपणे व्यक्त करणारा 'कर्म-भूमि' हा शब्द भारतीय द्रष्टयानी प्रचारात आणलेला आहे. आमची देशविषयक धारणा इतिहासजन्य तर आहेच; पण शिवाय ती शास्त्रीयही आहे व म्हणूनच आम्ही असे म्हणतो की भरतभूमि ही आमची पितृभूमि व पुण्यभूमि तर आहेच, पण त्याचबरोबर ती आमची कर्मभूमीही आहे. डॉ. जोसेफ बर्नार्ड याने म्हटल्याप्रमाणे भरतभूमि ही आमची पूजेची प्रतिमा होण्याचे वस्तुत हे कारण आहे.

कोणत्याही लोकसघाला एखादी विशिष्ट भूमि लाभली तर तो अपघाताचाही एक प्रकारे विषय असू शकतो. आम्ही एखाद्या विशिष्ट देशात जन्म पावलो यात आमचे स्वत चे असे कर्तृत्व

काहीच नसतें. व दुसरे कोणी लोक दुसऱ्या कोणत्या देशात जन्म पावल्यामुळे ते वास्तविक नाकर्तेही ठरू शकत नसतात परतु याहून अधिक शास्त्रीय पायावर आमचा देशाभिमान उभा आहे हे ‘ कर्मभूमि ’ या शब्दाने आम्ही स्पष्ट करू इच्छितो या भूमीत जगातील इतर भूभागाहून जीवविकासशास्त्राशी सबद्ध असे काही तरी वेगळे वैशिष्टय असल्याचा भारतीय द्रष्टयाचा अनुभव आहे व म्हणून त्यानी भोगभूमि व कर्मभूमि या परिभाषेने जगाचे दोन विभाग करून जगातील सर्व भूप्रदेश हा भोगभूमि असून भारतवर्ष ही मात्र कर्मभूमि आहे असे कठरवाने सागितले आहे.

अत्रापि भारत वर्ष जम्बुद्वीपे विशेषत ।
यतो हि कर्मभूरेषा अतोऽन्या भोगभूमय ।।

( सर्व विश्वात जम्बुद्वीपातील भारतवर्षाचे एक वेगळेच वैशिष्टयपूर्ण स्थान आहे कारण की भारतवर्ष ही कर्मभूमि असून इतर सारे भूप्रदेश हे केवळ भोगभूमि होत ) असे पुराण वाङमयातून स्पष्ट शब्दात वर्णन केलेले आढळते व त्याचेच प्रतिबिब श्रीएकनाथ महाराजासारख्या वीतराग व अहकारशून्य पुरुषाच्या ‘ भरतखडी नरदेह प्राप्ती । हे तो परम भाग्याची सपत्ति ।। ’ या प्रत्ययपूर्ण उद्‌गारातूनही पडलेले आहे श्रीमद्‌-भागवतात तर असे म्हटले आहे की ‘ गायन्ति देवा किल गीतकानि धन्यास्तु ये भारतभूविभागे ’ ( जे भारतात जन्म पावतात त्याच्या सद्‌भाग्याची स्तुतिस्तोत्रे देवही गात असतात )’ या भूमीमध्ये पशु, पक्षी, कृमि, कीटक, इतकेच काय, पण वृक्ष, पाषाण होऊन राहणेही परम भाग्याचे आहे, अशा स्थितीत कर्म करून नराचा नारायण होण्याचे साधन असलेले हे मनुष्य-शरीर प्राप्त होणे केवढे भाग्याचे असेल ! असा विश्वास पुराण-वाङमयापासून तर सतसाहित्यापर्यत सर्वत्र प्रकट केलेला आढळेल विशेषत: या दृष्टीने मातृभूमीचे एक उत्तानगीत म्हणून ब्रह्म पुराणातील २५ वा अध्याय प्रत्येकाने कण्ठस्थ करण्या-सारखा आहे भारत व भारतेतर हे जगाचे दोन भाग कल्पून

भारतभूमि ही कर्मभूमि व इतर साऱ्या भोगभूमि म्हणून उद्घोषिणाऱ्या भारतीय द्रष्टयाच्या प्रखर अस्मितेवर जस्टिस वुड्रॉफ याच्यासारखे पाश्चात्य विचारकही मुग्ध होऊन गेले आहेत. जस्टिस वुड्रॉफ हे आपल्या Is India Civilised या निबधात म्हणतात –

' Distinguished thinker Professer Lowes Dickinson, in an essay which seeks with justice to define the character of Indian civilization, profoundly remarks that it is so unique that the contrast is not so much between East and West as between India and the rest of the world Thus India stands for something which distinguishes it from all other peoples, as such she calls Herself a Karma Bhumi as opposed to the Bhoga Bhumi of all other poople For this she has been wonderfully preserved until to-day. Even now we can see the life of thousands of years ago –(Is India Civilized? P 115)

(विख्यात विचारवन्त प्रो लोवेस डिकिन्सन याने एक निबध लिहिलेला आहे या निबधात त्याने नि पक्षपाती न्यायदृष्टीने भारतीय सस्कृतीचे प्रकृतिगत वैशिष्टय विशद करण्याचा प्रयत्न केलेला आहे. या निबधात तो ठासून म्हणतो की ' पूर्व व पश्चिम असा हा भेद नसून भारत व भारतेतर या स्वरूपाचा हा भेद आहे ही अत्यंत अपूर्व गोष्ट आहे याचा अर्थ असा की, हिदुस्थान काही एका खास वैशिष्टयाचे प्रतिनिधित्व करीत आहे व तें वैशिष्टय इतर सर्व लोकाहून त्याचा असणारा वेगळेपणा सिद्ध करते या वैशिष्टयाचे व्यक्तीकरण करण्यासाठीच भारत स्वत ला कर्मभूमि म्हणून सबोधितो, व याच्या उलट इतर सर्व प्रदेशाना भोगभूमि अशी सज्ञा देतो. येवढयासाठीच आजपर्यंत आश्चर्य-कारक रीतीने भारत जसाच्या तसाच सरक्षिण्यात आला आहे. आजसुद्धां आपण सहस्रावधि वर्षांपूर्वींचें त्या देशातील जीवन जसेच्या तसे पाहू शकतो.)

कर्मभूमि म्हणून शास्त्रीय तत्त्वप्रणालीवर अधिष्ठित असलेली भारतीयाची ही देशविषयक धारणा प्रत्यक्ष वेदसहितेतूनहि आढळते हे पाहून कोणाचे हृदय भरून येणार नाही ? आमच्या देशविषयक धारणेची सर्व वैशिष्टचे वेदसहितेतून कशी प्रकट झाली आहेत हे पाहणे जसे आत्मगौरवाचे तसेच उद्बोधकहि आहे. आमच्या देशविषयक धारणेची वैशिष्टचे व वेदसहितेतून होणारा त्याचा आविष्कार पुढीलप्रमाणे दाखविता येईल:––

(१) आम्ही आमच्या भारतभूमीला सजीव व चैतन्यमयी मातृमूर्ति समजतो आमचे मातृभूमिभक्त पूर्वज सकाळी उठल्या-बरोबर, अगतिकतेने भूमातेला पादस्पर्श करावा लागतो याची मनोमन खत वाटून भूमीवर पहिला पदन्यास करण्यापूर्वी प्रार्थना करीत की––

समुद्रवसने देवि पर्वतस्तनमण्डले ।
विष्णुपत्नि नमस्तुभ्य पादस्पर्श क्षमस्व मे ।।

हे समुद्रवसने, पर्वतस्तनमण्डले, परमेश्वराच्या अर्धांगिनी, देवी ! तुला प्रणाम असो विवश होऊन अगतिकतेने मला तुला चरणस्पर्श करावा लागत आहे. तरी तू मला क्षमा कर ' अशी क्षमा मागून नतरच मोठ्या विनयाने भूमीवर पाय ठेवीत मातृभूमी-विषयीचा हा जिवत भाव व सुकोमल मनोवृत्ति ऋग्वेद, अथर्ववेद इत्यादि वेदसहितेच्या द्रष्टचानी अत्यत उत्कटतेने व्यक्त केल्या आहेत ऋग्वेदात म्हटले आहे ––

उप सर्प मातर भूमि एता उरुऽव्यचस पृथिवी सुऽशेवाम् ।
ऊर्णऽम्रदा युवति दक्षिणाऽवते एषा त्वा पातु नि ऽऋते उपऽस्थात्।।
उत् श्वञ्चस्व पृथिवि मा नि बाधथा सुऽउपायना अस्मै भव सुउपवञ्चना । माता पुत्र यथा सिचा अभि एन भूमे ऊर्णुहि ।।

–(ऋग्वेदसहिता १०–१८–१० व ११)

(तू आता या भूमातेकडे–या सुमगल आणि विस्तीर्ण पृथिवी-कडे जा. दानशूर पुरुषाला ही जी मखमालीप्रमाणे मृदू लागते ती

ही यौवनसपन्न पृथिवीच दुर्गतीपासून तुझे रक्षण करील हे धरित्री! वरच्यावर सावरून रहा ह्या मृताला इजा करू नकोस त्याचे लाड पुरीव त्याची समजूत कर आणि कोमल मनाची आई जशी लेकराला पदराखाली झाकून घेते त्याप्रमाणे हे भूमि, ह्याच्यावर तू आपले पाघरूण घाल )

देशभक्तिविषयक भावनेचे उज्ज्वल स्वरूप वेदसहितातून सर्वच ठिकाणी अभिव्यक्त झाल्याचे प्रत्ययास येते, हे सिद्ध करण्यासाठी मी हेतुत ऋग्वेदातील मत्र उल्लेखिले पण जेथे हे स्वरूप विशेष प्रकारे अभिव्यक्त झाले आहे ते प्रकरण म्हणजे अथर्ववेदातील पृथ्वीसूक्त होय. हे पृथ्वीसूक्त अथर्ववेदाच्या शौनकसहितेच्या बाराव्या काण्डातील पहिलेच सूक्त असून त्यात त्रेसष्ट मत्र आहेत. त्यातील प्रत्येक मत्र म्हणजे देशभक्तीचे ऊर्जस्वल गीत होय मी माझ्या पुढील विवेचनात या सूक्तातील मत्राचा उपयोग करणारच आहे अथर्ववेदातील हे वैदिकाचे स्वदेशगीत प्रत्येकाने कठस्थ करण्याच्या योग्यतेचे आहे भूमीचे व आपले नाते सागताना सूक्तकार म्हणतो 'माता भूमिः पुत्रो अह पृथिव्या '(मी पृथ्वीचा पुत्र आहे व पृथ्वी माझी माता आहे ) अन्नोत्पादन पृथ्वीपासूनच होत असल्यामुळे खणणे, नागर मारणे, जमीन धुपविणे इत्यादि तिच्या शरीराला कष्ट देणाऱ्या गोष्टी आवश्यकच ठरतात मातृ-शरीराला या वेदना द्यावयास आपण कारणीभूत होतो याचे दु ख वाटून हा सूक्तकार म्हणतो :—

> यत् ते भूमे विखनामि क्षिप्र तदपि रोहतु ।
> मा ते मर्म विमृग्वरि मा ते हृत्यमर्पिपम् ॥ ३५
> इन्द्रो या चक्र आत्मने न मित्रा शचीपति ।
> सा नो भूमिर्विसृजता माता पुत्राय मे पय ॥ १०
>
> —(अथर्ववेद १२–१ )

(हे भूमि! मी जी जी जागा खणतो ती ती शीघ्र प्राणतत्त्वानें भरून जावो. माझ्या हातून तुझ्या मर्मावर आघात न होवो वा तुझ्या हृदयाला माझ्या हातून व्यथा न होवो शचीपति इद्रानें

जिला शत्रुरहित केली ती ही भूमाता आपला पुत्र असलेल्या मला दूध (पोषक द्रव्य) देवो )

(२) बकिमचद्रानी 'सुजला सुफला सस्यश्यामला मातरम्' या शब्दानी जो भाव व्यक्त केला आहे तो त्याहूनहि अधिक ठसठशीतपणे या सूक्तकाराने प्रागैतिहासिक काळीच अभिव्यक्त केलेला आहे. सूक्तकार म्हणतो --

यस्याश्चतस्र प्रदिश पृथिव्या यस्यामन्न कृष्टय सम्बभूवु ।
या बिभर्ति बहुधा प्राणदेजत् सा नो भूमि. गोष्वप्यन्ने दधातु ।। ४
नानावीर्या औषधीर्या बिभर्ति पृथिवी न प्रथता राध्यताम् । २
यस्या समुद्र उत सिन्धुरापो यस्यामन्न कृष्टय सम्बभूवु ।
यस्यामिद जिन्वति प्राणदेजत् सा नो भूमिः पूर्वपेये दधातु ।। ३
विश्वभरा वसुधानी प्रतिष्ठा हिरण्यवक्षा जगतो निशेवनी ।
वैश्वानर बिभ्रती भूमिरग्निमिन्द्र ऋषभा द्रविणे नो दधातु ।। ६
यस्यामन्न व्रीहियवौ यस्या इमा पञ्चकृष्टय ।
भूम्यै पर्जन्यपत्न्यै नमोऽस्तु वर्षमेदसे ।। ४२
निधि बिभ्रती बहुधा गुहावसु मणि हिरण्य पृथिवी ददादु मे ।
वसूनि नो वसुदारासमाना देवी दधातु सुमनस्यमाना ।। ४४

(जिला चार दिशा आहेत, ज्या ठिकाणी शेतकरी शेती करतात, अनेक प्रकारे जीवनाचे पदार्थ पुरवून सर्व प्रकारे जी प्राणिमात्राचे सरक्षण करते ती ही आमची मातृभूमि आम्हाला गोधन व अन्न यानी सपन्न करो. जी अनेक प्रकारच्या सामर्थ्यसपन्न वनस्पतीना धारण करते ती भूमाता आमच्यावर सर्व बाजूनी प्रसन्न होऊन आमचे पोषण करो. समुद्र व समुद्रासारखेच मोठमोठे विशाल नद आणि नद्या यानी सुजला असणारी भूमाता आमचे पोषण करो. विश्वाचे पोषण करणारी, सपत्तीचे आगर असणारी सुवर्णहृदया, जगताचा आधार व अग्नि, इन्द्र इत्यादि देवश्रेष्ठाचे आश्रयस्थान असणारी ही भूमाता आम्हाला सपत्तिमान् करो. शेतीच्या साहाय्याने सर्व प्रकारच्या अन्नसपत्तीला प्रसविणाऱ्या या सस्यश्यामला, पर्जन्यपत्नी भूमातेला आमचे वदन असो. जी

आपल्या हृदयाच्या गुहेत नानाप्रकारची रत्नें सुवर्ण व ऐश्वर्य धारण करते ती भूमाता प्रसन्न होऊन आम्हाला वैभवसपन्न करो )

(३) आपले जीवन चालविणारी म्हणून तर आपण मातृभूमीवर प्रेम करतोच, पण त्या भूमीच्या प्रत्येक रज कणाशी आपल्या पूर्वजाचा विक्रमशाली इतिहास सबद्ध असतो व त्याच्या स्मरणाने विशाल कर्तृत्वाची स्फूर्ति उत्पन्न होते हेहि आपल्या मातृभूमिविषयक निष्ठेला प्रखरपणा आणणारे महत्त्वाचे कारण असते रायगड म्हटले की श्रीशिवछत्रपति समोर उभे राहतात द्वारका म्हटली की श्रीकृष्णाचे दिव्यजीवन आठवते. अयोध्या म्हटली की मर्यादापुरुषोत्तमाच्या धनुष्यटकाराचा नाद कानात भरतो हा सर्वाचाच अनुभव आहे. मातृभूमीच्या दर्शनाने या ज्या स्मृति जागृत होतात त्याचे चित्रण करताना हा सूक्तकार म्हणतो .--

यस्या पूर्वे पूर्वजना विचक्रिरे यस्या देवा असुरानभ्यवर्तमन् ।
गवामश्वाना वयसश्च विष्ठा भग वर्च पृथिवी नो दधातु ।।५
यामश्विनामविमाता विष्णुर्यस्या विचक्रमे ।
इन्द्रो या चक्र आत्मने न मित्रा शचीपति ।। १०
यो नो द्वेषत् पृथिवि य पृतन्यात् योऽभिदासान्मनसा यो वधेन।
त नो भूमे रन्धय पूर्वकृत्वरि ।। १४
यस्या पूर्वे भूतकृत ऋषयो गा उदानृचुः ।
सप्तसत्रेण वेधसो यज्ञेन तपसा सह ।। ३९

(ज्या ठिकाणी आमच्या पूर्वजानी आपली अद्भुत कृत्ये केली, ज्या ठिकाणी देवानी असुराचा विध्वस केला, ती ही गायी, पशु, अश्व व पक्षी याची माता असलेली आमची जन्मभूमि आम्हाला ऐश्वर्य व तेज याचें प्रदान करो. अश्विनी, भगवान् विष्णु व महेन्द्र याच्या विक्रमाशी ही भूमाता सबद्ध आहे. हे शत्रुमर्दिनी भूमाते, जे कोणी आमचा द्वेष करतात, जे सेना घेऊन आमचा विध्वंस करण्यासाठी व आम्हाला त्रास देण्यासाठी आमच्यावर आक्रमण करतात, तसेच जे मनाने, आमचे वाईट व्हावें म्हणून चिन्तन करतात व आमचा नाश करण्यासाठी सदैव टपून बसलेले

असतात त्याना तू नष्ट कर याच भूमीवर आमच्या सामर्थ्यसपन्न ऋषीनी यज्ञ, तपस्या व दीर्घ सत्राच्या वेळी मंत्रोच्चार केलेला आहे.) इतिहासाचे स्मरण आपला भविष्यकाळ ऐश्वर्यसपन्न, तेजस्वी व विक्रमशाली घडविण्यासाठीच करावयाचे असते, हा भाव सूक्तकाराने केवढ्या प्रभावीपणाने व्यक्त केला आहे !

(४) भरतभूमि व भारतीय धार्मिक आणि सास्कृतिक जीवन हे एकमेकाशी एकात्मतेने सबंधित आहे. जीवविकासशास्त्राचा या भूमीचा व वैदिक कर्माचा परस्परावलबी असा अव्यभिचारी सबध आहे व म्हणून वैदिक कर्म या भूमीवर केले तरच ते सफळ होते ही भारतीयाची शास्त्रीय धारणा आहे बलीसारख्या स्वर्गाचा धनी असलेल्या दैत्येश्वराला आपल्या स्वर्गभूमीवर काही अश्वमेध यज्ञरूपी वैदिक कर्म करता आले नाही, तर त्यासाठी त्याला नर्मदेच्या उत्तरतीरावरच यावे लागले. (त नर्मदायास्तट उत्तरे बले ) असें जे श्रीमद् भागवताच्या अष्टमस्कधात वर्णिले आहे त्याचे रहस्यहि हेच आहे त्यामुळेच भारत ही कर्मभूमि आहे अशी आमची श्रद्धा असून प्रत्यक्ष परमेश्वराने धर्मानुष्ठानासाठी ही भूमि आम्हाला दिली असल्यामुळे या भूमीचा व आमचा सबध कृत्रिम नसून ईश्वरनिर्मित व म्हणूनच स्वाभाविक आहे असा विश्वास ऋग्वेद सहितेतूनहि व्यक्त झालेला आहे विश्वात्मधारणेच्या तुर्यावस्थेवर अधिरूढ होऊन देवेन्द्र ऋग्वेदात म्हणतो, "अह भूमिमददामार्याय" म्हणजे मीच ही भूमि वैदिक आर्याना दिली. श्री अरविन्द घोषानी 'It is for the Dharma and by the Dharma that India exists' (धर्मासाठी व धर्मानेच भारताचे अस्तित्व आहे) हे काढलेले उद्गार व उपर्युक्त ऋग्वेदीय धारणा किती एकात्म आह ! अथर्ववेदाचा भूमिसूक्तकार म्हणतो·—

> सत्य बृहदृतमुग्र दीक्षा तपो ब्रह्म यज्ञ पृथिवी धारयन्ति ।
> सा नो भूतस्य भव्यस्य पत्न्युरु लोक पृथिवी न. कृणोतु ॥१॥

यस्या वेदि परि गृह्णन्ति भूम्या यस्या यज्ञ तन्वते विश्वकर्माण ।
यस्या मीयन्ते स्वरव पृथिव्या मूर्ध्वा शुक्रा आहुत्या पुरस्तात् ।
सा नो भूमिर्वर्धयद् वर्धमाना ॥१३॥
पृथिवी धर्मणा धृताम् ॥१७॥

(सत्य, उग्र ब्रह्मचर्य, दीक्षा, तप, वेद व यज्ञ हे पृथिवीचे धारण करतात ती आमच्या भूतकालावर व भविष्यावर अधिराज्य गाजविणारी भूमि आमचे कल्याणकरो ज्या भूमीवर वेदी निर्माण करतात, विश्वस्रष्टे ज्या भूमीवर यज्ञ करतात, तपस्वी जेथे मत्रपुरस्सर यज्ञाहुति देतात त्या भूमीची आम्ही उपासना करतो व तिने आमचे कल्याण करावे भूमातेला धर्माने धारण केलें आहे )

याप्रमाणे आमच्या देशाभिमानाच्या धारणेची जागतिक राष्ट्र-समूहातील देशविषयक धारणेहून वेगळचा स्वरूपाची असणारी सारी वैशिष्टचे वेदकाळीच सिद्ध स्वरूपात होती आणखी पुढील काही ऋचा या धारणेची उत्कटता कशी व्यक्त करतात ते पहा.–

ये ग्रामा यदरण्य या सभा अधिभूम्याम् ।
ये सग्रामा समितम तासु चारु वदेम ते ॥५६॥

(आम्ही ग्राम, अरण्य, सभा, सग्राम व समिति यापैकी कोठेहि तुझ्याविषयी वाईट बोलणारच नाही. तुझे गुणगायन करू.)

यो नो द्वेषत् पृथिवि य पृतन्यात् योऽभिदासान्मनसा यो बधेन ।
त नो भूमे रन्धय पूर्वकृत्वरि ॥१४॥

(जे आमचा द्वेष करतात, जे सैन्य घेऊन आमच्यावर चालून येतात. जे मनाने आमचे वाईट चिंतितात व जे आम्हांला ठार मारावयास टपलेले आहेत त्याना, हे शत्रुमर्दिनी तू नष्ट कर.)

मान पश्चान्मा पुरस्तान्नुदिष्ठामोत्तरादधरादुत । स्वस्ति भूमे नो भव मा विदन् परिपन्थिनो वरीयो भावमाबधम् ॥३२॥

(मागून, पुढून, वरून व खालून माझ्यावर कोणीही प्रहार करू नये. हे मातृभूमि ! तू माझे मगल कर. हिसक, चोर, लुटारू याना माझा पत्ता लागू नये तू त्याना दूर पाठवून दे.)

उपस्थास्ते अनमीवा अयक्ष्मा अस्मभ्य सन्तु पृथिवि प्रसूता ।
दीर्घ न आयु प्रतिबुध्यमाना वय तुभ्यं बलिहृत स्याम ॥६२॥
(हे मातृभूमि ! तुझे जे प्रदेश आहेत ते रोग, भय व क्षय यापासून विमुक्त व्हावे आम्ही दीर्घायुव सदा सावधान असावे, व तळहातावर शिर घेऊन तुझ्यासाठी सर्वस्वाचा त्याग करण्याची आमची सदा सिद्धता असावी.)

यस्या गायन्ति नृत्यन्ति भूम्या मर्त्या व्यैलवा ।
युध्यन्ते यस्यामाक्रन्दो यस्या नदति दुन्दुभि ॥
सा नो भूमि प्रणुदता सपत्नानसपत्न मा पृथिवी कृणोतु ॥४१॥
(ज्या भूमीवर वीर गर्जना करतात, नृत्य व गायन करतात, जेथे युद्धातील शस्त्राचा खणखणाट व रणदुदुभीचा भैरवनाद सुरू आहे ती आमची मातृभूमि आमच्या शत्रूना नष्ट करो व पिटाळून लावो, आणि आम्हाला निष्कटक करो.)

अहमस्मि सहमान उत्तरो नाम भूम्याम् ।
अभीषाडस्मि विशाषाडाशामाशा विषा सहिः ॥ ५४
( मी आपल्या मातृभूमीसाठी व तिच्या दु.खविमोचनासाठी सर्व प्रकारचे कष्ट भोगावयास सिद्ध आहे ते कष्ट केव्हाहि व कसेहि माझ्या वाटयास आले तरी त्याची मला पर्वा नाही. )

यद् वदामि मधुमत् तद् वदामि यदीक्षे तद्वनन्ति मा।
त्विषीमानस्मि जूतिमानवान्यान् हन्मि दोहत. ॥ ५०
(आपल्या मातृभूमीच्या हिताचेच मी बोलेन, व तिच्या साहाय्यासाठीच करावयाचे ते करीन मी ज्योतिःपूर्ण, तेजस्वी, व बुद्धिसपन्न होऊन मातृभूमीचे दोहन करणाऱ्या शत्रूचा विनाश करीन.)

भूमे मातर्निधेहि मा भद्र मा सुप्रतिष्ठितम् । ६३
(हे भूमाते माझे मगल कर व मला स्थिरपद कर.)

इतक्या प्रागैतिहासिक काली इतके तेजस्वी विचार वैदिक राष्ट्राविना अन्य कोणी प्रकट केल्याचे जगाच्या इतिहासांत दाखवितां येईल काय ?

✦ ✦ ✦

व्याख्यान तिसरें

# वैदिक समाजरचना

मागच्या व्याख्यानात आपण वैदिक राष्ट्राच्या स्वदेशप्रीतीचें आणि देशविषयक धारणेचे स्वरूप पाहिले त्यानतर वैदिक राष्ट्राचे समाजजीवन व समाजदर्शन अथवा समाजविषयक तत्त्वज्ञान काय होते हे पाहणे आवश्यक ठरते

एका जीवनसूत्रात बाधलेला समाज म्हणजे राष्ट्र ही कल्पना वेदवाङमयात पूर्णपणे सिद्ध झालेली आढळते समुदायवाचक जन शब्द ऋग्वेदातच असून 'पजजन' व 'पचजनास' हे शब्द पाच जाती या अर्थाने येतात 'जनस्य गोपाः' हा ऋग्वेदातील शब्द रामायणातील 'लोकस्य परिरक्षिता' (लोक रक्षक) याच अर्थाने येतो भारत जन असाहि स्पष्ट शब्दा ऋग्वेदामध्ये 'विश्वामित्रस्य रक्षति ब्रह्मेद भारत जनम्' या ठिकाणी आलेला आहे हापकिन्सने असे म्हटले की 'येथील जन शब्दाचा अर्थ 'ग्राम' असा करावा. पण त्याचे कोणतेंहि कारण तो देत नाही कसेहि करून भारत म्हणजे हिदुस्थान हा अर्थ नाकारावयाची केवळ हटवादी प्रवृत्तीच यातून दिसते डॉ केतकर यानी भारतजन याचा अर्थ बाहेरून भारतात येणाऱ्या भरताच्या टोळ्या असा केला आहे. हॉपकिन्सचा अर्थ पुरावा नाही म्हणून चूक आहे असे डॉ केतकर म्हणतात; पण केतकराच्या अर्थाला तरी बाहेरून आत येण्याच्या काल्पनिक गृहीत कृत्यापलीकडे दुसरा काय आधार आहे ? 'जन' या शब्दासारखा त्याच अर्थाचा वाचक असा 'विश' शब्दही ऋग्वेदात वारंवार येतो. राष्ट्र या शब्दाचा वापर ऋग्वेदकाळापासून वेदवाङमयांत केलेला आढळतो.

ऋग्वेद, तैत्तिरीय सहिता, अथर्ववेद या वेदवाङमयात राष्ट्र शब्दाचा विपुल प्रमाणात वापर केलेला आहे 'पर्यारि राष्ट्र' असाही शब्द येतो या शब्दाचा अर्थ शत्रूंनी वेढिलेले राष्ट्र असा आहे राष्ट्रशब्द ऋग्वेदात आणि तदुत्तर वाङमयात राज्य किवा राज्याचा प्रदेश या अर्थीच आलेला आहे असे जे डॉ केतकर यानी आपल्या ज्ञानकोशातील टीपेत म्हटले आहे त्यातील चकाराचा आग्रह मात्र चुकीचा आहे.

राष्ट्र या सज्ञेने संबोधिण्यात येणाऱ्या लोकसमुदायाला एकत्र आणावयास जी बधने कारणीभूत होतात त्यात समानराज्य हे एक अतिशय महत्त्वाचे बधन असते त्याविना राष्ट्रकल्पना परिपूर्ण होऊच शकत नाही मात्र राष्ट्र आणि राज्य ही एक नव्हेत

राष्ट्र म्हणजे एका जीवनसूत्रात बाधलेला समाज होय Nation व State या दोन इग्रजी शब्दानी ज्या कल्पना व्यक्त होतात त्याच राष्ट्र व राज्य या शब्दानी व्यक्त होतात. या कल्पना परस्पर-भिन्न आहेत वेदवाङमयात यणारा राष्ट्र शब्द समाज या अर्थी आहे असे म्हणावयास कोणतीहि सबळ अडचण नाही उदाहरणार्थ, तैत्तिरीय सहितेतील (७।५।१८) "आ ब्रह्मन् ब्राह्मणो ब्रह्मवर्चसी जायताम्" या राष्ट्रगीतात "अस्मिन् राष्ट्रे" हे जे शब्द आहेत त्याचा 'न' या पदाशी जो सबध आहे तो त्या शब्दाचे समुदाय-वाचकत्वच दर्शवितो अथर्ववेद (१९।३७।३) "त्वा राष्ट्रभृत्याय" या वाक्यात आलेला राष्ट्रशब्द समुदायवाचकच आहे तेव्हा राष्ट्र हा वेदवाङमयातील शब्द समाज या अर्थी आहे हे स्पष्ट होते त्याचे इतर अर्थ हे एक प्रकारे गौणच होत

**चतुर्विध पुरुषार्थ --**

मानवी जीवनाचा पूर्ण विचार करून ऋषीनी जीवनाचे ध्येय पूर्णपणे निश्चित केले होते हे मागच्या व्याख्यानमालेतील तत्त्वज्ञान व अनुभूतिवाद या शेवटच्या दोन व्याख्यानातून प्रतिपादन केलेलेच आहे. हे ध्येय चतुर्विध पुरुषार्थाच्या परिभाषेतून प्राचीन भारती-यानी व्यक्त केलेले आहे 'पुरुषैः अर्थ्यते' म्हणजे मनुष्यमात्र जे मिळविण्याची इच्छा करतो त्याला पुरुषार्थ असें म्हणतात.

पुरुषार्थाच्या या चार प्रकारच्या विभागणीत धर्म, अर्थ व काम याना नुसते पुरुषार्थ असे म्हटले असून मोक्षाला परम पुरुषार्थ असे नाव देऊन ते व्यक्तिमात्राचे सर्वोच्च ध्येय म्हणून सागितले आहे.

वस्तुत या प्रकारची विभागणी प्रथमदर्शनी मनाला व तीहि फ्राइड व मार्क्स याच्या विचारप्रणालीनी पकड घेतलेल्या मनाला मोठी चमत्कारिक वाटणारी आहे कामप्रवृत्ति ही मनुष्यमात्राची नैसर्गिक प्रवृत्ति असून कामपूर्तीचे साधन म्हणून अर्थप्रवृत्ति ही मनुष्यमात्रात अनुषगाने उत्पन्न झालेली आहे या दोन प्रवृत्तीविना इतर कोणत्याहि प्रवृत्ति नैसर्गिक अथवा स्वाभाविक असू शकत नाहीत त्यामुळे पुरुषार्थ या शब्दाच्या वास्तविक अर्थाप्रमाणे पाहिले तर अर्थ व काम या दोघानाच पुरुषार्थ असे म्हटले पाहिजे पण थोडचाशा विचाराती हे सहजच लक्षात येण्यासारखे आहे की अर्थ व काम या प्रवृत्ति म्हणजे इच्छापूर्ति व तिची साधने जुळविण्याची प्रवृत्ति ही केवळ मनुष्याची प्रवृत्ति नसून सर्वच प्राण्याची प्रवृत्ति आहे व त्यामुळे या दोन प्रवृत्तीना पुरुषार्थ म्हणण्याचे काही कारण नाही ही गोष्ट न ओळखता व मानवी जीवनाचा अधिक खोल अभ्यास न करता केवळ अर्थ व कामाच्या मागे लागून ज्यानी आपली समाजरचना उभारली त्यानी जगावर विनाशाचा प्रसग आणलेला आहे.

## नियंत्रणाची आवश्यकता

कामपूर्ति ही आवश्यक असली तरी खऱ्या अर्थाने सपूर्ण कामपूर्ति होण्याची शक्यता आहे काय ? उलट वासनेच्या अग्नीला साधनाचे इधन कितीहि पुरविले तरी तो अग्नि शात न होता उलट अधिकाधिक भडकतच जातो असा जगाचा अनुभव आहे पारतत्र्यात असलेल्या लोकाना स्वराज्याची तहान लागते, तर स्वराज्यात सुखाने जीवन कठणाऱ्या वखवखलेल्या वासनाच्या लोकाना साम्राज्याची तहान लागते ज्याचे साम्राज्य आहे त्याना सारे जग जिकण्याची व आपल्या पायाच्या टाचेखाली ठेवण्याची प्रबल इच्छा असते, तर ती पूर्ण झाल्यावर अलेक्झाडरसारख्या

कर्तृत्वसपन्न लोकाना आता जिकावयास जगच उरले नाही म्हणून दु ख वाटते ! तात्पर्य, तृष्णेला व कामाला जगात अत नाही आणि तिच्यासाठी साधने जुळविण्याच्या या प्रवृत्तीलाहि याच कारणाने कोणतीहि मर्यादा असू शकत नाही मानवी कामप्रवृत्तीचे व अर्थ-प्रवृतीचे आणि त्यावर आधारलेल्या समाजरचनेचे पर्यवसान आज हायड्रोजन बॉबच्या निर्मितीत झालेले असून सपूर्ण मानव समाज नष्ट होणार की काय असा प्रश्न उत्पन्न झालेला आहे, व त्यामुळे अर्थ व काम प्रवृत्तीच्या परिपूर्तीचेच केवळ ध्येय डोळ्यासमोर न ठेवता त्याना आवर घालण्याचा व त्याचे नियत्रण करण्याचा काही उपाय शोधून काढणे अत्यत आवश्यक आहे, असे प्रबलतम पाश्चात्य राष्ट्रातील समाजशास्त्रज्ञानाहि आज वाटू लागले आहे भारतीय समाजशास्त्रज्ञानी अर्थ व काम या प्रवृत्तीचे भयानक स्वरूप फार प्राचीन काळीच ओळखले होते म्हणूनच (श्रीमद् भागवतामध्ये ययातीने असे उद्‌गार काढले आहेत की,

न जातु काम कामानामुपभोगेन शाम्यति ।
हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते ॥

कामाच्या उपभोगाने काम कधीच शात होत नसून उलट अग्नीत घातलेल्या सरपणाने अग्नि जसा अधिकच भडकावा, त्याप्रमाणे काम अधिकाधिक भडकत जातो पण प्रश्न असा आहे की, या प्रवृत्तीला नियत्रणात ठेवण्याचे अथवा आवरण्याचे साधन कोणते असू शकेल ? वेगवेगळ्या आर्थिक पद्धतीची व व्यवसायाची गटवारी इत्यादि गोष्टी या सबधात पूर्णपणे अपुऱ्या ठरल्या आहेत हे आजच्या लोकशाहीच्या, कम्यूनिझमच्या, फॅसिझम्‌च्या अथवा नाझीवादाच्या वैफल्याचा इतिहास सिद्ध करीत आहे अशा स्थितीत रक्त अशुद्ध असलेल्या शरीरातील व्रणावरच्या केवळ बाहेरच्या मलमपट्टीने काम भागणारे नसून अधिक मूलगामी उपायांची आवश्यकता आहे हे कोणाच्याहि सहजच लक्षात येईल. या सबधातील सर्वांत प्रभावी मूलगामी उपाय म्हणजे या प्रवृत्ति नियन्त्रित करणे व त्या एका मर्यादेंतच ठेवणे हे आपले

कर्तव्य आहे असे वाटेल असें संस्कारित मन तयार करणे हा होय. तात्पर्य, कर्तव्याच्या भावनेनेच या प्रवृत्तीना नियत्रित केले पाहिजे.

यावर कोणी कदाचित् असे म्हणल की या प्रवृत्ति संपूर्णच नष्ट करावयास सिद्ध झाले पाहिजे पण सर्वच्या सर्व मानवाच्या सबधात हे पूर्णपणे अशक्य असल्यामुळे व येथे एका व्यक्तीचा प्रश्न नसून सर्व समाजाचा व त्याच्या रचनेचा प्रश्न असल्यामुळे या प्रवृत्तीच्या नियमनाची व काही मर्यादेपर्यत त्याच्या परिपूर्तीची सोय करणे हाच एकमात्र मार्ग आहे.

ही जी कर्तव्यबुद्धि अथवा कर्तव्यासाठी कर्तव्य ही स्थिति, ती ज्या योगे बाणते त्यालाच धर्म असे म्हणतात. धर्म अथवा कर्तव्यबुद्धि माणसात माणुसकी उत्पन्न करते व अर्थ आणि काम माणुसकीला न सोडताच रहावयाचे असतात म्हणून भारतीयानी पुरुषार्थ असा यथायोग्य शब्द वापरून आधी धर्म व नतर अर्थ, काम अशी गणना केलेली आहे, व जीवनाचे सर्वोत्तम ध्येय म्हणून त्यानी मोक्ष असे सागितले आहे

हा मोक्ष उदात्त असला तरी तो केवळ व्यक्तिगत स्वरूपाचा असल्यामुळे त्यात समाजनिरपेक्ष व्यक्तिस्वार्थाची भावना आहे असा पुष्कळानी आपला समज करून घेतलेला आहे. वैदिक व उपनिषदाच्या तत्त्वज्ञानाची परिभाषा माहीत नसल्यामुळे हा अप-समज उत्पन्न झालेला आहे मोक्ष म्हणजे अत्यत व्यापक अथवा विश्वात्म होऊन राहणे. हे लक्षात घेतले तर त्यात व्यक्तिस्वार्थवाद मुळीच नाही हे ध्यानात येईल उलट विश्वात्म होऊन राहण्यात 'आत्मौपम्येन भूतानि' अथवा सर्वाच्या हितासाठी सतत खपणें हा स्वभाव होऊन राहतो, व आपण आणि दुसरा हा आपपर-भेदभाव सपूर्णपणे नष्ट होतो ह्या स्थितीचे वर्णन करताना समर्थानी म्हटले आहे —

'तो परोपकार करितची गेला। तो पाहिजे ज्याला त्याला। मग काय उणे तयाला। भूमडळी ॥' असा मनुष्य स्वाभाविकपणेच सर्वाच्या हृदयात परमादराचे व श्रद्धेचे स्थान मिळवितो. जेथे

व्यक्तित्वच उरले नाही व देहाच्या देहलीतील 'स्व' सपला तेथे व्यक्तिस्वार्थ उरलाच कोठे ?

**व्यक्तिस्वातंत्र्य व समाजकल्याण यांचा समन्वय–**

व्यक्तिस्वातंत्र्य व समाजकल्याण याचा सपूर्ण समन्वय साधणाऱ्या या स्थितीलाच भारतीयानी परमपुरुषार्थ म्हटले आहे. असा समन्वय इतर कोणत्याहि समाजशास्त्राच्या पद्धतीत साधल्याचे आढळून येत नाही जीवनाचे ध्येय म्हणून मोक्ष व त्याची मूलभूत प्रेरणा म्हणून कर्तव्य निश्चित करून त्यानी त्याच्याशी अविरोधी अशी अर्थ व काम याची सोय लाविली, हे चतुर्विध पुरुषार्थाची परिभाषा पाहिली तर ध्यानात येते, व मानवी जीवनातील पशुत्व सीमापार करण्यासाठी त्यानी केलेल्या या रचनेवरून त्याच्या प्रतिभेच्या सुपूर्ततेची साक्ष पटते मोक्षरूपी ध्येयामुळे अधिकारा-ऐवजी कर्तव्याची प्रेरणा हीच जीवनसूत्र ठरली, व भोगाऐवजी त्यागालाच समाजरचनेचा प्रश्न सोडविताना महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले या चतुर्विध पुरुषार्थाच्या सिद्धीसाठी अनेक धार्मिक विधिविधानानी नियत्रित असणारे यज्ञमय जीवन उभारण्यात आले धर्मसूत्रकारानी गर्भाधानापासूनचे सस्कार, वेदव्रते, पाकयज्ञसस्था, हविर्यज्ञसस्था सोमयज्ञसस्था इत्यादिकाचे केलेले वर्णन पाहिले म्हणजे भारतीयाच्या, नियत्रित व सस्कारपरिपूर्ण जीवनाची कल्पना येते. पण या सर्व गोष्टीपेक्षाहि मनुष्याने मनुष्य होऊन राहण्यावर त्याचा सर्वात अधिक कटाक्ष आहे या सर्व सस्काराची व विधिविधानाची कल्पना दिल्यावर धर्मसूत्रकारानी मनुष्यात मानवता नसेल तर या सस्काराचा काही एक उपयोग नाही असे स्पष्ट शब्दात सागितले आहे

**एक निरर्थक वाद–**

अलीकडे, नीतिसपन्न मनुष्य श्रेष्ठ की जीवनातून नीतीचें सूत्र सीमापार करून कटाक्षाने धार्मिक विधिविधाने मात्र पाळणारा मनुष्य श्रेष्ठ असा वाद करण्यात येतो पण वस्तुत हा वाद पायाशून्य आहे कारण धार्मिक विधिविधाने मनुष्यासाठी असतात

व जो नीतिमान् नाही तो मनुष्यच नव्हे असा भारतीय समाज शास्त्राचा सिद्धान्त आहे

मनुष्याच्या मनुष्यपणासाठी आवश्यक असणारे हे जे नैतिक गुण, त्याना धर्मसूत्रकारानी आत्मगुण असे नाव दिलेले आहे या आत्मगुणाचे वर्णन करताना गौतम धर्मसूत्रात (८-२१) म्हटले आहे

दया सर्वभूतेषु क्षातिरनसूयाशौचमनायासो मङगलमकार्पण्य-मस्पृहेति। (स्वत इतकेच दुसऱ्याच्या हितासाठी व सुखासाठी जपण्याची प्रवृत्ति, सहनशीलता, गुणवान् लोकाचा द्वेष व मत्सर न करण्याची प्रवृत्ति, पदार्थ—मन—वाणी शरीर शुद्ध व पवित्र राखणे, स्वतःला व्यर्थ संकटाच्या व क्लेशाच्या खोड्यात न टाकणे, जे समाजात सभ्याचाराचे म्हणून समजण्यात येत असेल तसेच वागणे व जे अशिष्टपणाचे समजण्यात येत असेल ते कटाक्षाने टाळणे, आपल्यावर आलेल्या मोठ्या कष्टदायक परिस्थितीतही कोणाही-समोर स्वतःच्या दैन्याचे प्रदर्शन न होऊ देणे, जे काय मिळेल ते चार लोकाना देऊनच स्वत घेण्याची स्वाभाविक प्रवृत्ति असणे, विषयोपभोगाच्या सबधी सदैव असतोषी प्रवृति राहू न देणे, दुसऱ्याच्या द्रव्याची अभिलाषा न बाळगणे या आठ गोष्टीना आत्म-गुण असे म्हणतात.) अलीकडे ज्याला माणुसकी, मानवता, मनुष्यधर्म इत्यादि नावानी सबोधिण्यात येते तेच हे विशेष होत हे स्पष्टच आहे.

या आत्मगुणाना उद्देशून गौतम धर्मसूत्रात म्हटले आहे :—

यस्यैते न चत्वारिशत्सस्कारा न च अष्टावात्मगुणा न स ब्रह्मणरसायुज्य सालोक्य च गच्छति ॥२३॥ गर्भाधानापासून सप्त-सोम सस्थापर्यतचे सर्व सस्कार व धार्मिक विधि करणारा, पण या आठ आत्मगुणाची स्वत च्या जीवनाला जोड न करून घेतलेला जो मनुष्य असेल त्याचे जीवन कधीहि सफल होत नाही उलट धार्मिक विधिविधाने केवळ अशमात्रच करणारा, पण या आठ आत्मगुणाना मात्र जीवनात उतरविणारा मनुष्य जीवितसाफल्याचा निश्चित अनुभव घेतो

वसिष्ठ धर्मसूत्रात म्हटले आहे 'चिमणीच्या पिलाना पख आले की ती जसे घरटे सोडून जातात, त्याचप्रमाणे वेदवेदागेहि सद्गुण

शून्य मनुष्याला सोडून जातात ’ तात्पर्य सत्य, सदाचार व शील हाच प्राचीन भारताच्या राष्ट्रजीवनाचा भक्कम पाया होता. प्रत्यक्ष ऋग्वेदसहितेतच म्हटले आहे की ‘ऋतस्य पन्था न तरन्ति दुष्कृत ’ (दुराचारी मनुष्याला सत्याचा मार्ग कधीहि पार करता येत नाही) ‘केवलाघो भवति केवलादी’ (केवळ स्वतच्या स्वार्थापुरतेच पाहणारा मनुष्य केवळ आपले स्वत चे पापच खात असतो )शतपथ ब्राह्मणात म्हटले आहे. ‘अमेध्यो वै पुरुषो यदनृत वदति । तस्य कनीय कनीय एव तेजो भवति श्व श्व पापीयान् भवति तस्मात्सत्यमेव वदेत् ।’ (खोटे बोलणारा मनुष्य हा यज्ञप्रकृतिक आर्य राहूच शकत नाही त्याचे तेज प्रत्येक दिवशी उणेच होत जाते, व तो क्षणोक्षणी पापात्मा होत जातो म्हणून सत्यच बोलावे )

अशा शीलचारित्र्यसपन्न पुरुषाला काही दिवसानी आपण शीलचारित्र्यसपन्न आहोत याचाच अहकार होऊ लागतो, व एकदा हा अहकार उत्पन्न झाला की त्याचे पतन व्हावयास वेळ लागत नाही. त्यामुळे शतपथ ब्राह्मणाने दिलेली मार्मिक सूचना जीवनमार्गाच्या प्रत्येक पथिकाने ध्यानात घेणे अवश्य आहे ती अशी की ‘तस्मान्नातिमन्येत । पराभवस्य हैतन्मुख यदतिमान । ’ ( अहकार कधीहि उत्पन्न होऊ देऊ नये कारण अहकाराच्या क्षणापासूनच पतनाला प्रारभ होत असतो ) याप्रमाणे सर्वात प्रथम मानवतेच्या गुणविशेषाकडे सकेत करून अहकाररहित कर्तव्याच्या प्रेरणेच्या पायावर प्राचीन भारतीयानी आपल्या समाजजीवनाचे मदिर उभारले या भारतीय समाजजीवनाच्या मदिरालाच चातुर्वर्ण्यात्मक समाजरचना असे म्हणतात

**चातुर्वर्ण्यात्मक समाजरचना**

चातुर्वर्ण्य म्हटले की आजच्या पाश्चात्याळलेल्या भारतीय समाजशास्त्रवेत्त्यालाही मळमळल्यासारखे होते व तो आपल्या राष्ट्राच्या ऐतिहासिक पतनाचे, आजच्या साऱ्या सामाजिक दुरवस्थेचे खापर चातुर्वर्ण्याच्या माथी फोडून ही वर्णव्यवस्था सपूर्णपणानें नष्ट होईल तो महन्मगलाचा क्षण असें मानू लागतो.

पण प्रथम हे ध्यानात ठेवले पाहिजे की प्लेटोसारख्या समाजशास्त्रज्ञानेहि आदर्शसमाजाची विभागणी आपल्या चातुर्वर्ण्यपद्धतीच्या बाह्य स्वरूपासारखी चातुर्वर्ग्यात्मकच केलेली आहे पारशाच्या धर्मग्रथातूनहि समाजव्यवस्थेचे हे चार प्रकारचे स्वरूप सागितलेले आढळते पारशाच्या धर्मग्रथातून सागितलेले हे चार वर्ग म्हणजे (१) आथ्रवन् (ब्राह्मण) (२) रथैस्तार (क्षत्रिय) (३) वास्त्रोष (वैश्य) व (४) हुतोक्ष (शूद्र) हे होत चातुर्वर्ण्यव्यवस्थेसबधी कोणताही दुराग्रह मनात आणण्यापूर्वी त्या व्यवस्थेकडे नि पक्षपातीपणाने पाहणे अवश्य आहे कारण प्रागैतिहासिक काळापासून आजपर्यत हिदुसमाजाची ही रचना या ना त्या स्वरूपात कायम टिकून राहिलेली आहे व वैदिक मत्राच्या द्रष्टयापासून तर लोकमान्य टिळकापर्यत त्या त्या कालखडातील प्रातिनिधिक भारतीय राष्ट्रपुरुषानी तिचा पुरस्कार केलेला आहे. सहस्त्रावधि वर्षे एखाद्या समाजात बद्धमूल झालेली व्यवस्था तिची जीवनशक्ति अत्यत चिवट आहे ही गोष्ट सशयातीतपणे सिद्ध करते हे मानणे क्रमप्राप्तच आहे गेल्या दीडशे वर्षांत ब्रह्मप्रळयाच्या पैजा मारणाऱ्या किती तरी अर्थव्यवस्था व समाजव्यवस्था पार कोलमडून पडलेल्या आहेत हे पाहिले म्हणजे चातुर्वर्ण्यव्यवस्थेची जीवनसत्त्वे सकस असलीच पाहिजेत याची निश्चिति पटते केवळ विद्वेषाच्या, उच्चनीचतेच्या व वर्गनिष्ठ मिरासदारी टिकवून धरण्याच्या पायावर या समाजव्यवस्थेचें मदिर उभारण्यात आले असते तर ते केव्हाच भुईसपाट झाले असते. त्यामुळे या व्यवस्थेच्या मदिरामागची प्रेरणा राग-द्वेषशून्य अत करणाची व शास्त्रीय स्वरूपाची असली पाहिजे असे म्हणणे भाग आहे आज सामान्यत चातुर्वर्ण्यव्यवस्थेची जी तपासणी करण्यात येते तिच्या मुळाशी आजच्या वर्गस्वभावावर अधिष्ठित झालेल्या प्रेरणा बहुधा असतात या प्रेरणाच्या अतीत राहून या विषयाचा विचार करण्याची खरी आवश्यकता आहे. या समाजरचनेसबंधी विकाररहित अत करणाने विचार करणाऱ्या

पाश्चात्य समाजशास्त्रज्ञाची मते पाहिली तर ती विस्मयाचा धक्का देणारी आहेत बगाल प्रातात अनेक वर्षे राहून भारतीय तत्रशास्त्राचा व हिंदू समाजरचनेचा सूक्ष्म अभ्यास केलेले विख्यात पाश्चात्य सशोधक जस्टिस वुड्राफ यानी तर हिंदू समाजाच्या अमरत्वाचे रहस्य चातुर्वर्ण्यसस्थेत असल्याचे स्पष्ट उल्लेखिले आहे. आपल्या Is India Civilised या ग्रथात जस्टिस वुड्राफ म्हणतात

'India has presented itself as one of the immortal peoples Suffering racial and social divisions, politically disrupted with a variety of languages and scripts, governed for centuries by strangers, she has yet held to-gether, so that we can still speak of 'India' This, I think, is due principally to certain religious and philosophical concepts held in common by the people and as regards Hinduism in its technical sense, the wonderful organisation called Varnashrama Dharma ' ( भारताने आपण मृत्युजय राष्ट्रापैकी एक आहोत ही गोष्ट सिद्ध केलेली आहे वाशिक व सामाजिक भेद, राजकीय पतन, परकीयाचे शतावधि वर्षाचे दास्य, व भाषा नि लिपी याची विपुल विविधता या सकटातूनहि, त्याचे आपण आज नाव घ्यावे असे राष्ट्र म्हणून अस्तित्व टिकून राहिले आहे. माझ्या मते या मृत्युजयत्वाचे रहस्य मुख्यत लोकाच्या आचरणात समानसूत्राने आढळणाऱ्या काही धार्मिक वतत्त्वज्ञानात्मकसिद्धान्तात आहे व हिंदूच्या सबधात हे श्रेय वर्णाश्रमधर्मसस्थेला आहे )

जिच्याविषयी अत्यत वाईट व उत्कट अभिमानास्पद असे सर्वात अधिक बोलण्यात व लिहिण्यात आले आहे ती वर्णाश्रमव्यवस्था म्हणजेच वैदिक आर्याची समाजव्यवस्था व जीवनाची विभागणी होय.

चातुर्वर्ण्यव्यवस्था म्हणजेच वैदिक समाजरचना होय असे म्हटले की एक प्रश्न स्वाभाविकपणे उत्पन्न होतो व तो हा की सर्वात प्राचीन समजण्यात येणाऱ्या ऋग्वेदसहितेत चातुर्वर्ण्याचा उल्लेख आहे काय ? नसल्यास ऋग्वेदकालानतर ही समाजव्यवस्था उत्पन्न झाली असे म्हणावे लागेल यासाठी ऋग्वेदातहि चातुर्वर्ण्य आहे काय हे प्रथम पाहणे आवश्यक आहे.

वस्तुत मी पहिल्याच व्याख्यानात ‘वैदिक’ या शब्दाने मला अभिप्रेत असलेल्या वाङमयाची स्पष्ट कल्पना दिलेली असल्यामुळे एकादी गोष्ट आजच्या ऋग्वेदसहितेत स्पष्ट उल्लेखिलेली न आढळली तरी त्यामुळे काही बिघडत नाही इतर वेदसहितातून ती असली म्हणजे झाले पण ऋग्वेद सर्वात जुना व इतर वेद नंतरचे अशी चुकीची कल्पना बाळगणाऱ्यानाही ती ऋग्वेदातही आढळल्याने अधिक समाधान वाटेल

आजच्या ऋग्वेदसहितेत चातुर्वर्ण्यासबधाने असा निर्देश आढळतो.

ब्राह्मणोस्य मुखमासीद् बाहू राजन्य कृत ।
ऊरू तदस्य यद्वैश्य पद्भ्या शूद्रो अजायत ।। १२

–(ऋग्वेद म १० सूक्त ९०)

(ब्राह्मग हे त्याचे मुख, क्षत्रिय हे त्याचे भुजदड, वैश्य त्याच्या माड्या व शूद्र त्या विराट् पुरुषाचे पाय होत ) पण ही ऋचा ज्या मडलातील आहे ते १० वे मडल ऋग्वेदातील प्राचीन ऋचाच्या मानाने अर्वाचीन असून ऋग्वेदात त्याचा मागाहून समावेश करण्यात आला असे काही आक्षेपकाचे म्हणणे आहे. वस्तुत गृहीतकृत्यापलीकडे हे ठरवावयास कोणतेहि प्रबल प्रमाण नाही. तरी पण ‘ तुष्यतु दुर्जन ’ या न्यायाने ते मान्य केले तरी इतर मडलातूनही वर्णव्यवस्था अस्तित्वात असल्याचे पुरावे आहेत. नुसते वर्णनच नव्हे तर त्याच्या ठरलेल्या कर्तव्याचाही निर्देश ऋग्वेदसहितेतील प्राचीन समजण्यात येणाऱ्या मडलातूनही आढळतात. उदाहरणार्थ, ऋग्वेदाच्या आठव्या मडलातील पुढील ऋचा पहा –

ब्रह्म जिन्वत उत जिन्वत धियो हत रक्षासि सेधत अमीवा ।
सजोषसौ उषसा सूर्येण च सोम सुन्वतो अश्विना ।।१६।।
क्षत्रम् जिन्वत उत जिन्वत नॄन् हत रक्षासि अमीवाः ।।१७।।
धेनू जिन्वतम् उत जिन्वत विशः हतम् . ।।१८।। (ऋ ८।३५)

(ब्राह्मणाना मत्र स्फुरू द्या त्याच्या सद्बुद्धीला प्रेरणा करा. राक्षसाचा नाश करा. आणि हे अश्वीहो, भक्तवत्सल असे तुम्ही, उषादेवी आणि सूर्य याच्यासह येऊन भक्ताचा सोमरस

प्राशन करा क्षत्रियाच्या ठिकाणची वीरवृत्ति उसळू द्या. राक्षसाचा नायनाट करा, रोगाचा परिहार करा · आणि भक्ताचा सोमरस प्राशन करा धेनूची अभिवृद्धि करा वैश्याना समृद्ध करून त्याची भरभराट करा · आणि भक्ताचा सोमरस प्राशन करा ) येथे त्रैवर्णिक व त्याची कर्तव्ये याचा स्पष्ट निर्देश आहे आणखीहि " न आवक्ष सुवितामवर्णम्" (ऋ १।१०।४२), " यो दास वर्णम् अधरं गुहा क "(ऋ २।१२।४) " मम द्विता राष्ट्र क्षत्रियस्य " ( ऋ ४ । ४२ । १ ) " क्षत्रिया यातमर्वाक् " (ऋ ७ । ६४ । २ ) इत्यादि पुष्कळ उल्लेख आढळतात की जे ऋग्वेदकाळी वर्णव्यवस्था असल्याचे सिद्ध करतात अगस्त्याचा निर्देश तर " उभौ वर्णौ ऋषिरुग्र पुपोष " (ऋ १ । १७९।६ ) ( त्या श्रेष्ठ ऋषीने उभयवर्णाचा – स्वत: अगस्त्य ऋषि हे ब्राह्मण होते व त्याची पत्नी लोपामुद्रा ही क्षत्रिय कन्या होती – उत्कर्ष केला असा केलेला आहे यावर कित्येक आक्षेपकाचे असे म्हणणे आहे की या उल्लेखावरून ऋग्वेदकाळी ब्राह्मण व क्षत्रिय या दोनच वर्णाचे – फार झाले तर तीन वर्णाचे – अस्तित्व होते असे मानता येईल पण अर्वाचीन समजण्यात येणाऱ्या पुरुषसूक्ताशिवाय इतरत्र शूद्र या चौथ्या वर्णाचा निर्देश मुळीच नसल्यामुळे चातुर्वर्ण्य मात्र ऋग्वेदानतरच प्रस्थापित झाले असले पाहिजे

या व अशाच स्वरूपाच्या आक्षेपाना उत्तर देऊन विख्यात वेदज्ञ गुरुवर्य ' अप्रबुद्ध ' यानी आपल्या ' ऋग्वेदाचा सदेश ' या प्रबधात या विषयावर अतिशय वेधक विवेचन केले आहे ते लिहितात :
" ऋग्वेदाचा साकल्याने विचार करणाऱ्याला ज्याप्रमाणे 'श्रौतधर्माचे मत्रकालीन तत्र आजच्यापेक्षा फारसे निराळे नव्हते ' असे म्हणणे भाग पडते, अथवा ' सामान्य लोकाचा आजचा धर्म ऋग्वेदकालीन समाजाहून फारसा निराळा नाही ' हे कबूल करावे लागते, त्याचप्रमाणे ' मत्रकालातच वशपरपरेचे ब्राह्मण्य स्थापित झाले होते, यास पुरावे पुष्कळच आहेत, ' हेहि कबूल करावे लागते आणि एकदा वशपरपरेचे ब्राह्मण्य कबूल केले, म्हणजे बाकीच्या वर्णांच्या बाबतीत मात्र केवळ अनुल्लेख प्रमाण

धरून परपरेला का अमान्य करावे असा प्रश्न पडतो. वेदामध्ये ब्रह्म, क्षत्र, विश असे शब्द वारवार येतात आणि त्याचे सायणाने निरनिराळे अर्थ केले आहेत परतु ब्रह्मक्षत्रादि शब्दाचा अर्थ गौणच करावयाचा असा आग्रह त्याच्या ठिकाणी नसल्यामुळे तो कित्येक ठिकाणी या शब्दाचा जातिवाचकहि अर्थ करतो आता प्रश्न असा पडतो की हे जे या शब्दाचे गौण आणि 'जातिवाचक' असे अर्थ आहेत त्यातील पहिले कोणते ? सरळ पाहिले तर, काही कारणाने जाति उत्पन्न व्हाव्यात आणि त्या जातीच्या स्वभाव-विशेषावरून शब्दाना 'गौण' अर्थ यावा हे जास्त सयुक्तिक आहे ऋग्वेदातील या शब्दाचे 'गौण' अर्थ मागाहूनचे असावेत असे म्हणण्यास दुसरेहि एक कारण आहे ज्या चातुर्वर्ण्याविषयी वाद पडला आहे त्यातील 'वर्ण' शब्द हा पारशाच्या आवेस्त्यातहि येतो तेथेहि त्याला अनेक अर्थ आहेत आणि त्यात काही ठराविक 'रीतिभाति' अथवा 'सम्प्रदाय' असाही एक अर्थ आहे वर्ण शब्दाचे जातिवाचकत्व मत्रकालापूर्वीपासूनच होते, ही गोष्ट ज्ञान-कोशकारानाहि सम्मत आहे आक्रमणाची कल्पना खरी घेतली तर, आक्रमणापूर्वी पारशी व आर्य एकत्र रहात असता 'वर्ण' जातिबोधक होता, असा या मताचा इत्यर्थ आहे त्याचे तात्पर्य निदान इतकेच म्हणता येईल की वर्ण शब्दाचे जातिवाचकत्व मंत्ररचनेपूर्वीचेच आहे त्यावरूनहि 'गौण' अर्थ नतरचे असून लक्षणेने आलेले आहेत आणि जातिवाचक अर्थ मूळचे आहेत असे म्हणावे लागते आठव्या मडलातील ३५ व्या सूक्तात ब्रह्मक्षत्र आणि विश या तिन्ही शब्दाचा उपयोग त्याच्या त्याच्या कर्म विशेषासह केला असून त्यात त्रिवर्णाचा उल्लेख आहे हे मोठमोठ्या विद्वानानाहि कबूल करावे लागते पुरुषसूक्तातील उल्लेख आणि हा आठव्या मडलातील निर्देश हे टाकले तर 'विश' शब्द मात्र बहुतेक सर्व ठिकाणी सामान्य सर्वप्रजाबोधक आणि काही ठिकाणी तर सर्व मनुष्यजातीचा द्योतक आहे.त्यामुळेच, विचार करणारा बुचकळ्यांत पडतो. परतु बुचकळ्यांत पडण्याचें कांही कारण आहे असें वाटत नाहीं. चातुर्वर्ण्याचा, समाजव्यवस्था म्हणून पुरुषसूक्तांत मुद्दाम

उल्लेख केला आहे हे वेगळे एरव्ही वेदविद्येच्या दृष्टीने शूद्रास स्वतंत्र अस्तित्व नसल्यामुळे आणि शूद्र हे त्रिवर्णाचेच आश्रयात असल्यामुळे त्याचा अतर्भाव त्रिवर्णाच्याच परिवारात होऊन गेला आहे त्यामुळे आर्याच्या समाजाचे वेददृष्टचा ब्राह्मण, क्षत्रिय, विश असे तीनच भाग पडतात त्यातल्या त्यातहि वेदाचा सबध, क्षत्रिय आणि ब्राह्मण याना अध्ययनाचा सपूर्ण अधिकार असून त्याच्यात फक्त अध्यापन आणि प्रतिग्रह येवढाच भेद असल्यामुळे त्याच वर्णाशी येतो तसे वैश्याचे नाही म्हणून वैश्य व इतर जाति याचे पृथक् निर्देश न करता ब्रह्मक्षत्राखेरीज उरलेल्या सर्व आर्य समाजाचा नेहमी एकत्र उल्लेख केलेला आहे 'विश' शब्दाचा अर्थ सघाताच्या घटकाचे पृथकत्वच (Distributive Sense) दाखविणारा आहे, हे 'विश्वस्मात्' 'विश्वेदेव'इत्यादि अनेक ऋग्वेदीय शब्दावरून ध्यानात येईल. म्हणून 'विश' म्हणजे उरलेला सर्व वैदिक समाज असा अर्थ असला पाहिजे वैश्याच्या अतर्गत इतर जाति असल्यामुळे 'विश' शब्दाने बाकीच्या सर्व समाजाचा बोध घेतला पाहिजे झरथुष्ट्राच्या गाथेत अगदी अशाच प्रकारची विभागणी स्पष्ट उल्लेखिली आहे. तीत ब्रह्म-क्षत्रियाची वर्णोचित कर्मेही सागितली असून बाकीच्या सर्व लोकाना एकाच वर्गात टाकले आहे

"अईरयमा हे खाएतुश आताईश अंघहत।

ये वेरे नेजाई वघ उद्दीम दात ऋसस्तीम ।। गाथा ४९।७

What does a Brahman or a Vaishya avail? He alone counts who contributes to military strength of the community.

अईयरमा=आर्यम्ना, a Brahmin

खयेतु = People born at large

वेरेनेजाई = Kshatriya (from व्रश्च to fight)

हे शब्द येथें 'वर्ग'बोधक नसून 'वर्ण' बोधक आहेत युद्धाचे कर्तव्य फक्त एकाच वर्गाचे ही कल्पना चातुर्वर्ण्याचीच. कोणत्याही काळी इतर सर्व देशात सर्व वर्गाना युद्धास तयार रहावें लागे. वरील अर्थ माझे नाहीत. पारशास सम्मत असलेलेच आहेत.

त्या काळी पारशात शेतकरी अथवा कामकरी यापैकी एकवर्ग मुळीच नव्हता असे समजावयाचे काय ? बृहदारण्यकावरूनहि तसेच दिसून येते त्या आरण्यकात (अ ६ ब्रा ३) मत्रविद्या सागितली आहे त्यातील आहुतीत देखील 'ब्रह्मणे स्वाहा' आणि 'क्षत्राय स्वाहा' अशा दोनच वर्णाचा निर्देश असून इतर सर्वाना 'विश्वात' घातले आहे परतु बृहदारण्यकाच्या काळी चारी वर्ण होते याविषयी कोणाचाच वाद नाही

चातुर्वर्ण्य जन्मजात केव्हापासून झाले हे ठरविण्याची मुख्य खूण म्हणजे आतरप्रभव वर्ण होत वर्ण जन्मजात असल्याखेरीज आतरप्रभव वर्ण उत्पन्न होण्याचेच कारण नाही. समाजाच्या सोयीकरिता त्याचे हवे तितके वर्ग वाढू शकतील (रोमन लोकात असे सात वर्ग होते ) अथवा कमीही होऊ शकतील परतु वर्णाची सख्या कमी किवा अधिक न होता ती चारच राहिली पाहिजे आणि मिश्र सतति उत्पन्न झाली असता ती खालच्या अथवा वरच्या कोणत्याहि वर्गात मिळून न जाता त्याचा स्वतंत्र आतर-प्रभव वर्ण बनला पाहिजे असा निर्बंध व्हावयाचा म्हणजे चातुर्वर्ण्य जन्मजातच असले पाहिजे ही गोष्ट इतकी सोपी आहे की ती कोणाच्याही लक्षात येईल जगातील कोणत्याहि राष्ट्राच्या इति-हासात अशा आतरप्रभव वर्गाचे उदाहरण नाही. अशा प्रकारचा आतरप्रभव वर्ण सापडणे हे जन्मजात चातुर्वर्ण्याचेच लक्षण आहे शुक्ल यजुर्वेदामध्ये पुरुषमेधात निरनिराळ्या यूपाशी बाधावयाच्या माणसाची नावे आली आहेत. त्यात सूत, शैलूष, कर्मार, रथकार इत्यादि नावे आली आहेत आणि निरनिराळ्या जातीचे यज्ञपशु म्हणून त्याचा विनियोग केला आहे. ती जातिवाचक नावे आहेत धद्याची वाचक नाहीत हे उघड आहे कारण यजुर्वेदात चार वर्णाचे स्पष्ट उल्लेख आहेत तेव्हा यजुर्वेदकाली जन्मजात चातु-र्वर्ण्य व आतरप्रभव वर्ण स्थापित झाले होते हे उघड आहे. यापैकी कर्मार, भिषक्, शैलूष इत्यादिकाचे उल्लेख ऋग्वेदातहि आले आहेत. व तेथे ती नावें धदेवाचकच मानली पाहिजेत, जातिवाचक

असणें शक्य नाही, असे मानण्यास काही पुरावा नाही. यजुर्वेद-सस्कृति ऋग्वेद सस्कृतीहून भिन्न होती असे मानण्यास कांही आधार नाही. यजुर्वेदातील अश्वमेधाचा उल्लेख ऋग्वेदात आला आहे ती यजुर्वेदकालीन सस्था ज्याप्रमाणे ऋग्वेदपूर्व आहे, त्याच प्रमाणें यजुर्वेदात नवीन वाटणाऱ्या गोष्टीहि ऋग्वेदपूर्वच आहेत तात्पर्य –

(१) ब्राह्मण्य मात्र मत्रकालातच वशपरपरेने स्थापित झाले होते, ही गोष्ट डॉ केतकरासारख्या अर्वाचीन पडितानाहि आतां पटू लागली आहे

(२) ब्रह्म व क्षत्रिय हे शब्द ऋग्वेदात पुष्कळ ठिकाणी जातिवाचक आहेत असे सायणाचार्याचे मत आहे

(३) पुरुपसूक्तात चार वर्णाची नावे आणि त्याच्या कर्तव्याचें लाक्षणिक वर्णन अगदी स्पष्ट आले आहे

(४) पहिल्या मडलातील लोपामुद्रेच्या सूक्तात अनुलोम विवाहाचा स्पष्ट उल्लेख आला आहे

(५) आठव्या मडलातील सूक्तात तिन्ही वर्णाची नावे पुरुष-सूक्तातील रूपकाना धरून असलेल्या वर्णनासह आली आहेत.

(६) यजुर्वेदोक्त अतर्जातापैकी तीन चार नावे ऋग्वेदात आली आहेत, आणि यजुर्वेदात ती नुसती धदावाचक नसून जातिवाचक आहेत.

(७) यजुर्वेद सस्कृति आणि ऋग्वेदसस्कृति याच्यात तत्त्वत अभेद आहे.

(८) अतर्जाताचे अस्तित्व म्हणजेच जन्मजात चातुर्वर्ण्य.

यावरून ऋग्वेदकाळी चातुर्वर्ण्य सस्था होती हे सिद्ध व्हावयास प्रत्यवाय नाही. मग ती त्यापूर्वी केव्हाहि व कोणत्याहि कारणास्तव अस्तित्वात आलेली असो म्हणून वैदिक समाजरचना म्हणजे चातुर्वर्ण्यात्मक समाजरचनाच होय हे सशयातीतपणे म्हणता येतें.

✦ ✦ ✦

## व्याख्यान चौथें

# वर्णाश्रम संस्था

चातुर्वर्ण्यात्मक समाजरचना ऋग्वेद काळाइतकी प्राचीन असून तिचे मूळ भारतीयाच्या चतुर्विध पुरुषार्थाच्या ध्येयवादात आहे हे मी मागच्या व्याख्यानात दाखवून दिलेच आहे. समाजातील प्रत्येक व्यक्तीच्या विकसनाची चरम सीमा जशी भारतीयानी विश्वात्मधारणा अथवा स्थितप्रज्ञावस्था मानली त्याचप्रमाणे सपूर्ण समाजाच्या विकसनाची चरमसीमा म्हणून त्यानी कृतयुगाची अथवा सुवर्णयुगाची अवस्था मानलेली आहे या स्थितीत कर्तव्यासाठी कर्तव्य, चारित्र्यासाठी चारित्र्य व पावित्र्यासाठी पावित्र्य हा साऱ्या समाजाचाच स्वभाव होऊन 'एकमेका साह्य करू अवघे धरू सुपथ' अशा प्रवृत्तीने सर्वभूतहितासाठी करावयाच्या प्रयत्नात गढून राहणे नैसर्गिक असते अलीकडच्या मार्क्स प्रभृति समाजशास्त्रज्ञानीही परमोच्च अवस्था म्हणून याच स्थितीचा निर्देश केला आहे अलीकडच्या द्रष्टयाचे असे मत आहे की, ही स्थिति पुढे उत्पन्न व्हावयाची आहे, तर याच्या उलट भारतीयाचे असे मत आहे की पूर्वी एकदा ही स्थिति होती, ती पुढेहि उत्पन्न होईलच, इतकेच नव्हे तर समाजजीवनात विकसनाची ही चरमावस्था वारंवार उत्पन्न होते या स्थितीत समाजजीवन स्वयसिद्धपणेच अनुशासनबद्ध असल्यामुळे शासनयत्राची समाजजीवनात कोणतीहि आवश्यकता नसते म्हणूनच या परमोच्च स्थितीचे वर्णन करताना भीष्मानी शातिपर्वात म्हटले आहे:—

न राज्य नैव राजा च न दण्डयो न च दाण्डिकः ।
धर्मेणैव प्रजा. सर्वा रक्षन्ति स्म परस्परम् ।।

(तेथे राजा नाही व शासन सस्थाहि नाही ज्याला दण्ड करावा असा कोणी अपराधी अस्तित्वात नसल्यामुळें दण्डसस्थेचे अस्तित्वहि नाही कर्तव्यासाठी कर्तव्य या धारणेने प्रेरित असणारे या अवस्थेतील लोक स्वयस्फूर्तीनेच एकमेकाचे सरक्षण करीत असतात ) समाजाच्या विकसनाचे भारतीयाचे हे मानचित्र असल्यामुळे अधिकाराऐवजी कर्तव्याची प्रेरणा समाजजीवनात निरतर उत्पन्न होत राहील असा आदर्श समाजासमोर निरतर असण्याची आवश्यकता त्याना स्वाभाविकपणेच वाटली कर्तव्य-परायण जीवन हा व्यक्तीचा अथवा समाजाचा काही उपजत स्थायीभाव नसतो समाजाच्या मूळच्या उपभोगप्रधान पशुप्रवृत्ती-वर विजय सपादन करूनच हा भाव निर्माण करावयाचा असतो व ही गोष्ट केवळ उपदेश व शिक्षण यानी साध्य होणारी नसून त्यासाठी प्रत्यक्ष श्रेष्ठ जीवनादर्श व्यक्तीच्या व समाजाच्या समोर सतत असण्याचीच आवश्यकता असते व असा जीवनादर्श म्हणून भारतीय द्रष्टयानी चातुर्वर्ण्य पद्धतीतील ब्राह्मणवर्णाची रचना केली देवघरातील नदादीप ज्याप्रमाणे आपले जीवन सतत तिळतिळ जाळीत राहून देवमूर्तीचे अव्यक्त प्रकाशित करतो त्याप्रमाणे आपले जीवन त्याग, तपस्या, व वैराग्याच्या अग्नीत सतत जाळून त्या जीवनातून श्रेष्ठ जीवनमूल्याचा प्रत्यक्ष आविष्कार करून दाखविणे हेच या वर्णाचे खरे काम व यातच या वर्णाचे खरे जीवितसाफल्य आहे "समाजाचे गुरु, मार्गदर्शक, श्रेष्ठ" इत्यादि जी या वर्णाची वर्णने आहेत ती केवळ त्याच्या या भूमिकेसाठी आहेत अधिकार, उपभोग व स्वार्थ या श्रेष्ठतेशी हल्ली सहज सबद्ध असणाऱ्या गोष्टीचा येथे सबध नाही. याप्रमाणे आध्यात्मिक आदर्शाची निर्मिति एका वर्णाच्या रूपाने करण्यात आल्यावर व आजन्म आदर्श सभाळून असणे हे एकच काम त्या वर्णाकडे सोपविल्यावर समाजजीवनातील तितक्याच महत्त्वाच्या अशा दुसऱ्या अगाकडेहि लक्ष पुरविणे समाजशास्त्रज्ञाचे कर्तव्यच होतें ते दुसरे अग म्हणजे समाजाच्या सरक्षणाचें अग होय. जीवन

नुसते तत्त्वनिष्ठ व उदात्त असून चालत नाही तर ते पूर्णपणे स्वसरक्षणक्षम व प्रसगी दुसऱ्याचे सरक्षण करण्याइतके सबल व खंबीरही असण्याची आवश्यकता असते या वैषम्यपूर्ण जगात केवळ दुबळेपणाच पुष्कळदा पशुप्रवृत्तीच्या लोकाच्या आक्रमणाचें कारण झालेला आढळून येतो त्यामुळे समाजरक्षणासाठी वेगळ्या वर्णाची रचना करणे भारतीय समाजशास्त्रज्ञाना स्वाभाविकपणेच आवश्यक वाटले श्रीरामचद्राच्या काळी त्याच्याप्रमाणेच एक-पत्नीव्रतधारी व सत्यवचनी लोक काही कमी नव्हते दण्डकारण्यात असे किती तरी व्रती आश्रमातून तपस्यामय जीवन व्यतीत करीत होते पण त्याच्या त्या आदर्श जीवनाचा लकेतील रावणाच्या आक्रमक राक्षसावर काहीहि परिणाम झाला नाही उल्ट ते येऊन या आदर्श ऋषीचे मास खात असत व अशा खाऊन फस्त केलेल्या ऋषीच्या हाडाचा पर्वतप्राय ढीग दडकारण्यात स्वत रामचद्रानीच पाहिल्याचे प्रत्यक्ष वाल्मीकीय रामायणातील अरण्यकाण्डात वर्णन आहे म्हणून ऋषितुल्य आदर्श जीवन जगणाऱ्या श्रीराम-चद्राना कोदण्डधारी व्हावे लागले व पूर्णावतार भगवान् श्रीकृष्णाना सुदर्शनधारी होऊनच समाजाचे सरक्षण करावे लागले. बाह्य आक्रमणापासून संरक्षण व समाजातील आक्रमक पशुप्रवृत्तीचे नियत्रण या दोन कारणास्तव जो एक स्वतत्र समाजसरक्षकाचा वर्ण निर्माण करण्यात आला त्यालाच क्षत्रिय असे म्हणतात पण आदर्श व दण्डसामर्थ्य याच्या भरवशावर समाजाचे विकसन व सरक्षण होत असले तरी समाजाच्या धारणेचा व पोषणाचा अथवा अन्नाच्छादनाचा प्रश्न सोडविणेहि तितकेच महत्त्वाचे आहे. कारण भुकेच्या आगीने विकसनाची वेल मुळापासून करपल्या-शिवाय रहात नाही या दृष्टीने सपत्तीची निर्मिति, सरक्षण, व विनिमय हेच ज्याचे काम अशा एका वेगळ्या वर्णाची निर्मितीहि आवश्यकच होती जीवनादर्श निर्माण करणाऱ्या वर्गाकडे या गोष्टी सोपवून चालणार नव्हते. कारण सपत्तीच्या सर्वागीण सहवासात व प्रभुत्वात त्याचें पतनच अनिवार्य ठरले असतें. सत्तेत

सपत्तीचे सर्वांगीण केन्द्रीकरण करणे म्हणजे साऱ्या समाजालाच सत्तेचे दास बनण्यास भाग पाडणारे होते म्हणून त्यानी सपत्तीची निर्मिति, सरक्षण व विनिमय या बाबीचा ब्राह्मण व क्षत्रिय याच्याशी प्रत्यक्ष सबध न ठेवता त्यासाठी वैश्य नावाच्या एका स्वतत्र वर्णाचीच निर्मिति केली. शेती, व्यापार, सावकारी व पशुपालन ही या वर्णाची कर्तव्ये असून जातवारीने गट पाडून प्रत्येक गटाचे कर्तव्य हेच त्याच्या जीविकेचे साधन ठरविलेले असल्यामुळे स्पर्धेचे क्षेत्र स्वाभाविकपणेच मर्यादित होऊन त्यामुळे यात आर्थिक सतुलन राखण्याची व्यवस्था होती (१) जीवनादर्श सतत समाजासमोर राहून त्याच्या द्वारे समाजाचे परमोच्च आतरिक विकसन घडवून आणणे, (२) समाजाचे बाह्य व आतरिक आपत्तीपासून सरक्षण व (३) समाजाचे धारण व पोषण ही तीन उद्दिष्टे डोळ्यासमोर ठेवून याप्रमाणे समाजात तीन वर्गाची निर्मिति केल्यानतर समाजाच्या स्थैर्यासाठी व विकसनासाठी आपली श्रमशक्ति वेचणारा एक वर्ग असण्याची आवश्यकता होती, व असा वर्ग म्हणून तीन वर्गानतर उरलेल्या सर्व समाजाचा अतर्भाव शूद्र या वर्णात करण्यात आला चातुर्वर्ण्याच्या या स्वरूपाकडे वरवर स्थूल दृष्टीने पाहिले तरी त्यात, सामान्यत आरोप करण्यात येतो त्याप्रमाणे काही वर्गांची मिरासदारी चालविण्याचा प्रयत्न, वर्गवर्चस्वाची भावना, अथवा अल्पसख्याकानी बहुसख्य जनतेला दडपून ठेवण्याचा कट इत्यादि कोणतेच क्षुद्र हेतु नसून निश्चितस्वरूपाच्या एका महान् सामाजिक विकसनाच्या ध्येयाच्या परिपूर्तीसाठी श्रमविभागाच्या-व तेहि गुण आणि वैशिष्ट्ये याच्याशी सपूर्णपणे सवादी असणाऱ्या श्रमविभागाच्या तत्त्वावर दीर्घदर्शी द्रष्ट्यानी निर्माण केलेली ही व्यवस्था आहे असे आढळून येईल. त्यात राग-द्वेषमूलक अशी कोणतीहि प्रेरणा नाही हे तर त्यानी जीवनादर्श निर्माण करणारा वर्ग सत्ता व संपत्ति यापासून पूर्णपणे दूर ठेवला यावरूनच स्पष्ट होतें ही इतकी शास्त्रशुद्ध रचना आहे की तौलनिक दृष्टीने विचार केल्यास गेल्या दीडशे वर्षातील भौतिक सुधारणावादाच्या

युगात निर्माण झालेल्या सर्व सामाजिक प्रणालि तिच्यासमोर निकस ठरतात येथे थोडक्यात तौलनिक दृष्टीने या प्रणालीचे समालोचन करणे उपयुक्तच ठरेल

**आधुनिक प्रणालीचें समालोचन–**

यूरोपखडाशी जित आणि जेते या नात्याचा आमचा सबध दीडशे वर्षांपूर्वी प्रस्थापित झाल्यानतर भारतीय राष्ट्राला प्रज्ञाहत करण्याच्या दुष्ट राजकीय हेतूने ज्या एका कौशल्यपूर्ण शिक्षणयत्राची या देशात प्रतिष्ठापना करण्यात आली त्याचा परिपाक म्हणून शरीराने हिदु पण मनाने पाश्चात्य अशी शिक्षिताची एक पिढीच आमच्या देशात तयार झाली ज्या ज्या कल्पना व जे जे विचार यूरोपखडात उत्पन्न झाले व विकसनाचे मानण्यात आले त्याना शिरोधार्य समजून त्याना अनुकूल अशी लोकाची मनोभूमिका तयार करणे या पिढीचे एक प्रकारे कर्तव्य होऊन बसले. भारतीय जीवनमूल्याचा या शिक्षिताना आवश्यक तो परिचय तर नव्हताच, पण एक प्रकारच्या न्यूनगडात्मक विकृतीमुळे तो परिचय करून घेण्याची इच्छाहि नव्हती त्यामुळे वैदिक राष्ट्राच्या समाजशास्त्रीय सिद्धान्ताशी तुलना करून एकाद्या नवीन प्रणालीची ग्राह्याग्राह्यता ठरविण्याचा प्रश्न त्याच्यासमोर कधी नव्हताच कारण असे काही तुलना करण्यासारखे समाजशास्त्र आपल्या राष्ट्राजवळ आहे हेच त्याना आधी मान्य नव्हते अशा स्थितीत यूरोपात ज्या काही समाजधारणेच्या म्हणून विचारप्रणालि उदयास आल्या व प्रभुत्वाने नादल्या, त्याचेच प्रतिबिब भारतीय मनात दिसू लागले व आजहि दिसत आहे. या प्रणालीचे वर्गीकरण (१) व्यक्तिवाद (२) समाजवाद व (३) राष्ट्रवाद असे तीन प्रकारचे करता येईल या वर्गीकरणात अनेक सूक्ष्म असे तत्त्वाचे व तपशिलाचे पोटभेद आहेत पण सामान्यत स्थुल मानाने सर्व विचार प्रणालीचे वर्गीकरण असे त्रिविध करता येईल यूरोपखडात नव विचारप्रणालीचा उदय प्रथम फ्रेच राज्यक्रातीनतर झाला. व जन्मजात व वाशिक उच्चनीचतेच्या तत्त्वावर बहुसख्य जनतेला

पिळून काढणाऱ्या राज्यसत्तेचा या क्रातीने अत करून व्यक्तिवादाला व त्यावर अधिष्ठित असलेल्या जनतत्रवादाला जन्म दिला व्यक्ति-स्वातत्र्य, विकसनाची समान सधि व समता यावर आधारलेल्या या प्रणालीच्या प्रभावाने सारे प्रगतिवादी जग प्रथम अत्यत प्रभावित झाले व आजहि जगाच्या अतिशय व्यापक क्षेत्रावर या प्रणालीचेच अधिराज्य आहे. असे असले तरी या प्रणालीची विफलता अति-शयच थोड्या काळात विचक्षणाच्या ध्यानात आली या प्रणालीने मानवातील सघर्षप्रवृत्तीची व पशुत्वाची विषबीजे नष्ट होण्या-ऐवजी ती उलटी वाढीस लागून युद्ध व आक्रमणाची एक भयानक लाटच साऱ्या जगभर उसळली पीडित व विचक्षण लोकाच्या मनात त्यामुळे विलक्षण प्रतिक्रिया निर्माण झाली या प्रतिक्रिये-तूनच सघप्रधान समाजवाद, विश्वकुटुबवाद, अराज्यवाद साक्षात्-क्रातिकारी समाजवाद, सघनिष्ठ समाजवाद (Guild Socialism) बलप्रधानतज्ज्ञ शासनवाद (Fascism), राष्ट्रीय समाजस्वत्ववाद इत्यादि अनेक प्रणालीचा जन्म झाला पण यापैकी एकाही प्रणालीने लोकतत्र वादाच्या त्रुटी भरून काढल्या नाहीत इतकेच नव्हे तर सघर्षाची व पशुवृत्तीची विषबीजे चागली फुलवून आज मनुष्यजाति विनाशाच्या गर्तेवर आणून उभी केली आहे पुरी दीडशे वर्षेसुद्धा स्थिरता प्राप्त न करू शकलेल्या, इतकेच नव्हे तर विश्वाच्या विध्वसाचा क्षण जवळ आणीत रक्तपात व अत्याचार याची साऱ्या जगभर एक भयानक परपराच निर्माण करणाऱ्या या लोकतत्र, साम्यवाद व फॅसिझम् प्रभृति प्रणालीची, सहस्रा-वधि वर्षे एका बृहत्तम राष्ट्रातील कोट्यवधि लोकाचे जीवन शात सुव्यवस्थित, समाधानी व मंगलमय राखणाऱ्या चातुर्वर्ण्य समाज-प्रणालीशी तुलना करण्याचा विचारच अत्यत चुकीचा आहे वैफल्य व मागल्य याची तुलना काय होणार ? कोणत्याहि समाज-रचनापद्धतीच्या योग्ययोग्यतेचा खरा निकष शेवटी तिचा प्रत्यक्ष समाजजीवनावर घडून आलेला परिणाम हाच असतो, व असला पाहिजे. या एकाच निकषावर घासून पाहिले तर पाश्चात्य प्रणालीची

निस्सारता ध्यानात येते तरीपण भारतीय मनावर त्याचे असलेले अधिराज्य ध्यानात घेतले तर त्याच्या उभारणीच्या मुळाशी असलेल्या तात्त्विक दृष्टीचे समालोचन आवश्यक ठरते.

या लोकतंत्रवादापासून तर फॅसिझम व नाझीवादापर्यंतच्या विचारप्रणालीच्या वैफल्याचे खरे रहस्य त्याच्या मुळाशी असलेल्या भोगवादाच्या पुरस्कारात दडलेले आहे चातुर्वर्ण्यात्मक समाज-रचनेच्या द्रष्टयासमोर विश्वात्म होऊन राहणे हा जीवनाचा महत्तम आदर्श ठरल्यामुळे त्याग हेच तिच्या उभारणीचे मूलभूत तत्त्व ठरले व म्हणूनच ‘ अमरतेचे खरे रहस्य त्यागातच साठविलेले आहे ’ (त्यागेनैके अमृतत्त्वमानशु ) हा भारतीय द्रष्टयानीं उद्घोष केला पाश्चात्य समाजरचनाप्रणालीच्या द्रष्टयासमोर असा कोणताहि आदर्श नसून पुरेसा भोग न मिळण्याच्या वस्तु-स्थितीची प्रतिक्रिया म्हणूनच त्याचा जन्म झालेला आहे हे तेथील समाजक्रांत्याच्या इतिहासाचे वरवर पर्यालोचन केले तरी ध्यानात येते वांशिक राजसत्ता व सरंजामशाही यानी प्रजाचे अन्न वा जनतेचे जीवन यूरोपमध्ये फ्रेंच राज्यक्रांतीच्या पूर्वी जे दुस्सह करून सोडले ते स्वत च्या अमर्याद भोगलालसेसाठी हे जसे खरे आहे, त्याचप्रमाणे रूसो, वॉल्टेर प्रभृतीचे क्रांतिघोष व प्रत्यक्ष राज्यक्रांतीचे उद्दिष्ट प्रत्येकाला पुरेसे भोग मिळावे हेच होते या क्रांतिपर्वानंतर स्थापन झालेल्या लोकतंत्राचे पर्यवसान जे भांडवल शाही व साम्राज्यवादात झाले ते अल्पसंख्य यंत्रस्वामीच्या अनिवार भोगलालसेमुळे हे जितके खरे आहे तितकेच या विकृत जन-तंत्रवादाची प्रतिक्रिया म्हणून निर्माण झालेल्या साम्यवादाची प्रेरणाहि सर्वांना त्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणे व आवश्यकतेप्रमाणे उपभोग मिळाले पाहिजेत हीच होती व आहे या भोगप्रवृत्तीच्या पुरस्कारामुळे साम्यवादाच्या नावाखाली रशियात सत्ताकेन्द्रित भांडवलशाही स्थापन झाली व तिचे पर्यवसान उग्रस्वरूपाच्या अधिनायक वादात व अखेर जनतेच्या सर्वंकष स्वरूपाच्या शोषणात

झाले. व रशियन तत्राचे स्वरूप एखाद्या राष्ट्रापुरतें मर्यादित नसून साऱ्या जगालाच या उग्र अधिनायकवादाखाली खेचण्याचें आहे हे दिसून येताच काही स्वाभिमानी राष्ट्रातून त्याची प्रतिक्रिया म्हणून वशनिष्ठ व राष्ट्रनिष्ठ स्वरूपाचा बल-प्रधान तज्ज्ञ शासनवाद (फॅसिझम् व नाझीझम्) जन्माला आला त्याचीहि मूळ प्रेरणा भोगवादाचीच असल्यामुळे तेथेहि त्याचे पर्यवसान स्थिर स्वरूपाच्या रचनेत होऊ शकले नाही येथे एक असा मूलभूत प्रश्न उत्पन्न होण्याची शक्यता आहे की, समाज-रचनेची प्रेरणा भोगप्रधान का असू नये ?

**समाजरचनेची प्रेरणा भोगप्रधान कीं त्यागप्रधान ?**

एक तर आत्यतिक त्याग असभवनीय आहे कारण मुळात मनुष्याचा स्वभाव भोगप्रवण आहे, तो त्यागप्रवण नाही शिवाय सृष्टीतील यच्च यावत् गोष्टीचा केवळ त्यागच जर निसर्गाला अथवा नियामक शक्तीला अभिप्रेत असेल तर मग भोग्य पदार्थाची इतकी निर्मिति होण्याचा अथवा करण्याचा हेतु तरी काय ? भारतातील एकादा श्रेष्ठ परमहस घेतला तरी त्याला छाटी, दड, कमडलु इत्यादिकाची आवश्यकता असतेच अशा स्थितीत त्याग-प्रधानतेसारख्या असभवनीय व अनैसर्गिक प्रेरणेचा पुरस्कार करण्यात काय अर्थ ? मुळात भोगेच्छा ही सुखाच्या इच्छेच्या परिपूर्तीसाठी उत्पन्न होत असते, व सुखाची इच्छा ही मनुष्य-मात्रात इतकी नैसर्गिक आहे की ती सपली की जीवनाचेच विराम-चिन्ह उमटते म्हणून जितकी सुखाची इच्छा नैसर्गिक इतकीच भोगण्याचीहि इच्छा नैसर्गिकच आहे यावर उत्तर इतकेच आहे की मनुष्य हा केवळ निसर्गाच्या हातातील खेळणे होणारा पशु नसून त्या निसर्गावर मात करून त्याचा उपयोग स्वतच्या विकासासाठी व शाश्वत स्वरूपाच्या सुखासाठी करून घेण्याचे त्याच्या ठिकाणी सामर्थ्य आहे सुखाची इच्छा ही मनुष्यमात्राची नैसर्गिक प्रवृत्ति आहे व त्यासाठी सृष्टीतील विविध पदार्थाच्या उपभोगाची प्रवृत्ति स्वाभाविकपणेच त्याच्या ठिकाणी असून ते

उपभोग त्याला मिळाले पाहिजेत हे भारतीय समाजशास्त्रज्ञांनाहि समतच आहे 'सुखार्था सर्वभूताना मता सर्वा प्रवृत्तय' हे महाभारतातील वचन प्रसिद्ध असून सृष्टिनिर्मितीचे कारण सागताना भारतीय समाजशास्त्रज्ञानी म्हटले आहे --

'तद्भोगाय पुनर्भोग्यभोगायतनजन्मने ।
पञ्चीकरोति भगवान् प्रत्येक वियदादिकम् ॥'

जीवाच्या उपभोगासाठीच परमेश्वराने पचीकरणप्रक्रियेने सपूर्ण सृष्टि निर्माण केली' पण जगात केवळ एकच जीव जन्माला आला असता तर त्याच्या भोगेच्छेला कोणत्याहि प्रकारच्या सयमाची व प्रतिबधाची आवश्यकता नव्हती पण सृष्टिकर्त्याने असे काही केलेले दिसत नाही. त्याने जसे अनेक पदार्थ उत्पन्न केले आहेत तसेच असख्य जीवहि उत्पन्न केले आहेत या जीवाच्या भोगाच्या इच्छेच्या परिपूर्तीसाठी होणारा सघर्ष म्हणूनच अटळ आहे आज पशू जसे या भोगेच्छेच्या पोटी अखड सघर्ष करीत असतात तसाच मनुष्यप्राणीहि त्याच्या रानटी अवस्थेत करीत होता पण बुद्धिप्रधान मनुष्यजीवाने ही गोष्ट ओळखली की, निदान सुखाच्या परिपूर्तीसाठी जसे भोग आवश्यक आहेत त्याचप्रमाणे मनुष्य जीवहि असंख्यात असल्यामुळे अनिर्बध भोगेच्छेला सर्वाच्या समतीनेच पायबद घालून काही व्यवस्थाहि निर्माण करण्याची आवश्यकता आहे भोगाचे उपभोग घ्यावयाचे म्हटले तरी ते आपल्याहून सबळ असलेला दुसरा कोणी हिरावून घेणार नाही अशा निश्चिततेने, सुरक्षिततेने व निर्भयपणे घेता आले पाहिजेत तसेच इतरानाहि ते उपभोग मिळण्याच्या दृष्टीने त्याचे काही प्रमाणहि ठरविलेच पाहिजे कोणाही व्यक्तीला व्यक्तिजीवनच केवळ नसून या दृष्टीने सामाजिक जीवनहि असते उपभोग व सुख या व्यक्तिमात्राच्या केवढ्याहि मूलभूत प्रेरणा असल्या तरी या संबधात व्यक्तिमात्र परस्परावलबी आहे, व म्हणून परस्पर सहकार्याची व्यवस्था असण्याची जीवनात अत्यत आवश्यकता असते असे जर नसेल तर व्यक्तिमात्राच्या भोगसुखेच्छाचा परस्परसघर्ष निर्माण झाल्याविना

रहात नाही व अशा संघर्षात्मक वातावरणात कोणाचीच भोगसुखेच्छा निश्चितपणे पूर्ण होण्याची काडीइतकीहि शक्यता नाही इतकेच नव्हे तर बलवाद व दण्डवाद याचेच या स्थितीत प्राबल्य होऊन व्यक्तिवादी अथवा संघात्मक प्रबल शासनसंस्था निर्माण होण्यात या स्थितीचे निश्चित पर्यवसान होते. अशी काही वेगळी व्यवस्था निर्माण करावयाची तर एकमेकासाठी व उच्च आदर्शासाठी स्वयंस्फूर्त त्यागाचीच प्रेरणा व्यक्तिमात्रात उत्पन्न होणे अत्यवश्य आहे व या दृष्टीने विचार केला तर भोगसुखेच्छेच्या सुव्यवस्थित परिपूर्तीसाठीच जीवनाची प्रेरणा भोगात्मक नको असून ती त्यागात्मक असण्याची आवश्यकता आहे हे कोणाच्याही सहजच ध्यानात येईल. पाश्चात्याच्या गेल्या दीडशे वर्षांत उत्पन्न झालेल्या सर्व प्रणालि या अस्थिर, विफल, विनाशकारी, आणि बलवाद व दण्डवाद याचाच वस्तुत पुरस्कार करणाऱ्या ठरण्याचे कारण त्याची प्रेरणा केवळ भोगात्मक आहे हेच होय जनतेच्या कल्याणाच्या व सुखकारक व्यवहाराच्या दृष्टीने उभारावयाच्या समाजव्यवस्थेचे पहिले सूत्र त्यागात्मक प्रेरणा व विकारावर संयमाचे नियंत्रण घालणारी भोगत्यागमूलक रचना हेच असले पाहिजे भोगत्यागमूलक रचना असे म्हटल्यावर सर्वथा असंभवनीय असणाऱ्या सर्वस्वत्यागाचा येथे संकेत नाही हे वेगळे स्पष्ट करून सांगावयाची आवश्यकता नाही

पाश्चात्य प्रणालीचा दुसरा मोठा दोष म्हणजे संघर्षात व विनाशात पर्यवसित होणारी अधिकाराची जाणीव हा होय. हा दोष भोगात्मक प्रेरणेच्या पोटीच उत्पन्न झालेला आहे राजसत्ता व सरजामशाही याच्या विरुद्ध क्रांतीचे आवाहन करताना तिच्या पुरस्कर्त्यांनी जनतेला तिच्या व्यक्तिस्वातंत्र्य, विचारस्वातंत्र्य, उपभोगस्वातंत्र्य इत्यादि अधिकाराचीच जाणीव करून दिलेली होती या वादातून निर्माण झालेल्या भांडवलशाहीविरुद्ध श्रमजीवी वर्गाला क्रांतीच्या आवाहनाने जागृत करीत असता साम्यवादी समाजरचनेच्या पुरस्कर्त्यांनीही श्रमजीवी वर्गाच्या मनात त्याच्या

अधिकाराचीच तीव्र जाणीव उत्पन्न केली होती. याच्या उलट नाझीवादी व फॅसिस्ट प्रतिक्रियेतसुद्धा या अधिकाराच्या अथवा हक्काच्या तत्त्वाचाच पुरस्कार करण्यात आला याचा परिणाम आपातत अमृतमय परतु परिणामत विषमय अशा तामस वातावरणाची वाढ होण्यात झालेला दिसूत येतो बुद्धिमान्, निर्बुद्ध, सशक्त, अशक्त इत्यादि सृष्टीतील नैसर्गिक वैषम्याचा विचार न करता पुरस्कारिलेल्या समान सधीच्या तत्त्वामुळे स्पर्धेचे क्षेत्र मर्यादातीत होऊन एका बाजूला अमर्याद श्रीमती तर दुसऱ्या बाजूस अमर्याद दारिद्रचच असे दृश्य दिसू लागून जीवनार्थ कलह व हक्काचे झगडे यानी सारे वातावरण भारलेले आहे श्रमजीवी व यत्रस्वामी, विद्यार्थी व अध्यापक, स्त्री व पुरुष, पालक व पाल्य, जनता व अधिसत्ता असे सघर्षाचे द्वैत आज सर्वत्र दिसत आहे. हक्काचा सबध मनुष्यमात्राच्या अहकारप्रवृत्तीशी येतो किबहुना अधिकाराचा पुरस्कार हा एक प्रकारचा अहकारप्रवृत्तीचाच पुरस्कार आहे अर्थातच या पुरस्काराने व्यक्तीचा सबध शुद्ध प्रेमाऐवजी शुद्ध विरोधाचाच येतो हा विरोध समान हितसबधावर आधारलेले जे व्यक्तीव्यक्तीचे गट त्यात पसरतो व त्याचा परिणाम एकदर समाजात स्नेहशून्य व अशातिमय वातावरण उत्पन्न होण्यात होतो दुसऱ्याचा पाडाव करून आपले घोडे पुढे दामटण्याची सतत प्रवृत्ति उत्पन्न होऊन सपूर्ण समाजाचे जीवन स्पर्धा, चढाओढ व अहमहमिका यानी भरून जाते या सघर्षात जे मागे राहतात त्याचे तर हाल होतातच, पण जे पुढे सरतात त्याना आपली जागा स्थिर करण्यासाठी पुनश्च झगडावे लागून सूक्तासूक्त मार्गाचा अवलब करणाऱ्या पतित प्रवृत्तीचा सुळसुळाट होतो त्यामुळे हक्काऐवजी वेगळी प्रेरणा आपोआपच आवश्यक ठरते. ती प्रेरणा कर्तव्याची होय हक्काची जाणीव मनुष्यसमाजात आवश्यक आहे यात शका नाही. पण केवळ हक्काच्या जाणिवेने मनुष्यसमाजात मागल्य उत्पन्न होऊ शकत नाही. आज पाश्चात्य समाजात जी विविध परिवर्तने चालू आहेत त्याचा विचार केला

तर तेथील समाजरचना अद्याप प्रयोगावस्थेतच आहे हे ध्यानात येईल एक रचना पूर्ण ममाधानकारक न वाटली की, क्रातीचा मार्ग स्वीकारून ती नष्ट करावयाची, व ती विफल झाल्याचें पाहून पुन्हा त्या नवीन रचनेमुळेहि असतुष्ट होऊन पुन्हा क्रातीचा मार्ग चोखाळावयाचा, अशी एक अशातिमय परपरा तेथे उत्पन्न झालेली आहे काही शातताप्रधान मनोवृत्तीचे लोक उत्क्रातीचा मार्ग परिणामकारक नाही आणि क्रातीचा मार्ग रानटीपणाचा व पुनश्च अन्यायी समाजरचना उत्पन्न होण्याचे भय असणारा आहे अशा द्वद्वात सापडलेले आहेत भोगलालसा व तदर्थ अधिकाराची घोषणा याचा हा परिणाम आहे व त्यामुळेच थोडीबहुत त्यागबुद्धि, साम्यवाद व राष्ट्रवाद यानी पर्यायाने मान्य केली तरी बुद्धीची विकारवशना त्याच्या पुरस्कर्त्यानाही अधिनायकवादाकडे प्रवृत्त केल्यावाचून रहात नाही म्हणून अधिकाराची जाणीव हे समाजरचनेचे तत्त्व रहाणे योग्य नसून कर्तव्याची जाणीव हेच रहाणे योग्य आहे हे कर्तव्य म्हणजेच स्वधर्म होय या कर्तव्याच्या भावनेने अहकारवृत्तीच्या पुरस्काराचे पर्यवसान तिच्या सयमात होऊन स्पर्धेचे रूपातर सहकारित्वात होते, कर्तव्य हेच सर्वात श्रेष्ठ असे नैतिक बंधन आहे पाश्चात्य समाजरचनेच्या पुरस्कर्त्यांनी लोकतत्राचा पुरस्कार करताना अथवा व्यक्तिस्वातत्र्याचा पुरस्कार करताना व्यक्तिमात्राला तिच्या अधिकाराची जाणीव दिली, पण कर्तव्याची जाणीव दिली नाही त्यामुळे भाडवलशाही व साम्राज्यवाद याची निर्मिति झाली त्याची प्रतिक्रिया असलेल्या साम्यवादाने श्रमजीवी वर्गाला त्याच्या अधिकाराची जाणीव दिली, पण कर्तव्याची जाणीव दिली नाही व इतर प्रणालीतहि हीच त्रुटि शेवटपर्यत राहिली आहे त्याऐवजी समाजरचनेचे तत्त्व कर्तव्य म्हणून स्वीकारण्याची आज आवश्यकता आहे. प्रेरणा द्यावयाची ती आज जी मिळत आहे त्याहून अगदी वेगळ्या स्वरूपाची आवश्यक आहे, म्हणजे अशी की, श्रमजीवी वर्गाला त्याच्या कर्तव्याची जाणीव करून देणे आवश्यक आहे, तर यत्राचे मालक

असणाऱ्या धनिकांना श्रमजीवी वर्गाच्या अधिकाराची व ते अधिकार सुरक्षित राखण्याच्या धनिकाच्या कर्तव्याची जाणीव करून देणे हे खरे आवश्यक आहे तिसरी महत्त्वाची गोष्ट ही की, साम्यवादापासून गिल्ड सोशॅलिझमपर्यंत सर्व प्रकारच्या प्रणालींना आपआपल्या पद्धतीने आदर्श समाजरचनेचा पुरस्कार करताना ती अमलात आणावयास प्रबल शासनसस्थेच्या उग्र दंडाच्या भयावाचून दुसरे कोणतेहि योग्य व परिणामकारक साधन आढळत नाही. केवळ भयावर अधिष्ठित असणारी कोणतीहि व्यवस्था आरंभी मोठ्या द्रुतगतीने प्रगति करणारी व आदर्श वाटली तरी शेवटी तिचे पर्यवसान केवढे असंतोष निर्माण करणारे ठरते हे रशियाचा ताजा इतिहास सांगत आहे स्टालिनच्या उग्र दंडनीतीचा परिपाक म्हणून हल्ली क्रुश्चेव्ह याच्या नेतृत्वाखाली रशियन असंतोषाचा जो नुकताच भडका उडालेला आहे, त्याचा विचार केला तर या म्हणण्याची सत्यता ध्यानात येईल वैषम्यपूर्ण जगात दंडनीतीची नितांत आवश्यकता आहे, पण केवळ दंडाच्या भरवशावर समाजजीवन न चालविता समाजाच्या प्रत्येक घटकात स्वयंस्फूर्त कर्तव्याची प्रेरणा निर्माण करता आली पाहिजे. ही कर्तव्ये निश्चित करताना काही गोष्टींची जाणीव असणे आवश्यक आहे त्या गोष्टी अशा —

(१) व्यक्तीचे कर्तव्य ठरविताना ते स्पष्टपणे ज्याचे त्याला तर कळलेच पाहिजे, पण अशी समाजरचना हवी की, तिच्यात त्या त्या व्यक्तीचे कर्तव्य इतरांनाहि कळले पाहिजे कारण तसें ते कळले तर समाजाच्या इतर घटकांना जसे त्या व्यक्तीला साहाय्यक होता येईल तसेच ती व्यक्ति कर्तव्यभ्रष्ट झाली तर समाजाला व समाजाच्या शासनसंस्थेला त्या व्यक्तीला शासनहि करता येईल

( २ )व्यक्तीचे कर्तव्य जसे स्पष्ट तसेच ते निश्चित स्वरूपाचेही ठरले पाहिजे समाजरचनेत आपले स्थान व आपले कर्तव्य अमके विशिष्ट आहे व दुसरे नाही याची प्रखर जाणीव व्यक्तिमात्रात

असली तरच ती व्यक्ति कोणत्याही अडचणीना न जुमानतां आपले कर्तव्य पार पाडण्याच्या भूमिकेवर स्थिर राहते

( ३ ) सामान्यत व्यक्तीचे कर्तव्य तिच्या स्वभावास सर्व-साधारणपणे अनुकूल असले पाहिजे

( ४ ) व्यक्तिमात्राचे कर्तव्य जन्मत अथवा तिच्या शैशवा-वस्थेतच ठरणे आवश्यक आहे म्हणजेच त्या व्यक्तीला त्या कर्तव्यपरिपूर्तीसाठी सुक्षम बनण्यास आवश्यक असे शिक्षण व सस्कार घेता येतील एरवी कर्तव्य वेगळे व सस्कार आणि शिक्षण भिन्न प्रकारचे असा विचित्र दुरवस्थेचा प्रसंग ओढवेल

(५) वरील सर्व गोष्टी घडून येण्यास आपला जन्म भोगाकरता नसून कर्तव्याकरता आहे अशा रीतीची प्रखर जाणीव व्यक्तिमात्रात उत्पन्न झाली पाहिजे व प्रथम समाजकल्याण अथवा लोककल्याण व त्या मिळती आपले सुख ही व्यक्तिमात्राची प्रवृत्ति बनली पाहिजे.

तात्पर्य, भोगात्मक प्रेरणा व त्यागात्मक प्रेरणेचा पूर्णपणे अभाव, अधिकाराची उत्तेजना पण कर्तव्याच्या उत्तेजनेचा अभाव, आणि दडशक्तीच्या भयाचा वापर पण स्वयस्फूर्त कर्तव्यनिष्ठा उत्पन्न करणाऱ्या सस्कारयत्राचा अभाव, या तीन महत्त्वाच्या दोषामुळे पाश्चात्य विचारप्रणालि मानवतेला सपूर्णपणे अहित-कारक, विनाशकारी व अवघ्या दीड शतकाच्या आतच कोलमडून पडण्यासारख्या अशाश्वत ठरल्या आहेत शिवाय लोकतत्रापासून तर साम्यवादापर्यतची तेथील प्रणालीही कशाच्या तरी विद्वेषाच्या पायावर उभारलेली प्रतिक्रिया आहे त्यामुळे वैषम्यपूर्ण सृष्टीचा एक भाग असलेल्या मनुष्यजीवनाच्या स्वाभाविक वैषम्यपूर्ण ठेवणीत यापैकी कोणत्याहि प्रतिक्रियेला वर्गसमन्वयाचे अथवा सवादितेचे सगीत निर्माण करता आले नाही सहस्रावधि वर्षे हे वर्गसमन्वयाचे व सवादितेचे सगीत, वैषम्यपूर्ण व्यक्तिजीवनात व समाजजीवनात केवळ चातुर्वर्ण्यात्मक समाजपद्धतीनेच टिकवून धरले. कारण तिची निर्मिति कोणत्याही दु खपूर्ण परिस्थितीची प्रतिक्रिया म्हणून झालेली नाही. त्यामुळे कोणाच्याही विद्वेषाची

तिच्या मुळाशी मुळीच प्रेरणा नाही अत्यत कळकळीची समाज-कल्याणाची प्रेरणा, अतिशय सूक्ष्म असा सृष्टीचा व मनुष्य जीवनाचा अभ्यास, स्वार्थविरहित विवेकशक्ति व काही महत्त्वाच्या शास्त्रीय तत्त्वाचा साक्षात्कार यातून भारतीय द्रष्टयाना ही कल्पना स्फुरलेली आहे त्याच्या समोर जे अखड ध्येय राहिले त्याचा त्यानी त्याच्या दैनदिन प्रार्थनेतही समावेश केलेला आहे व तो पाहिला म्हणजे त्याच्या कल्याणमय भूमिकेची यथार्थ कल्पना येते तो असा ––

सर्वेऽत्र सुखिन सन्तु सर्वे सन्तु निरामया ।
सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चिद् दु खमाप्नुयात् ।।
अपुत्रा पुत्रिण सन्तु पुत्रिण सन्तु पौत्रिण ।
अधना सधना सन्तु जीवन्तु शरदा शतम् ।।

(या जगात सर्वजण सुखी असावे, कोणालाहि रोगाची अथवा अस्वास्थ्याची बाधा असू नये, सर्वाचे कल्याण व्हावे व कोणालाहि दु ख भोगण्याचा प्रसग येऊ नये जे निपुत्रिक असतील ते पुत्रवान् व्हावे, ज्याना पुत्र असतील त्याना पौत्र व्हावे, निर्धन असतील त्याना धनलाभ व्हावा व सर्वानाच शतायुष्य लाभावे ) ही प्रार्थना एकाद्या राष्ट्रापुरती सीमित नसून ती सर्व विश्वासाठी आहे. तीच थोडया फार फरकाने श्रीज्ञानेश्वर महाराजाच्या पसायदानातहि आढळते यावरून भारतीयाची ही विश्वकल्याणाची आतरिक स्फूर्ति शतकानुशतके कशी अक्षुण्ण परपरेने चालत आलेली आहे याची कल्पना येते या विश्वकल्याणाच्या उत्कट इच्छेतूनच भारतीयाच्या समाजशास्त्राची व शासन नि अर्थव्यवहाराच्या विविध सस्थाची निर्मिति झालेली आहे ही निर्मिति करताना त्यागमय आदर्श म्हणून त्यानी सर्व समाजासमोर ज्याप्रमाणे ब्राह्मण ठेवला त्याचप्रमाणे ब्राह्मणासमोर आदर्श म्हणून सन्यासी परमहसाला उपस्थित केले पण भोग ही माणसाची प्रवृत्ति आहे ही गोष्ट ते विसरले नाहीत तिचा खोलवर विचार करून त्यानी चातुर्वर्ण्याची जी भोगत्यागात्मक रचना केली ती साऱ्या जगाला

आश्चर्यमुग्ध करणारी आहे इतर सर्व विचारप्रणालीत जितकी योग्यता अधिक तितक्या सवलती अधिक व तितकेच भोगाचें प्रमाणहि अधिक अशी वस्तुस्थिति आहे चातुर्वर्ण्यपद्धतीची रचना याच्या नेमकी उलट आहे येथे जितकी योग्यता अधिक, तितके दायित्व व नियत्रण अधिक, आणि तितकाच भोग कमी आणि त्याग अधिक अशी वस्तुस्थिति आहे. त्यामुळे येथे निम्नश्रेणीला भोग पुष्कळ व त्याग जुजबी, आणि सर्वोच्च श्रेणीला भोग अगदीच जुजबी आणि त्याग व दायित्व सर्वात अधिक अशी व्यवस्था आहे. उच्च श्रेणीचा आदर्श उत्पन्न करून भोगातील स्पर्धेचे क्षेत्र निर्मूल करणारी ही व्यवस्था जीवनात केवढी क्रांति घडवून आणणारी ठरली हे भारताच्या सास्कृतिक इतिहासाचे सूक्ष्म अध्ययन केलें तर ध्यानात येते या रचनेबद्दल आश्चर्यमुग्ध होऊन रोमारोलाँ यानी म्हटले आहे –

' Its vision which passes beyond the changing horizon of good and evil, judges lucid and serene the flood of souls that goes by, indulgent to the frailities of the week and severe only with the strong For, this lofty thought demands much of those who are capable of much; and its entire conception of the hierarchy of castes, which at first sight, seems so contemptuously aristocratic, is based on this principle (diametrically opposed to that of the democracy of the West) that the more elevated the man be, the fewer are his rights and the more numerous his duties '

( या रचनेत दृष्टोत्पत्तीस येणारा द्रष्टेपणा इतका अलौकिक आहे की त्याने नित्य परिवर्तनशील असे लौकिक जगातील चागले आणि वाईटपणाचे क्षितिज पूर्णपणे उल्लघून अखड गतिशील जीवाच्या अपक्रमण नि उत्क्रमणाचा अतिशय खोल व सूक्ष्म

विचार करून सिद्धान्त काढलेले आहेत. येथे सामर्थ्यहीनाचा अतिशय सहानुभूतीने विचार केलेला असून सामर्थ्यवताच्या बाबतीत ढिलेपणाचा मुळीच अगीकार केलेला नाही. या श्रेष्ठ विचारप्रणालीत जे सामर्थ्यशील आहेत त्याच्याकडून पुष्कळ कर्तृत्वाची अपेक्षा करण्यात आलेली आहे, व जातिसस्थेच्या साऱ्या उभारणीत हेच तत्त्व अनुस्यूत आहे वरवर पाहणाऱ्यास या वर्णसस्थेत वर्चस्ववादाचे तत्त्व अनुस्यूत असलेले दिसते, पण त्यातील खरे तत्त्व वर लिहिल्याप्रमाणे असून त्यावर या सस्थेचे मदिर उभारलेले आहे पाश्चात्याच्या स्पर्धामय व लौकिक वर्चस्ववादाच्या अर्थातच अगदी उलट असे हे तत्त्व आहे. येथे मनुष्य जितका जास्त सुक्षम व योग्य, तितके त्याचे अधिकार (उपभोगाचे) कमी, व कर्तव्ये अधिक अशी रचना आहे )

चातुर्वर्ण्याच्या पद्धतीत जशी त्यानी सघर्षबीजे नष्ट केली त्याचप्रमाणे व्यक्ति आणि समाज याच्यातील द्वैतहि पूर्णपणे नाहीसे केले. मद्रास युनिव्हर्सिटीचे इतिहास व पुरातत्त्वशास्त्राचे प्राध्यापक श्री व्ही आर रामचद्र दीक्षितार यानी आपल्या 'War in ancient India' या ग्रथात या पद्धतीसबधी म्हटले आहे –

The Varna system of the ancient Hindus implied the fourfold division of society into Brahmans, Kshatriyas, Vaisyas, and Sudras The Brahmans formed the group of philosophers and teachers, the Kshatriyas the group of rulers and warriors, the Vaisyas the group of agriculturists and traders, and the Sudras the group of men engaged in different menial services The idea gained ground that to follow one's own Dharma and to sacrifice one's own life, if need be, in the prosecution of that Dharma was the highest duty expected of every citizen, to whatever caste he belonged. We may remember how Krishna

laid emphasis on this point to the vacillating Arjun who was out to fight his own kith and kin. This is the plain teaching of the Bhagavad-Gita This insistence on Swadharma is a sound economic concept It lays the axe on the principles of individual freedom, the struggle for existence and the survival of the fittest. The individual is made to realise his responsibility and duty to himself, his family, country, state, and ultimately to God In short, he is a member of a free corporate state He stands or falls with society and state He is a part of it and not separate from it It is a peculiar concept by which the individual did his duty and yet enjoyed freedom Every castere alised its dependence on the other castes and this tended to avoid caste wars Hereditary callings and the absence of competition helped an orderly movement, unlike the perpetual restlessness of modern society due to lack of equilibrium.

( प्राचीन हिंदूंच्या वर्णसस्थेने समाज ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र अशा चार प्रकारानी विभागला तत्त्वज्ञ व लोकशिक्षकाचा वर्ग अथवा गट म्हणजे बाह्मण, राज्यकर्त्यांचा व योद्धयाचा वर्ग म्हणजे क्षत्रिय, कृषकाचा व व्यापार करणाऱ्याचा वर्ग म्हणजे वैश्य व श्रमजीवीचा वर्ग म्हणजे शूद्र या रचनेत ही भावना दृढमूल होती की प्रत्येकाने आपल्या स्वधर्माचे अथवा स्वकर्तव्याचे पालन करणे व त्यासाठी आवश्यक झाल्यास आपल्या जीविताचेहि बलिदान करणे हे कर्तव्य आहे प्रत्येक नागरिकाकडून या श्रेष्ठ कर्तव्यतत्परतेची अपेक्षा असे. मग तो कोणत्याही जातीचा अथवा वर्णाचा असो अर्जुन आपल्या इष्टमित्राना व नातलगाना रणभूमीवर पाहून मोहित झाला व कर्तव्यभ्रष्ट होण्याच्या मार्गावर असता भगवान् श्रीकृष्णाने या मुद्द्यावर केवढा जोर दिला होता हे प्रसिद्धच आहे. श्रीमद्भगवद्गीतेची हीच सुस्पष्ट शिकवण

आहे (स्वधर्मे निधन श्रेय. परधर्मो भयावह ) स्वधर्मावरील हा जोर ही एक भक्कम आर्थिक व्यवस्था आहे ती व्यक्तिस्वातत्र्याचे सिद्धान्त, जीवनार्थ कलह व योग्यता असेल तोच टिकेल इत्यादि अनर्थकारक गोष्टीचे उत्कृष्ट नियमन करते या रचनेत प्रत्येक व्यक्तीला तो स्वत , त्याचे कुटुब, स्वदेश, राज्यसस्था, व शेवटी ईश्वर यासबधीच्या त्याच्या कर्तव्याची सुस्पष्ट जाणीव करून देण्यात येते थोडक्यात म्हणजे या समाजव्यवस्थेत प्रत्येक मनुष्य हा स्वतत्र पण सहकारी राज्यसस्थेचा दायित्वपूर्ण घटक असतो त्याचे पतन व उत्पतन समाज व राज्यसस्था याच्या समवेतच होत असते कारण की तो त्याच्याहून कोणत्याहि तऱ्हेने वेगळा नसून त्याचा अश अथवा विभागच असतो. ही एक विशिष्ट रचना आहे की, जेथे व्यक्तिमात्र कर्तव्यपरायण व तरीहि स्वातत्र्याचा उपभोग घेणारा आहे येथे प्रत्येक गटाला अथवा जातीला ती दुसऱ्या जातीवर अवलबून आहे याची पूर्ण जाणीव असे, व त्याचा परिणाम वर्गसघर्ष न होण्यात झाला जन्माने सिद्ध होणारे कर्तव्यक्षेत्र व स्पर्धेचा अभाव यानी वर्ग समन्वय व सवादिता उत्पन्न होण्यास अतिशय साहाय्य झाले आजच्या समाजव्यवस्थातून कोणत्याहि प्रकारच्या सतुलनाचा पूर्णपणे अभाव असल्यामुळे ज्याप्रमाणे वखवख व असतोष नित्याचाच होऊन राहिलेला आहे तसा प्रकार त्या पद्धतीत नव्हता. ही एक प्रकारची सहकारी सघटना म्हणजे परस्पराचे दृढतर बधन होऊन राहिली होती व म्हणजे तिच्या शाश्वततेचे खरे कारण म्हणजे असणारे निर्बध पाळण्याच्या सबधात पूर्णपणे जागरूकता हे असे )

श्री रामचद्र दीक्षितार् याच्या या स्पष्टीकरणावर विशेष प्रकारच्या कोणत्याहि विवेचनाची आवश्यकता नाही. धर्म म्हणूनच आपापल्या कर्तव्याचे परिपालन करण्याची प्रवृत्ति या प्रत्येक वर्गात व त्या वर्गाचा घटक असणाऱ्या प्रत्येक व्यक्तीत निर्माण करण्याच्या सबधात वैदिक समाजशास्त्रज्ञाचा केवढा कटाक्ष असे हे ज्याना समजावून घ्यावयाचे असेल त्यानी धर्मसूत्रवाङमयाचा अवश्य

अभ्यास करावा. या दृष्टीने महर्षि आपस्तबाचे पुढील वचन मनन करण्यासारखे आहे ते म्हणतात – " नेम लौकिकमर्थ पुरस्कृत्य धर्मांश्चरेत् । निष्फला ह्यभ्युदये भवन्ति । तद्यथा आम्रे फलार्थे निमित्ते छायागन्ध इत्यनूत्पद्येते । एव धर्ममपि चर्यमाणमर्था अनूत्पद्यन्ते, नोचेदनूत्पद्यन्ते न धर्महानि भवति ।" (कोणत्याहि इहलौकिक लाभाच्या अपेक्षेने धर्माचे – स्वतःच्या कर्तव्यकर्माचे – आचरण करू नये. पुष्कळदा त्या आचरणापासून कोणत्याहि प्रकारचा इहलौकिक लाभ पदरात पडत नाही ज्याप्रमाणे आब्याचे फळ मिळावे म्हणून आब्याच्या झाडाची जोपासना केली असता त्यापासून छाया व सुगध याचाही लाभ होतोच पण त्यामुळे सुगध व छाया याचा लाभ हे काही आब्याच्या झाडाच्या जोपासनेचे प्रधान कारण होऊ शकत नाही, ती केवळ आनुषगिक फळे होत, त्याचप्रमाणे धर्माचे अथवा आपल्या कर्तव्यकर्माचे आचरण करीत असताना त्यापासून कधी कधी लौकिक स्वरूपाचे लाभ होतातही पण ते जर न झाले तरीहि आपल्या कर्तव्यकर्माच्या आचरणाच्या सबधात कधी अळ टळ करू नये कारण त्यामुळे निदान धर्महानीचा म्हणजे कर्तव्यच्युतीचा दोष तरी पदरात येत नाही

असो. आतापर्यतच्या विवेचनावरून हे सहजच लक्षात येईल की (१) बाहेरून भारतात आलेल्या आर्याना येथील वेगवेगळे समाज पचवावयाचे होते (२) पुरोहिताना व योद्धयाना आपली मिरासदारी चालवावयाची होती इत्यादि चातुर्वर्ण्यासबंधी अलीकडे देण्यात येणाऱ्या उपपत्ति पूर्णपणे बिनबुडाच्या व चुकीच्या आहेत. अशा या आदर्श सस्थेतील श्रेष्ठ धारणेचा पुरस्कार अलीकडे महात्मा गाधी प्रभृतीनीहि केलेला आहे पण त्याना व त्या पद्धतीनेच चातुर्वर्ण्याविषयी प्रशसेचे उद्गार काढणाऱ्या अनेकाना ही पद्धति जन्मजात असणे चुकीचे वाटते. चातुर्वर्ण्यात पहिल्यापासूनच अनुवशाच्या तत्त्वाचा पुरस्कार व अवलब करण्यात आलेला आहे ही गोष्ट काही कोणालाहि नाकारता येण्यासारखी नाही.

चातुर्वर्ण्य समाजरचनेंतील व्यक्ति ही जन्मतःच आपापल्या वर्णाची अथवा वर्गाची घटक असे व तिचा व्यवसायहि जन्मत च ठरलेला असे दुसऱ्याच्या व्यवसायावर व अधिकारावर, स्वत तो व्यवसाय प्रारभ करून अतिक्रमण केल्यास अशी व्यक्ति समाजातहि बहिष्कृत ठरत असे व राज्ययत्राच्या शिक्षेलाही ती पात्र ठरत असे. ऋग्वेदातहि आतरप्रभव वर्ण सापडत असल्यामुळे त्या काळापासूनच या पद्धतीत अनुवशाचे तत्त्व असल्याचे दृष्टोत्पत्तीस येते याचा निर्देश मागे केलाच आहे. भारतीयाच्या विवाह सस्थेतील अनेक निर्बधाची व काहीशा कडकपणाची निर्मिति या अनुवशतत्त्वाच्या व्यापक मर्यादाना धरून झालेली आहे वरवर दिसायला स्वातत्र्य-कल्पनेवर दडपण आणणाऱ्या या अनुवशतत्त्वाची कास धरण्याचें कारण पाहिल्यास त्याच्या विषयीचे अपसमज नष्ट होतील असे वाटते भारतीय समाजशास्त्रज्ञाचा चतुर्विध पुरुषार्थाच्या परि-भाषेतून व्यक्त होणारा ध्येयवाद व त्याचा त्यानी निर्माण केलेल्या चातुर्वर्ण्य पद्धतीशी असलेला सबध याचा विचार केला तर हे सहज लक्षात येते की त्याना विशिष्ट पद्धतीची, गुणाची व स्वभाव वैशिष्टयाची माणसे घडवावयाची होती हेच वेगळया शब्दात सागावयाचे म्हणजे त्याना आहे त्या समाजाची केवळ व्यवस्थाच करावयाची नव्हती तर त्यातून विशिष्ट घडणीची माणसे निर्माण होतील अशी यत्रणा उत्पन्न करावयाची होती. त्यामुळे अशी माणसे घडविताना बाह्य सस्काराबरोबरच बीजाचा मूलभूत विचार व बीजसस्कार याचाहि विचार करण्याची आवश्यकता होती त्यामुळेच आमच्या येथील सस्काराचा प्रारभ सतति झाल्यावर होणाऱ्या उपनयनादि शैक्षणिक सस्कारापासून होत नसून तो गर्भाधान व पुसवन यापासून होत असतो असा मूलभूत विचार करून कोणतीहि रचना करावयाची म्हणजे अनुवशत्वाची कास धरणे किती आवश्यक असते हे हल्लीच्या सुप्रजाजनन शास्त्राच्या प्रमेयाचे ज्ञान ज्याना आहे त्याना तरी वेगळे सागण्याची आवश्यकता नाही. इतर अभ्यासहीनाची गोष्ट वेगळी.

लकी म्हणतो "The type of individual character depends partly upon inner temperament and partly upon external circumstances" (व्यक्तीचे विशिष्ट प्रकारचे चरित्र घडणे ही गोष्ट अशत बाह्य परिस्थिति व अशत अतर्जीवन यावर अवलबून असते ) या अतर्जीवनाचा खोल विचार करून भिन्न स्वभाववैशिष्टयाच्या विकसनास्तव प्रथमपासूनच भिन्न बाह्य सस्काराची व्यवस्था भारतीय समाजशास्त्रज्ञानी यासाठीच केलेली आहे. नुसते बौद्धिक वळणच नव्हे तर विशिष्ट प्रकारची गुण-सपत्ति सुद्धा आनुवशिक असते हे हल्लीच्या सुप्रजाजनन शास्त्रज्ञानी मान्यच केलेले आहे केसरलिग म्हणतो "Not only intellectual, but moral qualities are hereditary" (केवळ बौद्धिकच नव्हे तर नैतिक वैशिष्टये सुद्धा आनुवशिक असतात ) यावरून ज्याना भिन्न भिन्न वैशिष्टयाचा समाज उत्पन्न करावयाचा आहे त्याना अनुवशतत्त्वाच्या अनुसार सगळी रचना करण्याची केवढी आवश्यकता आहे हे स्पष्ट होईल पिढयाची वैशिष्टये पिढयानु-पिढया कायम ठेवावयाची असली तर बीजशुद्धीची व क्षेत्रशुद्धीची अत्यत आवश्यकता असते वॉटमनने म्हटले आहे "To preserve a type, true breeding is essential" (वैशिष्टयसरक्षणासाठी क्षेत्रशुद्धि व बीजशुद्धि अत्यावश्यक आहे ) चातुर्वर्ण्य जन्मजात का व अनुवशशास्त्राचे त्यात इतके महत्त्व का होते याची कल्पना यावरून यावयास हरकत नाही

येथे जी चर्चा केलेली आहे ती वैदिक समाजाच्या चातुर्वर्ण्य-पद्धतीचे स्वरूप स्पष्ट व्हावे यासाठीच केलेली आहे आज काय असावे हा प्रश्न स्वतत्र असून त्याचा प्रस्तुत पुस्तकाच्या विषयाशी तसा सबध नाही. कारण आज खरे चातुर्वर्ण्यच अस्तित्वात नाही. त्यामुळे उपसहाराच्या वेळी या प्रश्नाचा वेगळा विचार माडावयाचे ठरविले आहे

असो आता एकच प्रश्न शिल्लक उरतो व तो हा की, भारतीय समाजशास्त्रज्ञानी समाजाचे हे जे चार गट अथवा वर्ग पाडले

त्याना वर्ण असे नाव का दिले ? इतर सर्व समाजशास्त्रात ज्याला clan असे म्हणतात त्याला वर्ग हाच योग्य प्रतिशब्द आहे हा प्रतिशब्द सोडून मूळ समाजशास्त्राचा नसलेला वर्ण हा शब्द येथे वर्ग अथवा गट या अर्थी का वापरण्यात आला ? त्यासाठी वर्ण या शब्दाचे मूळ पाहिले पाहिजे हे मूळ पाहण्याचा प्रयत्न केला तर असे आढळून येईल की वर्ण हा शब्द मुळात ध्वनिशास्त्रातील अथवा शब्दशास्त्रातील आहे पण तो मुळात शब्दशास्त्रातीलहि नसून त्याचा खरा अर्थ रग असा आहे वर्ण म्हणजे रग. महर्षि श्री अण्णासाहेब पटवर्धन यानी अतीन्द्रियशास्त्र व वेदाचे स्वरूप ह्याचा विचार करून या विषयावर अतिशय सूक्ष्म विचार माडले आहेत त्यावरून सामाजिक वर्गाना भारतीयानी वर्ण अशी विशिष्ट सज्ञा का दिली व भारतीयाच्या समाजशास्त्रातच केवळ असणाऱ्या (कारण जगात सर्वत्र चातुर्वर्ण्य नसून चातुर्वर्ग्य आहे चातुर्वर्ण्य हे केवळ वैदिक समाजरचनेचेच वैशिष्टच होय ) चातुर्वर्ण्य सज्ञेचे वैशिष्टच काय यावर नवा प्रकाश पडतो. वर्ण सज्ञेचे इतके सोपपत्तिक व शास्त्रीय विवेचन अन्य कोणीहि केलेले दिसत नाही म्हणून विद्वानाच्या विचारासाठी मी अण्णासाहेबाचे विवेचन येथे देतो. सर्वानी ते जसेच्या तसे मान्य करावें असा आग्रह नाही पण त्याचा विचार व्हावा महर्षि अण्णासाहेब पटवर्धन यानी लिहून ठेवलेल्या भिन्न भिन्न परिच्छेदाचा विचार करून त्याची या सबधातील विचारप्रणालि त्याच्या चरित्रात त्याचे शिष्योत्तम व वेदवाङमयाचे विख्यात सशोधक श्री. अप्रबुद्ध यानी माडलेली आहे ती त्याच्याच शब्दात पुढीलप्रमाणे —

"निरनिराळ्या तऱ्हेच्या सर्व उत्क्रातीतून वर गेलेल्या एका अत्यत विशाल सस्कृतीची परिणतावस्था म्हणजेच मूळ वैदिक सस्कृति. मनुष्याच्या आयुष्याचे आणि विश्वाच्या अस्तित्वाचे, त्याच्या परस्परसबधाचे आणि पर्यवसानाचे सर्व कोडे उत्तम रीतीने सोडविल्याखेरीज त्या सस्कृतीस परिणतावस्था येणे आणि तिच्यात एकसूत्रीपणा असणे शक्य नाही या पूर्ण वैदिक सस्कृतीने

हे कोडे 'एकमेवाद्वितीयम्' या महावाक्याने सोडविले. आणि या आधारभूत सूत्रावर वैदिक सस्कृतीची रचना केली. त्यामुळे वैदिक सस्कृति, वर्णाश्रमधर्म संस्कृति, पौराणिक सस्कृति आणि या सर्वांची हल्लीची विकृति ही सर्व वस्तुतः या मूळ स्वरूपापासून उतरत आलेली, परतु त्या मूळ स्वरूपास न सोडता घट्ट धरून ठेवण्याची धडपड करीत असलेली दिसतात आणि म्हणूनच पुढील सर्व तऱ्हेचे फरक वस्तुत उत्क्रातीच्या पायऱ्या नसून अध पातास घातलेले तात्पुरते अडसर आहेत

पूर्वी केव्हा तरी समाजात सारीच सवर्णता असून चातुर्वर्ण्य हे मागून निर्माण झाले, याविषयी सस्कृत वाङमयात एकवाक्यता आहे चातुर्वर्ण्य हा असाच एक मोठा अडसर आहे आणि त्याची उत्पत्ति श्रमविभागाच्या तत्त्वावर बसविलेली नसून निरनिराळ्या शरीराच्या, ब्रह्मविद्याशास्त्राच्या तत्त्वास अनुसरून लागणाऱ्या क्षमतेच्या विभागावर केली आहे श्रमविभाग हे या सस्थेचे रहस्य नसून आपापल्या परीने सर्वोपयोगी असे श्रम शक्य तितके जास्त आणि चागले कसे करता येतील हे या सस्थेचे रहस्य आहे अनेक प्रकारचे प्रयोग केल्यावर त्याना (भारतीय समाजशास्त्रज्ञाना) असे आढळून आले की या विश्वोत्पत्तीच्या मूलस्थानी सर्वत्र ध्वनीच असून हे विश्व त्या ठिकाणी अभेदरूप होते व्यक्ततेला आरभ झाल्याबरोबर हा ध्वनीच जसजसा जास्त स्पष्ट होऊ लागला तसतसा त्यास मर्यादितपणा येऊन तो साकार आणि सरूप दिसू लागला म्हणून ध्वनि आणि हे साकार सरूप विश्व ही परस्पराचीच वेगळी वेगळी रूपे आहेत, आणि म्हणूनच नाम आणि रूप अथवा पद म्हणजे शब्द आणि त्याचा अर्थ म्हणजे वस्तु हे द्वद्व अस्तित्वात आले. अर्थात्च त्याचा जन्यजनक सबंध आहे. बाह्य वस्तूतून ध्वनि आणि ध्वनीपासून बाह्य वस्तु निर्माण होते. म्हणजे त्याचे एकमेकात रूपातर करता येते एवढेच की बाह्य वस्तूचा मूलस्थानीय ध्वनि कोणता हे नक्की कळले पाहिजे सृष्ट वस्तू अथवा सृष्टिकार्य हा वेदाचा खरा अर्थ होय (सृष्टीचे आदिद्रव्य

असणाऱ्या ध्वनिलहरी म्हणजेच वेद होत हा विषय प्रस्तुत ग्रंथाच्या पूर्वार्धात मी सविस्तरपणे मांडलेलाच आहे ) इतर कोणत्याहि वस्तूपेक्षा वाक् शक्ति ही प्रत्येकास सुलभ असल्याकारणाने या वेदशक्तीच्या शास्त्रावर आपले इष्ट कार्य घडवून आणण्याचा त्यानी यत्न केला अर्थात्च त्यासाठी जेणे करून तो ध्वनि व्यक्त सृष्टीतील इष्ट कार्याचे मूलभूत ध्वनीच मूलस्थानी उत्पन्न करील आणि जशी मूलस्थानी उत्पत्ति झाली तशीच म्हणजे त्यातील वीर्य क्षीण न होता त्याची वैखरीने वाच्यता होईल हे अवश्य झाले. म्हणून ज्या शरीरयत्रातून तो ध्वनि बाहेर येईल ते यत्र विशिष्ट स्थितीत असणे जरूर झाले. निरनिराळ्या हॉर्सपावरच्या एजिनात जर वाफेची शक्ति कोडली गेली तर तिचे जसे ते एजिन व्यवस्थेशीर चालविणे, बेफाम होऊन वाटेल तिकडे जाऊन दुसऱ्या वस्तूचा नाश करून कोठे तरी अडकून पडणे, अथवा ठायीच तडकून फुटून जाणे असे वेगवेगळाले परिणाम होतील तसेच शरीरात वाक् शक्ति उत्पन्न झाली तर घडून येतील ब्रह्म-देवाने उच्चारलेली अमूर्त वाचा अथवा वेद याच्या परस्परसबधात काही अडथळा नसल्यामुळे ब्रह्मदेवाची मूर्ति होत होत सृष्टिरूपाने अप्रतिहत प्रकट होते मानवी शरीरात सर्व क्रिया प्राणाच्या आधारे प्रकट होतात आणि बहात्तर हजार प्रकारच्या निरनिराळ्या प्रवाहरूपाने शरीराचे लक्षावधि व्यापार करितात या सर्व प्रवाहा-तून शक्तीचा प्रवाह अव्याहत असेल तर ते शरीर खरोखर प्रकृतिस्थ आहे आणि ब्रह्माडाशी त्याचे साधर्म्य असल्यामुळे तारेने विणलेले जाळीचे भाडे पाण्यात बुडवून ठेवावे त्याप्रमाणे त्या भाड्यात आणि विश्वात सर्व क्रिया एकरूपच असते हे प्रवाह जसजसे आणि जितक्या कमी अधिक प्रमाणाने मोकळे असतील तितक्या प्रमाणाने विश्वापासून ते शरीर व त्याचे व्यापार हे तुटक होतात. अशा प्रकारची सर्वात जास्त प्रकृतिस्थ शरीरे निवडून काढून त्याच्याकडे वेदोच्चाराचें काम दिले असता त्याचा समाजास आणि समाजामिळती स्वत सही फायदा होऊन दोघाचेही कल्याण

होईल, हे उघड आहे वर सकलित केलेल्या एकदर मूलतत्त्वावरून ध्यानात येईल की वेदोच्चाराच्या दृष्टीने चार प्रकारची शरीरे असू शकतील एक तर काही शरीरे अशी असू शकतील की ज्या मध्ये शब्द आणि अर्थ याच्यातील हा सबधरूप प्रवाह अथवा पतजलीच्या भाषेत बोलावयाचे म्हणजे 'शब्दार्थ प्रत्यय' अबाधित असू शकेल अर्थात् त्या मत्रातून बाहेर पडणारी वेदवाणी ही त्या मत्रास व सर्वासच हितकारी होऊ शकेल त्याचप्रमाणे अशीही काही शरीरे असतील की त्याच्यातून निघणारी वाणी ही जशीच्या तशी बाहेर पडत नसल्यामुळे ती स्वत स उपकारक होत असली तरी इतरास तिचा उपयोग होत नाही अथवा कदाचित् अशीहि विकृततेने बाहेर पडेल की त्यामुळे इतरास अनिष्ट असेच परिणाम होतील त्याचप्रमाणे काही शरीरप्रकृति इतक्या बिघडल्या असतील की वेदाचा उच्चार होणे इतराच्या आणि खुद्द त्याच्याही अनर्थास कारण होईल तसेच स्वत स फायदेशीर असलेली वाणी देखील तिचा फायदा दोन तऱ्हेने देऊ शकेल म्हणजे ज्या शरीरात ती जवळ जवळ पूर्ण प्रकट होऊन त्या शरीरास शुद्ध करून ब्रह्म-विद्येस पात्र करते अशी आणि ब्रह्मविद्येस पात्रता आणण्याइतकी तर प्रकट होत नाही, परतु सर्व तऱ्हेच्या वैषयिक सुखाची मात्र जोड करून देऊ शकते अशी अशा दोन तऱ्हा तिच्या असू शकतील, आणि यावरूनच चातुर्वर्ण्य अस्तित्वात आले ज्या शरीरात वेद-वाणी सर्वथैव अनिष्टच क्रिया करू शकते अशा शरीराचेही दोन प्रकार असू शकतील. जरी वेद-मार्गास योग्य नसली तरी योगादि दुसऱ्या साधनानी ब्रह्मविद्येस पात्र होऊ शकतील अशी काही शरीरे – आणि ज्याच्या ठिकाणी हे काहीही सभवत नाही अशी केवळ खाण्यापिण्याचेच – 'मग ते पुष्कळाचे पुष्कळ सुख असो अथवा व्यक्तीचे असो – सुख उपभोगण्याकरिताच योग्य अशी याप्रमाणे चातुर्वर्ण्याची उत्पत्ति ही अध्यात्मविद्येस धरून आहे, आणि म्हणूनच या सस्थेस चातुर्वर्ण्य हे नाव पडले कारण योगशास्त्रा-प्रमाणे प्रत्येक ध्वनीस काही तरी आकार आणि रूप म्हणजे रग अथवा वर्ण हे आहे याच्या उलट प्रत्येक रूपास अथवा वर्णास

ध्वनि ही एक बाजू आहेच फक्त आमच्या इंद्रियास प्रेरणा करणारी त्याची आदोलन संख्या आणि शक्ति ही भिन्न भिन्न आहेत जर त्याला अनुसरून अशी आमच्या इंद्रियास वळणे देता आली तर आम्हास कोणताही पदार्थ त्याच्या पद आणि अर्थ अशा वाटेल त्या स्वरूपात इच्छेनुरूप जाणता येईल. म्हणूनच व्यक्त ध्वनीस आणि ज्याच्या साहाय्याने साकारता यते ते त्याचे रग याना '**वर्ण**' अशी एकच सज्ञा लावता आली मूलस्थानी अथवा शरीरात इतरत्रही व्यक्त होणाऱ्या ध्वनीचे जे वर्ण तत्रस्थ आकाशात उमटले पाहिजेत, तसे ते डोळ्यानी पाहून ध्वनि-उच्चार बरोबर आहेत असे ठरविता येते म्हणजे वर्ण आणि ध्वनि हे एकमेकाचे ताळे आहेत ब्रह्मविद्येच्या पात्रतेस पूर्वी सागितल्याप्रमाणे याच्या शुद्धतेचे अथवा सस्काराचे चार प्रकार जेमतेम उपयोगी पडू शकतात म्हणून त्यास वेगळे काढून चातुर्वर्ण्य असे नाव दिले. याप्रमाणे चातुर्वर्ण्याची उत्पत्ति पातजल योगशास्त्रास धरून सशास्त्र आहे असो. समाजातील वर्गाना वर्ण ही सज्ञा पडण्याचे महर्षि अण्णासाहेब पटवर्धनानी विवेचिलेले हे कारण आहे चातुर्वर्ण्यव्यवस्थेला सकस व पिळदार व्यक्तीची घडण आवश्यक आहे ती आश्रमसस्थेच्या द्वारे भारतीय समाजशास्त्रज्ञानी केली पाश्चात्य प्रणालीत व्यक्ति व समाज घडविण्याची अशी कोणतीही योजना नसणे हेही तिच्या विफलतेचे एक प्रधान कारण आहे प्रत्येक व्यक्ति घडविल्यावाचून समाज कधीच उच्च श्रेणीचा बनत नाही व्यक्तीकडे दुर्लक्ष करावयाचे व समाजापासून मोठमोठ्या अपेक्षा बाळगावयाच्या या अर्ध भारतीय प्रकाराची कास धरणे यशदायी कधीच ठरत नाही आश्रम सस्थेमुळेच चातुर्वर्ण्यात्मक समाजरचनेतून चतुर्विध पुरुषार्थाच्या प्राप्तीचे स्वप्न साकार होऊ शकण्याची शक्यता उत्पन्न झालेली आहे या वर्णाश्रम सस्थेतून निर्माण होणारे राष्ट्रपुरुषाचे चतुर्विध घटक कशा पकारचे असावेत अशी भारतीय समाजशास्त्रज्ञाची अपेक्षा आहे हे पाहाणे मोठे उद्बोधक ठरेल या दृष्टीने प्रथम ब्राह्मण अथवा लोकशिक्षकाच्या वर्गाकडे वळू कारण वैदिक राष्ट्राचे सास्कृतिक नेतृत्व या वर्गाकडे होते.

## व्याख्यान पाचवें

# ब्राह्मण – नेतृवर्ग

वैदिक राष्ट्राच्या समाजव्यवस्थेतील ‘ब्राह्मण’ या वर्णाविषयी हेतुत व अज्ञानाने जितका अपसमज पसरविण्यात आलेला आहे इतका दुसऱ्या कोणत्याच वर्णाविषयी पसरविण्यात आलेला नाही त्यानी लोकाना व विशेषत बहुजनसमाजाला अज्ञानात ठेविले व विद्या शिकण्याचा अथवा तिचा लाभ पदरात पाडून घेण्याचा स्वार्थ साधला असे सागण्यात येते. वस्तुस्थिति याच्या नेमकी उलट आहे हे भारतवर्षाच्या सास्कृतिक इतिहासाचे वरवर निरीक्षण केले तरी ध्यानात येईल हौसेने दारिद्र्य पत्करून निष्काचन अवस्थेत स्वार्थहीन मूल्योपासना या वर्णाने अव्याहत सहस्रावधि वर्षे पत्करली व सुख आणि भोग याचा मार्ग इतर सर्वासाठी मोकळा राखला केवळ वेदविद्या सोडून ब्रह्मविद्येपर्यतच्या इतर सर्व विद्या त्यानी सर्वासाठी मोकळ्या राखल्या इतकेच नव्हे तर अन्य विद्याच्या सबधात प्रसगी त्यानी इतर वर्णाचे शिष्यत्वहि पत्करलेले आहे. वेदविद्या म्हणजेहि मागच्या प्रकरणात उल्लेखिलेले ध्वनिशास्त्रच होय व त्यासबधात कागाळी करणें हे तबल्याला थाप मिळते तशीच मलाही का नाही अशी फिड्ल्ने कागाळी करण्यासारखेच हास्यास्पद आहे सृष्टीचे आदिद्रव्य असणाऱ्या ध्वनिलहरीचा शरीराच्या नादयत्राने विशिष्ट उपयोग करून घेण्याला त्या नादयत्राच्या विशिष्ट अवस्थेची आवश्यकता आहे. तेवढी एक गोष्ट सोडून दिली तर वेदातील सर्व ज्ञान लोकाना समजावे म्हणून त्याचे विशदीकरण करणारे महाभारतासारखे ग्रथ व प्रचड पुराणवाङमय त्यानी निर्माण केले. हे त्याचे विद्यादानाचे औदार्य त्याच्या हृदयाची विशालताच व्यक्त करीत नाही

काय ? भारतीय समाजव्यवस्थेत व्यक्तिमात्राचें ठरलेले परम कल्याण साधून घेण्यास कोणालाही कधीच बदी नव्हती उलट ब्राह्मणानाच लौकिक सुखोपभोगाची सपूर्णपणे बदी असून इतराना त्यासबधात सपूर्ण स्वातत्र्य होते. ज्या प्रकारे सुखाचा उपभोग घेतला असता इद्रिये व वासना याची योग्य तृप्ति होऊन मनुष्याची ओजोहानि होत नाही आणि योग्यमार्गाने पूर्ण प्रयत्न केला असतां ब्राह्मणाप्रमाणेच जीवन्मुक्त होता येते असा मार्ग सागून उलट या व्यवस्थेत इतराचा मार्ग अधिक सुलभ मात्र करून ठेवलेला आहे. मध्यतरीच्या काळात या मोकळीक असलेल्या विद्याच्याही सबधात इतरानी पूर्ण दुर्लक्ष्य केले हा काही ब्राह्मणाचा दोष नव्हे या सबधात महर्षि अण्णासाहेब पटवर्धन याच्या चरित्रात श्री. अप्रबुद्ध यानी काढलेले उद्‌गार थोडेसे कडक वाटले तरी यथार्थ आहेत. ते म्हणतात "सुखोपभोगाचे साधन ज्या वेळेस विद्या हे नसून शौर्य आणि सपत्ति हेच होते अशा वेळेस अपवादात्मक उदाहरणे सोडली तर माडीखाली खदा घोडा घेऊन जरीफेटचाच्या झोकात भाल्याची फेक करणे सोडून बळेच घोकपट्टीत डोके खुपसणे कोणास आवडणार ? राजसभेमध्ये मिळणाऱ्या शालजोडीपेक्षा शूर म्हणून सुदर स्त्रियानी केलेली ओवाळणी कोणास अधिक पसत पडणार नाही ? अशा स्थितीत जर इतर वर्गानी सर्वच तऱ्हेच्या विद्यास फाटा देऊन 'ते काम बामणाचे' म्हणून मोठ्या खुशीने ब्राह्मणाचा आदर केला असला तर त्यात ब्राह्मणाचा काय दोष ? शिवाजी-महाराजाच्या काळी पाहिले तरी देखील भाल्याची फेक करून सपत्ति आणि गौरव मिळविणे यातच भूषण वाटत असे अजून देखील वऱ्हाडासारख्या सुपीक देशात जेथे या इग्रजी विद्येची साधने सुलभ आहेत तेथेहि 'शिकून काय करावयाचे आहे ? आहेत दोन नबर घरी, करील चैन' अशी प्रवृत्ति आढळून येते असे असता ब्राह्मणानी इतर वर्गास अज्ञानात ठेवले, आणि लबाडीने स्वत चे वर्चस्व अबाधित ठेवले, असा आरोप करणे नीचपणाचे आहे याच्या उलट असे मात्र आहे की, पेशवाईचा एक अपवाद

सोडला तर ब्राह्मणानी सत्ता आणि वैभव ही फक्त विद्येनेच प्राप्त करून घ्यावयाची अमा कडक निर्बंध स्व नस घालून घेतल्यामुळे, इतर सर्व लोकास याचा उपभोग हजारो वर्पे अव्याहत घ्यावयास सापडला, आणि एक उत्तम सस्कृति, कशाही रीतीने का होईना, जिवत राहून तिचा सर्व प्रकारचा फायदा राष्ट्रास मिळाला

ब्राह्मणाची तुलना यूरोपमधील पुरोहित वर्गाशी करण्यात येऊन ज जे अत्याचार पाद्री भट व पुरोहित यानी यूरोपमध्ये केले ते ते त्याच्या माथी मारण्यात येतात पण या भारतीय राष्ट्राच्या नेतृत्वाच्या धगधगीत चारित्र्यामुळेच या राष्ट्राची मान ताठ राहिली हे ग्रीक प्रवाशाच्या भारतीय समाजासबधीच्या उद्गारावरून ध्यानात येईल धूर्त इग्लिशानी हे ओळखूनच त्याच्या नेतृत्वाला सुरुग लावणारे एक पद्धतशीर प्रचारयत्र या देशात उभारले, व आमच्या इकडील त्याच्या मानसपुत्रानी तोच क्रम आपल्या वाङमयातून नव आन्दोलनाच्या द्वारे पुढे चालविला वस्तुत ब्राह्मण म्हणजे पुरोहित नव्हे पुरोहित व धर्मगुरू हे शब्द ज्या भिक्षुकी व्यवसायाच्या अर्थाने यूरोपच्या वातावरणात वापरण्यात येतात त्याच्यावरून ब्राह्मणाची कल्पना करणे पूर्णपणे चुकीचे आहे. तसेच प्लेटो ज्याना तत्त्वज्ञ समजतो व अलीकडे ज्याना ‘लोकशिक्षक’ म्हणतात तो प्रकार म्हणजेही वैदिक राष्ट्रातील ब्राह्मण नव्हे ब्राह्मणाची ‘लोकपालक’ इत्यादि गौरवास्पद शब्दानी स्तुति करण्यात येते अथवा ‘त्याचा वध करू नये’ ‘ब्रह्महत्या हे सर्वात भयानक पातक आहे’ ‘राजाने ब्राह्मणाजवळून करभार घेऊ नये’ इत्यादि जे ब्राह्मणाविषयीचे उल्लेख आढळतात त्यातील रहस्य वैदिक राष्ट्रात ब्राह्मण्याची काय कल्पना होती हे ध्यानात आल्याविना समजणे दुरापास्त आहे केवळ कोणी जन्माने ब्राह्मण असला व पुरोहितीचा व्यवसाय करीत असला म्हणजे त्याला ही वर्णने लागू पडत व तो राजशासनाच्या अधिकारक्षेत्राच्या अतीत होता असे समजणे व त्यावरून अनुमाने काढून टीकेची चिखलफेक करणे अनभिज्ञतेचे आणि अप्रामाणिकपणाचेच आहे. श्रीकृष्णानी द्रोणाचार्याना ठार मारविले आहे व

स्वत च अश्वत्थाम्याला कठोर दण्ड दिलेला आहे. म्हणून रागद्वेष-विरहित बुद्धीने प्राजल सशोधकाच्या भूमिकेवरूनच ब्राह्मण्य म्हणजे काय व ब्राह्मण म्हणजे कोण याचा विचार केला पाहिजे तरच वैदिक समाजशास्त्रज्ञानी हा वर्ग निर्माण करण्यात केवढे मोठे राष्ट्रहित साधले होते हे ध्यानात येईल ब्राह्मण म्हणजे पुरोहित नव्हे हे वैदिक समाजशास्त्राचा निर्विकार बुद्धीने अभ्यास करणाऱ्या पाश्चात्य सशोधकाच्याहि ध्यानात आलेले आहे Intrcductıcn to the study of Hındu Dcctrıns या आपल्या ग्रंथात रेनेग्वेनॉ याने ब्राह्मणाविषयी लिहिताना या गोष्टीचा स्पष्ट उल्लेख केलेला आहे. तो म्हणतो –

' It should be added that the Brahmıns are not prıests ın the Western and relıgıous sense of the word No doubt theır functıons ınclude the accomplıshments of varıous kınds of rıtes, because they must possess the knowledge necessary to make them fully effectıve but they also ıncludeabove everythıng else theır conservatıon and regular transmısıon of the tradıtıonal doctrıne '

(ही गोष्ट उल्लेखिणे अवश्य आहे की पाश्चात्य जगात प्रीस्ट या शब्दाचा जो धार्मिक अर्थ आहे त्या अर्थाचा ब्राह्मण शब्दाने बोध होत नाही ब्राह्मण म्हणजे पुरोहित नव्हे अर्थातच या बाबतीत सशय नाही की ब्राह्मणाच्या कार्यात सर्व प्रकारच्या विधिविधानाच्या सपूर्ण ज्ञानाचा व पूर्ततेचाही समावेश होत असल्यामुळे स्वत ला परिपूर्ण करण्याचा दृष्टीने हे ज्ञानहि त्याना असलेच पाहिजे अशी अपेक्षा होतीच; पण त्याच बरोबर मुख्य गोष्ट ही की पारपरिक धर्मग्रथाचे ज्ञान, त्याचे सरक्षण व ती परपरा, पिढ्यानुपिढ्या तिचे सक्रमण करीत टिकविणे हे त्याचे काम होतें.)

या गोष्टीचा मागे उल्लेख केलाच आहे की, विषमतापूर्ण सृष्टीत वर्ग सपूर्णपणे मरणे कधीहि शक्य नाही हे ओळखून

भारतीय समाजशास्त्रज्ञानी वर्गाचे अस्तित्व मान्य केले व त्याच्या समन्वयाच्या पद्धतीचा अगीकार केला अर्थातच या व्यवस्थेत कर्तव्यासाठी कर्तव्य या भावनेची पकड सर्व समाजाच्या मनावर कायम रहावी म्हणून निष्काम जीवनमूल्योपासकाचा एक वर्ग समाजासमोर आदर्श म्हणून उत्पन्न करणे व त्याच्या हाती समाजाच्या सास्कृतिक नेतृत्वाची सर्व सूत्रे सोपविणे आवश्यक होतें. या दृष्टिकोनातून त्यानी ब्राह्मण वर्ण निर्माण केला या वर्णाच्या जीवनाकडे पाहून समाजाला आपला जीवनविकास मोजण्याची शक्यता होती, व अखड जीवन जाळीत त्यातून वैदिक सस्कृतीच्या अत्युच्च धारणेचा प्रत्यक्ष आविष्कार करणे एवढेच या वर्गाचे काम होते सस्कृतीच्या श्रेष्ठ आदर्शाचा आविष्कार ग्रथाऐवजी प्रत्यक्ष जीवनातून घडविण्याची व ही योजना परपरेने पिढ्यानु-पिढ्या चालत ठेवण्याची ही पद्धति जगाच्या इतिहासात केवळ अपूर्व होय यात शका नाही. ब्राह्मणाचे हे विशिष्ट स्वरूप ध्यानात घेतले तर ब्राह्मणाचे प्रधान कर्तव्य विद्यासपादन करणे हेच केवळ नसून प्लेटोच्या परिभाषेप्रमाणे केवळ तत्त्वज्ञ असण्याने तो ब्राह्मण होत नाही हे स्पष्ट होते अपरिग्रह, ज्ञान, तपोनिष्ठा, चारित्र्य-सरक्षण व निष्काम मूल्योपासना ही ब्राह्मण्याची वैशिष्ट्ये व ब्राह्मणाची लक्षणे होत म्हणूनच ब्राह्मणाविषयी लिहिताना राजर्षि मनूने म्हटले आहे —

ब्राह्मणस्य हि देहोऽय क्षुद्रकामाय नेष्यते ।
कृच्छ्राय तपसे चेह प्रेत्यानन्तसुखाय च ॥
सावित्रीमात्रसारोऽपि वर विप्र सुयत्रित. ।
. . सर्वाशी सर्वविक्रयी ॥

( ब्राह्मणाचे शरीर या जगातील सुखोपभोगास्तव नसून इह लोकात नाना प्रकारचे शरीरकष्ट करून तपश्चर्येने जीवन आटविणे व परलोकी अनत सुखात्मक कल्याणाची जोड करून घेणे हेच त्याचें खरे कर्तव्य आहे अत्यत विद्वान् परतु कशाचाच विधि-निषेध न मानणाऱ्या व हवे त्या पद्धतीने सुखोपभोग घेणाऱ्या

ब्राह्मणापेक्षा केवळ गायत्रीमत्र येण्याइतकी नाममात्रच विद्वता असणाऱ्या पण अत्यत सयमशील व सुयत्रित जीवन असलेल्या ब्राह्मणाची योग्यता अधिक श्रेष्ठ आहे ) महाभारतातील सर्परूपी राजा नहुष व युधिष्ठिर याच्या प्रश्नोत्तरात ब्राह्मणाच्या लक्षणावर केलेले विवेचन या दृष्टीने अतिशय उद्बोधक आहे ते असे :

'सर्प उवाच .–

ब्राह्मण को भवेद्राजन् वेद्य कि च युधिष्ठिर ।
ब्रवीह्यतिमति त्वा हि वाक्यैरनुमिमीमहे ॥२०॥

युधिष्ठिर उवाच –

सत्य दान क्षमा शीलमानृशस्य तपो घृणा ।
दृश्यन्ते यत्र नागेन्द्र स ब्राह्मण इति स्मृत ॥२१॥

सर्प उवाच –

शूद्रेष्वपि च सत्य च दानमक्रोध एव च ।
आनृशस्यमहिसा च घृणा चैव युधिष्ठिर ॥२३॥

युधिष्ठिर उवाच –

शूद्रे यत्तु भवेद् लक्ष्म द्विजे तच्च न विद्यते ।
न वै शूद्रो भवेत् शूद्रो ब्राह्मणो न च ब्राह्मण ॥२५॥
यत्रैतल्लक्ष्यते सर्प वृत्त स ब्राह्मण· स्मृत ।
यत्रैतन्न भवेत्सर्प त शूद्रमिति निर्दिशेत् ॥२६॥

सर्प उवाच –

यदि ते वृत्ततो राजन् ब्राह्मण प्रसमीक्षित ।
वृथा जातिस्तदाऽऽयुष्मन् कृतिर्यावन्न विद्यते ॥३०॥

युधिष्ठिर उवाच –

जातिरत्र महासर्प मनुष्यत्वे महामते ।
सकरात्सर्ववर्णाना दुष्परीक्ष्येति मे मति ॥३१॥
तस्मात् शील प्रधानेष्ट विद्युर्ये तत्त्वदर्शिनः ॥३३॥
यत्रेदानी महासर्प सस्कृत वृत्तमिष्यते ।
त ब्राह्मणमह पूर्वमुक्तवान् भुजगोत्तम ॥३७॥

– श्रीमहाभारत, वनपर्व अ. १८०

(सर्प म्हणाला, ' हे युधिष्ठिरा ! कोणाला ब्राह्मण म्हणावें व या जगात जाणण्याचे सर्वश्रेष्ठ तत्त्व कोणते? तुझ्या एकदर बोलण्यावरून तू दीर्घदर्शी, विचक्षण दिसतोस म्हणून तुझ्याकडून या प्रश्नाची उत्तरे मला हवी आहेत यावर युधिष्ठिरानें उत्तर दिले की, हे सर्पराजा ! ज्या ठिकाणी सत्यनिष्ठा, दानप्रवृत्ति, क्षमाशीलता, चारित्र्यसपन्नता, भूतमात्राविषयी अनुकपा, तपोनिष्ठा व गर्ह्य गोष्टीविषयी तिटकारा आणि सकोची प्रवृत्ति या दृष्टोत्पत्तीस येतात, त्याला ब्राह्मण असे म्हणावे यावर सर्प म्हणाला की, हे राजन् ! पुष्कळदा शूद्राच्या ठिकाणी देखील सत्यनिष्ठा, दानप्रवृत्ति, शाति, भूतमात्राविषयी अनुकपा, अहिसा व घृणावृत्ति दृष्टोत्पत्तीस येते अशा स्थितीत ब्राह्मण व शूद्र या सबधात काय निर्णय घ्यावा? यावर युधिष्ठिराने उत्तर दिले की जर हे सागितलेले लक्षण शूद्राच्या ठिकाणी दिसत असेल व ब्राह्मणाच्या ठिकाणी दृष्टोत्पत्तीस येत नसेल तर तो शूद्र शूद्र नव्हे व तो ब्राह्मण ब्राह्मणही नव्हे असे समजावे हे सर्पराज ! या बाबतीतील खरा निर्णय हाच की, ज्या ठिकाणी मी सागितलेली लक्षणे आढळतील त्यालाच ब्राह्मण असे समजावे व ज्या ठिकाणी ही लक्षणे आढळणार नाहीत त्याचा निर्देश शूद्र म्हणून करावा. यावर सर्प म्हणाला की, राजन् ! केवळ लक्षणे व चारित्र्य यावरूनच ब्राह्मण ओळखावा असे तुझे मत असले तर मग जातीची परिभाषा, त्या ठिकाणी तशी कृति नसली तर, व्यर्थच समजली पाहिजे यावर युधिष्ठिर म्हणाला की, हे सर्पराज ! मनुष्याच्या मध्ये सर्वच वर्णाचा सामान्यत सकर झालेला असल्यामुळे जातीची यथावत् परीक्षा करून ती ओळखून काढणे अत्यत कठीण आहे. म्हणून जे तत्त्वदर्शी लोक आहेत त्याच्या मतानुसार शीलाला अथवा चारित्र्यालाच खरे प्राधान्य आहे यासाठीच ज्या ठिकाणी खरे सस्कारित शील असेल त्यालाच ब्राह्मण म्हणावे असे मी सागितले ) ब्राह्मण्य व ब्राह्मण म्हणजे भारतीय समाजशास्त्रज्ञाच्या मतें काय अपेक्षित यावर ही प्रश्नोत्तरे उत्कृष्ट प्रकाश पाडू शकतात.

हे ब्राह्मण्य जातिमात्र ब्राह्मणात दृष्टोत्पत्तीस येणार नाही हे ओळखूनच महाभारतकारानी ब्रह्म-ब्राह्मणापासून चाडाल-ब्राह्मणापर्यंत ब्राह्मणाची वर्गवारी केलेली असून केवळ देवब्राह्मण व ब्रह्मब्राह्मण हेच आदर्श ब्राह्मण्याचे प्रतिनिधी मानलेले आहेत, व त्यानाच भारतीय समाजाचे सास्कृतिक नेतृत्व समर्पण केलेले आहे इतर सर्वांना राज्यशासनाच्या नियत्रणाखालीच ठेवलेले आहे महाभारतकाराच्या या प्रतिपादनाचे नीट मनन केलें तर वर्चस्वासाठी ब्राह्मणवर्गाने काही सवलती घेतल्या व त्यात मिरासदारीच्या भावनेचे पोषण होते इत्यादि आरोप किती फोल होत याची कल्पना येते महाभारतकारानी या सबधात टाकलेला प्रकाश पुढीलप्रमाणे आहे –

विद्यालक्षणसपन्ना सर्वत्र समदर्शिन ।
एते ब्रह्मसमा राजन् ब्राह्मणा परिकीर्तिताः ॥२॥
ऋग्यजुःसामसपन्ना स्वेषु कर्मस्ववस्थिताः ।
एते देवसमा राजन् ब्राह्मणाना भवन्त्युत ॥ ३ ॥
जन्मकर्मविहाना ये कदर्या ब्रह्मबन्धवः ।
एते शूद्रसमा राजन् ब्राह्मणाना भवन्त्युत ॥ ४ ॥
अश्रोत्रिया सर्व एव सर्व चानाहिताग्नय ।
तान् सर्वान् धार्मिको राजा बलि विष्टि च कारयेत् ॥५॥
ऋत्विक् पुरोहितो मत्री दूतो वार्तानुकर्षक ।
एते क्षत्रसमा राजन् ब्राह्मणाना भवन्त्युत ॥७॥
अश्वारोहा गजारोहा रथिनोऽथ पदातय ।
एते वैश्यसमा राजन् ब्राह्मणाना भवन्त्युत ॥८॥
एतेभ्यो बलिमादद्यात् हीनकोशो महीपति ।
ऋते ब्रह्मसमेभ्यश्च देवकल्पेभ्य एव च ॥९॥
अब्राह्मणाना वित्तस्य स्वामी राजेति वैदिकम् ।
ब्राह्मणाना च ये केचिद् विकर्मस्था भवन्त्युत ॥१०॥
विकर्मस्थाश्च नोपेक्ष्या विप्रा राज्ञा कथचन ।
नियम्या. सविभज्याश्च धर्मानुग्रहकारणात् ॥११॥

–महाभारत शातिपर्व अ. ७

(विद्वान, चारित्र्यसपन्न, ब्राह्मण्याची सर्व लक्षणे जीवनातून आविष्कृत करणारे, व सर्वत्र सम भावना ठेवणारे जे ब्राह्मण त्याना **ब्रह्मसम** असे म्हणतात वेदत्रयीमध्ये निष्णात असून आपल्या वर्ण-धर्माची सर्व कर्म कटाक्षाने करणारे असे जे ब्राह्मण त्याना **देवसम** असे म्हणतात (भूदेव ते हेच होत) जे जन्मसिद्ध कर्मापासून विन्मुख असणारे, दळभद्रे ब्राह्मणब्रुव आहेत ते सर्व शूद्र होत वेदाध्ययन न केलेले, अग्नीची उपासना न करणारे अशा सर्व ब्राह्मणाना धार्मिक राजाने वेठीला धरून कामाला लावावे व त्याच्याकडून कर घ्यावा ऋत्विज, पुरोहित, मत्री, दूत, व बातम्या काढणारे हे ब्राह्मणामधले क्षत्रिय होत अश्वदळात, गजदळात, रथदळात व पायदळात काम करणारे ब्राह्मण हे ब्राह्मणा-मधील वैश्य होत या सर्वापासून क्षीणकोश राजाने करभार घ्यावा केवळ प्रारभी सागितल्याप्रमाणे जे ब्रह्मासारखे व देवासारखे ब्राह्मण असतील त्याच्याच जवळून करभार घेऊ नये अब्राह्मणाच्या वित्ताचा धनी राजाच आहे अशी वैदिक धर्माची धारणा आहे जे ब्राह्मण सस्कृतिसंरक्षणाचे आपले काम सोडून देणारे व भलत्याच कामास हात घालणारे असतील त्याची राजाने केव्हाहि उपेक्षा करू नये इतकेच नव्हे तर त्याचे नियत्रण करावे, व इतर सामान्य प्रजाजनाप्रमाणेच त्याना वागवावे ) इतकेच नव्हे तर महाभारत-कारानी असे म्हटले आहे की, 'राजप्रेष्यो यश्च भवेद्विकर्मा । राजन्नेतान् वर्जयेत् देवकृत्ये ॥ ४।५ (म शातिपर्व अ ६३) (जे राजाचे नोकर व कर्महीन असतील अशा ब्राह्मणाना धार्मिक कृत्यात वर्ज्य समजावे ) तात्पर्य, महाभारतामध्ये भीष्मानी देव-सम व ब्रह्मसम ब्राह्मणाची जी लक्षणे सागितली आहेत ती म्हणजेच वैदिक समाजशास्त्रज्ञाना अभिप्रेत असलेले ब्राह्मण्य होय व हे ब्राह्मण्य ज्याच्या जीवनात दृष्टोत्पत्तीस येईल तोच वैदिक सस्कृतीला अभिप्रेत असलेला ब्राह्मण होय योगयुक्त, तपस्यामय, ज्ञानसपन्न जीवन जगणारा, मानवाच्या अत करणातील सर्व नैसर्गिक भाव-विकारावर विजय सपादन करून निष्काचनतेलाच परम वैभव

मानणारा असा हा ब्राह्मण आहे त्याला कोणाच्या धनाची अपेक्षा नाही उपजीवनासाठी राजसत्तेचे अकितत्व तो स्वीकारावयाचा नाही सर्व इद्रियाना स्वाधीन ठेवणारा, शम, दम, तप, सत्य, तितिक्षा शाति इत्यादि गुणाची केवळ मूस असा हा वर्ग आयुष्यभर देव-घरातल्या नदादीपाप्रमाणे सास्कृतिक जीवनमूल्ये प्रत्यक्ष जीवनातून आविष्कृत करण्यासाठी सतत तिळतिळ जीवन जाळण्याचे महाव्रत घेई, व तीच त्याच्यापासून वैदिक समाजशास्त्रज्ञाची अपेक्षा होती म्हणूनच राजर्षि मनूने ब्राह्मण वर्णाच्या रचनेचे कारण सागताना (मनुस्मृति अ १) म्हटले आहे –

उत्पत्तिरेव विप्रस्य मूर्तिर्धर्मस्य शाश्वती ।
स हि धर्मार्थमुत्पन्नो ब्रह्मभूयाय कल्पते ॥१०८॥
ब्राह्मणो जायमानो हि पृथिव्यामधिजायते ।
ईश्वर सर्वभूताना धर्मकोशस्य गुप्तये ॥१०९॥

(शाश्वत धर्माची मूर्ति म्हणूनच ब्राह्मणाला निर्माण करण्यात आलेले आहे तो केवळ धर्मासाठीच उत्पन्न झालेला असून आपल्या आचरणाने ब्रह्मरूप होईल या पृथ्वीवर ब्राह्मण जन्म पावतो तो केवळ धर्मरूपी निधीच्या सरक्षणासाठीच होय व तेवढ्यासाठीच तो सर्वांचा नियत्रक ठरतो ) तात्पर्य, निष्काम व निरतर मूल्यो-पासना म्हणजेच ब्राह्मणाचे जीवन होय, व म्हणून जनार्दनाचा ब्राह्मण हा कधीहि विश्राति न घेणारा निरतरचा सेवक आहे

ब्राह्मणाचे सारे जीवन केवळ आदर्शवाद जीवनातून व्यक्त करण्यासाठीच असल्यामुळे त्याचे जीवन सर्व प्रकारच्या व्यामोहा-पासून पूर्णपणे अलिप्त राखण्यावर वैदिक समाजशास्त्रज्ञाचा कमालीचा कटाक्ष आहे धनाच्या व्यामोहापासून ब्राह्मणाला किती दूर राखले आहे याची कल्पना येण्यासाठी ब्राह्मणाची जी कर्मे सागितलेली आहेत, त्याचे सूक्ष्मतेने परीक्षण करणे आवश्यक आहे गौतम धर्मसूत्रकारानी ब्राह्मणाची पुढीलप्रमाणे षट् कर्मे सागितली आहेत प्रथमत सर्व द्विजातीसाठी म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या त्रैवर्णिकासाठी म्हणून असे सागतात की .–

**'द्विजातीनामध्ययनमिज्यादानम् ।' –गौतम धर्मसूत्र अ. १० वा.**

त्रैवर्णिकाची मुख्य कर्मे तीन आहेत व ती त्यानी केलीच पाहिजेत ही तीन कम म्हणजे (१) विद्येचे अध्ययन (२) यज्ञ अथवा देवपितराची उपासना आणि (३) दान ही होत पण ही केवळ त्रैवर्णिकाची कर्तव्यकर्मे झाली त्यानी आपली जीविका कशी चालवावयाची हा एक मोठाच प्रश्न उत्पन्न झाल्याविना रहात नाही, व त्यासाठी केवळ ब्राह्मणाना म्हणून अधिक तीन कर्मे सागितलेली आहेत ती अशी –

ब्राह्मणस्याधिका प्रवचनयाजनप्रतिग्रहा ॥२॥–गौतमधर्मसूत्र अ १०

(प्रवचन म्हणजे अध्यापन, याजन म्हणजे दुसऱ्याकडून यज्ञादि धार्मिक कर्मे करवून घेणे व प्रतिग्रह म्हणजे दानाचा स्वीकार करणे या तीन गोष्टी केवळ ब्राह्मणासाठी अधिक आहेत ) ब्राह्मणाचे उपजीवनाचे व्यवसाय केवळ हे तीन होत या तीनही व्यवसायाचे निरीक्षण केले तर असे आढळून येईल की त्यातून होणारा लाभ कोणत्याही प्रकारे निश्चित स्वरूपाचा नसून केवळ देणाऱ्याच्या श्रद्धेवर व इच्छेवर तो अवलंबून आहे. अध्यापनानतर शिष्याकडून येणारी गुरुदक्षिणा इतकीच असावी असा कोठेहि नियम नाही यज्ञातील ऋत्विजाच्या दक्षिणेचे प्रमाण ठरले असले तरी त्यातून कोणाला श्रीमत होण्याची आशा असण्याइतके ते मोठे नाही , व दान हे तर जाणून बुजूनच दात्याच्या मर्जीवर अवलबून याच्या उलट मिळेल तेवढ्यात सतोष मानील तोच खरा ब्राह्मण असा वैदिक समाज-शास्त्रज्ञाचा कटाक्ष आहे. क्षत्रिय, वैश्य व शूद्र याच्या उपजीवनाच्या साधनाचा विचार केला व त्यात त्याना असलेल्या सवलतीचा विचार केला तर ब्राह्मणाच्या जीविकेची ही साधने केवळ जेमतेम जीवन चालविण्यापुरतीच कशी आहेत याचा पूर्णपणे उलगडा होतो क्षत्रियादि वर्णाना आपल्या वृत्तीतील विजिगीषा टिकून रहावी यासाठी सतोषाऐवजी असतोषाचे पोषण करण्याचा सकेत सागितलेला आहे शस्त्र व राजाची सैनिक वृत्तीने सेवा ही क्षत्रियाची जीविकेची साधने असून 'क्षत्रियस्य विजितम्' असा त्याच्यासाठी, राजाचा अधिकार सोडून, सपत्तीचा मार्ग पूर्ण मोकळा केलेला आहे. राजसत्ता व तदतर्गत सपूर्ण अधिकारक्षेत्र केवळ

क्षत्रियासाठीच मोकळे ठेविलेले आहे. वैश्यवर्णासाठी तर शेती, व्यापार व पशुपालनादि सारे व्यवसाय व धनोत्पादनाची मुख्य केन्द्रेच मोकळी ठेवलेली आहेत शिल्पाचे सपूर्ण क्षेत्र व निश्चित वेतनाची नोकरी शूद्रासाठी मोकळी आहे व ब्राह्मण सोडून इतर कोणाचीहि जीविका कोणाच्या मर्जीवर व धर्मबुद्धीवर अवलबून ठेविलेली नाही तात्पर्य, ब्राह्मणाच्या जीविकेच्या या तीन व्यवसायाचे सूक्ष्मतेने निरीक्षण केले तर असे म्हणणे भाग आहे की हे व्यवसाय अथवा धदे अनुत्पादक आहेत व असे अनुत्पादक व्यवसायहि त्याने केलेच पाहिजेत असा कटाक्ष नाही क्षत्रिय-वैश्यादिकाचे जीविकेचे व्यवसाय त्यानी केलेच पाहिजेत, असा कटाक्ष होता कारण की तो त्याचा स्वधर्म आहे ब्राह्मणाच्या बाबतीत मात्र असा कटाक्ष नाही गौतम धर्मसूत्रात म्हटले आहे —

पूर्वेषु नियमस्तु ।।३।। —गौतमधर्मसूत्र १०अ

यावरील मस्करी भाष्यात म्हटले आहे "प्रथमेणु अध्ययनादिषु अवश्यकर्तव्यता ततश्च अक्रियाया दोष क्रियाया च अभ्युदय । प्रवचनादिषु अनियम । ततश्च क्रियाया अभ्युदय अक्रियाया प्रत्यवायाभावश्च ।" या सूत्राचा अर्थ असा आहे की पहिली (१) विद्येचे अध्ययन (२) यज्ञ अथवा देवपितराची उपासना व (३) दान ही कर्मे अवश्य केलीच पाहिजेत असा कटाक्ष आहे. म्हणजे ती कर्मे केली तर इह पारलौकिक कल्याण होतें व न केली तर कर्तव्यभ्रष्टतेचा अथवा धर्मभ्रष्टतेचा दोष अगी लागतो पण दुसरी जी प्रवचन, याजन व प्रतिग्रह ही ब्राह्मणाच्या जीविकेसाठी सागितलेली कर्मे आहेत ती केलीच पाहिजेत असा धर्मशास्त्रकाराचा कटाक्ष नाही. म्हणजे ती केली तर अभ्युदय होईल, पण न केली तर धर्मभ्रष्टतेचा दोष मुळीच अगी लागणार नाही. यावरून या वर्णाचे धदे कसे अनुत्पादक आहेत व निष्काम मूल्योपासनेसाठीच केवळ हा वर्ग कसा निर्माण करण्यात आलेला आहे हे ध्यानात येईल.

ब्राह्मण जातीत उत्पन्न होण्याऐवजी कडकडीत ब्राह्मण्यपालनावर वैदिक समाजशास्त्रज्ञाचा केवढा कटाक्ष होता हे दानाला निषिद्ध

असणाऱ्या ब्राह्मणाची जी यादी गौतम धर्मसूत्रकारांनी दिलेली आहे त्यावरून स्पष्ट होते ती यादी अशी – ' न भोजयेत् स्तेनक्लीबपतितनास्तिकतद्वृत्तिवीरहाग्रेदिधिषूदिधिषूपतिस्त्री ग्राम याजकाजपालोत्सृष्टाग्निमद्यपकुकरकूटसाक्षिप्रतिहारिकान् ॥ १५ ॥ उपपतिर्यस्य च स ॥१६॥ कुण्डाशिसोमविक्रय्यगारदाहिगरदावकीर्णिगणप्रेष्यागम्यागामिहिंस्रपरिवित्तिपरिवेतृपर्याहितपर्याधातृत्यक्तात्मदुर्वालकुनखिश्यावदच्छिवत्रिपौनर्भवकितवाजपराजप्रेष्यप्रतिरूपिकशूद्रापतिनिराकृति किलासिकुसीदिवणिक् शिल्पोपजीवि ज्यावादित्रतालनृत्यगीतशीलान् ॥१७॥—गौतमधर्मसूत्र अ १५

मस्करी भाष्यानुसार या सूत्राचा अर्थ पुढीलप्रमाणे आहे — "बाह्य अग्निहोत्रादि आचार पाहूनच केवळ ब्राह्मणाला भोजनादिकासाठी बोलावणे उचित नसून त्या दृष्टीने बाह्य आचार दिसला तरी पुढील लोक वर्ज्य समजावे (१) स्तेन म्हणजे सोने सोडून कोणत्याहि अन्य गोष्टीचा अपहार करणारा (कारण सोन्याची चोरी करणारा पतितच असल्यामुळे तो वर्ज्य आहेच.) (२) क्लीब म्हणजे निरुत्साही मनुष्य (षढ नव्हे, कारण षढ हा अग्निहोत्रादि कर्मानाच अपात्र असतो, व येथे तर ते बाह्य आचार असल्यामुळे पात्र वाटणाऱ्याचाच विचार करावयाचा आहे ) (३) पतित म्हणजे पचमहापातके करणारा (४) नास्तिक म्हणजे परलोक इत्यादि अतीन्द्रिय सृष्टि व अतीन्द्रिय शास्त्रे न मानणारा (या ठिकाणी अत करणाने नास्तिक असणारा मनुष्य अपेक्षित आहे जो प्रत्यक्ष आचाराने नास्तिक व भ्रष्ट आहे त्याचा पतित या सदरातच अतर्भाव होत असल्यामुळे त्याचा वेगळा विचार करण्याचे कारणच नाही ) (५) नास्तिक विचारप्रणालीच्या भरवशावर आपले उपजीवन चालविणारा (मग तो स्वतः नास्तिक असो वा नसो.) (६) वीरहा म्हणजे मनुष्याचा घातपात करणारा (७) व्यर्थ सोमाभिषव करणारा (येथे व्यर्थ शब्दाचा प्रयोग 'शास्त्रमर्यादा उल्लघून असा आहे ) (८) धाकटचा बहिणीचे लग्न वडील बहिणीच्या आधी केले तर त्या विवाहित

धाकटचा बहिणीला 'अग्रे दिधिषू' व वडील बहिणीला 'दिधिषू' असे म्हणतात अशा बहिणीचे पति (सोयीसाठी शास्त्रमर्यादेचे उल्लघन करणारे लोक असा याचा अभिप्राय आहे) किंवा आपला ज्येष्ठ बधू मृत झाल्यावर किंवा जिवत असतानाहि धर्मशास्त्राप्रमाणे परवानगी असताहि आपल्या इच्छेप्रमाणे भावजयीशी सबध ठेवणारा (९) स्त्रियाच्या कामनिक कृत्याचे पौरोहित्य करणारा (१०) अनेकाचे पौरोहित्य करणारा (११) मेंढपाळाचा धदा करून पोट भरणारा (१२) शास्त्रमर्यादेचे उल्लघन करून लहरीनुसार अविधीने श्रोताग्निहोत्राचा अथवा स्मार्ताग्निहोत्राचा परित्याग करणारा (१३) मद्यपी अथवा दारूच्या व्यापारावर जगणारा (१४) लोकविद्विष्ट व लोकनिन्दित कर्म करणारा (१५) खोटी साक्ष देणारा (१६) जादूचे चमत्कार दाखवून गारुडी इत्यादिकाच्या धद्याने उपजीविका करणारा (१७) शीलभ्रष्ट कुटुम्बात राहणारा (१८) दुष्कुलीनाच्या घरी भोजन करणारा (१९) सोमाचा विक्रय करणारा (२०) दुसऱ्याच्या घराना आगी लावणारा (२१) दुसऱ्यावर विषप्रयोग करणारा (२२) ब्रह्मचर्याश्रमात राहून बुद्धिपूर्वक त्या आश्रमातील पावित्र्याला धक्का लावणारे कर्म करणारा (२३) गणाचा सेवक (२४) अगम्यागमन करणारा (२५) प्राण्याच्या हत्येची आवड असणारा (२६) वडील भावाच्या आधी विवाह करणारा धाकटा भाऊ व त्याचा वडील बधू (२७) याच पद्धतीने याजन करणारा धाकटा व वडील बधू– याला पुढील अपवाद आहेत १) चुलत्याची मुले २) सावत्र अथवा कोणत्याही रीतीने सहोदर नसलेला बधू. ३) वेडसर, पतित, कुष्ठरोगाने पीडित, कलकी, षंढ, क्षयासारख्या दुर्धर रोगाने पीडित, देशातराला गेलेला, सन्यासी, योगी, व्यसनी व नास्तिक बधु असला तर धाकटचा भावाला त्याच्या आधी अथवा त्याची कोणत्याहि प्रकारे वाट न पाहता विवाह, अग्निहोत्र, याजन इत्यादिकाचा पूर्ण अधिकार आहे. (२८) नेहमी शस्त्र हातात वागविणारा साहसी

(२९) पौरुषहीन (३०) कोणताहि रोग नसता दात नखें नेहमी मलिन ठेवणारा (घाणेरड्या राहणीचा असा अर्थ) (३१) जुगारी (३२) मानीची चित्रे विकण्याचा धदा करणारा (३३) केवळ मुंज हा संस्कार झालेला पण धर्मशास्त्राने ब्राह्मणाला म्हणून सांगितलेली कोणतीही कर्मे न करणारा (३४) राजाची नोकरी करणारा (३५) खोटी वजने व मापे वापरणारा अथवा कोणत्याही पद्धतीने लोकाची फसवणूक करण्याची प्रवृत्ति असलेला (३६) शूद्रेचा पति (३७) ज्या कोणत्या आश्रमात असेल तेथील आश्रमधर्माचे मुळीच पालन न करणारा (३८) दुसऱ्याची जमीन दडपणारा. (३९) प्रतिषिद्ध मार्गाने पोटाची खळगी भरणारा (४०) व्यापार करून पोट भरणारा (४१) शिल्पव्यवसायाने पोट भरणारा (४२) धनुर्वेदाच्या म्हणजे शस्त्रास्त्रविद्येच्या भरवशावर आपली उपजीविका चालविणारा (४३) वाद्ये वाजवून वादकाच्या धद्यावर आपले उपजीवन चालविणारा (४४) नृत्यकलेच्या भरवशावर आपले पोट भरणारा (४५) गायक (४६) आईबापाची इच्छा नसताना अथवा त्याना आवश्यकता असताना त्याना सोडून स्वत चा ससार थाटणारा या सर्व ब्राह्मणाना वर्ज्य समजावे"

धर्मशास्त्रातील ही विस्तृत यादी येथे उद्धृत करण्याचे कारण इतकेच की ब्राह्मण्य अथवा ब्रह्मवर्चस् म्हणजे काय व ते किती गोष्टीपासून अलिप्त असे आदर्शवादाचे प्रतीक आहे याची पूर्ण कल्पना यावी तात्पर्य, शम, दम, तप, शुचिर्भूतपणा, शाति, सरळपणा, अध्यात्मनिष्ठा, ज्ञान, आस्तिक्य, सर्वभूतहितरतता याची साकार मूस म्हणजे ब्राह्मण असून निर्विषय, शात, निर्वैर, यम व कर्तव्यपरायण असा या वर्गाचा जगत्कल्याण हा एकमात्र जीवनहेतु आहे या वर्गाच्या जीवनाच्या आरशात समाजाने सदैव आपले प्रतिबिब पाहून आपले चारित्र्य विशुद्ध राखावयाचे असा वैदिक राष्ट्राचा सकेत होता व या वर्गाने अखड बलिदानाचे महाव्रत स्वीकारून निष्काम मूल्योपासना करीत जीवन-यापन

करणे हीच या वर्गाची वास्तविक राष्ट्रसेवा व मानवसेवा होती. भारतीय राष्ट्राचे सास्कृतिक नेतृत्व या वर्गाकडे देऊन राजदण्डा-वरहि त्याचे प्रभुत्व, एका विशिष्ट पद्धतीने भारतीयानी प्रतिष्ठा-पित केले व राजदण्डाकडे या वर्गाच्या सरक्षणाचे महान् कार्य सोपविले शस्त्राचा हा विशिष्ट सकेत ऋग्वेद सहितेतहि आढळून येतो ऋग्वेदाचा मत्रद्रष्टा म्हणतो 'अह रुद्राय धनुरातनोमि ब्रह्मद्विषे शरवे हन्तवा उ' ( ऋग्वेद १०।१२५।६ ) (मी म्हणजे आदिशक्ति ब्राह्मणाच्या व वेदाच्या विद्वेष्टयाला हाणून पाडण्यासाठी रुद्राच्या हातात सज्ज धनुष्य देत आहे ) स्वत आदिशक्तीने ब्राह्मण्याच्या सरक्षणासाठी सहारदेवतेच्या हातात धनुष्य देण्याची ही कल्पना केवढी भव्योदात्त आहे ! हीच गोष्ट ऱ्या रुद्रशक्तीची जी पार्थिव प्रतिनिधि राजसत्ता तिच्या सबधात धर्मसूत्रकारानी सागितलेली आहे गौतम धर्मसूत्रात राजाची कर्तव्ये सागताना म्हटले आहे 'बिभृयाद् ब्राह्मणान् श्रोत्रियान्' ।।९।। (गौ ध अ ९ वा ) यावर भाष्यकार लिहितात (ब्राह्मणान् ब्रह्मगुणसपन्नान् श्रोत्रियान् श्रुतिमत '' ब्राह्मण्य ज्याच्या ठिकाणी पूर्णपणे दृग्गोचर होते अशा ज्ञानसपन्न वर्गाचे राजाने भरण, पोषण व सरक्षण केले पाहिजे )

आदर्श राष्ट्रात असा नेतृवर्ग असलाच पाहिजे ही कल्पना विख्यात ग्रीक तत्त्वज्ञ प्लेटो याच्या दीर्घदर्शी प्रतिभेलाहि स्फुरली होती पण वैदिक समाजशास्त्रज्ञानी या नेतृवर्गाच्या निर्मिती-सबधी प्रतिभेच्या सर्वकषतेचा जो प्रत्यय दिला तो प्लेटोच्या प्रतिभेला देता आला नाही व त्यामुळे कल्पना स्फुरूनहि प्रत्यक्ष रचनेच्या सबधात त्याच्या विचारप्रणालीची अवस्था 'विनायक प्रकुर्वाणो रचयामास वानरम्' अशी झाल्याचे आजचे राज्य-शास्त्रज्ञ व मान्य करीत आहेत तौलनिक दृष्टीने पुढील व्याख्या-नात त्याच्या विचारप्रणालीचे समालोचन करून वैदिक राष्ट्राच्या या नेतृवर्गाच्या आणखी काही विशेषाचा परिचय करून देऊन क्षात्रवर्णाकडे वळू

✦ ✦ ✦

## व्याख्यान सहावे

### ब्राह्मण

ग्रीक तत्त्वज्ञ प्लेटोला आदर्श राष्ट्राला सांस्कृतिक नेतृत्व असण्याची आवश्यकता पटली होती या नेतृवर्गालाच त्याने तत्त्वज्ञ (Philosopher) असे नाव दिले आहे तत्त्वज्ञाची त्याने जी लक्षणे दिली आहेत त्याचा विचार केला तर तो ब्राह्मण वर्णाकडेच संकेत करीत आहे असे आढळून येईल तो म्हणतो 'Specator of all time and all existence, he has the noblest gifts of nature and makes the highest use of them Attained the knowledge of the true nature of every essence by a spmpathetic and kindred power in the soul and....having begotten mind and truth, he will have knowledge and will live and grow truely ' वैदिक राष्ट्राने सत्यज्ञानाचा निधि, जीवनातून मूल्याचा आविष्कार करणारा तपस्वी व उत्कृष्ट गुणसंपत्तीचा अथवा दैवी गुणाचा साठा आणि कर्मयोगी म्हणून जे ब्राह्मणाचे चित्र रेखाटले आहे तेच प्लेटोनेहि या शब्दांनी रेखाटले आहे. वासना, विकार व पूर्वग्रह यापासून प्लेटोचा तत्त्वज्ञ पूर्णपणे अलिप्त असून त्याच्यावर कसलेहि अनैतिक दडपण जसे येऊ शकत नाही त्याचप्रमाणे मूल्य त्याच्या प्रत्यक्ष व्यवहारातून व्यक्त होते प्लेटो अशा तऱ्हेच्या तत्त्वज्ञाचे अस्तित्व हा एकादा चमत्कार मानीत नाही तर हा तत्त्वज्ञ प्रयत्नांनी निर्माण करण्याची शक्यता आहे असें मानतो, व त्याची परंपरा टिकण्यावरच राष्ट्राचा आदर्शपणाहि टिकण्याची शक्यता असल्यामुळे ती परंपरा टिकण्यासाठी व टवटवीत राहण्यासाठी ब्रह्मचर्याश्रमासारख्याच एका अनुशासनबद्ध शिक्षणप्रणालीचा पुरस्कार करतो त्यासाठी तत्त्वज्ञाचे निर्माते अथवा पालक

(Philosopher-guardians) नावाच्या एका स्वतत्र वर्गाची आपल्या प्राचीन ऋषिसस्थेसारखीच त्याचीहि कल्पना आहे व समाजसस्था टिकून रहावी म्हणून या ऋषिसस्थेच काही निर्णायक स्वरूपाचे अधिकारही तो मान्य करतो पण प्लेटो व भारतीय तत्त्वज्ञ याच्यात एक अतिशय मूलभूत असा भेद आहे तो असा की सास्कृतिक नेतृत्व व राजकीय नतृत्व याच्यात त्याने सरमिसळ केली आहे, तर भारतीय द्रष्टयानी कटाक्षाने अशी सरमिसळ होऊ दिलेली नाही नेतृत्व हे राजसत्तेपासून पृथक् असू शकते, व राजसत्ता व सपत्ति याच्या योगाने नेतृत्वाच्या अध पतनाचा सभव असतो या गोष्टीची कविहृदयाच्या भावनाशील प्लेटोला कल्पनाच आली नाही व त्याचा परिणाम त्याचे सारे विवेचन म्हणजे एक भव्योदात्त, सुदर, पण अव्यवहार्य काव्य झाले आहे तो सास्कृतिक व राजकीय नेतृत्व एकच असले पाहिजे असे साग्रह प्रतिपादन करतो इतकेच नव्हे तर पाशवी भौतिक सामर्थ्याच्या एकीकरणावाचूनच्या नैतिक सामर्थ्याची कल्पनाही त्याच्या अत करणाला स्पर्श करू शकत नाही तो म्हणतो 'Until philosophers are kings and princes of the world have the spirit and power of philosophy .... cities will never have rest from their evils.' (The Republic P 473- C D Jowett's Translation) 'जोपर्यंत तत्त्वज्ञ हे राजे होत नाहीत व जगातील राजाना तत्त्वज्ञतेचा भाव व सामर्थ्य प्राप्त होत नाही तोपर्यंत राज्ये ही दुर्गुणापासून होणाऱ्या हानीपासून विमुक्त होऊ शकत नाहीत' प्लेटोने असे ठाम विधान केले आहे की If political power and scientific knowledge (Philosophy) are not united in one person, then there is no end of evil for the state and also for mankind in general' (जोपर्यंत राज्यशक्ति अथवा प्रभुत्व व तत्त्वज्ञता ही एकाच मनुष्यात सयुक्त होत नाहीत तोपर्यंत राज्यातील दोष अथवा एकदर मानवतेतीलही दोष कधीच नष्ट होऊ शकत नाहीत) म्हणून प्लेटोच्या आदर्श राज्याचा अधिनायक हा तत्त्वज्ञ राजा (Philosopher-king) आहे. आणि तोच सर्वश्रेष्ठ

असून त्याच्यावर कोणतीही सत्ता अथवा नेतृत्व असू शकत नाही असे त्याचें म्हणणे आहे प्लेटो हा सॉक्रेटिसचा शिष्य होता व सॉक्रेटिमच्या 'They only shall rule who know' (त्यानीच राज्य करावे की जे ज्ञानी आहेत) या सूत्रातून प्लेटोच्या तत्त्वज्ञ राजाच्या कल्पनेचा जन्म झालेला आहे प्लेटोच्या मते या तत्त्वज्ञ राजात आत्म्याचा सपूर्ण विकास झालेला असेल व असा एकहि आतरिक सद्गुण असणार नाही की जो त्याच्यात असणार नाही तो म्हणतो 'None of the graces of a beautiful soul are wanting in him.' सर्व प्रकारच्या ज्ञानाचे सगतीकरण त्याच्या ठिकाणी स्वत सिद्ध असून सर्व समाजाच्या हितासबधीचे त्याचे ज्ञान इतर कोणापेक्षाहि अधिक अचूक असेल केवळ समाजहिता-पलीकड त्याच्या प्रत्येक क्रियेची अन्य कोणतीही प्रेरणा असणार नाही तात्पर्य, त्याची भूमिका ही भगवान् श्रीकृष्णानी ज्याला 'सर्वभूतहितरत' असे म्हटले आहे त्या स्वरूपाची राहील. अर्थात्च इतर कोणाहीपेक्षा त्यालाच समाजाचे हित वस्तुत कशात आहे हे अधिक कळू शकत असल्यामुळे विधिनियमाची चौकट (Law) त्याला बधनकारक असू शकणार नाही. उलट तो म्हणेल तोच वस्तुत विधिनियम (Law) असून लोकानी त्याच मार्गाने स्वहिताच्या व राष्ट्रहिताच्या दृष्टीने गेले पाहिजे प्लेटोच्या तत्त्वज्ञ राजाचे स्वरूप असे राहील की 'The Philosopher-king is doubly demanded as the only adequate embodiment of the Socretic conception of goodness and also as the authority whose personal insight into good creates the public tradition by which the rest of society is to live (सत या शब्दाने जे जे भाव व्यक्त होतील ते ते सर्व भाव या तत्त्वज्ञ राजाच्या ठिकाणी सहजसिद्ध असतात असे प्लेटोचे म्हणणे आहे. त्याचे ज्ञान विज्ञान दैवी व अलौकिकच असल्यामुळे शाश्वत न्यायाचा तोच स्वतःसिद्ध सरक्षक आहे असेहि प्लेटो सागतो प्लेटोचा हा तत्त्वज्ञ जसा विधिनियमाच्या अतीत आहे तसाच तो

स्वार्थाच्याहि अतीत आहे. सामान्यत तो रूढ विधिनियमाच्या अनुसारच राज्याचा व्यवहार चालवीत असला तरी क्वचित् रूढ विधिनियम व संकेत आणि तत्त्वज्ञ राजाचे मत याच्यात विरोध उत्पन्न झाला तर समाजाने हे संकेत व नियम गुंडाळून ठेवून त्याच्या मतानुसार वागण्यातच समाजाचे हित असते याप्रमाणे विधिनियमातीत असे त्याचे वर्णन असले तरी प्लेटोचा हा तत्त्वज्ञ राजाहि काही नियमाच्या अंकित असतोच. प्लेटोच्या विवेचकानी असे म्हटले आहे की " The philosopher-King was to be an absolute ruler because he was not to be trammelled by the rigid and clumsy abstractions and generalities of written laws but his absolutism was subject to certain limitations. Freedom from the shackles of written laws did not mean freedom from all restraint The philosopher-king must respect the fundamental articles of the constitution of the state He must not radically alter the basic principles on which the state was constituted at his own sweet will These basic principles which he must not change in hurry, related to (1) regulation of wealth and property in the state (2) The size of the state (3) Rule of justice in the state and (4) system of education Thus even the philosopher king of Plato was the servan of a fundamental social order "

प्लेटोच्या तत्त्वज्ञ राजाची सत्ता संपूर्ण व अन्य कोणी नियंत्रित केलेली नसून लिखित विधिनियमाच्या ठाशीव व दीर्घसूत्री चौकटीने त्याचे प्रभुत्व संकोचित केलेले नाही हे खरे असले तरी त्याचें निरंकुश प्रभुत्वहि कांही नियमानी सीमित केलेलेच आहे लिखित व ठाशीव विधिनियमानी नियंत्रित नसले तरी ते संपूर्णपणे अनियंत्रित आहे असे मात्र नव्हे. या तत्त्वज्ञ राजालाहि ज्या तत्त्वावर राज्यघटना आधारलेली असेल त्या मूलभूत तत्त्वाना मान्यता द्यावीच लागे आपल्या लहरीनुसार या मूलभूत तत्त्वात आमूलाग्र परिवर्तन घडवून

आणण्याचा त्याला अधिकार नव्हता त्याने घिसाडघाईने ज्याच्यात मुळीच परिवर्तन करू नये अशी अपेक्षा व्यक्त केलेली आहे ती तत्त्वे अशी – (१) राज्यातील धन व सपत्ति याच्या सबधातील ठरलेली पद्धति (२) राज्याच्या सीमा मर्यादा (३) राज्यातील शाश्वत न्यायावर अधिष्ठित असणारी राज्य-कारभाराची पद्धति (Rule of justice) व (४) शिक्षणपद्धति याप्रमाणे प्लेटोचा तत्त्वज्ञ राजासुद्धा समाजव्यवस्थेच्या मूलतत्त्वाचा अकितच आहे ' (Plato and Aristotle, by D. R Bhandari and R R. Sethi P 59) पण प्लेटोच्याच दुसऱ्या काही विवेच-काचे मत असे आहे की, तत्त्वज्ञ राजाला याहि अकितत्वाची प्लेटोच्या मते काही आवश्यकता नाही कारण स्वभावत च या गोष्टी त्याच्या ठिकाणी असतात. (प्लेटोच्या तात्त्विक परिभाषेत नेहमी Justice अथवा Rule of justice असे शब्द येतात त्याचा अर्थ नीट ध्यानात घेणे आवश्यक आहे हल्ली Justice या शब्दाचा अर्थ 'लिखित कायद्याना अनुसरून केलेला निर्णय ' असा करण्यात येतो प्लेटोच्या justice अथवा न्याय या शब्दाचा असा सीमित अर्थ नाही त्याच्या justice शब्दाचा अर्थ ' कर्तव्य ' असा आहे व राज्यातील न्याय याचा अर्थ त्याच्या मते ' The justice of the State is the citizen's sense of duty ' ' नागरिकाची स्वकर्तव्यपरायणबुद्धि असा आहे हे कर्तव्य म्हणजे समाजातील प्रत्येक गटाने सामाजिक क्षेत्रात त्या त्या गटाकडे जी भूमिका व जे काम आले असेल तेच कर्तव्यपरायणतेने यावज्जीव करीत राहणे हे होय व तत्त्वज्ञ राजाने आपल्या लहरीनुसार ही वर्ग-व्यवस्था मोडू नये तर तिचे सरक्षण करावे हा प्लेटोच्या 'Rule of justice in the state या शब्दाचा अभिप्राय आहे. आदर्श समाजव्यवस्था तीन वर्गात प्लेटो विभागतो. हे तीन वर्ग आपल्या समाजव्यवस्थेतील त्रैवर्णिकासारखेच सामान्यत आहेत प्रत्येक व्यक्तीचे जसे (१) सदसद्विवेकबुद्धि (२) सामर्थ्य व (३)

क्रियाशीलता असे त्रिविध स्वरूप दृष्टोत्पत्तीस येतें, तसेच समाजपुरुषाचेहि आहे समाजपुरुषाची सदसद्विवेकबुद्धि म्हणजे तत्त्वज्ञ सत्ताधिपाचा अथवा खऱ्या लोकपालकाचा वर्ग होय. समाजपुरुषाचे सामर्थ्य म्हणजे सैनिकाचा, योद्धयाचा व अधिकाऱ्याचा वर्ग होय, आणि समाजपुरुषाची क्रियाशक्ति म्हणजे धनोत्पादक वर्ग होय उर्वरित वर्ग म्हणजे जनता आदर्श राष्ट्रामध्ये समाजपुरुषाच्या या तीनहि अगानी आपआपल्या क्षेत्रात योग्य, कर्तव्यनिष्ठ व वाकबगार ठरावे अशा रीतीने त्याना तयार करण्यासाठी सुयोग्य शिक्षणप्रणालि असते. आदर्श राज्याची उभारणी कर्तव्याच्या योग्य विभक्तीकरणाच्या पायावरच झालेली असते. या विभक्तीकरणाचे प्रधानसूत्र एक मनुष्य व एकच पण निश्चित कर्तव्य हे असते. एकाच कामावर एका व्यक्तीला आपले सपूर्ण लक्ष्य केंद्रित करावयास लावण्याने त्या व्यक्तीचे कौशल्य अधिकाधिक वाढत जाते व अशा कुशल आणि सुक्षम व्यक्तीचा समुदाय म्हणजेच सर्व दृष्टीने आदर्श व समृद्ध असे सामाजिक अथवा राष्ट्रीय जीवन होय अशा राष्ट्राच्या घटकाची प्रेरणा हक्क व अधिकार ही न राहता राष्ट्रसेवा व राष्ट्रनिष्ठा हीच राहिली पाहिजे कारण ज्या ठिकाणी व्यक्ति ही स्वत साठी नसून राज्यासाठीच असते तेच खरे आदर्श राज्य होय ) प्लेटोच्या सामाजिक विचारधारेतील हे तत्त्वज्ञ राजाच्या सास्कृतिक नेतृत्वाचे स्वरूप पाहिले की हे नेतृत्व ज्या वर्गातून उत्पन्न होते तो वर्ग म्हणजेच ब्राह्मणाचा वर्ग होय हे ध्यानात यावयास वेळ लागत नाही प्लेटोच्या परिभाषेप्रमाणे या वर्गाला तो philosopher ruler अथवा True guardian असे नाव देतो विशिष्ट सस्कारित शिक्षणप्रणालीच्या द्वारे हा वर्ग तयार केला तरी उत्पादनाच्या द्वारे मिळणाऱ्या सपत्तीच्या मोहापासून, कौटुबिक स्वरूपाच्या ममत्व मर्यादित करणाऱ्या मोहापासून व स्त्रीविषयक मोहापासून हा वर्ग दूर राहील अशी व्यवस्था केल्यावाचून तो आपला जीवनातील

आदर्शवाद टिकवू शकणार नाही अशी भीति प्लेटोलाहि होतीच व त्यासाठी त्याने आपल्या मगदुराप्रमाणे एक धाडसी उपाय सांगितला. त्या उपायाला ‘ A system of communism of property and of wives ’ असे म्हणतात हा उपाय त्याने आजच्या साम्यवादाप्रमाणे सर्व समाजाला लागू न करता भारतीयांच्या परिभाषेत ज्यांना ब्रह्म व क्षात्र असे म्हणता येईल त्या तत्त्वज्ञ व योद्धा या दोन वर्गानाच लागू केलेला आहे कारण त्याच्या मते आदर्श राज्यसंस्था या दोन वर्गावरच खरी अधिष्ठित असल्यामुळे इतर वर्गाचा फारसा विचार करण्याचे कारण नाही उपजीविकेचा व्यक्तिगत स्वतंत्र व्यवसाय आणि व्यक्तिगत आर्थिक जीवन हे व्यक्तिगत स्वार्थ व मर्यादित व्यक्तिजीवनाचा भाव उत्पन्न करीत असल्यामुळे प्लेटोने प्रथम या दोन वर्गापुरती ही गोष्ट पूर्णपणे नष्ट करण्याचा उपाय सांगितला. पण या वर्गाच्या उपजीवनाची व्यवस्था केल्याविना त्यांचे आर्थिक जीवन नष्ट करता येण्याची शक्यता नव्हती प्लेटोने ही व्यवस्था अशी सुचविली की सर्वांसाठीच एक समान भोजनगृहाची (common mess) व्यवस्था असावी व राज्यतंत्राच्या वतीने तेथ सर्वांच्या भोजनादिकाची व्यवस्था असावी केवळ आर्थिक जीवनच नव्हे तर व्यक्तिगत कामजीवन हेहि ममत्व सीमित करावयास व स्वार्थप्रवृत्ति वाढवावयास कारणीभूत होत असते प्लेटोने त्यासाठी समान कामजीवनाचा उपाय सुचविला आहे त्याचे असे म्हणणे आहे की समाजातील व्यक्तिमात्राचे जीवन हे केवळ राष्ट्रासाठीच असल्यामुळे स्त्री-जीवनहि राष्ट्रासाठीच आहे. समाजातील उत्कृष्ट स्त्रियांनी कौटुंबिक जीवन पत्करताना राष्ट्राच्या दोन प्रमाणभूत वर्गासाठी आपले सर्वस्व अर्पावे त्यामुळे व्यक्तिगत कामजीवनाचा प्रश्न तर उत्पन्न होणार नाहीच, पण कोणता मुलगा कोणाचा हा प्रश्नच उत्पन्न न होता सर्वच मुले सर्वांची ही वस्तुस्थिति उत्पन्न झाल्यामुळे कौटुंबिक जीवनात आपआपल्या मुलावर प्रत्येक जण जसे उत्कट प्रेम करिताना दृष्टोत्पत्तीस येतो तसेच उत्कट प्रेम सर्वचजण सर्वच मुलांवर करू लागतील.

## प्लेटोच्या विचारप्रणालींतील दोष

प्लेटोने सांस्कृतिक नेतृत्व व राजकीय नेतृत्व हे एकाच व्यक्तीत संयुक्त करण्यात सांस्कृतिक नेतृत्वाच्या अधःपतनाची एक प्रकारे व्यवस्थाच केली आहे. मनुष्याचे आर्थिक जीवन व कामजीवन त्याचा जितका अधःपात घडवून आणते त्याहूनहि अनियंत्रित सत्तेचे जीवन त्याचा अधिकच अधःपात घडवून आणते. किंबहुना प्रभुत्व अथवा सत्ता ही एक अशी मदिरा आहे की तिने जितका अधःपात होण्याची शक्यता असते तितका अर्थजीवनाने व कामजीवनाने मुळीच होत नाही. प्लेटोसारख्या दीर्घदर्शी प्रतिभेच्या पुरुषाच्या ध्यानात ही गोष्ट कशी आली नाही हे एक महान् आश्चर्यच होय. ती ध्यानात आली असती तर त्याने आपल्या तत्त्वज्ञ राजाला विधिनियमाच्या अतीत ठेवून त्याच्या अनियंत्रित सत्तेचा कधीहि पुरस्कार केला नसता. त्यानें तत्त्वज्ञ वर्गाच्या हाती अनियंत्रित सत्ता देण्यात एक प्रकारे बुद्धिप्रधान वर्गाच्या सत्तात्मक अधिनायकवादाचा पुरस्कार केलेला आहे. एका दृष्टीने विचार केला तर प्लेटो ज्याचा संकेत करतो तो स्थितप्रज्ञ पुरुष सापडणे अत्यंत दुष्कर आहे, व ही गोष्ट लक्षात घेता एका स्वप्नाळू परिभाषेतून व्यक्तिस्वातंत्र्य व विचारस्वातंत्र्य संपूर्णपणे नष्ट करणाऱ्या एका अरेराव व अत्याचारी अधिनायकवादाचा प्लेटोच्याविचारप्रणालीतून जन्म होण्याची पुष्कळच शक्यता आहे. दुसरी व अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हणजे प्लेटोने तत्त्वज्ञाला अथवा तत्त्वज्ञवर्गाला राजसत्ता बहाल करताना त्याच्या ज्या विशेषाचा अथवा गुणाचा उल्लेख केला आहे ते सारे आंतरजीवनातील सद्‌गुण आहेत. या वर्गाच्या शिक्षणक्रमात त्याने भौतिक विद्यापैकी गणित व तर्कशास्त्र यांचा प्राधान्येकरून अंतर्भाव केलेला आहे. पण या गोष्टींनी राज्य करता येत नाही. राज्याचा सूत्रचालक व्हावयास कायद्याचे सूक्ष्म ज्ञान, अर्थशास्त्राचे सूक्ष्म ज्ञान व लष्करी शिक्षण आणि युद्धशास्त्राचे पद्धतशीर ज्ञान

इत्यादि गोष्टीच्या ज्ञानाची अत्यंत आवश्यकता असते व प्लेटोनें आपल्या तत्त्वज्ञ राज्यकर्त्यांच्या शिक्षणप्रणालीत या गोष्टीचा अतर्भाव केलेला नाही, इतकेच नव्हे तर त्याना तादृश महत्त्वहि दिलेले नाही त्यामुळे त्याच्या तत्त्वज्ञ राजाला अथवा तत्त्वज्ञ राज्यकर्त्याना ज्याच्यापाशी हे ज्ञान व बळ एकवटले आहे त्याच्या इच्छाशक्तीचे अकित होऊन राहण्याविना दुसरा मार्गच उरलेला नाही. आकस्मिकपणे राष्ट्रात उद्भवणारा अत सघर्ष अथवा बाहेरच्या प्रबळ शत्रूचे आक्रमण अशासारख्या परिस्थितीत हा राजा तडकाफडकी कोणते निर्णय घेऊ शकणार ? या सर्व गोष्टीचा विचार केला तर तत्त्वज्ञ वर्गाचा दैनदिन राजकीय व्यवहाराशी सबध जोडणे नेहमीच अहितकारक ठरते. या दृष्टीने Jowett याच्या मर्यादा ओळखूनही त्याने प्लेटोवर केलेली टीका विचारार्ह वाटते. तो म्हणतो – The philosopher-ruler is apt to be looking into the distant future or back into the remote past and unable to see actions and events of the present '

(तत्त्वज्ञ सत्ताधारी हा लाबचे भविष्य व अज्ञात भूतकाळ याचे रहस्य आकलन करण्यात केवढाहि विचक्षण ठरला तरी वर्तमानकालीन प्रसग व क्रिया या त्याच्या ध्यानात येणे मुळीच शक्य नाही. )

या वर्गाला मोहातीत राखण्यासाठी प्लेटोने सुचविलेले आहार-विहाराच्या अथवा अर्थजीवन व कामजीवनाच्या साम्यवादाचे उपाय तर केवळ बालिश स्वरूपाचे आहेत प्लेटोचा विख्यात शिष्य व प्रसिद्ध राज्यशास्त्रज्ञ ॲरिस्टॉटल् यानेच आपल्या गुरूच्या या साम्यवादावर घेतलेले आक्षेप पाहण्यासारखे आहेत ॲरिस्टॉटलने प्लेटोविरुद्ध उपस्थित केलेले एकदर मूलभूत मुद्दे पुढीलप्रमाणे आहेत ––

(1) Real progres of Society depends upon cultivation of distinct interests by individuals based on private property; (2) there is a natural instinct and pride

of ownership; (3) communism of property would destroy the sentiments of charity and benevolence (4) Unity of the state should be promoted by proper education and not by communism which only produces dead uniformity (5) Plato's communism ignores the majority of the citizens and by dividing the state into two communities, renders unity and harmony impossible; (6) that community of wives will create confusion and disharmony in the social order (7) that children, common to all, are bound to be neglected (8) that unholy acts may be done against near relatives (9) that state controlled mating will be unworkable and will not bring the best males and females together (10) that it is absurd to use the anology of animals in support of community of wives (11) that it will make the guardian class most unhappy. (12) one female cannot be the wife of all guardians If so this will create disharmony instead of unity Family is a natural school of moral conduct and is a preparation for the state. In the family, duty is learnt the more easily because it is tinged with family affection and personal feelings. Communism of women will destroy temperence, a fundamantal element of good character ' (१) खाजगी मालमत्तेच्या तत्त्वावर आधारलेल्या व्यक्तिमात्राच्या भिन्न भिन्न स्वार्थसाधनाच्या मर्यादित सवर्धनावर व संरक्षणावरच समाजाची खरी प्रगति मुख्यत अवलबून असते (२) मालकी हक्काचा अभिमान ही एक नैसर्गिक प्रवृत्ति आहे (३) आर्थिक साम्यवादाचा प्रयोग दोन प्रवृत्तीच्या अथवा औदार्याच्या व सहानुकपेच्या विनाशात पर्यवसित होईल (४) आदर्श राज्यात एकात्मतेची भावना योग्य शिक्षणाच्या सस्काराच्या द्वारे उत्पन्न व सर्वधित करता

येते साम्यवादाने केवळ कृत्रिम व निर्जीव सरूपतेची निर्मिति होईल, ती काही खरी एकात्मता नव्हे. (५) प्रत्यक्ष जीवनाचा अनुभव साम्यवादाच्या गृहीत कृत्याच्या पूर्ण विरोधी आहे. (६) प्लेटोच्या साम्यवादाने बहुजन समाजाकडे पूर्णपणे दुर्लक्ष केलेले असून केवळ दोनच वर्गाना प्राधान्य देण्यात राष्ट्रातील एकात्मता व सवादिता अशक्य करून सोडली आहे (७) स्त्री-जीवनावर जो साम्यवादाचा प्रयोग करावयाचे त्याने ठरविले आहे त्यामुळे समाजव्यवस्थेत केवळ गोधळ व विसवादिता निर्माण होईल (८) जी सर्वाचीच मुले असतात ती वस्तुत कोणाचीच नसतात या नात्याने उत्कटप्रेमाने पालन होण्याऐवजी त्याची केवळ हेळसाड मात्र होईल (९) या स्वैराचारामुळे जवळच्या सबधियाच्या सबधातहि अपवित्र कृत्ये घडून येतील. नीतीचे मदिर भुईसपाट होईल (१०) राजसत्तेने नियत्रित असे हे स्वैर कामपूर्तीचे यत्र योग्य काम कधीच करू शकणार नाही व त्यामुळे उत्कृष्ट माणसे व उत्कृष्ट स्त्रिया एकत्रित आणणे कधीच शक्य होणार नाही (११) जनावरात विवाह सस्था नाही म्हणून जनावराची परिस्थिति माणसाना लागू करून तिच्या आधारे काम जीवनातील या साम्यवादाचे समर्थन करणे अत्यत अर्थशून्य आहे (१२) याच्या योगाने लोकपालाचा हा वर्ग नेहमीच असतुष्ट व दुःखी राहील (१३) एकच स्त्री सर्व लोकपालकाच्या कामपूर्तीचे साधन कधीच असू शकणार नाही व जर तशी वस्तुस्थिति असली तर त्याने एकात्मतेऐवजी विसवादिता व द्वेष मात्र निर्माण होईल. वस्तुत कुटुबसस्था हेच नैतिक आचार शिकविणारे नैसर्गिक विद्यालय आहे व या विद्यालयातून आदर्श राज्यसस्थेचा खरा घटक निर्माण व्हावयाचा आहे कुटुब व संस्थारूपी विद्यालयातच स्यकर्तव्य, धर्माचे शिक्षण अत्यत सुलभतेने मिळते. कारण की या शिक्षणात आपल्या कुटुबाविषयीचे स्वाभाविक आकर्षण आणि व्यक्तिगत सवेदना अनुस्यूत असतात. उत्कृष्ट चारित्र्याचा मूलाधार असलेल्या सहनशीलतेचाच हा कामजीवनातील साम्यवाद अत घडवून आणण्यात पर्यवसित होईल.’

कांही किरकोळ मतभेद सोडले तर ॲरिस्टॉटलने घेतलेले आक्षेप अत्यत मूलभूत स्वरूपाचे व विदारक प्रकाश पाडणारे आहेत यात शका नाही त्यामुळे आदर्श सास्कृतिक जीवन जगणाऱ्या नेतृवर्गाच्या निर्मितीची आवश्यकता वैदिक राष्ट्राच्या दृष्टचाप्रमाणेच प्लेटोलाही पटली असली तरी त्या वर्गाच्या निर्मितीसबंधाच्या प्लेटोच्या कल्पना अशास्त्रीय व भोगळस्वरूपाच्या ठरतात हा नेतृवर्ग निर्माण करताना पुढील विशेष महत्त्वाच्या गोष्टी लक्षात घ्यावयास हव्या असतात (१) दैनदिन व्यावहारिक गोष्टीत तो व्यापृत राहणार नाही (२) प्रत्यक्ष भौतिक वैभव व केवळ भौतिक सामर्थ्याधिष्ठित सत्ताकेन्द्र याच्या पासून तो सदैव दूर राहील (३) जीवनातील मोहोत्पादक गोष्टीचा सहसा त्याच्या दैनदिन जीवनाशी सबध असणार नाही (४) त्याच्या सरक्षणाची निश्चित हमी समाजव्यवस्थेत असेल (५) समाजजीवनावर सस्कार घडविण्याचे तत्र सर्वस्वी त्याच्या अधीन असून समाजजीवन घडविण्याच्या दृष्टीने त्या जीवनाशी त्याचा नित्यसबध असेल. (६) प्रत्यक्ष नागरी जीवनात तो राहणार नाही. (७) त्याचा अकुश राजसत्तेवर असेल पण राजसत्तेच्या दैनदिन व्यवहाराचा व त्याचा सहसा सबध असणार नाही (८) राजसत्ता मूल्याचे विडम्बन करीत असेल तेव्हाच या वर्गाच्या हाती असलेल्या अंकुशाचा उपयोग होईल अन्यथा त्या सत्तेच्या कारभारात हा वर्ग ढवळाढवळ करणार नाही (९) ज्ञानोपासक तपोनिष्ठ,सर्वभूतहितरत अशा या वर्गाच्या निष्काम मूल्योपासनेच्या कार्यात कधीहि अन्य गोष्टीचे व्यवधान असणार नाही. इतक्या गोष्टीची कसोशीने काळजी घेणे आवश्यक असते ती न घेता प्लेटोने या वर्गाच्या हाती राजसत्ता देण्यात फार मोठी चूक केली. भारतीय द्रष्टचानी या उपरिनिर्दिष्ट तत्त्वानुसारच ब्राह्मण वर्गाची निर्मिति केलेली आहे त्यानी राजसत्ता ही बलाधिष्ठित असते, हे ओळखून बलोपासक योद्धचाचा वर्ग जो क्षात्रवर्ण त्या वर्णाकडेच सपूर्ण राजसत्ता सोपविली व अमात्य मडळ, सेनापतित्व इत्यादि

राज्यकारभारविषयक जी महत्त्वाची अगे ती वेगवेगळ्या वर्गाकडे देऊन राष्ट्राचे सास्कृतिक नेतृत्व करणाऱ्या या वर्णाला त्यापासून अलिप्त ठेवले ज्याना आपले जीवन असे मूल्योपासनेसाठी सतत जाळता येण्याची शक्यता वाटत नव्हती अशा दुर्बळाना राजसत्तेच्या अकित राहून वेगवेगळ्या विभागात काम करण्याचे व्यावसायिक स्वातत्र्य देऊन त्याच्या जीवनाची सोय केली खरी, पण त्यानी अशा ब्राह्मणाकडून सास्कृतिक नेतृत्व मात्र काढून घेतले व सर्व सामान्य लोकापेक्षा त्याना अधिक सन्मान व सवलती देण्याचे मुळीच काही कारण नाही असे राजसत्तेला स्पष्ट बजाविले जे खरे मूल्योपासक तपस्वी ऋषि (देवसम व ब्रह्मसम ब्राह्मण) त्याच्या हाती मात्र त्यानी राजसत्तेचाही अकुश ठेवला हा अकुश या तपस्वी वर्गाच्याच प्रतिनिधीची एक एक अभिनव मत्रिसस्था व पुरोहित सस्था निर्माण करून तिच्या हाती घटनात्मक दृष्टीनेच दिला प्लेटोने ज्या गोष्टीसाठी तत्त्वज्ञाला राजा बनविण्याची कल्पना माडली ती वैदिक राष्ट्राच्या दृष्टचानी या मत्रिसस्थेच्या व पुरोहित सस्थेच्या निर्मितीने साधली व तत्त्वज्ञाला प्रत्यक्ष राज्यपद बहाल करण्याने ज्या आपत्ति निर्माण होतात असें वर वर्णन केले आहे त्या आपत्तीचाहि या पद्धतीने परिहार केला. या मत्रिसस्थचे व पुरोहितसस्थेचे स्वरूप मी माझ्या वाल्मीकीय रामायणावरील व्याख्यानमालेत दिग्दर्शित केले आहे व याच व्याख्यानमालेत पुढे वैदिक राष्ट्राच्या राज्यसस्थेचे स्वरूप विशद करताना मी ते अधिक विस्तृतपणे माडणारही आहे तूर्त येवढा निर्देश पुरे वैश्यवर्णाच्या हाती असलेल्या धनोत्पादनाच्या क्षेत्राशी या वर्णाची सपूर्ण फारकत करून त्यानी अत्यत दीर्घदर्शिता व्यक्त केली आहे ॲरिस्टॉटलने प्लेटोवर आक्षेप घेताना 'सस्कारित शिक्षणाच्या द्वारे एकात्मता निर्माण होते, कृत्रिम सरूपतेनें नव्हे' असे जे उद्‌गार काढले आहेत, तेंच तत्त्व या वर्णाच्या निर्मितीच्या सबधात वैदिक राष्ट्राच्या द्रष्टचानी प्रत्यक्षात आणलें व सहस्त्रावधि वर्षे यशस्वीहि करून दाखविले प्लोटोच्या

साम्यवादी कामजीवनासारख्या अघोरी उपायाकडे त्यानी आपली दृष्टि मुळीच वळविली नाही कुटुबसस्था हे नैतिक शिक्षणाचे महाविद्यालय आहे याची जाणीव त्याना पुरेपूर असल्यामुळे त्याच्या विध्वसात राष्ट्रविध्वस त्याना स्पष्ट दिसत होता व अनिर्बध कामपूर्तीच्या सोयीनी राष्ट्राचे वा वर्गाचे चारित्र्य बनत नसून ते सयम व वैराग्याच्या अग्नीत जीवन आटविल्यानेच बनत असते अशी त्याची दृढ धारणा होती सर्वांत महत्त्वाची गोष्ट ही की प्लेटोच्या तत्त्वज्ञ राजाप्रमाणे अथवा लोकपालक वर्गाप्रमाणे त्यानी या वर्णाला मुळीच विधिनिर्बधातीत असे स्वयंभू राखले नाही उलट धर्मानुशासनाच्या सदैव अकितच ठेवले आहे. त्यामुळे पतन व त्याचे तात्त्विक समर्थन या विपत्तीपासून त्यानी हा आपला नेतृवर्ग अलिप्त राखला आध्यामिक अवस्थेच्या परिपूर्णतेत अशी एक विधिनिषेधातीत अवस्था भारतीय तत्त्वज्ञानी मानलेली आहे, तिचे वर्णन 'निस्त्रैगुण्ये पथि विचरता को विधि को निषेधः' असे लौकिक सस्कृतात व 'न तस्य लोमाऽपि मीयते अपि ब्रह्मवधेन पितवधेन, मातृवधेन' असे उपनिषद् वाङमयात केलेले आढळते. पण ही विधिनिषेधातीत अवस्था केवळ एखाद्या व्यक्तिजीवनापुरती मर्यादित आहे समाजजीवनाशी तिचा सबंध नाही इतकेच नव्हे तर समाजाने त्याना कधीहि आदर्श समजून त्याच्या वर्तनासारखे आपले वर्तन ठेवू नये असे भारतीय तत्त्वज्ञानी बजावून सागितले आहे श्री शुकदेव श्रीमद्भागवतात सागतात, 'ईश्वराणा वच सत्य तथैवाऽऽचरित क्वचित्' 'ब्रह्मज्ञानी पुरुष जे उपदेश म्हणून सागतील तेच केवळ प्रमाणभूत होय त्याचे स्वत चे वागणे हे प्रमाणभूत नाही' एका तत्त्वज्ञाने तर म्हटले आहे –

'मुताद्वैतसतत्त्वस्य यथेष्टाचरण यदि ।
शुना तत्त्वदृशा चैव को भेदोऽशुचिभक्षणे ।।'

(आत्मज्ञानी मनुष्य जर हवे तसे वागू लागला तर त्याच्यात आणि अशुचि भक्षण करणाऱ्या कुत्र्यात समाजाने काही भेद करू नये.) म्हणजे कुत्र्याचे अशुचि भक्षण जसें आपण आदरणीय व

अनुकरणीय समजत नाही तोच न्याय तत्त्वज्ञाच्याहि यथेष्टाचरणाला लावावा कारण यथेष्टाचरणाने त्या आत्मज्ञानी पुरुषाचा कोणत्याहि प्रकारचा तोटा होत नसला तरी तदनुसार वागणाऱ्या समाजाचा तोटा झाल्याविना रहात नाही म्हणून भगवान् श्रीकृष्णासारख्या पूर्णावताराने‍हि विधिविधानाचे सकेत पाळण्यावरच सर्वभूतहितरत बुद्धीने कटाक्ष दाखविलेला आहे आपल्या सुसमत व सुनियत्रित आचरणाचे रहस्य अर्जुनाला उलगडून दाखविताना भगवान् श्रीकृष्ण श्रीमद्भगवत्गीतेत म्हणतात :–

न मे पार्थाऽस्ति कर्तव्य त्रिषु लोकेषु किचन ।
नानवाप्तमवाप्तव्य वर्त एव च कर्मणि ॥
उत्सीदेयुरिमे लोका न कुर्या कर्म चेदहम् ।
सकरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजा ॥

(हे पार्थ ! वस्तुत मला या जगाशी काही एक कर्तव्य नसल्यामुळे त्याची यत्किंचितही पर्वा बाळगण्याचे कारण नाही. काही असे नाही की जे मला मिळवावयाचे राहिले असून या जगापासून मी ते मिळविणार आहे पण तरीहि मी अखड कर्तव्यपरिपालनातच निमग्न असतो जर मी विहित कर्माचरण करणार नाही तर सारी समाजव्यवस्था उत्सन्न होईल मी सकराचे कारण होईन व माझ्यामुळेच सर्व प्रजाचा विनाश झाला असे होईल) याची कारणमीमासा सागताना विधिनिषेधातीततेची स्वप्ने पाहणाऱ्या जगातील सर्वश्रेष्ठ पुरुषाना भगवतानी जो इशारा दिलेला आहे तो पहाण्यासारखा आहे ते म्हणतात –

‘यदि ह्यह न वर्तेय जातु कर्मण्यतंद्रित ।
मम वर्त्मानुवर्न्तते मनुष्याः पार्थ सर्वश ॥
यद्यदाचरति श्रेष्ठ तत्तदेवेतरो जन. ।
स यत्प्रमाण कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥’

(जर मी निरलसपणे विहित कर्माचरण करणार नाही तर लोकहि तसेच वागू लागतील कारण की लोक मी जसे वागेन तसेच वागण्याचा स्वाभाविकपणेच प्रयत्न करतील. श्रेष्ठ पुरुष

जसे आचरण करतात तसेच सामान्य लोकहि आचरण करतात. तो जे प्रमाणभूत समजतो तेच प्रमाणभूत समजण्याची सर्वसामान्य लोकाचीहि प्रवृति असते )

तात्पर्य, आदर्श असणारे नेतृत्व विधिनियमाच्या अंकित व धर्मानुशासनाने नियंत्रित असेच असले पाहिजे असा कटाक्ष राखण्यात वैदिक राष्ट्राच्या द्रष्टयानी समाजहिताच्या दृष्टीने दीर्घदर्शीपणाच व्यक्त केलेला आहे यात शका नाही अशा या नेतृवर्गाच्या कार्याचा निर्देश करताना ऋग्वेदात म्हटले आहे, 'ब्रह्म जिन्वत उत जिन्वन्त हत रक्षासि सेधत अमीवाः' (ऋग्वेद मडल ८ वे, सूक्त ३५ वे, ऋचा १६) 'ज्ञान प्राप्त करून घ्या. सद्बुद्धीचे सरक्षण करा, व समाजातील आसुरी प्रवृत्ति व हीनता याचा विनाश करा ' ब्राह्मणाच्या कर्तव्याचा ऋग्वेदाने हा किती समर्पक निर्देश केला आहे ! व म्हणूनच समाजातील आदर्शवादाचे रक्षण या वर्गाच्या भरणाचे कर्तव्य राजसत्तेने पार पाडले तरच होईल हे जाणून ऋग्वेदात म्हटले आहे –

उच्चा दिवि दक्षिणावन्तो अस्थु ।(१०–१०७–२)
तमेव मन्ये नृपति जनाना य प्रथमो दक्षिणामाविवाय ।।
–(ऋग्वेद १०–१०७–५)

(दक्षिणाप्रदान करणारे जे यजमान त्यानाच स्वर्गात उच्च स्थान प्राप्त झाले. त्यालाच लोकाचा खरा राजा म्हणता येईल की जो दक्षिणाप्रदान करण्यात अग्रेसर असतो )

एका गोष्टीचे मात्र येथेच स्पष्टीकरण करणे आवश्यक वाटते व ती गोष्ट म्हणजे ऋषि या शब्दासबधीची होय अलीकडे ऋषि म्हणजे ब्राह्मण होत अशी पुष्कळानी आपली समजूत करून घेतली आहे. पण ती समजूत चुकीची आहे ऋषि म्हणजे ब्राह्मण नव्हे. वेदातील सृष्टिविज्ञानाप्रमाणे ऋषि ही देवाप्रमाणेच एक उच्च जीवकोटी आहे, व मनुष्याना उद्देशून वैदिक वाङमयात जेव्हा ऋषि शब्द वापरतात तेव्हा त्याचा अर्थ ब्राह्मण नसून सत असा असतो. सत हा ब्राह्मणच असला पाहिजे असा काही नियम नाही.

सारांश, जीवनाचा अखंड यज्ञ करणारे नेतृत्व म्हणजे ब्राह्मण्य होय समाजाच्या नैतिक स्तराची उंची सतत टिकविणारा हा आदर्श आहे हा आदर्श निर्माण केल्यावर मूल्याच्या संरक्षणाची व नी जीवनातून प्रत्यक्ष उमटवून दाखविण्याची कामगिरी आजीव कर्तव्य म्हणून या वर्णाला दिलेली आहे तत्त्वनिष्ठ जीवन जगण्यासाठी जीवनातील सर्व सुखाचा अखंड होम हेच या वर्णाच्या जीवनाचे स्वरूप आहे त्याने सर्वांना जीवन घडविण्यापासून तर व्यवसायापर्यंत सर्व गोष्टीचे शिक्षण द्यावयाचे, पण स्वत कोणताही व्यवसाय करावयाचा नाही सुखाचे मार्ग त्याने लोकाना उपलब्ध करून द्यावयाचे, पण त्यातील एकाहि सुखसाधनाला त्याने स्वत स्पर्श करावयाचा नाही जीवनातील प्रेमळ व उत्कृष्ट मार्गदर्शक म्हणून समाजासाठी त्याने सतत खपावयाचे, पण समाजापासून कोणतीहि अपेक्षा करावयाची नाही असे त्याचे स्वरूप आहे या वर्णाच्या नेतृत्वाखाली भारतातील राज्यशासन संस्थेने रहावे असा संकेत आहे. आजच्या राज्यशास्त्राच्या परिभाषेत ज्याला **सार्वभौमत्व** म्हणतात त्याचा अधिकार जनता व दंडशक्ति यांच्या अधीन न ठेवता प्राचीन वैदिकानी तो या वर्गाच्या रूपाने धगधगीत वैराग्याच्या तपस्येकडे–या वर्णाकडे–सोपविलेला आहे जनता व दंडशक्ति यांच्या अधीन असलेल्या सार्वभौमत्वाचे दुष्परिणाम वर्तमानयुगाच्या विचक्षण निरीक्षकाना तरी सांगावयास नकोत राजमुकुट तर वापरावयाचा नाही, दंड हाती घ्यावयाचा नाही व त्याला मार्गदर्शन मात्र करावयाचे अशी ही व्यवस्था होती ज्ञान व संशोधन यातच जीवन घालविणाऱ्या लोकाचे प्रत्यक्ष जीवन कडकडीत तपोमय असण्याचीच आवश्यकता आहे असे कॅरल प्रभृति आजच्या युगातील श्रेष्ठ तत्त्वज्ञहि प्रतिपादन करू लागले आहेत. आमच्या पूर्वजानी निश्चित केलेली जीवनमूल्ये आजच्या शास्त्राच्या क्षेत्रातहि हळू हळू कशी सिद्ध होत आहेत याचा हा एक पुरावाच होय यात शंका नाही. समाजातील व्यावसायिक स्पर्धेच्या कोणत्याहि क्षेत्रात

कधीहि नमणारा व सतत श्रेष्ठ मूल्याच्या उपासनेत गढून सर्वांच्याच हिताचे मार्गदर्शन करणारा असा हा नेतृवर्ग समाजात सहस्रावधि वर्षे आदराचे व सन्मानाचे, श्रद्धेचे व भक्तीचे स्थान होऊन राहिला यात आश्चर्य नाही. समाजाची या वर्गावर त्याच्या स्वार्थहीन तपस्यामय जीवनाने केवढी विलक्षण श्रद्धा बसली होती हे वसिष्ठाच्या कामधेनूच्या गोष्टीवरून उत्तम रीतीने ध्यानात येते. दंडधारी विश्वामित्र राजाने सैनिक सामर्थ्याच्या भरवशावर त्या निष्प्रतिकार तपस्वी वसिष्ठांना उपसर्ग पोहोचविताच समाजाच्या सामान्य थरातील लोकांनी त्या राजाचा पार धुव्वा उडवून त्याला चोपून पिटाळून हाकलून दिले असे इतिहास सांगतो कामधेनूच्या अंगातून निघालेल्या लोकांच्या रूपकाचे हेच रहस्य आहे शेवटी 'धिग्बलं क्षत्रियबलं ब्रह्मतेजो बलं बलम्' असे करुण आक्रंदन करीत सत्ता चारित्र्यबलासमोर नमली भारतीय राष्ट्राच्या जीवनात आदर्शवाद सहस्रावधि वर्षे या वर्णामुळे टिकून राहिला म्हणूनच आपल्या राष्ट्राच्या राष्ट्रगीतात वैदिक मंत्रद्रष्टा म्हणतो.

'अस्मिन राष्ट्रे– आब्राह्मन् ब्राह्मणो ब्रह्मवर्चसी जायताम् ॥'

(या राष्ट्रातील ब्राह्मण कडकडीत तपाचरणाच्या तेजाने युक्त असोत)



## व्याख्यान सातवे

# क्षत्रिय

वैदिक राष्ट्राचे सास्कृतिक नेतृत्व ज्याच्याकडे होते त्याचा आदर्श कोणत्या स्वरूपाचा होता हे आपण पाहिले आहे पण हा आदर्श नैतिक दृष्टीने केवढाहि श्रेष्ठ असला व जरी तो साऱ्या समाजाला वळण लावू शकत असला, तरी पण त्याचे सरक्षण करू शकत नव्हता. अखड मूल्योपासनेचेच काम दिलेल्या वर्गाकडे सरक्षणाचे अगदीच भिन्न प्रवृत्तीवर आधारलेले काम देऊन चालणारहि नव्हते. जशी लोकाना, तशीच या नेतृवर्गालाही सरक्षणाची आवश्यकता होती कारण विषमतापूर्ण व पशुभाव विशिष्ट जगात केवळ नैतिक आदर्शानी जीवन जगता येण्याची कधीच शक्यता नसते म्हणून महर्षि वेदव्यासानी म्हटले आहे : "शस्त्रेण रक्षिते राष्ट्रे शास्त्रचिन्ता प्रवर्तते" (शस्त्रबळाने पूर्णपणे सुरक्षित असलेल्या राष्ट्रातच शास्त्रचिन्तन व तत्त्वचिन्तन निर्वेधपणे चालू शकते ) नुसते बाह्य आक्रमणापासूनच नव्हे तर एक स्थिर व अनुशासनबद्ध समाजरचना चालवावयास व तिच्या द्वारे समाजाचा विकास घडवून आणावयास या दण्डशक्तीची विशेष आवश्यकता असतेच राजसत्तेच्या रूपाने ही दण्डशक्ति येवढ्यासाठी कोणत्या ना कोणत्या स्वरूपात प्रत्येक कालखडात समाजधारणेला आवश्यक ठरली आहे प्राचीन भारतीयानी दण्डशक्तीचे अथवा राजसत्तेचे हें महत्त्व ओळखले होते. श्रीमन्महाभारतात राजधर्म व क्षात्रधर्माचे महत्त्व वर्णन करताना म्हटले आहे —

"मज्जेत् त्रयी दण्डनीतौ हताया सर्वे धर्मा प्रक्षयेयुर्विवृद्धा ।
सर्वे धर्मा चाश्रमाणा हता स्यु क्षात्रे त्यक्ते राजधर्मे पुराणे ।।
सर्वे त्यागा राजधर्मेषु दृष्टा. सर्वा दीक्षा राजधर्मेषु युक्ता ।
सर्वा विद्या राजधर्मेषु चोक्ता सर्वे लोका राजधर्मे प्रविष्टा ।।

शान्तिपर्व अ. ६३ श्लोक २८ व २९

(ज्या वेळी क्षात्र राजधर्म चैतन्यहीन होतो त्या वेळी वेदत्रयीचा प्रभाव नाहीसा होतो, विकसित झालेली सास्कृतिक मूल्ये सपूर्णपणे विनाश पावतात, व आश्रमधर्म व समाजव्यवस्था याच्या आधारशिलाना जबरदस्त धक्का बसतो राजधर्मात सर्व प्रकारचे त्याग समाविष्ट झालेले आहेत, सर्व दीक्षा राजधर्मांत समाविष्ट आहेत, सर्व प्रकारच्या ज्ञानाचा राजधर्म हाच आधार आहे व समाजाचे स्थैर्य राजधर्मावरच अधिष्ठित आहे ) दण्ड शक्तीचे हे महत्त्व ज्यानी ओळखले नाही त्याना समाजाचा विकास तर घडवून आणता आलाच नाही पण स्वत चा व आपल्या राष्ट्राचाहि नाश मात्र त्यानी ओढवून घेतला असे जगाचा इतिहास सागतो. प्रबल दण्डशक्तीवरच कोणतीहि मूल्ये व कोणतीहि व्यवस्था चिरस्थायी होणे अवलबून असते. राजर्षि मनूने त्रिगुणात्मक जगाच्या व्यवहाराचे व त्यातील तमोगुणावर अधिष्ठित असणाऱ्या प्रवृत्तीचे अत्यत सूक्ष्म निरीक्षण करून असा सिद्धान्त सागितला आहे की ––

सर्वो दण्डजितो लोको दुर्लभो हि शुचिर्नर ।
दण्डस्य हि भयात्सर्व जगद्भोगाय कल्पते ॥२२॥
देवदानवगन्धर्वा रक्षासि पतगोरगा ।
तेऽपि भोगाय कल्पन्ते दण्डेनैव निपीडिता ॥२३॥
यत्र श्यामो लोहिताक्षो दण्डश्चरति पापहा ।
प्रजास्तत्र न मुह्यन्ति नेता चेत्साधु पश्यति ॥२५॥

मनुस्मृति अ ७ वा

"जगामध्ये कोणत्याहि बलाधिष्ठित अनुशासनाचा धाक नसताना स्वयप्रेरणेने विशुद्धपणे वागणारा मनुष्य अत्यत दुर्लभ आहे वस्तुत सर्व लोक दण्डाच्याच सामर्थ्याने नियत्रित असतात मनुष्यच काय पण देव, दानव, गन्धर्व, राक्षस, पक्षी, सर्प इत्यादि जगातील यच्चयावत् उच्च व नीच योनिविशेष सुद्धा केवळ दण्डाच्या धाकानेच आपआपल्या अनुशासनाच्या सीमारेषेत असतात. ज्या ठिकाणी श्यामवर्णाचा, आरक्त नेत्राचा व पापाचा विनाश करणारा दण्ड सतत फिरत असतो त्याच ठिकाणी प्रजाना

कर्तव्याकर्तव्याच्या संबधात कधी मोह उत्पन्न होऊ शकत नाही. मात्र दण्डनीतीचा प्रेरक असणारा नेता तिचे रहस्य ओळखून योग्य प्रेरणा देणारा असला तरच ती उपयुक्त ठरते. कामन्दकीय नीतिशास्त्रात दण्डाचे स्वरूप व महत्त्व याच पद्धतीने पुढीलप्रमाणे विशद केलेले आहे

आन्वीक्षिकी त्रयी वार्ता सतीर्विद्या प्रचक्षते ।
सत्योऽपि हि न सत्यस्ता दण्डनीतेस्तु विप्लवे ।।
दण्डनीतिर्यदा सम्यङ् नेतारमधितिष्ठति ।
तदा विद्याविद शेषा विद्या सम्यगुपासते ।।

(अध्यात्मविद्या अथवा तर्कविद्या, वेदविद्या व अर्थशास्त्र या तीन प्रकारच्या ज्ञानामध्ये सर्व प्रकारच्या विद्याचा अंतर्भाव होतो. पण जर दण्डनीति सामर्थ्यहीन व विस्कळीत झाली तर या विद्या वस्तुत असूनहि नसल्यासारख्याच होत ज्या वेळी विचक्षण व योग्य अशा नेतृवाच्या अधिष्ठानावर दण्डनीति सुव्यवस्थितपणे आपला व्यवहार करते त्याच वेळी विद्वान् लोक इतर विद्याची यथायोग्य उपासना करीत असतात ) मी येथे दण्डनीति व त्याचा आधार असलेला क्षात्रधर्म, याच्या आवश्यकतेचे प्रतिपादन करताना परकीय व तथाकथित स्वकीय आक्रमणापासून संरक्षण ही जशी एक गोष्ट उल्लेखिली तशीच दुसरी गोष्ट म्हणजे समाज व्यवस्थेचे विधारण अथवा ती योग्य प्रकारे चालविणे याचाहि उल्लेख केला निरुक्त नावाच्या वेदाङ्गात दण्ड शब्दाची या दोन्ही अर्थाची निरुक्ति केली आहे. ती अशी —"दण्डच पुरुष: दण्डमर्हतीति वा दण्डेन संपद्यते इति वा । दण्डो ददतेर्धारयति कर्मण 'अक्रूरो ददते मणिम्' इत्यभिभाषन्ते । दमनादित्यौपमन्यव ।।" (दण्डच पुरुष म्हणजे ज्याला दण्ड आवश्यक आहे अथवा दण्डाने ज्याला सुव्यवस्थित राखले आहे असा मनुष्य होय दण्ड शब्द धारण करणे या अर्थाच्या ददते या शब्दापासून बनलेला आहे. जसे अक्रूर मण्याचे (स्यमन्तक) धारण (ददते) करतो. दमन या शब्दावरून दण्ड शब्द झालेला आहे असे उपमन्यूच्या

मताच्या लोकाचे म्हणणे आहे लौकिक व्यवहारामध्ये औपमन्यव मताच्या दमन शब्दाचाच अर्थ दण्ड या शद्बाने रूढ झालेला असला तरी राज्यशास्त्रामध्ये दण्ड शब्दाचा निरुक्तकाराना अभिप्रेत असलेला अर्थच स्वीकारण्यात आलेला आहे राज्यशास्त्रात दण्ड म्हणजे प्रत्यक्ष राज्यकारभार (Administration) व दण्डनीति म्हणजे न्यायाधिष्ठित राज्यकारभार (Administration by Justice) या दण्डनीतीचे प्रत्यक्ष प्रतीक म्हणजे राज्यसस्था असून ती राज्यसस्था ज्या वर्गातून उत्पन्न होते व ज्या वर्गाच्या बळावर मुख्यत अधिष्ठित असते त्या वर्गाला क्षात्रवर्ण अथवा क्षत्रिय वर्ण असे म्हणतात.

या क्षत्रियवर्णाची निर्मिति, सरक्षण व सुव्यवस्था यासाठी तपस्विवर्गाने अथवा वैदिक राष्ट्राचे सास्कृतिक नेतृत्व ज्या वर्गाकडे होते त्या वर्गानेच केलेली आहे असे वेदवाङमयात प्रतिपादन केलेले आहे शतपथ ब्राह्मणात म्हटले आहे – ब्रह्म वा इदमग्र आसीदेकमेव, तदेक सन्न व्यभवत् । तच्छ्रेयोरूपमत्यसृजत क्षत्र, यान्येतानि देवत्रा क्षत्राणीन्द्रो वरुण सोमो रुद्र पर्जन्यो यमो मृत्युरीशान इति । तस्मात्क्षत्रात्पर नास्ति । तस्माद् ब्राह्मणः क्षत्रियमधस्तादुपास्ते राज्यसूये । क्षत्र एव तद्यशो दधाति । सैषा क्षत्रस्य योनिर्यद् ब्रह्म । तस्माद्यद्यपि राजा परमता गच्छति, ब्रह्मैवान्तत उपनिश्रयति स्वा योनिम् । ( पूर्वी ब्राह्मण हा एकच वर्ण होता. तेवढ्याने परिपूर्णता येणारी नव्हती म्हणून त्यानें कल्याणरूप क्षात्रवर्णाची निर्मिति केली या ज्या इन्द्र, वरुण, सोम, रुद्र, पर्जन्य, यम, मृत्यु व ईशान देवता आहेत त्या क्षात्र वर्णाच्या आहेत त्यामुळे क्षत्रियापेक्षा अधिक श्रेष्ठ जगात काही नाही. म्हणून राजसूय यज्ञामध्ये उच्चासनस्थित क्षत्रियाच्या खाली ब्राह्मण उभा राहतो क्षत्रियालाच हे यश मिळते ब्राह्मणानीच क्षत्रियवर्णाची निर्मिति केलेली आहे. (योनि.) म्हणून राजा केवढाहि श्रेष्ठ असला तरी शेवटी आपल्या कारणाच्याच आश्रयाने

राहतो )' तपस्व्यांनी हा वर्ण निर्माण केला या म्हणण्याचाच असा ध्वनि आहे की देश व धर्म यासाठी लढणारा योद्धयाचा वर्ग त्याचे नाव क्षत्रिय आहे

वस्तुत इतिहासाच्या कोणत्याहि कालखडात युद्धे ही अनिवार्य आहेत केवळ बाह्य परिस्थितीलाच युद्धाचे प्रधान कारण समजणे हेहि चुकीचे आहे बाह्य परिस्थिति व अत प्रवृत्ति या दोन्ही कारणामुळे युद्धे निर्माण होत असतात समाजजीवनाचा व्यक्ति-जीवन हा एक भागच असल्यामुळे सामाजिक मनाच्या प्रवाहात पुष्कळदा व्यक्तिजीवनाची इच्छा असो वा नसो, पण त्याला वहात जावेच लागते, व सामाजिक जीवनात पुष्कळदा युद्धे ही अनिवार्य ठरतात जगाच्या युद्धाचा इतिहास पाहून त्याच्या उद्भवाच्या कारणाची मीमासा केली तर असे आढळून येईल की सामान्यत या युद्धाची कारणे पुढीलप्रमाणे आहेत (१) युयुत्सुप्रवृत्ति (२) शाततेने जीवन जगण्याचा कटाळा (३) साहसीपणाची आवड व काहीतरी पुरुषार्थ गाजविण्याची महत्त्वाकाक्षा (४) लाडखोरपणा व अपहरण करण्याची प्रवृत्ति (५) स्वसरक्षणाची आवश्यकता (६) रागीट अथवा शीघ्रकोपी मनोवृत्ति (७) मत्सरीपणा व स्पर्धाप्रवृत्ति (८) स्वामित्वाची आकाक्षा व (९) विजेतत्वाच्या कीर्तिची आकाक्षा यापैकी कोणत्या ना कोणत्या कारणानी युद्धे अटळ ठरतात व त्यामुळे युद्धाची इच्छा असो वा नसो, पण प्रत्येक लोकसघाला व राष्ट्राला स्वसरक्षणाची व्यवस्था करणे भाग पडते त्यासाठी सैन्यबळाची व त्याचे योग्य सचलन करण्यात सिद्धहस्त असणाऱ्या नेत्याची प्रत्येकच समाजात नियुक्ति करण्यात येते देवासुर सग्रामाच्या रूपकाच्या मिषाने ऐतरेय ब्राह्मणात हेच सागितले आहे. तेथे म्हटले आहे ' देवासुरा वा एषु लोकेषु समयतन्त . . . तास्ततोऽसुरा अजयन् देवा अब्रुवन्नराजतया वैनो जयति राजान करवामहा इति तथेति ॥ ' (देव व दैत्य याच्यात नेहमी सग्राम चालू असत त्या सग्रामात नेहमी असुराचा विजय होत असे. तेव्हा देव

असा विचार करू लागले की हे दैत्य आमच्यावर का विजय मिळवितात त्याच्या असे ध्यानात आले की आपल्याला सग्रामात कोणी राजा (नता) नसल्यामुळे आपला सतत पराभव होत असतो नतर त्यानी असा निश्चय केला की आपण कोणाला तरी राजा (नेता) म्हणून नियुक्त करावे ) या विषमतापूर्ण जगात स्वसरक्षण व शाततापूर्ण जीवनयापन या गोष्टीसाठी सदैवच जागरूक राहण्याची आवश्यकता असल्यामुळे युद्धे प्रत्यक्ष चालू असोत वा नसोत, पण असे नेतृत्व व खडे सैन्य याची नेहमी आवश्यकता आहे पण या सबधात पूर्ण विचार करून भारतीयानी जी व्यवस्था निर्माण केली ती आजहि अनेक दृष्टीनी विचारार्ह ठरते आज रशियामध्ये व थोडच दिवसापूर्वी इटाली, जर्मनी व जपान या देशातून आपापले राष्ट्र सदैव सामर्थ्यसंपन्न राखण्यासाठी सर्व लोकात सैनिकी प्रवृत्ति (Militarist attitude) सदैव जागृत राहील अशा शिक्षणपद्धतीचाच अगीकार करण्यात आला आहे या शिक्षणयत्राच्या द्वारे सारेच्या सारे राष्ट्र युद्धप्रवृत्त व युद्धास्तव सिद्ध अशा मनोवृत्तीचे करण्यात येते कित्येक राष्ट्रातून तर सैनिकी शिक्षण सक्तीचे करण्यात येऊन प्रत्येक पुरुषाला सैनिक म्हणून काही काळ काम करण्यास भाग पाडण्यात येते त्याचा परिणाम समाजातील सुव्यवस्था व स्थैर्य याना धक्का लागण्यात व सास्कृतिक व अन्य विकासानाही पुरेसा वाव न मिळण्यात होतो. ज्या मनुष्याचे ज्या क्षेत्रात काम कर-ण्याचे निश्चित असेल त्याच्यावर लहानपणापासून तेच सस्कार करणे व त्या दृष्टीनेच त्याचे विकसन घडवून आणणे आवश्यक असते ज्याला युद्धासाठी अखड सिद्ध राखावयाचे आहे त्याच्या मनात विजेतृत्वाची आकाक्षा निर्माण करणे, रक्तपात व सहार याच्याविषयी घृणा न वाटेल असे त्याचे भावजीवन सिद्ध करणे, कशाचीही भीति वाटणार नाही अशी मनोवृत्ति सिद्ध करण्यासाठी विशिष्ट प्रकारच्या वातावरणात त्याला लहानपणापासून वाढविणे, युद्ध हाच धर्म वाटेल व प्राणार्पण व तेहि शस्त्राघाताचे प्राणार्पण

हेंच सर्वश्रेष्ठ ध्येय वाटेल असा आदर्श सतत मनावर बिबविणे, भौतिक ऐश्वर्याच्या सीमित उपभोगाची इच्छा व लालसा अंत - करणात जागृत राहील, करपणार नाही अशाच पद्धतीने त्याच्या मनाची मशागत करणे इत्यादि गोष्टी आवश्यक ठरतात हे सस्कार समाजाच्या सास्कृतिक शिक्षकाचे काम करणाऱ्या वर्गावर. करणे अर्थातच योग्य नाही त्याच्यावरील सस्कार वेगळे राहतील. तसेच विनय, दुसऱ्याच्या पोटात शिरणे, धनसग्रहाची आस्था व शाततात्रिय जीवनाची आवड हे सस्कारच व्यापारी वर्गावर करावे लागतील तात्पर्य, सैनिकाचे सस्कार सर्व वर्गावर करणे राष्ट्र-जीवनातील विविध अगाच्या विकसनाला जसे मारक ठरते, त्याचप्रमाणे धगधगीत तेजस्वी प्रवृत्तीला सदा आवर घालणारे सस्कार सैनिकावर करणेही चुकीचेच असते. सैनिकी सस्कार एका विशिष्ट पद्धतीने करण्याची व्यवस्था आजच्याही प्रगत राष्ट्रातून असतेच जसे जपानमध्ये मृत्यु हा क पदार्थ समजण्याची पूर्ण निर्भय प्रवृत्ति अगी बाणण्यासाठी लहानपणापासूनच स्मशान-भूमीतून मध्यरात्री मुलाना हिडवून आणण्यासारखेही प्रयोग करण्यात येतात, असे जपानी शिक्षणपद्धतीचे विवेचन करणाऱ्या पाश्चात्य ग्रथकारानी प्रतिपादन केले आहे वैदिक राष्ट्राच्या द्रष्टयाच्या समोर आपल्या राष्ट्राच्या सर्वागीण विकसनाचे ध्येय असल्यामुळे त्यानी एक विशिष्ट वर्ग निर्माण करून सैनिकी शिक्षणाचे सारे सस्कार सक्तीचे पण त्या वर्गापुरते सीमित केले. धनुर्वेद शिकावयास मनाई कोणत्याच राष्ट्रघटकाला नव्हती. शूद्राला सुद्धा इतर वेदविद्याच्या बाबतीत निर्बध असूनही धनु-र्वेदाच्या बाबतीत कोणताच निर्बध नव्हता इतकेच नव्हे तर धनुर्वेदासाठी त्याचेहि उपनयन वेदकाळी करीत असत कारण तशीच आवश्यकता उत्पन्न झाली तर राष्ट्रसरक्षणासाठी सर्वच्या सर्व राष्ट्रघटकानी सग्रामास्तव सिद्ध झाले पाहिजे असे भारतीय समाजाच्या प्राचीन धुरीणानी अपेक्षिले आहे श्रीमद्व्यास महा-भारतात यासबधात म्हणतात .--

'अमर्यादप्रवृत्ते च शत्रुभिस्सगरे कृते ।
सर्वे वर्णाश्च दृश्येयु शस्त्रवन्तो युधिष्ठिर ॥ '

(ज्या वेळी मर्यादाचा सर्व प्रकारे भग करून शत्रू राष्ट्रावर चहूबाजूनी चढाई करतो त्यावेळी सर्व वर्णाच्या लोकानी शस्त्र हातात घेऊन सग्रामार्थ सज्ज रहावे हेच कर्तव्य आहे ) पण यासाठी सर्वानी शस्त्रविद्येचे शिक्षण घेणे अभिप्रेत असले तरी शस्त्रविद्येचे परिज्ञान ही वेगळी गोष्ट आहे व युद्धोन्मुख प्रवृत्ति निर्माण करणे ही वेगळी गोष्ट आहे या दोन गोष्टीतील तरतम भाव ओळखूनच वैदिक द्रष्टयानी पूर्ण सैनिकी प्रवृत्तीचा एक वर्ग निर्माण केला व त्याच्यावरच त्या विशिष्ट सस्काराना केद्रित केले भारतातही वैदिककाळी सक्तीची सैन्यभरती व सैन्यात काम केलेच पाहिजे असा निर्बध होता पण तो एकाच वर्गापुरता मर्यादित होता, सर्वासाठी नव्हता त्या दृष्टीने आवश्यक ते व त्या त्या अगाचे शिक्षण, सचलन व कठोर अनुशासनाने नियत्रित असे जीवन ठेवल्याविना खरी सैनिकी प्रवृत्ति निर्माण होऊ शकत नाही या गोष्टी त्यानी ज्या वर्गासाठी सीमित केल्या तो क्षत्रियाचा वर्ग होय. याचा परिणाम अखड युयुत्सु प्रवृत्तीपासून शातताप्रधान विकसनाचे कार्य करणारा समाज वेगळा राखण्यात झाला व एक आश्चर्यकारक दृश्य भारतीय राष्ट्रात दिसू लागले इतर कोणत्याहि राष्ट्रात अशा प्रकारचे दृश्य कधी दिसले नाही, व ते पाहून परकीय प्रवासी आश्चर्याने थक्क होत. हे दृश्य चद्रगुप्त मौर्याच्या काळापर्यत तरी भारतीय राष्ट्रात दिसत होते ते दृश्य म्हणजे प्रत्यक्ष युद्धे व युद्धसस्थेची कामे जोरात चालली असली तरी त्यापासून इतर समाजघटकाच्या कार्याना कोणताहि अडथळा उत्पन्न होत नसे समाजव्यवस्थेचे स्थैर्य त्यामुळे ढासळत नसे व शातताप्रधान विकसनाच्या कार्यात त्यामुळे सहसा अडथळा उत्पन्न होत नसे देश व धर्म याच्या सरक्षणासाठी प्राणार्पण करण्याची सदैव सिद्धता असणाऱ्या या वर्गाकडे सर्वच्या सर्व समाज अत्यत आदराने पाही व भौतिक जीवनांतील

सत्तेच्या अत्युच्च जागा या वर्गासाठी मोकळया ठेवलेल्या असून त्याच्या राष्ट्ररक्षणाच्या महत्त्वपूर्ण कामगिरीचे मोल ध्यानात घेऊन त्याचे वजन, उच्च अधिकार व विशिष्ट सवलती याविषयी समाजातील कोणत्याच थराच्या मनात मुळीच मत्सर व असूयेचा भाव नसे सास्कृतिक नेतृवर्गाच्या खालोखाल समाज व्यवस्थेत या वर्गाला सन्मानाचे स्थान होतें व प्रत्यक्षात सास्कृतिक नेतृ-वर्गाच्या मानाने या वर्गाला सवलती, उपभोगस्वातत्र्य व अधिकाराचे ऐश्वर्य तर कितीतरी पटीने अधिक होते. या वर्गाच्या द्वारे सैनिक व नागर लोकाच्या आणि त्याच्या कर्तव्याच्या विभागणीमुळे नुसते प्रत्यक्ष राष्ट्रीय व्यवहारालाच साह्य झाले असे नसून नैतिक व भौतिक विकासाला अतोनात साह्य झाले आहे. मेगॅस्थेनिसने असे म्हटले आहे की, प्राचीन भारतात जी युद्धे लढली जात त्यामुळे सर्वसाधारण समाज आपल्या ठरीव राहणी-पासून विचलित होण्याचे कोणतेही कारण नव्हते

हा वर्ण कसा सस्कारित करण्यात येई व तपस्व्यानी हा वर्ण निर्माण केला असे जे शतपथ ब्राह्मणात वर्णन असल्याचे वर उल्लेखिले आहे, त्याचे रहस्य काय हे पाहणे आवश्यक आहे युद्धप्रवृत्ति ही मनुष्यामध्ये असणारी नैसर्गिक प्रवृत्ति असल्यामुळे आयुधजीवी लोकाचे सघ जगातील सर्वच प्राचीन राष्ट्रात होते. जगातील श्रेष्ठ तत्त्वज्ञानी पुरुषाचे राष्ट्रही सामर्थ्याच्या अभावी कसे नष्ट होते हा ग्रीक राष्ट्राच्या इतिहासावरून मिळणारा धडा विसरण्यासारखा नाही म्हणूनच ऋग्वेदात म्हटले आहे ' अना-युधा स आसता सचन्ताम्' (ऋग्वेद ४।५।१४). (जे नि शस्त्र असतात त्याना नेहमीच दु खाचे व दुर्दैवाचे जीवन लाभते ) त्यामुळे भारतीयानी क्षात्रवर्णाची निर्मिति केली हे खरे असले तरी इतर राष्ट्रातील बलोपासक लढवय्याचा वर्ग अथवा आयुध-जीवी सघ व भारतातील क्षात्रवर्ण यात अतिशय अतर आहे हे क्षात्रवर्णाच्या सस्कार व शिक्षणपद्धतीचे सूक्ष्म निरीक्षण केले असता ध्यानात येईल. भारतीयाचे हे वैशिष्ट्य आहे की त्यानी

पराक्रम व पशुत्व याची क्षात्रधर्माच्या उभारणीत गल्लत होऊ न देता पशुत्वविरहित पराक्रमाचे सवर्धन केले युद्ध व संरक्षण, राज्यविस्तार व हिसा यानाही धर्माच्या नियत्रणात ठेवून त्यानी मानवतेचे हितशत्रु ठरण्यापासून स्वत ला वाचविले आहे. भारतातील क्षात्रवर्ण व त्याच्यावर होणारे सस्कार हे आजच्या प्रगत म्हणविण्यात येणाऱ्या कोणत्याही सामर्थ्यसपन्न राष्ट्रातील आयुधजीवी अथवा सैनिक वर्गावर होणाऱ्या सस्कारापेक्षा अधिक मानवतावादी होते असे आढळून येईल

वैदिक राष्ट्राच्या द्रष्टयानी या आयुधजीवी लोकाच्या युद्धोन्मुखतेचे सवर्धन केले, पण तिला ध्येयवादाची आधारशिला दिली. या वर्णाला शातता, सहनशीलता, व साम्य बुद्धि याच्या अतिरिक्त धारणेवर आधारलेल्या सन्यासश्रमाचा पूर्णपणे निषेध आहे. क्षत्रियाचा बाणा तर 'यदोजसा न लभते क्षत्रियो न तदश्नुते' (खड्गधारेच्या सामर्थ्याने जे मिळणार नाही ते स्वीकारणार नाही) असा तेजस्वी, व सन्यासी म्हणजे तर भिक्षु योद्धा जर समाधिधारणेत सदैव राहील व सहनशीलता हा बाणा पत्करील तर राष्ट्ररक्षणाचे, इतकेच नव्हे तर सन्याशाच्याही सरक्षणाचे कार्य कोण करणार? म्हणून पूर्ण विवेकानेच क्षात्रवर्णाला सन्यास निषिद्ध ठरविण्यात आलेला आहे. पण मग परमपुरुषार्थरूपी मोक्षापासून क्षत्रिय सदाचा आचवला की काय? मुळीच नाही वैदिकराष्ट्राच्या द्रष्टयानी असे सागितले आहे की रणागणावर ज्या क्षत्रियाला शत्रूशी लढत असता अभिमुख शस्त्राघाताने मृत्यु येतो तो त्याच श्रेष्ठ मोक्षाचा अधिकारी होतो की ज्या मोक्षाचा योगधारणेने ब्रह्मरध्रातून प्राण काढणारा योगी व सन्यासी अधिकारी होतो असे म्हटले आहे की —

द्वाविमौ पुरुषौ लोके सूर्यमण्डलभेदिनौ ।
परिव्राट् योगयुक्तश्च रणे चाभिमुखो हत ॥

(सूर्यमण्डलाचा भेद करून परमगतीला जाणारे दोन पुरुष आहेत. एक योगयुक्त सन्यासी व दुसरा रणागणात शत्रूच्या डोळ्याशी

डोळा व छातीशी छाती भिडवून सग्राम करीत असतां मृत्यु पत्करणारा ) रणागणावरील मृत्यु हा क्षत्रियानी नेहमीच आपल्या मोक्षाचा अथवा परम पुरुषार्थसिद्धीचा एकमात्र मार्ग मानलेला आहे दक्षिणेकडे परवापर्यंत योद्धयाच्या जमातीत अशी चाल असे की धारातीर्थी पतन पावलेल्या आपल्या मुलाच्या पाठीवर वार आहेत की छातीवर हे पाहण्यासाठी वीरमाता रणागणावर येत व पाठीवर वार असला तर तो आपल्या दुधाला मोठा कलक आहे असे समजून त्या माता आपले स्तन कापून टाकीत. देश व धर्म यासाठी चाललेल्या युद्धात भाग घ्यावा यास्तव पाठवावयास मुलगा नाही म्हणून वीरमातांनी विलाप केल्याची उदाहरणे कितीतरी आहेत या दृष्टीने ऋग्वेदाचे पुढील स्फूर्तिदायक उद्‍गार पाहण्यासारखे आहेत. ऋग्वेदाचा मंत्रद्रष्टा म्हणतो --

"शूरग्राम सर्ववीर सहावान् जेता पवस्व सनिता धनानि। तिग्मायुध क्षिप्रधन्वा समत्स्वसाह साव्हान् पृतनासु शत्रून् ॥ (ऋ ९।९०।३)जो शूर सर्व प्रकारे वीर्यवान्, सहनशील, व विजयी शस्त्रास्त्राने युक्त, शत्रूला असह्य, शत्रूच्या छातीत धडकी भरविणारा असतो तो सर्व प्रकारचे वैभव प्राप्त करू शकतो यावरून ऋग्वेदा-इतक्या प्राचीन काळीच रणागणावर देह समर्पण करणे हा परम-पुरुषार्थ होय हा ध्येयवाद क्षात्रवर्णाच्या प्रवृत्तीचा प्रेरक होता हे स्पष्ट होईल असो क्षात्रवर्णाचा हा ध्येयवाद ध्यानात घेतला व तद-नुरूप त्याचे त्याच्या मनावर बिबविलेले, राष्ट्र व धर्मसरक्षणा-साठी सग्राम करण्याचे श्रेष्ठ कर्तव्य ध्यानात घेतले तर शातता ही क्षत्रियाच्या मनोवृत्तीला मुळीच मानवणारी नव्हती हे स्पष्ट होईल किबहुना क्षत्रियाच्या सद्‍गुणाच्या विकासाला शांतता ही एक प्रकारे बाधकच वाटत असे पराक्रमाचे प्रख्यापन व तेजाचा आविष्कार याचे युद्ध हे क्षत्रियाना प्रधान साधन वाटत असे या पराक्रमाच्या प्रख्यापनाच्या हेतूसाठीच भारतात मुख्यत. सग्राम झाले आहेत. क्षत्रियात यामुळे जो सर्वांत श्रेष्ठ लढवय्या असेल

व निर्भय असेल त्यालाच सन्मान असे. या दृष्टीने शूर, वीर, रथी, महारथी, अतिरथी या सज्ञा क्षात्रवर्णातील श्रेष्ठतेच्या श्रेणीच्या निदर्शक म्हणून अस्तित्वात आलेल्या आहेत त्या अशा –

आत्मान सारथि अश्वान् स्वसैन्य रक्षितु क्षम ।
प्रहर्ता परसैन्याना युद्धशास्त्रविशारद ।।
युद्धशास्त्रेषु निपुण· स **रथित्वेन** समत ।
एको दशसहस्राणि योधयेद्यश्च धन्विनाम् ।।
पूर्वोक्तलक्षणैर्युक्त पार्थिवस्याऽपि रक्षक ।
**महारथी**ति कथितो युद्धशास्त्रविशारदै ।।
अमितान्योधयेद्यश्च पूर्वोक्तगुणसयुत ।
विज्ञेयोऽतिरथी नाम्ना शस्त्रास्त्रनिपुणस्तदा ।।

(जो स्वतःचे, सारथ्याचे घोडचाचे व आपल्या सैन्याचे सरक्षण करण्यास समर्थ असून युद्धशास्त्रात युद्धाच्या वेगवेगळचा पद्धतीत विशारद असेल व शत्रुसैन्यावर प्रहार करणारा असेल त्याला **रथी** असे म्हणतात जो वरील सर्व गुणानी युक्त असून एकटाच दहासहस्र धनुर्धारी वीराशी युद्ध करू शकत असेल व युद्धात आपल्या राजाचे सरक्षण करू शकत असेल, त्याला **महारथी** असे म्हणावें जो वरील सर्व गुणानी युक्त, शस्त्रास्त्र-विद्येत अत्यत निपुण, व असख्यात योद्धचाशी एकटाच युद्ध करू शकत असेल त्याला **अतिरथी** असे म्हणतात ) पराक्रमाचे प्रख्यापन हा क्षत्रियाचा बाणा असला तरी भारताच्या इतिहासात अगी सिहासारखा पराक्रम असूनहि चेंगीझखान, तैमूरलग, महम्मद बिन कासीम, गझनीचा महमूद यासारखे नरराक्षस उत्पन्न न होता मर्यादापुरुषोत्तम श्रीरामचद्रापासून तर श्रीशिवछत्रपतीपर्यंत पुण्यश्लोक राजर्षीचीच परपरा निर्माण झालेली आहे. रणागणावर प्राणार्पण करणे हाच ज्याचा मोक्ष, पराक्रमाचे प्रख्यापन हा ज्याचा बाणा व जे पराक्रमाने सपादन करण्यात येईल त्याचाच स्वीकार हे ज्याचे महाव्रत त्या या वर्णातून पशुत्वविरहित पराक्रमी वृत्तीचा कसा आविष्कार झाला होता हे पहावयाचे असलें तर त्यांचे

युद्धाचे नीतिशास्त्र तपासले पाहिजे. त्यातील काही नियम पुढील प्रमाणें आहेत –

(१) "नासन्नह्यो नाकवचो योद्धव्य क्षत्रियो रणे"

(अगात चिलखत न घातलेल्या व शिरस्त्राण इत्यादिकानी सिद्ध नसलेल्या शत्रूवर क्षत्रियाने प्रहार करू नये )

(२) "एक एकेन भाव्यश्च विसृजेति क्षिपामि च"

(एका योद्धयाने एका योद्धयाशीच युद्ध करावे. व युद्ध करताना "संभाळ, मी प्रहार करतो. आता तू प्रहार कर" असें म्हणावे ) (शत्रू थकला व प्रतिप्रहारास असमर्थ असला तर प्रहार करू नये असा ध्वनि) राम-रावण युद्धांत रावण थकला असता रामाने त्याच्यावर प्रहार न करतां त्याला परत जावयास सागितले असे रामायणात वर्णन आहे

(३) स चेत्सन्नद्ध आगच्छेत्सन्नद्धव्य ततो भवेत् ।
स चेत्ससैन्य आगच्छेत्ससैन्यस्तमथास्वयेत् ॥
स चेन्निकृत्या युध्येत निकृत्या प्रतियोधयेत् ।
अथ चेद्धर्मतो युध्येद्धर्मेणैव निवारयेत् ॥

( शत्रू जर चिलखत शिरस्त्राण वगैरे घालून आला असेल तर आपणहि तसेच सिद्ध होऊन जावे, तो जर ससैन्य चालून येत असेल तरच आपण ससैन्य त्याच्या अगावर चालून जावे. तो जर कपट नीतीचा अवलब करून युद्ध करीत असेल तर आपण कूट नीतीचा अवलब करावा, पण तो जर धर्मयुद्धाचे नियम पाळीत असेल तर आपणही धर्मयुद्धपद्धतीनेच सग्राम करावा. )

(४) नाश्वेन रथिन यायादुदियाद्रथिन रथी ।
व्यसने न प्रहर्तव्य न भीताय जिताय च ॥

(अश्वारोहाने रथ्यावर प्रहार करू नये अश्वारोहावरच अश्वारोहाने व रथ्यावर रथ्यानेच प्रहार करावा. आपल्या बरोबरीच्या व आपल्या परिस्थितीतील व्यक्तीवरच प्रहार करावा. शत्रू सकटात असताना, भयभीत झाला असताना अथवा जिकला गेला असताना त्याच्यावर कधीहि प्रहार करू नये.)

(५) नेषुर्लिप्तो न कर्णी स्यादसतामेतदायुधम् ।
यथार्थमेव योद्धव्य न क्रुध्येत जिघासत ॥

( विषाने माखलेल्या अथवा वाकडचा बाणाचा प्रयोग करू नये ही दुर्जनाची शस्त्रे होत युद्ध यथार्थच करावे व व्यर्थ क्रोधाच्या आहारी जाऊ नये )

(६) विशीर्णकवच्र चैव तवास्मीति च वादिनम् ।
कृताञ्जलि न्यस्तशस्त्र गृहीत्वा न विहिसयेत् ॥

( ज्याचे कवच तुटलेले आहे, जो मी आपल्याला शरण आलों आहे अशी हात जोडून प्रार्थना करीत आहे, ज्याने शस्त्रसन्यास केला आहे अशा शत्रूला पकडून ठार मारूं नये )

(७) अनेकयो सहतयोर्यदीयाद् ब्राह्मणोऽन्तरा ।
शान्तिमिच्छन्नुभयतो न योद्धव्य तदा भवेत् ॥

(दोन्ही युध्यमान पक्ष युद्ध करीत असताना जर त्याच्या मध्य-भागी ऐन धुमश्चक्रीत एखादा ब्राह्मण समेट घडविण्यासाठी आला तर दोन्ही पक्षानी युद्ध थाबवावे व त्या ब्राह्मणाला कसलीहि इजा होऊ देऊ नये )

(८) आहवे तु हत शूरं न शोचेत कथचन ।
अशोच्यो हि हत शूर स्वर्गलोके महीयते ॥
वराप्सर सहस्राणि शूरमायोधते हतम् ।
त्वरमाणानि धावन्ति मम भर्ता भवेदिति ॥

(युद्धात ज्याला मरण आले असेल त्या शूराविषयी कधीहि शोक करू नये ज्याच्याविषयी विलाप करण्यात येत नाही असा शूर पुरुष स्वर्गात अत्यत सन्मानिला जातो युद्धात मरण पावलेल्या शूराला वरण्यासाठी लावण्यवती अप्सरा, याने माझा भर्ता व्हावें म्हणून त्वरेने धावून येतात )

(९) वृद्धबालौ न हन्तव्यौ नच स्त्री नैव पृष्ठत ।
तृणपूर्णमुखश्चैव तवास्मीति च यो वदेत् ॥

(वृद्ध, अल्पवयी, स्त्री, व गवत तोडात घालून 'मी तुझा आहे' असे म्हणणारा शत्रू याना ठार करू नये तसेच शत्रूच्या पाठीवरही वार करू नये. )

(१०) न हि प्रहर्तुमिच्छन्ति शूरा प्रद्रवतो भयात् ।
तस्मात्पलायमानाना कुर्यान्नात्यनुसारणम् ।।

(भयाने पळत सुटलेल्या शत्रूवर शूर प्रहार करू इच्छीत नाहीत. म्हणून पळून जाणाऱ्या लोकाचा अधिक पाठलाग करू नये )

(११) प्रसुप्तान् तृषितान् श्रान्तान् प्रकीर्णान्नाभिघातयेत् ।
मोक्षे प्रमाणे चलने पानभोजनकालयो ।।

(झोपलेले, तहानलेले, थकलेले, संकटात असलेले, पानभोजनादिकात गुतलेले वा अन्य रीतीने युद्धात भाग न घेतां आपला व्यवहार करणारे जे लोक असतील त्याच्यावर प्रहार करू नये.)

महाभारतातील याच नियमाचा धर्मसूत्रवाङमयातून स्पष्ट निर्देश आहे गौतमधर्मसूत्रात म्हटले आहे – " न दोषो हिसायामाहवे ।। १६ ।। अन्यत्र व्यश्वसारथ्यायुधकृताञ्जलिप्रकीर्णकेशपराङमुखोपविष्टस्थलवृक्षारूढदूतगोब्राह्मणवादिभ्य ।। १७ ।।

–(गौतमधर्मसूत्र, अध्याय १० वा )

(युद्धामध्ये केलेली हिसा दोषास्पद नाही पण पुढील लोकाना मारणे दोषास्पद आहे ते असे – घोडा मेलेला, सारथी नसलेला, आयुध नसलेला, हात जोडलेला, केस मोकळे सोडलेला (भानावर नसलेला), पराङमुख, बसलेला, उचवटयावर अथवा वृक्षावर चढलेला (म्हणजे आश्रयाची अपेक्षा करणारा), मी दूत आहे, ब्राह्मण आहे असे म्हणणारा, गाईसारखा शब्द करणारा (आर्त स्वर काढणारा) हे नियम म्हणजे नुसते तत्त्वविमर्शाच्या ग्रथात उल्लेखिलेले आदर्श नसून ते प्रत्यक्ष व्यवहारात असल्याचा पुरावा उपलब्ध आहे ख्रिस्तपूर्व चौथ्या शतकात या देशात चद्रगुप्त मौर्याच्या राजसभेत असलेला ग्रीक वकील मेगॉस्थेनिस या सबधात जे लिहितो ते मनन करण्यासारखे आहे मेगॉस्थेनिस हा भारतीय राष्ट्राचा मित्र नसून शत्रू होता ही गोष्ट ध्यानात घेतली तर त्याच्या या साक्षीचे महत्त्व विशेषच ध्यानात भरतें मेगॉस्थेनिस म्हणतो –

"Whereas among other nations it is usual in the contests of war to ravage the soil and thus reduce it to an uncultivated waste; among the Indians, on the contrary, by whom hunbandmen are regarded as a class that is sacred and invariable, the tillers of the soil, even when the battle is raging in their neighbourhood, are undisturbed by any sense of danger, for the combatants on either side in waging the conflict make carnage of each other, but allow those engaged in husbandry to remain quite unmolested Besides, they neither ravage an enemy's land with fire, nor cut down its trees; nor would an enemy coming upon a husbandman at work on land do him harm, for men of this class, being regarded as public benefactors, are protected from all injury

(इतर राष्ट्रामध्ये ही सर्वसामान्य गोष्ट आहे की युद्ध चालू असताना सारा प्रदेश पिकाला पूर्ण निरुपयोगी होईल इतकी त्याची नासाडी करण्यात येते पण हिंदुस्थानात याच्या नेमका उलट प्रकार दृष्टीस पडतो जमिनीची लागवड करणारे शेतकरी येथे अत्यत पवित्र समजण्यात येतात. इतके की प्रत्यक्ष शेजारी युद्ध चालू असतानाही सर्व प्रकारच्या भीतीपासून ते मुक्त असतात उभय बाजूचे योद्धे परस्पराशी युद्ध करीत असतानाही जे आपल्या व्यवसायात निमग्न असतात त्या शेतकऱ्याना ते मुळीच उपद्रव देत नाहीत इतकेच नव्हे तर येथे शत्रूवर विजय मिळविल्यावरही विजेता आपल्या शत्रूच्या प्रदेशाना कधी आग लावून बेचिराख करीत नाही अथवा त्याच्या उद्यान व वनस्पतिसपत्तीचा कधी नाश करीत नाही कोणताही शत्रू शेतकाम करणाऱ्या शेतकऱ्यावर कधी आक्रमण करीत नाही कारण की हा वर्ग समाजभरणाचे काम करणारा असल्याची जाणीव ठेवून त्याला सर्व प्रकारचे सरक्षण देण्यात येते )

' भीरतातील युद्धोन्मुख आयुधजीवी सघाचे हे नीतिशास्त्र वरवर राष्ट्राचे तपस्व्यानी क्षात्रवर्णाची निर्मिति केली या शतपथ ब्राह्मणातील विधानाचे रहस्य ध्यानात आल्याविना रहात नाही शुत्व व पराक्रम याची आजवर कोणीही फारकत करू शकला नाही व आज तर ॲटम बॉबने जपानवर उडविलेला कहर आणि युद्धानी मानवतेवर घडविलेला भयानक परिणाम आणि चालविलेले अत्याचार याचा विचार केला तर आज केवळ पशुत्वाचे ताण्डव हाच आयुधजीवी लोकाचा सकेत झाला असल्याचे ध्यानात येईल जपानवर ॲटमबॉब न टाकता तो एखाद्या निर्जन प्रदेशावर टाकून जपानी सेनापतीना ते दृश्य दाखवावे म्हणजे युद्ध बद होईल अशी वारवार सूचना आईन्स्टीनसारख्या तपस्व्याने केली असता प्रेसिडेट ट्रूमन यानी तिची वासलात लावली या व अशासारख्या घटनावरून मानवता व आजची सस्कृति याचे केवढे द्वैत आहे याची कल्पना येते म्हणूनच भारतीयानी निर्माण केलेली क्षात्र-सस्कृति ही आजच्या तथाकथित सैनिक जीवनाच्या सस्कृतीहून अनेक पटीनी श्रेष्ठ होती असे माझे म्हणणे आहे या वर्णावर सस्कार कसे होत असत व कोणत्या पद्धतीने त्यानी पशुत्व विरहित पराक्रमाचा हा आदर्श निर्माण केला हे पाहणे अत्यत उद्बोधक होईल त्याकडे आपण पुढील व्याख्यानात वळू.



## व्याख्यान आठवे

# क्षत्रिय वर्णाचीं कर्तव्ये

क्षत्रियत्व हे क्षत्रियाच्या ठिकाणी सस्कारानी उत्पन्न करावयाचे असल्यामुळे ब्राह्मणाप्रमाणेच त्याच्याहि बाबतीत उपनयन सस्काराचे महत्त्व होते क्षत्रियाचा उपनयन सस्कार अकराव्या वर्षी होत असे ब्राह्मण व क्षत्रिय याचे शिक्षण व त्याच्या सभोवतीचे वातावरण, यातील भिन्नता लक्षात घेऊनच ब्राह्मणापेक्षा क्षत्रियाला तीन वर्षे उपनयन सस्काराच्या सबधात सूट दिलेली आहे गोतमधर्मसूत्रात असे म्हटले आहे की 'एकादशद्वादशयो क्षत्रियवैश्ययो' (गोतमधर्म सूत्र अ १) (अकराव्या वर्षी क्षत्रियाचे व बाराव्या वर्षी वैश्याचे उपनयन करावें.) पुढे क्षत्रिय आश्रमात राहून विद्याध्ययन करण्याऐवजी केवळ शस्त्रविद्या हीच विद्या समजून घरी राहूनच तिच्यात पारगत होऊन एकदम व्यवसायात पडू लागल्यामुळे उपनयन सस्काराची खरी आवश्यकता जाऊन तो नाममात्रच राहिला या सस्कारावाचून क्षत्रियाच्या नैर्बन्धिक अधिकाराना क्षत्रियाचा मुलगा पात्रच होत नसल्यामुळे सस्कार तर आवश्यकच होता, पण त्याची इतर दृष्टीनी उपयुक्तता सपलेली होती त्यामुळे क्षत्रियाला या सस्काराच्या बाबतीत पुढील सवलत मिळाली, "द्वाविशते राजन्यस्य" ( क्षत्रियाचे उपनयन बाविसाव्या वर्षापर्यत झाले तरी चालेल.) त्यानतरच्या काळात तर हा नाममात्र सस्कारही लोपला व पुढें आवश्यक त्या प्रसगी केवढचा अडचणी उपस्थित झाल्या हे प्रात स्मरणीय छत्रपति श्रीशिवराय याच्या राज्यारोहणाच्या प्रसगीचे विवाद पाहिले तर ध्यानात येते शिवछत्रपतीचे क्षत्रियत्व सिद्ध झाल्यावर त्याचा उपनयन सस्कार झालेला नसल्यामुळे धर्मशास्त्राप्रमाणे ते राज्याभिषेक सस्कारास पात्र होऊ शकत माहीत व त्यासाठी त्याचे

उपनयन करावे तर ते विवाहित आहेत असा सूर कांही पडितानी काढला होता पण समारभाचे अध्वर्यु अग्रगण्य मीमासक गागाभट्ट यांनी शिवछत्रपतीचा स्वतत्र उपनयन सस्कार करता येत नसला तरी राज्याभिषेकरूपी प्रधानविधीचे अग म्हणून तो करता येतो असा निर्णय देऊन सर्वांना निरुत्तर केले. असो या उपनयनसस्कारातील एकदर साहित्याचे समीक्षण केले तर क्षत्रियाच्या मनाचे पोषण ब्राह्मणाहून किती वेगळ्या पद्धतीचे असे याची कल्पना येते उपनयन सस्काराच्या वेळी ब्राह्मणाप्रमाणें क्षत्रियाच्या कमरेला मुज नावाच्या गवताची दोरी न बाधतां धर्मरक्षणार्थ सदैव सज्ज असणाऱ्या धनुष्याची प्रत्यचा त्यासाठी वापरीत त्याचे अजिन मृगाचे व दड अश्वत्थाचा असे. याला पर्याय पुष्कळ असले तरी पर्याय हा मूळ गोष्ट उपलब्ध होण्याच्या सबधात अडचण उपस्थित झाल्यामुळेच निर्माण होतो हे ध्यानात घेतले तर पर्याय हे केव्हाही गौणच होत हे सागण्याची वेगळी आवश्यकता रहात नाही ज्याला बलसपन्न व्हावयाचे आहे त्या क्षत्रियाचा उपनयन सस्कार वयाच्या सहाव्या वर्षीच करावा व त्याच्या शिक्षणाला नि सस्कारित जीवनाला प्रारभ करावा असें धर्मसूत्रकारानी सुचविले आहे. आदर्श समाजरचनेचे घटक होणारे कोणतेहि जीवन जाणत्या वयापासून वाया जाऊ नये यावर आमच्या समाजशास्त्रज्ञाचा केवढा कटाक्ष होता याची यावरून कल्पना येते सहाव्या वयात पदार्पण केलेल्या क्षत्रिय बटूच्या कोवळ्या मनावर कमरेला बाधलेल्या धनुष्याच्या दोरीने जसा बाहुबलाधिष्ठित विजिगीषेचा व पराक्रमाचा सस्कार करण्यात येई, त्याचप्रमाणे रुरुमृगाचे चर्म त्याला तेजस्वी जीवनाची प्रेरणा देई पण हे तेज व हा पराक्रम केवळ व्यक्तिगत वैभव व सत्ता सपादन करण्यासाठी नसून राष्ट्राच्या व धर्माच्या परिपालनासाठी आहे ही जाणीव त्या बालकाच्या सस्कारसुलभ मनावर कपाळा-पर्यंत उच असणारा तो अश्वत्थाचा दड सतत जागृत ठेवीत असे. अश्वत्थ हा महाविष्णूचे प्रतीक असणारा वृक्ष आहे हे प्रसिद्धच

आहे महाविष्णु ही ईश्वराची पालनात्मक शक्ति आहे व म्हणूनच क्षत्रियाच्या हाती त्या शक्तीचे प्रतीक म्हणून हा अश्वत्थाचा दड देण्यात आला आहे या पद्धतीने सस्कारित झालेल्या क्षत्रिय बालकाला ब्राह्मणाप्रमाणे ब्रह्मचर्याचे सर्व नियम पाळावे लागत व अग्निपूजा करावी लागे अग्निपूजा करीत असताना तो आपल्या विद्याध्ययनाचे कार्य निर्विघ्नपणे पार पडण्यासाठी देवतेची प्रार्थना करी त्यालाही रोज सावित्रीमत्राची उपासना करावी लागे व त्याचा सावित्री मत्र त्याच्या कर्तव्याची रोजच त्याच्या अत करणात जाणीव उत्पन्न करी तृष्टुभ् वृत्तात क्षत्रियाचा हा सावित्रीमत्र असून त्या मत्राचा उल्लेख मी माझ्या प्रस्तुत ग्रथाच्या पूर्वार्धात केलेला आहे पुन्हा तो मत्र येथे उद्धृत करून मी जागा अडवीत नाही, पण त्या मत्रात तेजस्वी सूर्यनारायणाची जी प्रार्थना केलेली आहे तिचा केवळ अनुवाद येथे उद्धृत करतो, म्हणजे त्यावरून क्षत्रियाच्या मनावर होत असलेल्या सस्काराची कल्पना येईल तो अनुवाद असा —" कृष्णवर्ण अतरिक्षातून मार्ग आक्रमण करीत आणि अमर्त्य व मर्त्य या सर्वांना आपआपल्या उद्योगास प्रवृत्त करीत सर्व भुवनाचे अवलोकन करणारा सविता हा आपल्या सुवर्णमय रथात बसून आगमन करीत आहे " ( वे. रा पूर्वार्ध पृ २८४ ) प्रस्तुत मत्रात विरोधातून स्वत च्या सामर्थ्याने मार्ग आक्रमण करीत दिग्विजय करण्याचा विक्रम, सर्वाचे नियमन करून दडशक्तीच्या अधिष्ठानावर सर्वांनाच आप-आपल्या कर्तव्यक्षेत्रात प्रवृत्त करीत राहण्याचे व त्यात कोणी ढिलाई करतो की काय हे सूक्ष्मपणे पाहण्याचे कर्तव्य व वैभवाच्या उपभोगाचा अधिकार या क्षत्रियाला आवश्यक असणाऱ्या गोष्टीचे किती उत्कृष्ट व किती थोडक्यात वर्णन केलेले आहे ! आपले ब्रह्मचर्याचे जीवन या सस्कारानी सस्कारित करीत धनुर्विद्येसह सर्व विद्याचे शिक्षण झाले म्हणजे तोवर तारुण्यात आलेल्या क्षत्रिय ब्रह्मचाऱ्याचा समावर्तन सस्कार करण्यात येई. त्यावेळी गुरु

त्याच्या कमरेला खड्ग बांधून जीवनाच्या क्षेत्रात त्याचा प्रवेश करून देई जी कर्तव्ये त्याच्या मनावर बिंबविण्यात येत त्याचे वर्णन करताना राजर्षि मनु (मनुस्मृति अध्याय १) म्हणतात,

प्रजानां रक्षणं दानं इज्याध्ययनमेव च।
विषयेष्वप्रसक्तिश्च क्षत्रियस्य समासतः ॥८९॥

(प्रजाचे संरक्षण करणे, दान देणे, यज्ञ करणे, अध्ययन करणे आणि गीत, नृत्य, मृगया, विहार इत्यादि विषयाच्या उपभोगाची सवलत दिलेली असली तरी त्याच्या ठिकाणी आसक्ति नसणे ही कर्मे क्षत्रियासाठी आहेत) जीवनात प्रवेश केलेल्या क्षत्रियाने काय करावे हे सांगताना धर्मसूत्रकार म्हणतात –

"चर्या च रथधनुर्भ्याम् ॥१४॥ संग्रामे संस्थानमनिवृत्तिश्च ॥१५॥ क्षत्रियश्चेद् अन्यस्तमुपजीवेत्तद्वृत्त्या ॥१८॥ (गौ. ध सू अध्याय १०)

क्षत्रियाने सैनिकी वृत्तीने आपले उपजीवन चालविले पाहिजे निर्भयपणे संग्रामात उभे ठाकणे व तेथून कधीहि निवृत्त न होणे हे त्याचे कर्तव्य आहे आपल्या राष्ट्राची व राजाची सैनिकी वृत्तीने निरलसपणे सेवा करणे हेच क्षत्रियाचे खरे कर्तव्यकर्म आहे) असा हा क्षत्रियवर्ग मूल्यासाठी प्राणार्पणास केव्हाही सिद्ध असे क्षत्रियाचे शिक्षण सहाव्या वर्षापासून प्रारंभ होत असे याचा उल्लेख मागे केलाच आहे ते बाविसाव्या वर्षी संपे, व तो जीवनात प्रवेश करी पण हे सामान्यतः शास्त्रातील मत आहे असे म्हणता येईल इतिहास व पुराणाच्या साह्याने वेद उलगडण्याचा प्राचीन संकेत ध्यानात घेतला तर क्षत्रिय सोळाव्या वर्षीच सैन्य विभागात दाखल होऊन योद्ध्याच्या जीवनात प्रवेश करीत असे, असे पुराण व इतिहाससाहित्याच्या आधारे म्हणता येईल उदाहरणार्थ महर्षि विश्वामित्र हे राजा दशरथाच्याकडे राम मागावयास गेले असता दशरथाने त्याच्या मागणीला नकार देताना 'ऊनषोडशवर्षो मे रामः नादातुमर्हसि।' (वयाची सोळा वर्षे पूर्ण न झालेल्या माझ्या रामाला रणक्षेत्रात नेणे योग्य नाही) असे म्हटले आहे.

वाल्मीकीय रामायणातील या उद्गारावरूनच सोळा हे सामान्यत क्षत्रियाचे रणक्षेत्रात उतरण्याचे वय समजले जात असे असे स्पष्ट होते महाभारतामध्येहि अर्जुनाचा मुलगा अभिमन्यु हा वयाच्या सोळाव्या वर्षीच योद्धयात गणला जात होता व तेव्हा त्याचा विवाहहि झाला होता असा स्पष्ट उल्लेख आहे अभिमन्यूच्या उल्लेखासबधी, ते वय उपनयनापासून धरावे, असा काही लोकाचा आग्रह असून तो चोवीस वर्षाचा होता असे त्या लोकाचे म्हणणे आहे पण रामचद्राच्या बाबतीत हे काहीच म्हणता येणे शक्य नाही कारण 'राम पुरे सोळा वर्षाचे नाहीत म्हणून मी त्याना सग्रामात पाठवीत नाही' हे म्हणणे जसे योग्य वाटते तसे 'ते चोवीस वर्षाचे नाहीत' हे कारण काही योग्य वाटण्यासारखे नाही असो. क्षत्रियाच्या शिक्षणात वेदत्रयीबरोबर गणित, आन्वीक्षिकी अथवा तर्कशास्त्र, वार्ता अथवा अर्थशास्त्र व दण्डनीति अथवा राज्यशास्त्र या विषयाचा प्राधान्येकरून समावेश असे क्षत्रियाना अर्थशास्त्र व राज्यशास्त्र शिकविण्यासाठी योग्य वयात राज्यातील त्या त्या खात्यामधून त्या त्या खात्याचे मुख्य (अध्यक्ष) व वक्ते आणि प्रवक्ते याच्या हाताखाली प्रत्यक्ष काम करावे लागे शिक्षण अधिकात अधिक प्रात्यक्षिक असावे हा त्यात हेतु होता क्षत्रियाला द्यावयाच्या सैनिकी शिक्षणालाच धनुर्वेद असे म्हणत धनु म्हणजे केवळ धनुष्य नसून यच्चयावत् शस्त्रास्त्र व सैनिकी विद्येचा तो प्रतीकात्मक वाचक शब्द आहे सामान्यत क्षत्रियाच्या बाबतीत शिक्षणाच्या वेळेची विभागणी पुढीलप्रमाणे होती असे दिसते सकाळपासून दुपारपर्यंतची वेळ, वेगवेगळी शस्त्रे व त्याच्या युद्धपद्धति याचे प्रायोगिक शिक्षण व युद्धशास्त्र याच्या शिक्षणासाठी होती दुपारपासून सध्याकाळपर्यंत इतिहासाचे व इतर शास्त्राचे अध्ययन होई क्षत्रियाच्या शिक्षणात इतिहासाला फार मोठे महत्त्व होते आपल्या प्राचीन पूर्वजानी केलेल्या दिग्विजयाच्या व पराक्रमाच्या घटना, त्याचा राज्यकारभार, त्याचे धोरण याची माहिती ज्याला नाही तो क्षत्रिय अर्धवट शिकलेला

आहे असे मानण्यात येत असे त्यासाठी सूताचा एक वर्ग नियुक्त केलेला होता शुक्ल यजुर्वेद सहितेत पुरुषमेधप्रसगी दिलेल्या यादीत या वर्गाचा उल्लेख आहे दुपारचा विशेषत सध्याकाळचा व रात्रीचा पहिल्या प्रहराचा वेळ क्षात्रवृत्तीला आवश्यक अशा काही गूढ व महत्त्वाच्या गोष्टीच्या शिक्षणासाठी उपयोगात आणला जाई क्षत्रियालाही गुरुगृहीच व आश्रमातून शिक्षण घ्यावे लागे व अनुशासनबद्ध जीवन त्याच्यात उत्पन्न होईल अशी सर्वतोपरी काळजी घेण्यात येत असे भारतीय धनुर्वेदाचे प्रणेते महर्षि विश्वामित्र मानले जातात धनुर्वेदाचे (१) दीक्षापाद (२) सग्रहपाद (३) सिद्धिपाद व (४) प्रयोगपाद असे चार पाद असून (१) मुक्त (२) अमुक्त (३) मुक्तामुक्त व (४) यत्रमुक्त असे प्राचीन भारतीय शस्त्रविद्येतील चारही प्रकारचे आयुधाचे सप्रयोग शिक्षण या चार पादातून वर्णिलेले आहे भारतीय राष्ट्राच्या द्रष्टयाची अशी आकाक्षा होती की, 'राजन्य इषव्यः शूरो महारथो जायताम् ।' (आमच्या राष्ट्रातील क्षत्रिय चारहि प्रकारच्या शस्त्र-विद्येत निष्णात, शूर व महारथी व्हावा )

याप्रमाणे ज्या शिक्षणपद्धतीने व ज्या सस्कारानी पशुत्व-विरहित पराक्रमाचे प्रतीक असणारा क्षात्रवर्ण निर्माण करण्यात येत असे त्याचे स्वरूप आपण पाहिले पण शस्त्र, हिसा व सहार या अनिवार्य गोष्टीच्या उपयोगासाठी तपस्व्यानी निर्माण केलेली ही शक्ति नुसती सस्कारित करून चालणार नव्हते तर ती नियत्रित राखणेहि आवश्यक होते व येवढ्यासाठी वैदिक राष्ट्राच्या द्रष्टयानी ब्रह्म व क्षात्र याची जोडी कल्पिलेली आहे जोपर्यत ब्रह्म हे समष्टिजीवनाशी एकरूप झालेले व क्षात्र ब्रह्माच्या नियत्रणात असलेले राहते तोपर्यतच राष्ट्राचा उत्कर्ष असतो अशी भारतीयाची धारणा आहे महाभारताच्या शान्तिपर्वात म्हटले आहे –

तपो मत्रबलं नित्य ब्राह्मणेषु प्रतिष्ठितम् ।
अस्त्रबाहुबल नित्य क्षत्रियेषु प्रतिष्ठितम् ।।
नाब्रह्म क्षत्रमृध्नोति नाक्षत्र ब्रह्म वर्धते ।
ब्रह्मक्षत्र च सपृक्त इह चामुत्र वर्धते ।।

(तपश्चर्या व मत्र अथवा मुत्सद्देगिरी याचे बळ नेहमीच ब्राह्मणाच्या ठिकाणी प्रतिष्ठित असते तसेच अस्त्रविद्या व बाहुबल नेहमीच क्षत्रियाच्या ठिकाणी प्रतिष्ठित असते ब्राह्मबलाच्या साहाय्यावाचून क्षत्रियाचे कधीहि वैभव वाढू शकत नाही व क्षात्रबलाच्या सरक्षणावाचून ब्राह्मबलाचाही उत्कर्ष होऊ शकत नाही म्हणून हे नेहमीच लक्षात ठेवले पाहिजे की, ब्रह्मक्षत्राच्या परस्पर सहकार्यावरच राष्ट्रीय उत्कर्ष अवलबून आहे गौतमधर्म-सूत्रकारानी असे म्हटले आहे की,

ब्रह्मप्रसूत हि क्षत्र रुध्यते न व्यथते इति च विज्ञायते ।
ब्रह्मक्षत्रेण पृक्त देवपितृमनुष्यान् धारयतीति विज्ञायते ॥
–(गौतमधर्मसूत्र अ ११, सूत्रे १६ व २९)

(ब्रह्माने ज्याप्रमाणे संकेत केला असेल तदनुसार वर्तन करणारे क्षात्रच कोणत्याहि प्रकारची व्यथा न होता वैभवशाली होते व क्षत्राने साह्य केलेले ब्रह्मच देव, पितर व मनुष्य याच्या सृष्टीचे विधारण करण्यास सर्वथा समर्थ असते ) म्हणूनच आदर्श समाज स्थितीचे वर्णन करताना वाल्मीकि रामायणात 'क्षत्र ब्रह्ममुख चासीत्' असे उद्गार काढण्यात आलेले आहेत या विशिष्ट रचनेमुळेच भारतभूमि ही केवळ रक्तपिपासू क्रूरकर्म्याची प्रसवभूमि न ठरता मर्यादा पुरुषोत्तम रामचद्र, भीष्म, सगर, इक्ष्वाकु या राजर्षींच्या परपरेची जननी ठरली आहे कारण महाभारतात म्हटल्याप्रमाणे भारतातील क्षत्रियासमोर नरपशूंचा नायनाट (क्षत्रस्यैतत् कृत्यतमं यद्वै दस्युनिबर्हणम्) हा एकच ध्येयवाद होता व तपस्व्याच्या नियत्रणात राहून त्यानी तो पार पाडलेला आहे भारतातील क्षात्र वर्ण आपल्या या तेजस्वी भूमिकेवर जोवर अधिष्ठित होता तोवर या राष्ट्राकडे जगातील कुठल्याही पाशवी शक्तीची वक्र दृष्टीने पाहण्याची छाती झाली नाही पण युधिष्ठिराचा विख्यात नातू परीक्षिति याच्या राज्यारोहणानतर त्याच्या कर्तृत्वाने व त्याच्या परपरेत निर्माण झालेल्या भारतीय नृपतीच्या कर्तृत्वाने जी शतावधि वर्षाची निष्कंटक शातता भारतीय राष्ट्रजीवनाला

ठाभली तिचा परिणाम हा राष्ट्रसंरक्षक क्षात्रवर्ण काही प्रमाणात ोग-सुखासीन, तर काही प्रमाणात सन्यासवादी होण्यात झाला ाष्ट्र जीवनातील आपल्या भूमिकेचे त्या वर्गाला विस्मरण होऊन पस्व्याचा सन्यास पत्करण्याचा मोह त्याना उत्पन्न झाला आपले ामाजजीवनातील कर्तव्यकर्म हेच तपस्व्याच्या सन्यास जीवना- तके श्रेष्ठ आहे ही वैदिक धर्माची भगवान् श्रीकृष्णानी रस्कारिलेली शिकवण तो विसरला व चिरकालिक शाततेच्या ोटी जन्मास आलेली ही कर्तव्यभ्रष्टता क्षात्रवर्णातूनच बौद्ध व ैन विकृतीच्या रूपाने बाहेर पडली बौद्ध सम्प्रदाय प्रवर्तक गौतम जैन सम्प्रदायाचा अतिम तीर्थंकर महावीर हे दोघेही राजकुळात त्पन्न झालेले पुरुष होते अलीकडे त्याचा व त्यातल्या त्यात ौतम बुद्धाचा फार मोठा जयघोष चालू आहे. ज्या कारणास्तव ुद्धाचा जयघोष करण्यात येतो त्या कारणास्तव वस्तुतः महावीराचा ायघोष व्हावयास पाहिजे. बुद्ध व महावीर याच्या व्यक्ति- ीवनाविषयी आम्हाला येथे काही म्हणावयाचे नाही पण समाज- चनेत त्याच्या वाटचास आलेले कर्तव्य सोडून भगवान् श्रीकृष्णाच्या ीतेतील परिभाषेप्रमाणे ते राष्ट्रजीवनाला भयावह ठरलेल्या परधर्मात' शिरले हे मान्य केलेच पाहिजे लहरीनुसार व्यक्तीने ामाजजीवनातील आपली कर्तव्याची भूमिका सोडणे चुकीचेच ोय त्यानी जो चागला म्हणून उपदेश केलेला आहे त्यात नवीन से काही नाही तो उपदेश त्याच्या शतावधि वर्षे पूर्वी वैदिक व ौपनिषद् साहित्याने केलेलाच आहे पण हा उपदेश समाज- रक्षकाच्या आपल्या भूमिकेपासून न चळता त्याना करता आला सता, व तसे त्यानी केले असते तर राजर्षि जनकाप्रमाणे यानी आपले एक आदर्श उदाहरण राष्ट्रजीवनात निर्माण केले सते पण त्यानी राजदडाचे दायित्व सोडून काषायवस्त्रे धारण रण्यात आपल्या सामाजिक कर्तव्याची वचना केली तेहि त्यानी यक्तिजीवनापुरतेच केले असते तर गोष्ट वेगळी होती पण ाजघराणी व क्षात्रवर्ण याना भिक्षूचा व यतीचा मार्ग मोकळा

करून राष्ट्रीय दायित्वापासून चळण्याचा मार्ग त्यानी सर्वांनाच मोकळा करून दिला साऱ्या समाजाच्या अंगोपांगाना कर्तव्यभ्रष्ट होण्याचे दार बुद्धाइतके कोणीच मोकळे केले नसेल ! बुद्ध हिंसक होता की अहिंसक, त्याचे व्यक्तिजीवन निर्मळ होते की नव्हते व अंतसमयी त्याने सूकर मांस भक्षण केले की काय या विवादाशी आम्हाला कर्तव्य नाही राष्ट्रीय जीवनात त्याने आपल्या उदाहरणाने व यत्नांने कर्तव्यभ्रष्टता उत्पन्न केली व तिच्यातून भारतीय राष्ट्राची अपरिमित हानि झाली हे निर्विवाद आहे कर्तव्यासाठी कर्तव्य या सूत्रावर अधिष्ठित असणाऱ्या एका आदर्श समाज-रचनेच्या पायावर त्यानी प्राणघातक वार केला, ही सगळ्यात भयानक गोष्ट होय श्री रामचंद्र दीक्षितार यानी आपल्या War in Ancient India या ग्रंथात बुद्ध व महावीर यांच्या कार्याचे समालोचन करताना जे उद्‍गार काढले आहेत ते अत्यंत मननीय आहेत ते म्हणतात –

There is a definite ordinance of the ancient law books prohibiting the warrior caste from taking to asceticism Only the Brahmins may resort to asceticism, because the kshatriya may neither beg nor receive a gift The very nature of Sannyasin is to beg; hence he is called a Bhikhu. Action and not renunciation is the watch-word of the kshatriya It was realised that if this were allowed, the kshatriyas would become philosophers rather than warriors and this would result in the deterioration of man-power in the land Therefore a warrior was not generally allowed to don the robes of an ascetic. But Mahavir and Gautam protested against these injunctions and inaugurated an order of monks or sanyasins When these dissenting sects gathered in strength and numbers, the decline of Kshatriya valour set in Once they were

nitiated into a life of peace and prayer, they preferred t to the horrors of war This was a disservice that lissenting sects did to the cause of ancient India

--( War in Ancient India p 55 )

(प्राचीन धर्मशास्त्रीय ग्रथातून क्षत्रियाना यतिधर्माच्या गीकाराची बदी करणारा स्पष्ट निर्बंध आहे केवळ ब्राह्मणानाच ातिधर्म विहित आहे कारण भिक्षा मागणे व दान घेणे या ोन्ही गोष्टी क्षत्रिय करू शकत नाही. सन्यासी व्यक्तीचा नर्वाहच भिक्षेवर होतो म्हणूनच त्याला **भिक्षू** असे म्हणतात त्रियाचा बाणा सर्व परित्यागाचा नसून कर्म करण्याचाच आहे ा निषेधाच्या पाठीमागे अशी विचारप्रणालि होती की क्षत्रियाना ो मुभा दिली तर ते योद्धयाऐवजी साधु होतील व त्याचा रिणाम राष्ट्रातील मनुष्यबळाच्या हानीत होईल व म्हणून ामान्यत योद्धयाला यतिधर्मात शिरण्याची बदी होती. पण द्ध व महावीर यानी या बंदीविरुद्ध बड केले व भिक्षुसघाची र्निमिति केली हे भिक्षुसघ जसजसे सख्येने व प्रभावाने वाढू ागले, तसतसे क्षात्रतेज लुप्त होऊ लागले एकदा या लोकाना ार्थना व शाततेच्या जीवनाची चटक लागल्यावर युद्धमय ीवनाहून तेच त्यानी अधिक पसत केले प्राचीन भारताच्या राष्ट्र- ीवनाच्या दृष्टीने भिक्षुसघाने ही मोठीच राष्ट्रीय हानि केली.)

असो वैदिक राष्ट्राच्या द्रष्टयानी या क्षात्रवर्णातूनच राज्य- स्थेची निर्मिति केलेली आहे वैदिक राज्यसस्थेचे स्वरूप काय ोते ते पुढील व्याख्यानात पाहू

✦ ✦ ✦

## व्याख्यान ९ वे

# वैदिक राज्यसंस्था

भारतीय समाजशास्त्रज्ञानी फार प्राचीन काळापासूनच अराजकाचा निषेध केलेला असून राज्यसस्थेचा पुरस्कार केलेला आहे अराजक व वाईट राज्यसस्था याच्यामध्ये भारतीयानी वाईट राज्यसस्था सुद्धा अराजकापेक्षा श्रेष्ठ ठरविली आहे वेनासारख्या अत्याचारी राजाला राजसिहासनावर ऋषीनी का बसविले याची उपपत्ति सागताना श्रीमद्भागवतात असे म्हटले आहे की "अराजकभयादेष कृतो राजाऽतदर्हण" ( वस्तुत सर्वस्वी अयोग्य असलेल्या वेनाला ऋषीनी जे राजा केले ते केवळ अराजकाच्या भयानेच होय ) अराजक म्हणजे निर्नियत्रित अवस्था व अशी स्थिति समाजात असली तर तो समाज रसातळास जावयास कितीसा वेळ लागणार ? समाज म्हटला की त्याच्या धारणेसाठी, रक्षणासाठी, पोषणासाठी व विकसनासाठी राज्यानुशासनाची अत्यत आवश्यकता आहे क्षत्रिय वर्णाचे स्वरूप विशद करताना दण्डशक्तीचे महत्त्व सागितलेलेच आहे पण ही दण्डशक्ति सुनियत्रित होऊन दण्डनीति ( Administration by justice ) स्थिरपद होण्यासाठी राज्यसस्था का उत्पन्न झाली हे सागताना राजर्षि मनूने म्हटले आहे -

अराजके हि लोकेऽस्मिन् सर्वतो विद्रुते भयात् ।
रक्षार्थमस्य सर्वस्य राजानमसृजत् प्रभु ॥
तस्यार्थे सर्वभूताना गोप्तार धर्ममात्मजम् ।
ब्रह्मतेजोमय दण्डमसृजत् पूर्वमीश्वर ॥

(सर्व जगत् अराजकाच्या निर्नियत्रित परिस्थितीत भयकपित होऊन पळत असता सर्वांच्या सरक्षणासाठी परमेश्वराने राजाला

निर्माण केले व या राजासाठीच सर्व प्राणिमात्राचे सरक्षण करणारा ब्रह्मतेजोमय धर्मरूपी दण्ड परमेश्वराने स्वत पासूनच निर्माण केला.) राज्यसस्थेच्या याच विशिष्ट स्वरूपामुळे राजधर्मात सर्व प्रकारचा त्याग आहे, राजधर्मात सर्व प्रकारच्या दीक्षा आहेत, राजधर्मात सर्व उच्च ग तीचा समावेश आहे असे यथार्थ उद्गार महाभारतात काढले आहेत.

राज्यसस्था सरक्षण व न्याय यासाठी निर्माण झालेली असून तिची आवश्यकता व स्वरूप चाणक्यसूत्रात पुढीलप्रमाणे सागितले आहे "सुखस्य मूल धर्म । धर्मस्य मूलमर्थ । अर्थस्य मूल राज्यम् । दण्डनीतिमधितिष्ठन् प्रजाः सरक्षति ।" (सर्वांनी सुखी होण्याचा खरा मार्ग धर्म म्हणजे आपआपल्या कर्तव्याची योग्य ओळख करून घेऊन तदनुसार वर्तन करणे हा आहे धर्माचे मूळ अर्थ म्हणजे सपत्ति होय आर्थिक जीवन सुव्यवस्थित असले तरच मनुष्य-समाज कर्तव्यनिष्ठा जीवनात उतरवू शकतो सर्व समाजाची आर्थिक घडी समर्थ व सुयोग्य राज्यसस्था स्थिरपद झाल्यावाचून नीट बसू शकत नाही राजा अथवा राज्यसस्था दण्डनीतीचे योग्य अवलबन करून समाजसरक्षणाचे आपले कार्य करीत असते ) दण्ड व दण्डशक्ति हे शब्द सर्वांच्या परिचयाचे आहेत, त्याच्या अर्थासबधी सहसा गोधळ उडत नाही पण दण्डनीति (Administra tion by justice) या शब्दाचा मात्र अर्थ स्पष्ट करणे आवश्यक आहे दड व दडनीति याच्यातील भेद स्पष्ट करून दण्डनीतीचा पुरस्कार करताना विख्यात राज्यशास्त्रज्ञ कौटिल्य आपल्या अर्थ-शास्त्रात पुढीलप्रमाणे मूलगामी विवेचन करतात "आन्वीक्षिकी त्रयी वार्तांना योगक्षेमसाधनो दण्ड । तस्यनीतिर्दण्डनीति । अलब्धलाभार्था, लब्धपरिरक्षिणी, रक्षितविवर्धिनी, वृद्धस्य तीर्थेषु प्रतिपादिनी च । तस्यामायत्ता लोकयात्रा । तस्माल्लोक-यात्रार्थी नित्यमुद्यतदण्ड स्यात् । न हि एवविध वशोपायनमस्ति भूताना यथा दण्ड इत्याचार्या । नेति कौटिल्य । तीक्ष्णदण्डो हि भूतानामुद्वेजनीय । मृदुदण्ड परिभूयते । यथार्हदण्ड. पूज्य. ।

सुविज्ञातप्रणीतो हि दण्ड प्रजा धर्मार्थकामैर्योजयति। दुष्प्रणीत कामक्रोधाभ्यामज्ञानाद्वानप्रस्थपरिव्राजकानपि कोपयति कि पुनर्गृहस्थान्। अप्रणीतो हि मात्स्यन्यायमुद्‌भावयति। विनयमूलो दण्ड प्राणभृता योगक्षेमावह ।" (कौटिलीय अर्थशास्त्र चतुर्थाध्याय) (आन्वीक्षिकी अथवा अध्यात्मविद्या, वेदत्रयी, व वार्ता अथवा अर्थशास्त्र याचा योगक्षेम चालण्याचे जे साधन त्याला दण्ड असे म्हणतात आणि त्याचे जे नियम त्याना दण्डनीति असे म्हणतात या दण्डनीतीपासून अलब्धाचा लाभ होतो, लब्धाचे रक्षण होते, रक्षिताची वृद्धि होते आणि सचितद्रव्याना योग्य स्थानी व योग्य कार्यात व्यय होतो लोकव्यवहारही दण्डनीतीवर अवलबून आहे. म्हणून लोककल्याणेच्छूने नेहमी उद्यतदण्ड असावे दण्डासारखे समाजाच्या वशीकरणाचे दुसरे प्रभावी साधन नाही असे **आचार्य** म्हणतात **पण कौटिल्याच्या मतें हे** चूक आहे नेहमी दण्डाशी गाठ घातल्यास प्राणिमात्र त्रासून जातात दण्ड सोडून द्यावा तर आपलाच विनाश होतो. यास्तव यथोचित दण्ड करणारा योग्य होय कारणप्रसगी नीट चौकशी करून दडाचा उपयोग केल्यास प्रजा धर्म, अर्थ व काम या त्रिविध पुरुषार्थसिद्धीने सपन्न होते अविवेकाने, अज्ञानाने, कामक्रोधादि मनोविकाराच्या आहारी जाऊन दडाचा उपयोग केल्यास सर्वसगपरित्याग करून मनोजय साधलेले वानप्रस्थी व सन्यासी हे देखील क्षुब्ध होतात; मग गृहस्थाश्रमी लोक क्षुब्ध होतील यात नवल ते काय? दण्ड मुळीच उपयोगात न आणल्यास मात्स्यन्याय प्रवृत्त होतो म्हणजे प्रबल लोक लहरीनुसार दुर्बळाचा फडशा पाडतात पण दण्डाने सरक्षण केल्यास निर्बलसुद्धा प्रबलाप्रमाणे राहू शकतात चातुर्वर्ण्यात्मक व चार आश्रमानी युक्त अशा प्रजेचे राजाने यथायोग्य दण्डाचा वापर करून रक्षण केल्यास सर्वलोक आपआपल्या मर्यादेत वर्तन करतील )

राज्यसस्था ही इतकी महत्त्वाची असल्यामुळे समाजाचा विकास तिच्या आधारानेच उलगडता येतो प्राचीनकाळी, विशेषत वेदकाळी राज्यसस्था सुव्यवस्थित स्वरूपात होती हे सिद्ध करणारे

हवे तितके पुरावे वेदवाङमयात आहेत सर्वात प्राचीन समजण्यात येणाऱ्या ऋग्वेदसहितेतच चाळीसच्यावर राजाची नावे आलेली आहेत ऋग्वेदात राजाला उद्देशून "जनस्य गोपा" (लोकाचे रक्षण करणारा) हे विशेषण वापरलेले आहे त्यावरून राज्य-सस्थेच्या कार्याची कल्पना स्पष्ट होते वेदवाङमयात केवळ राज्य-सस्थेचेच नव्हे, तर अनेक राजावर आधिपत्य गाजविणाऱ्या साम्राज्य सस्थेचेहि स्पष्ट निर्देश येतात उदाहरणार्थ, **अभ्यावर्तिन् चायमान** या पृथूच्या राजाचे विशेषण "सम्राट् पार्थिवानाम्" म्हणजे राजाचा सम्राट् असे आहे यावरून चक्रवर्तिसस्था व साम्राज्यसस्था याचा वैदिक द्रष्टयाना परिचय होता हे स्पष्टच सिद्ध होते मात्र वेदकाळी जी राज्यसस्था होती ती एकतंत्री पद्धतीचीच होती गणराज्ये (Republics) इत्यादि महाभारत काळापासून तर कौटिल्याच्या काळापर्यंत आढळून येणारी राज्य-सस्थेची व राज्यघटनाची भिन्न भिन्न स्वरूपे वेदवाङमयात आढळत नाहीत ऐतरेय ब्राह्मणात कुरुक्षेत्रापासून प्रयागापर्यंतच्या गगा-यमुनाच्या दुआबातील राज्यसस्थेचे वर्णन करताना असे म्हटले आहे की "एतस्या ध्रुवाया मध्यमाया प्रतिष्ठाया दिशि ये के च कुरुपचालाना राजान स वशोशीनराणा राज्यायैव तेऽभिषिच्यन्ते। राजेत्येनानभिषिक्तानाचक्षते।" (ऐतरेय ब्राह्मण ८ १४)

(या विभागात कुरु व पचालाचे जे राजे आहेत त्याना राज्याभिषेक सस्कार करूनच राज्यपदावर आणले जाते असा अभिषेक ज्याला होईल तोच राजा होतो) वेदवाङमयात गण-राज्याचा (Republics) उल्लेख आढळत नाही राजा या शब्दा-तील मूळ धातु 'राट्' असून त्याचा अर्थ नियता असा आहे पण प्राचीन भारतीय राज्यशास्त्रज्ञानी 'रजनात् राजा' म्हणजे जो प्रजाचे अनुरजन करतो तो राजा अशी या शब्दाची व्याख्या करून केवळ प्रजेच्या हिताकडे लक्ष देऊन जो आदर्श राज्यकारभार करतो त्यालाच राजा म्हणावे असा आपला अभिप्राय व्यक्त केला आहे. सपूर्ण प्राचीन व मध्ययुगीन सस्कृत व प्राकृत साहित्यात

राजा शब्दाची हीच व्याख्या रूढ झालेली आहे येथील राजे लोकानाहि हा अर्थ समत होता व राज्यघटनेतहि याच अर्थाला मान्यता होती छादोग्योपनिषदात राजा अश्वपतीने आपल्या राज्याचे म्हणून जे वर्णन केलेले आढळते ते या दृष्टीने अत्यत उद्बोधक आहे केकयाचा राजा अश्वपति आपल्या येथे आलेल्या तत्त्वज्ञाना आपल्या प्रजाजनाच्या विषयी सागताना म्हणतो –

न मे स्तेनो जनपदे न कदर्यो न मद्यप ।
नानाहिताग्निर्नाविद्वान् न स्वैरी स्वैरिणी कुत ।।

छादोग्योपनिषत् अ ५–११

(माझ्या राज्यात कोणीही चोर नाही, भ्याड नाही, दारुड्या नाही, व अग्निहोत्र नसलेला मनुष्य नाही, मूर्ख तर नाहीच नाही स्वैर वर्तन करणारा मनुष्यच जर या राज्यात नाही, तर स्वैराचारी स्त्री कोठून असणार?) भारतीय राजाच्या मनावर या तत्त्वाची इतकी विलक्षण पकड होती की भवभूतीनी श्रीरामचद्राच्या तोडी पुढील प्रसिद्ध वाक्य घातले आहे

स्नेह दया च सौख्य च यदि वा जानकीमपि ।
आराधनाय लोकाना मुञ्चतो नास्ति मे व्यथा ।।

—उत्तररामचरितम्

(स्नेह, दया, सुख, फार तर काय, पण लोकसेवेसाठी देवी सीतेचा परित्याग करण्याचा प्रसग आला तर त्यानेही माझे हृदय व्यथित होणार नाही )

प्रसिद्ध जैन सम्प्रदायानुयायी कलिग नरेश खारवेल याने "आपली प्रजा आपल्या राज्यात अत्यत सुखी असल्यामुळे तिने राजा ही आपली पदवी सार्थ केली आहे" असे म्हटले आहे त्याचे उद्गार राजा शब्दाच्या या व्याख्येची त्याच्या अत:करणावर केवढी खोलवर मुद्रा उमटलेली होती या गोष्टीचे निदर्शकच होत एक प्रकारे भारतीय राष्ट्रातील राज्यसस्थेचे हे सर्वमान्य मूलतत्त्वच होय असे म्हटले पाहिजे

राज्यसस्था म्हटली की ती एकतत्री असो अथवा लोकाच्या

प्रतिनिधि मंडळाकडून चालविलेली असो, पण तिच्या प्रत्यक्ष व्यवहारात एकाचे अथवा काही थोड्याचे नियत्रण पुष्कळानी मानावयाचे ही योजना असतेच त्यामुळे राज्यसस्था निघाली कशी व अनेकानी तिचे नियत्रण आपल्या स्वातत्र्यावर लादून घेतले कसे असा प्रश्न स्वाभाविकपणेच उत्पन्न होतो सर्वच राज्यशास्त्रीय ग्रथातून उपस्थित करण्यात येत असलेल्या या प्रश्नावर वेद वाङमयात तीन उपपत्त्यानी प्रकाश टाकलेला आढळून येतो त्यातील पहिली उपपत्ति प्राणिमात्राच्या सघर्षमय जीवनाचा अनिवार्य परिणाम म्हणून राज्यसस्था अस्तित्वात आली असे सागणारी आहे ऐतरेय ब्राह्मणात यासबधी मोठी उद्बोधक गोष्ट आलेली आहे ती अशी की देव व असुर याचा नेहमीच सग्राम होत असे व त्या सग्रामात असुराकडून देवाचा नेहमीच पराभव होई वारवार पराभूत झालेल्या देवानी असे का होते हे शोधून काढण्यासाठी आत्मनिरीक्षण करावयास प्रारभ केला तेव्हा त्याना असे आढळून आले की आपल्यात कोणीही एक नेता व त्याच्या अनुशासनात सर्वानी वागावे असा सकेत नसल्यामुळेच आपला पराभव होतो त्यामुळे त्यानी राजा व त्याचे अनुशासन या गोष्टी उत्पन्न केल्या, व असुरावर विजय सपादन केला (देवासुरा वा एषु लोकेषु समयन्तत . तास्ततोऽसुरा अजयन् देवा अब्रुवन्नराजतया वैनो जयति राजान करवामहा इति तथेति। (ऐतरेय ब्राह्मण १,१४ )

या गोष्टीवरून आर्य भटके लोक होते व द्रविडापासून त्यानी राज्यकल्पनेची उसनवारी केली असा कित्येक सशोधकाचा तर्क आहे पण ही उसनवारीची कल्पना सिद्ध होण्यासारखी नाही हे आर्य व अनार्य, सुर व असुर या शब्दाची चर्चा करून मी या व्याख्यानमालेच्या पूर्वार्धातच सिद्ध केलेले असल्यामुळे त्याचा येथे विस्तार करण्याचे कारण नाही. ही कथा मानवात राज्यसस्था मुळात कशी झाली येवढेच केवळ दर्शविते ऐतरेय ब्राह्मणातील या गोष्टीवरून येवढेच सिद्ध होते की राज्यसस्थेचे मूळ युद्धात

अथवा जीवनाच्या सघर्षप्रवृत्तीत आहे पण यावरून राज्यसस्था लोकमताला उत्तरदायी असावी की नसावी, तसेच लोक व राजे याचा सबध काय असावा, मुळात सार्वभौमत्वाचा अधिकार लोकाचा की राजाचा याचा उलगडा होत नाही राज्यसस्थेचे स्वरूप अनियत्रित असावे असा आग्रह धरणाऱ्या मध्ययुगातील पाश्चात्य राज्यकर्त्यांनी व त्याच्या धार्मिक भाटानी, अव्यक्त परमेश्वराकडे हे सार्वभौमत्व असल्याचे प्रतिपादन करून ते ईश्वरानेच राजाला दिलेले असल्यामुळे लोकाना ते काढून घेण्याचा अथवा त्याविरुद्ध बडाळी करण्याचा काही एक अधिकार नाही, या विचारप्रणालीचा आविष्कार केला राज्यसत्ता अनियत्रित असावी या हेतूपलीकडे या विचारप्रणालीचे दुसरे उद्दिष्ट नव्हते कारण अव्यक्त परमेश्वर काही राजाच्या अरेराव कृत्यासबधी कानउघाडणी करणार नव्हताच ती गोष्ट केवळ लोकमतच करणार होते त्याला त्यानी याप्रमाणे उडवून लावण्याचा प्रयत्न केला शेवटी राजाना गिलोटिनवर चढावे लागले ही गोष्ट वेगळी

असो भारतात अशा अनियत्रित प्रणालीचा राज्यशास्त्रज्ञानी कधीही पुरस्कार केला नाही राज्यसस्था लोकानीच निर्माण केलेली असल्यामुळे ती लोकमताला नेहमीच उत्तरदायी राहील हे त्यानी प्रथमपासूनच उद्घोषिलेले आहे लोक व राज्यसस्था याच्यात एक विशिष्ट प्रकारचा करार असून तो करार अथवा सधि जसा लोकाना तसाच राजानाही बधनकारक आहे हे त्यानी जगाच्या इतिहासात पहिल्या प्रथम माडले प्रजानी आपल्या हितासाठी राजा निर्माण केला असल्याचे सत्य ओळखावयास यूरोपला अठरावे व एकोणिसावे शतक पहावे लागले. पण हे सत्य भारतीयांनी ग्रीस राष्ट्राच्याहि जन्मापूर्वी सागितलेले आहे राजा याप्रमाणे प्रजानिर्मित असल्यामुळे प्रजेच्या सुखातच राजाचे सुख व प्रजेच्या हितातच राजाचे हित असून राजाचे स्वतत्र असे हित व सुख कोणतेही असू शकत नाही विद्येने आपल्या कर्तव्याची जाणीव झालेला, सर्व प्राणिमात्राच्या हितासाठी झटणारा, व

प्रजाच्या सुव्यवस्थित जीवनाविषयी जागरूक असलेला राजाच खऱ्या अर्थाने राजा होतो असे कौटिल्याने यासबधाने म्हटले आहे. तो म्हणतो --

प्रजासुखे सुख राज्ञ प्रजाना च हिते हितम् ।
नाऽत्मप्रिय हित राज्ञः प्रजाना तु प्रियं हितम् ।।
विद्याविनीतो राजा हि प्रजाना विनये रत ।
अनन्या पृथिवी भुक्ते सर्वभूतहिते रत ।।

पण कौटिल्य अथवा मनूसारख्या समाजशास्त्रज्ञाच्या या तात्त्विक विचारप्रणालीचे बीज वेदात आढळते काय हा महत्त्वाचा प्रश्न आहे व 'होय' असे त्यावर माझे उत्तर आहे. ऋग्वेदाच्या दशम-मडलातील १७३ व्या सूक्तात राजाला राज्यपदावर बसविताना "विशस्त्वा सर्वा वाञ्छन्तु" (प्रजाजन तू राज्यपदावर असावे अशी इच्छा करोत ) असे म्हटले असून शतपथ ब्राह्मणात तर या कराराच्या भगामुळे राज्यपदावरून काढून दिलेल्या राजाचा प्रत्यक्ष निर्देशही आहे ऐतरेय ब्राह्मणात म्हटले आहे की "या च रात्रीमजायेह या च प्रेतास्मि तदुभयमन्तरेणेष्टापूर्त मे लोक सुकृतमायु प्रजा वृजीथा यदि ते द्रुह्येयमिति" (ऐतरेय ब्राह्मण ८,१५)

( जर मी माझ्या प्रजाहिताच्या सरक्षणाच्या कर्तव्यात कुचराई केली तर ज्या रात्री मी जन्माला आलो तिच्यापासून तो ज्या रात्री मी मृत्यु पावेन तिथपर्यतच्या जीवनात मी केलेली इष्टापूर्ते, पुण्य व त्यामुळे सपादन केलेले दिव्य लोक, आयुष्य व माझी मुलेबाळे या सर्वांचा विनाश होवो )

पण कराराची ही विचारप्रणालि वेदकालापासूनच्या भारतीय राज्यशास्त्रज्ञानी पुरस्कारिलेली असली तरी कराराच्या विचार-प्रणालीचा पुरस्कार करणाऱ्या फ्रेंच राज्यक्रातीपूर्वीच्या लॉक, रूसो इत्यादि पाश्चात्य विचारप्रणालीशी ती पूर्णपणे जुळणारी नाही.

पाश्चात्य विचारप्रणालीत प्रजाजन व राज्यसस्था याच्यातील या कराराचे स्वरूप सामान्यत दोन प्रकारचे पाहण्यात येते. लॉक प्रभृति तत्त्वज्ञानी या कराराचे जे स्वरूप सागितले आहे तें

असे आहे की प्रजाजनानी स्वत:च्या सरक्षणासाठी व विकासासाठी हा करार आपआपसात केला व राजाला आपले नेतृत्व आणि आपल्यावर राज्य करण्याचा अधिकार विचारपूर्वक बहाल केला पण या विचारसरणीत एक मोठा दोष आहे व तो हा की, येथे राजा हा प्रत्यक्ष करागत कोठेच नसल्यामुळे त्याच्यावर काहीही बधन नाही दोन माजरानी आपल्याला सापडलेल्या लोण्याच्या गोळ्याच्या वाटणीच्या भाडणात माकडाला न्यायाधीश नेमावे त्याप्रमाणे चागल्या उद्देशाने का होईना, पण येथे राजाला आपण होऊन प्रजानी सर्व सत्ता समर्पण केली आहे अशा स्थितीत राजा हवा तसा वागला तरी त्याच्यावर नैतिक बधन कोणतेच नसते आणि सत्तेविरुद्धच्या प्रजेच्या उत्थानाला नैतिक आधार रहात नाही उलट सत्तेच्या अनियत्रित अरेरावीला मात्र तात्त्विक पाठबळ मिळते म्हणून रूसोप्रभृति तत्त्वज्ञानी कराराचे हे स्वरूप अमान्य करून राजा व प्रजा याच्यात हा करार झालेला आहे असे प्रतिपादन केले आहे या म्हणण्याने राजसत्ता कराराच्या बधनात सापडते व अत्याचारी सत्तेविरुद्ध प्रजानी केलेल्या उठावणीलाही नैतिक आधार मिळतो या उभयविध करारात एका तत्त्वाचे साम्य आहे व ते तत्त्व म्हणजे सार्वभौमत्व हे प्रजेच्या ठिकाणी असून ते राजा या व्यक्तीच्या ठिकाणी नाही, प्रजेने ते त्याला दिलेले आहे हे होय अर्थात् जी गोष्ट एका व्यवस्थेसाठी प्रजानी राजाला दिली ती प्रसगविशेषी काढून घेण्याचाही अधिकार त्याना आहेच. हिदू राज्यपद्धति ही करारावर ( Contractual monarchy) अधिष्ठित असली तरी तिच्या कराराच्या स्वरूपात व पाश्चात्य विचारप्रणालीच्या कराराच्या स्वरूपात एक मोठा भेद आहे व तो असा की, हा करार प्रजाच्या समतीनेच पण तपस्विसस्था व राजा याच्यात झालेला आहे हिदू राज्यशास्त्रज्ञाच्या मते सार्वभौमत्व हे मूळ ईश्वराचे असून ते त्याने ज्ञानमय व तपस्यासपन्न जीवन जगणाऱ्या वर्गाकडे सोपविलें

आहे राजर्षि मनु म्हणतात, "सर्वं स्वं ब्राह्मणस्येदं यत्किंचि-ज्जगतीगतम्" (मनुस्मृति १।१००) हे संपूर्ण जगत् वस्तुत ब्राह्मणाचे आहे ज्याच्या संबंधाने मनूने हे विधान केले आहे त्या ब्राह्मणाचे वैदिक द्रष्ट्यांना अभिप्रेत असलेले स्वरूप मागे विशद केले आहेच ते लक्षात घेतले म्हणजे येथे जातीयवादाला जागा रहात नाही हे वेगळे सांगावयास नकोच राज्यसंस्थेचा झालेला करार त्या जीवनादर्श ब्राह्मणाशी झालेला असून नाममात्र ब्राह्मणाचा येथे संबंध नाही तात्पर्य, येथे उपभोगाच्या इच्छेचा संस्पर्श नसलेल्या वर्गाला किरीटाचे अधिकारी ठरविले आहे स्वामित्वाची आकांक्षा जाळलेल्यांना स्वामी केले आहे असो या संबंधात कोणताही घोटाळा होऊ नये म्हणूनच बुद्धि-पुरस्सर मी येथे ब्राह्मण शब्दाच्या ऐवजी तपस्विसंस्था हा शब्द वापरलेला आहे

या तपस्व्यांनी संरक्षणाचे खड्ग क्षत्रियवर्णाच्या स्वाधीन केले व राज्यसंस्था निर्माण केली तपस्विसंस्था ही राज्यसंस्थेची जनक असल्याचे तत्त्व महाभारतात खड्गस्तोत्राच्या मिषाने पुढीलप्रमाणे सांगितले आहे —

> असिं धर्मस्य गोप्तारं ददौ सत्कृत्य विष्णवे ।
> विष्णुर्मरीचये प्रादात् मरीचिर्भगवानपि ॥ ६६ ॥
> महर्षिभ्यो ददौ खड्गमृषयो वासवाय च ।
> महेंद्रो लोकपालेभ्यो लोकपालास्तु पुत्रक ॥६७॥
> मनवे सूर्यपुत्राय ददुः खड्गं सुविस्तरम् ।
> ऊचुश्चैनं तथा वाक्यं मानुषाणां त्वमीश्वरः ॥६८॥
> असिना धर्मगर्भेण पालयस्व प्रजा इति ॥६९॥
>
> —महाभारत शांतिपर्व अ. १६६

धर्माचे संरक्षण करणारे खड्ग प्रजापतीने सत्कारपूर्वक महाविष्णूला दिले महाविष्णूनी ते मरीचीला दिले मरीचीने ते महर्षींच्या स्वाधीन केले. महर्षींनी ते महेंद्राला दिले. (शत-पथ ब्राह्मणाप्रमाणे इंद्र ही क्षात्रवर्णाची देवता आहे) महेंद्राने ते

लोकपालाना दिले व लोकपालानी ते मानवाचा पहिला राजा जो वैवस्वत मनु त्याला दिले व असे सांगितले की, तू मनुष्याचा नियता आहेस धर्मासाठीच असलेल्या या खड्गाच्या साहाय्याने तूं प्रजाचे पालन कर क्षात्रशक्तीला राज्यसंस्था महर्षींच्या द्वारे प्राप्त झाली एवढाच याचा अर्थ आहे तपस्विसंस्थेने हा राज्याचा भार जो क्षत्रियावर सोपविला म्हणून म्हटले आहे ते केवळ मनु व महाभारतकार यांचे स्वतंत्र सिद्धान्त नसून वेदातील सिद्धान्ताचेच त्यानी आपल्या भाषेत प्रतिपादन केले आहे शतपथ ब्राह्मण, गरुड, ब्राह्मणापासून क्षत्रिय वर्णाची उत्पत्ति झाली असा जो उल्लेख महाव्या व्याख्यानात केलेला आहे तो याचे उत्कृष्ट निदर्शनच होय यास्तव वैदिक राष्ट्रातील राजा सर्व-संमतीने निवडून येत असले तरीही प्रजानी तपस्विसंस्थेच्या साहाय्याने राजाची निवड केलेली असून राज्यपद हा नुसता करार नव्हता, तर तो करार व संस्कार होता हे ध्यानात ठेवणे अवश्य आहे निर्विवादपणे ही विशिष्ट पद्धतीची निवडणूक सिद्ध करणारा पुरावा अथर्ववेद व ऋग्वेद या दोन्ही वेदसंहितांतून आहे अथर्ववेदातील पुढील सूक्त पहा —

"आ त्वाहार्षमन्तरभूर्ध्रुवस्तिष्ठा विचाचलत् ।
विशस्त्वा सर्वा वाञ्छन्तु मा त्वद्राष्ट्रमधि भ्रशत् ॥१॥
इहैवैधि माप च्योष्ठा पर्वत इवा विचाचलत् ।
इन्द्र इहैव ध्रुवस्तिष्ठेह राष्ट्रमु धारय ॥२॥
इन्द्र एतमदीधरद्ध्रुवं ध्रुवेण हविषा ।
तस्मै सोमो अधि ब्रवदयं च ब्रह्मणस्पति. ॥३॥
ध्रुवा द्यौर्ध्रुवा पृथिवी ध्रुवं विश्वमिदं जगत् ।
ध्रुवास पर्वता इमे ध्रुवो राजा विशामयम् ॥४॥
ध्रुवं ते राजा वरुणो ध्रुवं देवो बृहस्पति ।
ध्रुवं त इन्द्रश्चाग्निश्च राष्ट्रं धारयतां ध्रुवम् ॥५॥
ध्रुवोऽच्युत प्रमृणीहि शत्रूञ्छत्रूयतोऽधरान् पादयस्व ।
सर्वा दिश संमनस सध्रीचीर्ध्रुवाय ते समितिः कल्पतामिह॥६॥

—(अथर्ववेद ६, ८७-८८)

हे राजा, राष्ट्राच्या हितासाठी आम्ही तुझी निवड करून तुला जनतेपुढे आणले आहे, तर आता येथे ह्याच राज्यावर अगदी ठामपणे स्थिर रहा कोणतीहि चलबिचल होऊ देऊ नकोस तुझ्या सर्व प्रजाजनाना तूच राज्यावर पाहिजे आहेस असे वाटो, आणि तुझ्यावरील निष्ठेपासून तुझे प्रजाजन कधीहि न ढळोत येथच ठामपणे रहा केसाइतकासुद्धा कर्तव्यापासून ढळू नकोस, पर्वताप्रमाणे पक्का स्थिर रहा, इद्राप्रमाणे दृढ व अढळ रहा आणि राष्ट्राचे धारण व पोषण कर निश्चित विधानाने ठरलेला हविर्भाग अर्पण केल्यामुळेच इद्राने ह्या राजाला राज्यावर पक्केपणी स्थिर केले त्याला सोमानेही समति दिली आणि ब्रह्मणस्पतीनेही अनुमति दिली हे तारकामडित आकाश जसे स्थिर आहे, जशी पृथ्वी देखील ध्रुवाभिमुखच आहे आणि तिच्यावरील पर्वतहि जसे अचल आहत किंबहुना हे सर्व जगत् देखील जसे निश्चित टिकणारे आहे, तसाच हा राजा देखील राज्यावर टिकून राहो हे राजा, तुझ्या हितासाठी राजा वरुणहि ठाम उभा राहिला आहे तसाच बृहस्पतिदेवहि अगदी सज्ज आहे, म्हणून इद्र आणि अग्नि देखील तुझे राष्ट्र टिकवून धरोत पदभ्रष्ट न होता राज्यपदावर चिरकाल टिकून रहा शत्रूचे विमर्दन करून त्याना पार बुडवून टाक सर्व दिशा प्रसन्न असोत, (म्हणजे सर्व बाजूनी तुझ्या राज्यपदाच्या सबंधात तुला एकमताचा पाठिबा असो ) व या राजपदावर समिति तुला दीर्घकाल स्थिर करो ऋग्वेदाच्या दहाव्या मडलातील १७३ वे सूक्त म्हणजे थोडचा फार फरकाने हेच असून त्यात पुढील ऋचा अधिक आहे ती अशी:-

ध्रुव ध्रुवेण हविषाभि सोम मृशामसि ।
अथो त इद्र केवलीर्विशो बलिहृतस्करत् ॥
—(ऋग्वेद १०-१७३-६)

(स्थैर्यप्रद हविर्भाग स्थिरप्रसाद सोमाला अर्पण करून त्याला प्रसन्न करू म्हणजे इद्र हा असे करील की तुझे एकनिष्ठ प्रजाजन तुलाच सतत करभार देत राहतील ) या ऋचेत शेवटी "तूच

केवळ लोकाजवळून कर घेणारा (बलिहृत्) आहेस" असे जे म्हटले आहे त्याचे महत्त्व विशद करताना डॉ जयस्वाल म्हणतात:

"The 'sole-taker' signifies that the regular tax, as a royal due, had already developed No one else but the king alone was entitled to it The king is asked to ascend a raised seat which is significantly described as the highest point of the body of state It shows that the idea of state as organism is realised as early as the Vedic Kingship"

('बलिहृत्' या शब्दावरून नियमित करपद्धति विकसित झाली होती हे स्पष्टच दिसते राजाच हे करग्रहण करीत असे राजा म्हणजे अर्थातच राज्यसस्था राज्यसस्थेत राजपद हे सर्वश्रेष्ठ असतेच याचा अर्थ असा की वेदकाली राज्यसघटनेची कल्पना परिपूर्ण होती ) वैदिक लोक भटके व रानटी होते असा अभिप्राय व्यक्त करणाऱ्या लोकानी डॉ जयस्वाल याच्या या विवेचनाकडे लक्ष देणे आवश्यक आहे

असो राजाची निवड करणारी जी सस्था असे तिला समिति असे म्हणत. समिति (National Assembly or Parliament), सभा (National Judicature) व विदथ (Association for Military and Religious functions) या तीन लोकसस्थाच्या वतीने वैदिक राष्ट्राचे जीवन नियत्रित केले होते या तीन संस्थाची स्वरूपे पाहिली तर पार्लमेटरी डेमॉक्रसीची बीजे प्राचीन भारतीय राष्ट्रात कशी विकसित झाली होती याची कल्पना येईल

राजाची निवडणूक होत असे असे म्हटल्यावर त्याला काढण्याचा लोकाना अधिकार होता काय व वेदवाङमयात तसे काही स्पष्ट निर्णायक उल्लेख आढळतात काय असा प्रश्न स्वाभाविकपणेच उत्पन्न होईल त्याकडे पुढच्या व्याख्यानात वळू

✦ ✦ ✦

## व्याख्यान १० वे

# वैदिक राजसत्तेचें स्वरूप

राज्यसस्था ही सघर्षमय जीवनात सरक्षणाची आवश्यकता पटल्यामुळे निर्माण झाली असे विधान मी मागच्या व्याख्यानात केले आहे व वेदवाङमयात देवासुरसग्रामाच्या रूपाने हा सिद्धान्त माडलेला असल्याचेही तेथेच दाखवून दिले आहे ज्या ऐतरेय ब्राह्मणातील उताऱ्याच्या आधाराने मी हे दिग्दर्शन केले, तेथे असे म्हटले आहे की, देवासुराच्या सग्रामात देवाचा नित्य पराभव होई म्हणून देवानी राज्यसस्थेची निर्मिति केली. त्यावर डॉ जयस्वाल यानी आपले असे अनुमान बसविले आहे की, If it has a historical reference, it would refer to the tribal stage of the Aryans in India and it would suggest that the institution of kingship was borrowed from the Dravidians

(जर या कथेत एखाद्या प्राचीन ऐतिहासिक घटनेचा सदर्भ असेल तर आर्याचा भटक्या टोळ्याच्या अवस्थेत भारतात प्रवेश झाला त्या काळची ही घटना असावी असे अनुमान करता येईल. व त्यापासून असे दुसरेही अनुमान करता येईल की राज्यसस्थेची उसनवारी आर्यानी द्रविडापासून केलेली आहे.) पण जयस्वाल याचे हे अनुमान केवळ काही अपरीक्षित गृहीत कृत्यावर बसविलेले व म्हणूनच आधारहीन आहे आर्य नावाचा भटक्या टोळ्याचा लोकसघ बाहेरून भारतात आला ही कल्पना किती आधारहीन व चुकीची आहे आणि द्रविड सस्कृति नावाच्या स्वतत्र सस्कृतीच्या अस्तित्वाचे सारेच पुरावे कसे बिनबुडी तर्काचे बुडबुड आहेत हे प्रस्तुत ग्रथाच्या पूर्वार्धात मी दाखवून दिलेलेच आहे. देव व असुर हे वेदवाङमयात येणारे शब्द हे मानवेतर उच्च योनिविशेषाचे

वाचक असून असुर या शब्दाचा वास्तविक अर्थ काय याचेहि विवेचन मी पूर्वार्धात केलेलेच आहे असुर म्हणजे द्रविड ही कल्पनाच आधी असिद्ध असल्यामुळे उसनवारीचे प्रमेय सिद्ध होण्या-सारखे नाही If व But इत्यादि शब्दाचा उपयोग करून डॉ. जयस्वाल यानीही या संबधात विशेष आग्रह नसल्याचेच व्यक्त केले असल्यामुळे आम्हीही त्या संबधात अधिक तपशिलात पडत नाही हे एवढे म्हटले ते मुद्दा डॉ जयस्वाल याच्यासारख्या ख्याति पावलेल्या पडितानी जाता जाता केलेल्या पुसट विधानाचाही इतरेजन सिद्ध झालेले प्रमेय म्हणून उपयोग करू लागतात, ते तसे न व्हावे म्हणूनच होय

असो हिंदू राज्यपद्धतीला contractual Monarchy (करारा-धिष्ठित राजसत्ता) असे म्हणता येईल व तो करार तपश्विसस्था, जनता व राजा याच्यातील आहे याचा उल्लेख मागच्या व्याख्या-नात केलेलाच आहे भारतात वेदकाळानतर दृष्टोत्पत्तीस येणाऱ्या वाशिक राजसत्तेच्या प्रतिष्ठापनानतरहि राजाला राज्यपदावर विशिष्ट समारभाने सत्कारपूर्वक बसावे लागणे व त्यावेळी विशिष्ट प्रतिज्ञा अथवा शपथ घ्यावी लागणे या गोष्टी या प्राचीन निवडणूक व करार पद्धतीच्याच खुणा होत वाशिक राजसत्तेच्या काळातही विशिष्ट अडचणीच्या प्रसगी या निवडणूक पद्धतीचा अवलंब करण्यात येत असे. वस्तुत मेगॉस्थेनिसच्या काळी वाशिक राजसत्ता प्रस्थापित झाली होती तरीहि भारताचे वर्णन करताना तो म्हणतो की, 'When a failure of heirs occurred in the royal house, the Indinas elected their sovereign on the principle of merit ' (ज्या वेळी राजवशात वारसा चालणे असभवनीय दिसे त्या वेळी भारतीय लोक आपला राजा योग्यतेच्या निकषावर निवडीत असत ) बौद्धाच्या जातककथातून तर पशूच्या कथामध्येमुद्धा निवडणूक असल्याचे काल्पनिक वर्णन आहे अशी ही लोककथामधून आढळणारी वर्णने जनतेच्या राजा निवडण्याच्या अधिकाराची जाणीव राष्ट्रजीवनात कशी भरून राहिलेली होती

या गोष्टीची निदर्शकच होत निवडणूक म्हटले की ती करणाऱ्याच्या हाती सत्ताधिप अयोग्य वाटल्यास त्याला पदच्युत करणे, नव्या सत्ताधिपाची त्या जागी प्रतिष्ठापना करणे, एकदा पदच्युत केलेल्या राजाला पुन्हा सिंहासनावर आणणे इत्यादि अधिकार असावे लागतात असे अधिकार लोकांच्या हाती असल्याचे पुरावे वेद-वाङमयातून उद्गाराच्या रूपाने आढळतात अयोग्य राजाला पदच्युत करून पुन्हा फेरनिवडणुकीत निवडून दिल्याचे दाखविणारा अथर्ववेदातील पुढील मत्र पहा —

'त्वा विशो वृणती राज्याय त्वामिमा प्रदिश पञ्चदेवी ।
वर्ष्मन् राष्ट्रस्य ककुदिश्रमस्य ततो न उग्रो विभजा वसूनि ।।
– अथर्ववेद ३, ४ २

(लोकानी तुला या पदावर पुन्हा निवडून दिले खूप लोकानी तुझे नेतृत्व मान्य केले राज्ययत्रातील या सर्वोच्च स्थानी रहा आणि हृदय उघडून धनाची योग्य विभागणी कर ) अयोग्य वाटणाऱ्या राजाला काढून लावून पुन्हा प्रजानी त्याला बोलाविल्याचे पुढील वर्णन पहा —

'श्येनो हव्य नयत्वा परस्मादन्यक्षेत्रे अपरुद्ध चरन्तम् ।
अश्विना पन्था कृणुता सुगत इम स जाता अभि सविशध्वम् ।।
– अथर्ववेद ३. ३. ४

(विजनवासात भटकणाऱ्या या राजाला श्येन घेऊन येईल अश्विनी तुझ्यासाठी मार्ग तयार करतील सर्व आप्त जवळ येतील विरोधक बोलावतील, मित्र पुन्हा तुझीच निवड करतील ) अशा तऱ्हेने पदच्युत करून पुन्हा ज्याला त्याच पदावर आणण्यात येई, त्याला आपल्याला निवडून देणाऱ्याशी प्रथम कर्तव्यपालनाचा करार करावा लागे अथर्ववेदात म्हटले आहे –

इन्द्रेन्द्र मनुष्या परेहि सह्यज्ञास्था वरुणै सयिदान ।
स त्वा या भव्हत् स्वे स्वधस्थे स देवान् यथात स उ कल्पयाद्विश. ।।
– अथर्ववेद ३. ४. ६

(पुन्हा जनतेत ये कारण तुझी व तुला निवडून देणाऱ्या प्रजेची मते जुळली आहेत ) सामान्यत असे प्रसग फार कमी येत अयोग्य

व अरेराव न ठरल्यास एकदा केलेली राजाची निवड त्याच्या जीवितापर्यंत असे असे अथर्ववेदात म्हटले आहे – 'दशमीमुग्र सुमनावरोह ॥' – (अथर्ववेद ३ ४ ७) (तू दहाव्या अवस्थेपर्यंत राज्य कर )

वैदिक राज्यपद्धतीत राजपदग्रहण हा करार व संस्कार होता याचा उल्लेख केलाच आहे या संस्काराचे संपूर्ण वर्णन तपासले म्हणजे प्रजातंत्रवादाच्या बीजाचे सम्यक्‌दर्शन घडते ब्राह्मण ग्रंथातून राज्याभिषेक संस्काराचे वर्णन विस्तृत स्वरूपात आढळते ब्राह्मण-ग्रंथातून राज्याभिषेकाचे जे विधि आढळतात तेच अगदी अलीकडच्या काळापर्यंत म्हणजे ब्रिटिश राजवटीतील संस्थानिकाच्या तथाकथित राज्याभिषेकापर्यंत तसेच आचारात होते संहिता व ब्राह्मण या ग्रंथात वेदकालीन वस्तुस्थिति समजावून घेण्याच्या दृष्टीने मी काहीच भेद करीत नाही याचा उल्लेख मी पहिल्याच व्याख्यानात केलेला आहे तरी पण प्रथम आपण संहितेतील राज्याभिषेकाचे स्वरूप पाहून नंतर ब्राह्मणग्रंथातील वर्णनाकडे वळू संहितेतील राज्याभिषेक विधीचे स्वरूप पुढीलप्रमाणे आहे – नवा राजा राज्य सिंहासनावर बसल्यावर जमलेले लोक व 'राज्यकर्ते' (म्हणजे राज्यातील वरिष्ठ जागावरचे अधिकारी अथवा मंत्री) हे त्याला त्याच्या पदाधिकाराचे चिन्ह म्हणून 'मणि' (ही राजाला द्याव-याची दंडासारखी वस्तु असावी मणि हे तिचे पारिभाषिक नाव आहे ती पळसाच्या काष्ठाची बनवलेली असे.) देत असत ज्याना 'राज्य-कर्ते' असे म्हणत ते वरिष्ठाधिकारी म्हणजे कोषाध्यक्ष, सेनापति, ग्रामणी अथवा खेडे विभागाचा मुख्याधिकारी व इतर असत या 'राज्यकर्त्यांमधूनच एकाला राजा करण्यात येत असे या राज्यकर्त्यांना पुढे 'रत्निन्'अशी संज्ञा प्राप्त झाली आहे कारण अधिकारप्रदानाचे निदर्शक असणारा मणि अथवा रत्न राजाला या लोकाकडूनच घ्यावे लागे. रामायण काळापर्यंत हे 'राज्यकर्ते' असल्याचा उल्लेख आढळतो. त्याची ही पदवी सार्थही होती कारण राजा याच्यापैकीच कोणी एक होई व त्याला हेच विधीप्रमाणे अधिकारप्रदानाचे चिन्ह

असलेला 'मणि' देत वस्तुत हे जे 'मणि' देत तेसुद्धा सर्व प्रजाचे प्रतिनिधि म्हणूनच देत असत कारण मुळात हा 'मणि' रथकार, कारागीर यापासून तर सर्वत्र प्रजाजनाकडून घ्यावयाचा असे असा उल्लेख आहे वेदसंहितेत असणाऱ्या या राज्याधिकार-ग्रहणाच्या विधाच्या वर्णनात मणि ग्रहण करते वेळी राजाच्या तोंडी असलेला मंत्र या दृष्टीने अतिशय उद्बोधक आहे तो असा –

> ये धीवानो रथकारा कर्मारा ये मनीषिण ।
> उपस्तीन् पर्ण मह्यं त्वं सर्वान् कृण्वभितो जनान् ।।
> ये राजानो राजकृत सूता ग्रामण्यश्च ये ।
> उपस्तीन् पर्ण मह्यं त्वं सर्वान् कृण्वभितो जनान् ।।
>
> – अथर्ववेद ३ ५. ६–७.

(हे कुशल रथकारानो व धातूच्या कारागिरानो, हे शिल्प-कुशलानो, व सर्व बुद्धिमान लोकानो, हा मणि (पर्ण) देऊन मला साह्य करा हे राजानो व राज्यकर्त्यानो, हे सूतानो व ग्रामणीनो, मला साह्य करा हे पर्णा, या सर्व उपस्थिताचे साह्य मला मिळवून दे ) सर्वच प्रजाजनाजवळून हे अधिकार ग्रहण करण्याची शक्यता नसल्यामुळे त्याचे प्रतिनिधि जे राज्यकर्ते त्याच्याजवळून ते घेत असत राजसत्ता ही सर्वप्रभुत्वनिदर्शक शक्तीची द्योतक असल्यामुळे राज्यसिंहासन सिंह, व्याघ्र अथवा अगावर चित्र-विचित्र रंगाचे ठिपके असलेल्या चित्त्याच्या कातड्याने मढविलेले असे राजसिंहासन केवढ्याहि मोलाच्या रत्नानी मढविलेले व सोन्याचेच तयार केलेले असले तरी ते या कातड्याने आच्छादिलेले असावेच लागे त्याच्यावर अनेक प्रकारची अधिकार-निदर्शक चिन्हे असत या सिंह अथवा व्याघ्र चर्मावर राजाने आरोहण करावयाच्या वेळी म्हणण्यात येणारा मंत्र असा आहे की –

> व्याघ्रो अधिवैयाघ्रे विक्रमस्व दिशो मही ।
> विशस्त्वा सर्वा वाञ्छन्तु ।। अथर्व ४ ८ ४.

(या व्याघ्रचर्मावर आरोहण करणारा तू मनुष्यामधील व्याघ्र आहेस. आपल्या पराक्रमाने दशदिशा जिंकून पृथ्वीवर निरपवाद

विजय संपादन कर, व आपल्या सर्व प्रजाजनांना सर्वदा प्रिय होऊन रहा ) या सिंहासनावर आरोहण केल्यानंतर पुढील मंत्र म्हणून राजाला पवित्र जलाचा अभिषेक करीत –

तासां त्वा सर्वासामपामभिषिञ्चामि वर्चसा ।
अभि त्वावर्चसा सिञ्चन्ननापो दिव्या पयस्वती ।।

– अथर्ववेद ४ ८ ५–६

(या जलाने मी तुला सर्व बाजूंनी अभिषेक करतो या दिव्य, फलप्रद अशा जलाभिषेकाने तुला सफलता प्राप्त होवो ) राजाला त्याच्या कर्तव्याचे परिज्ञान या अभिषेकाच्या वेळीच पुढील मंत्राने करून देण्यात येई तो मंत्र असा "अधा मनो वसु देयाय कृणुष्व ततो न उग्रो विभजा वसूनि ।।" अथर्ववेद ३ ४ ६ (आपले लक्ष्य राष्ट्राचे उत्पादनसामर्थ्य वाढविण्यावर केन्द्रित करून ते संपन्न करणे व संपत्तीचे योग्य वाटप करून प्रजांचे जीवन समृद्ध व सुखी करणे हे जे तुझे प्रधान कर्तव्य ते तू योग्य रीतीने पार पाड ) वेदकाळी समृद्ध राज्याचे हे लक्षण किती सर्वमान्य झाले होते याची साक्ष देणारे उतारे संहिताग्रंथातूनही आढळतात. अथर्ववेद संहितेत कुरूंचा राजा जो परीक्षित त्याचे केलेले पुढील हृदयंगम वर्णन पहा हे वर्णन काव्य म्हणूनहि श्रेष्ठ श्रेणीचे आहे ते असे --

राज्ञो विश्वजनीनस्य यो देवो मर्त्यं अति ।
वैश्वानरस्य सुष्टुतिमा शृणोता परीक्षितः ।।
कतरत् त आहराणि दधिमन्थं परिश्रुतम् ।
जायापतिं विपृच्छति राष्ट्रे राज्ञ परीक्षित ।।
अभीव स्व प्रजिहीते यव पक्व परो विलम् ।
जन संभद्रमेधते राष्ट्रे राज्ञ परीक्षित ।।

– अथर्ववेद २० १२७ (३) ७–१०

सर्वांचे पालन करणाऱ्या सर्वश्रेष्ठ राजा परीक्षितीचे हे वर्णन एका राजा परीक्षितीच्या राज्यात तहानलेला पति घरी परत येताच पत्नी त्याला विचारते की मी आपल्यासाठी दही, ताक,

लोणी अथवा अन्य तुम्हाला आवडणारे कोणते पेय आणू ? (तहानलेल्या नवऱ्याला कोरे पाणी देण्याची दरिद्री कल्पना समृद्ध गृहजीवनाच्या त्या धनिणीला सुचण्याची शक्यताच नाही असा भावार्थ ) परीक्षितीच्या राज्यात सर्व लोक सुखी व समृद्ध जीवन जगत आहेत

याप्रमाणे संहिता वाङमयातूनही सूत्ररूपाने वैशिष्ट्यपूर्ण वैदिक राज्यपद्धतीची कल्पना येण्यासारखी आहे तरी पण तिच्या स्वरूपाचे खरे आकलन व्हावयास ब्राह्मणग्रंथाकडेच दृष्टि वळविली पाहिजे.

ब्राह्मण ग्रंथाप्रमाणे अभिषेकसंस्काराचे जे स्वरूप आहे ते यज्ञविधीशी संबद्ध आहे राजा, सम्राट् व तपस्विसंस्थेचा प्रतिनिधि म्हणून पुरोहित हे तिन्ही लोकनेते आपआपल्या पदावर अधिष्ठित होताना त्याना तीन यज्ञ करावे लागत त्यापैकी राजपदावर अधिष्ठित होताना जो यज्ञ करावा लागे, त्याला राजसूय असे म्हणत असत. महाभारतातील युधिष्ठिराच्या राजसूयाचं वर्णन वाचले तर त्या काळी तो राजाच्याही राजाचा म्हणजे चक्रवर्तीचा यज्ञ झाला होता असे दिसते पण ब्राह्मण ग्रंथानुसार हा राजाने करावयाचा अनिवार्य विधि दिसतो शतपथ ब्राह्मणात म्हटले आहे की ' राज्ञ एव राजसूयम् । राजा वै राजसूयेनेष्ट्वा भवति ।। ' (शतपथ ब्राह्मण. ५ १ १. १२)

(राजसूय यज्ञ हा राजानेच करावयाचा आहे कारण की जो राजसूय यज्ञ करील तोच राजा होऊ शकतो ) पुरोहिताची नियुक्ति करताना वाजपेय यज्ञ करीत वाजपेय यज्ञाचे फळ वैयक्तिक नसून सामाजिक आहे. व ते पारलौकिक नसून इहलौकिक आहे राष्ट्राचे जीवन अन्नधान्याने समृद्ध करणे हे वाजपेयाचे फळ आहे तपस्विसंस्थेचा प्रतिनिधि असलेल्या पुरोहिताचे, राज्यसंस्थेच्या द्वारे या बाबतीत काय करण्यात येते हे पाहणे, व त्या संस्थेला या संबधात वारवार मार्गदर्शन करणे व प्रेरणा देणे हें कार्यच आहे, म्हणून पुरोहित पदग्रहणाचा वाजपेयाशी संबध आहे. तिसरा सर्वमेध नावाचा यज्ञ सर्व राजाना जिकून जो

चक्रवर्ती अथवा सम्राट् होई त्यानेच करावयाचा असे सर्व वेद-यज्ञाच्या या विधानावरूनच असे सिद्ध होते की, संपूर्ण भारतात एकछत्री राज्य असण्याची कल्पना वेदकाळी अस्तित्वात होती असो राजसूयाचे तीन विधि असत त्यातील पहिला विभाग म्हणजे होमहवन, दुसरा अभिषेचनीय अथवा राज्याभिषेक समारंभ आणि तिसरा विभाग म्हणजे पदग्रहण होय पदग्रहण वैदिक समितीने नियुक्त केलेल्या अकरा अधिकाऱ्याकडून होत असे हे जे अकरा अधिकारी, त्यानाच राज्यकर्ते अथवा रत्नी म्हणत असत याचा उल्लेख मागे केलाच आहे त्यातील पहिला जो अधिकारी तो म्हणजे पुरोहित होय हे रत्निमंडळाचे अकरा अधिकारी पुढीलप्रमाणे असत (१) पुरोहित (२) सेनापति (३) राणी (४) सूत (५) ग्रामणी (६) छत्री (७) संगृहित्री (८) भागदुघ (९) अक्षवाप (१०) गोविकर्त्रिन् (११) पालगल अथवा तक्षा यापैकी एकेका अधिकाऱ्याचे स्वरूप आपण पाहू

(१) **पुरोहित** -- पुरोहित सर्व विद्यात निष्णात असून अथर्व-विद्या व दंडनीति ( Administration by justice and political science ) यात अत्यंत निष्णात असावा लागे कौटिल्य आपल्या राज्यशास्त्रात म्हणतात, 'पुरोहित उदितोदितकुलशील षडङ्गे वेदे दैवे निमित्ते दंडनीत्या च अभिविनीत आपदा दैव मानुषीणा अथर्वभि उपायै च प्रतिकर्तार कुर्वीत तमाचार्य शिष्य पितर पुत्रो भृत्य: स्वामिनमिव चानुवर्तेत " ( ज्याचे कुलशील विख्यात आहे, षडंग वेद, दैवी व नैमित्तिक कर्मशास्त्रात कुशल, राज्य-शास्त्रात पंडित, दैवी व मनुष्यकृत आपत्तीचा अथर्ववेदोक्त मंत्रानी व व्यावहारिक युक्तीनी प्रतिकार करणारा असा जो असेल त्याला राजाने आपला पुरोहित करावा, व शिष्य ज्याप्रमाणे गुरूला, पुत्र ज्याप्रमाणे पित्याला, नोकर ज्याप्रमाणे आपल्या मालकाला, त्याप्रमाणे राजाने त्याला सन्मान देऊन सर्व प्रकारे त्याच्या मार्गदर्शनानुसार वागावे ) हल्ली पुरोहित शब्दाचा जो हास्यास्पद अर्थ झालेला आहे तो भारतीय राज्यशास्त्रावरील

वाङमयात या शब्दाला नाही पुरोहित म्हणजे वस्तुत राज्य-सस्थेचे मार्गदर्शन करणारा, राष्ट्रकार्यधुरधर असा पुढारी होय शुक्ल यजुर्वेद महिनेच्या नवव्या अध्यायातील व अकराव्या अध्यायातील उल्लेखावरून पुरोहिताचे राज्यसस्थेमधील महत्त्व ध्यानात येते नवव्या अध्यायाच्या तेविसाव्या मत्रात पुरोहित घोषणा करतात, 'वय राष्ट्रे जागृयाम पुरोहिता ।' (आम्ही पुढारी होऊन राष्ट्रकल्याणार्थ सदैव सावध राहू )आपली राष्ट्ररूपी नौका प्रगतिपथावर आहे की अवनतीच्या वादळात सापडण्याचा सभव आहे यासबधीची काळजी वेदकाळचे ब्राह्मण पुरोहित अहर्निश करीत व राष्ट्रपरिपालनाचे कार्य करीत असलेल्या राजाला योग्य ते मार्गदर्शन करून त्याची राष्ट्रनियत्रणशक्ति नेहमी कार्यक्षम राहील अशी खटपट करीत शुक्ल यजुर्वेदात पुरोहित आत्म-विश्वासाने म्हणतो, "सशित मे ब्रह्म सशित वीर्य बलम्। सशित क्षत्र जिष्णु यस्याहमस्मि पुरोहित ॥" (शुक्ल यजु अ ११-८१) शास्त्रशुद्ध आचरणाने आपले ब्रह्मतेज मी अत्यत तीक्ष्ण व कडकडीत राखले आहे मी आपले शरीरसामर्थ्य व सर्व इद्रियाच्या शक्ति सतत कार्यक्षम ठेवल्या आहेत इतकेच नव्हे तर ज्या राजाचा मी पुरोहित आहे त्या राजाचे जयशाली असणारे क्षात्र-तेज मी अत्यत तीव्रतेने वृद्धिगत केले आहे. ) याच्या पुढच्याच ऋचेत पुरोहित म्हणतो, 'उदेषा बाहू अतिरमुद् वर्चो अथो बलम् । क्षिणोमि ब्रह्मणाऽमित्रानुन्नयामि स्वामहम् ॥' (स्वराष्ट्र सरक्षणा-साठी राष्ट्रातील वीर पुरुषाचे बाहू जेणेकरून सदेव उभारलेले असतील अशी परिस्थिति मी निर्माण केली आहे माझ्या राष्ट्रातील वीराच्या मुखावरील वीरश्री व त्याचे शरीरबल ही मी अत्यत उज्ज्वल करून सोडली आहेत माझ्या राष्ट्राविरुद्ध असलेल्या शत्रूना मी मुत्सद्दीपणाच्या धोरणाने क्षीण करून टाकीन आणि माझ्या राष्ट्रबाधवाना मी उत्कर्षाच्या शिखरावर नेऊन पोहोचवीन. पुरोहित म्हणजे काय हे यावरून स्पष्ट होण्यासारखे आहे. हे पुरोहिताचे महत्त्व ऋग्वेदकाळीहि वैदिक द्रष्टयाच्या पूर्णपणे

ध्यानात आले होते देवाचा पुरोहित जो बृहस्पति, त्याच्या स्तुति-स्तोत्राच्या मिषाने पुरोहित संस्थविषयीचा आदर ऋग्वेदाने पुढील-प्रमाणे व्यक्त केला आहे "स: इत् राजा प्रतिऽजन्यानि विश्वा शुष्मेण तस्थौ अभि वीर्येण। बृहस्पतिम् य: सुऽभृतम् बिभर्ति वल्गुऽयति वन्दते पूर्वऽभाजम् ॥७॥ स इत् क्षेति सुऽधित ओकसि स्वे तस्मै इळा पिन्वते विश्वऽदानीम्। तस्मै विश स्वयम् एव नमन्ते यस्मिन् ब्रह्मा राजनि पूर्व एति॥ अप्रतिऽइत जयति सम् धनानि प्रतिऽजन्यानि उत या सऽजन्या। अवस्यवे य वरिव। कृणोति ब्रह्मण राजा तमवन्ति देवा ॥९॥" (जो भव्याकृति बृहस्पतीला भक्तिरसान पूर्णपणे भरून स्तुतिकुसुमानी अलकृत करून त्याच्या चरणी लीन होतो तोच सत्ताधारी राजा होतो आणि आपल्या एकदर प्रतिस्पर्ध्याना धाकाने आणि पराक्रमाने पादाक्रात करून राज्य करतो (७) ज्या राजाच्या येथें ब्रह्मवेत्त्या व सत्पुरुष अशा पुरोहिताला मान मिळतो तोच आपल्या स्वत च्या राजगृहात सुखासमाधानाने नादतो त्याच्याकरिता अन्नदात्री पृथ्वी निरतर धान्यानी समृद्ध होते आणि त्याच्याचपुढे प्रजाजन आपण होऊन नम्र होतात अशा राजाचे सामर्थ्य अप्रतिहत होऊन तो शत्रूची धनसपत्ति जिकून घेऊ शकतो त्याला आपल्या स्वजनानाहि आप-ल्याच तत्राने वागविता येते देव त्याच्यावर कृपाच करतात ९ (ऋग्वेद म. ४ ५०) ऋग्वेदाचा परिसर श्रुतबधु, कवश, प्रियमेध, भरद्वाज, वामदेव, कक्षीवान् इत्यादि पुरोहिताच्या कर्तृत्वाने निनादित झालेला असून त्यातील वसिष्ठाचा प्रभाव तर नेत्र स्तिमित करणारा आहे. तृत्सु अथवा भरतसघाचा राजा शत्रूकडून पराभूत होऊन अनन्यगतिक झाला होता त्याच्या साऱ्या सपत्तीची वाताहत होऊन प्रजेची अत्यत दुर्दशा झाली होती अशा स्थितीत वसिष्ठानी त्याला आधार देऊन त्याच्या राष्ट्राचे वैभवशाली पुनरुत्थान घडवून आणले. वसिष्ठाची सर्वात महत्त्वाची कामगिरी म्हणजे दाशराज्ञ युद्धात त्यानी सुदासाचे केलेले सरक्षण होय ही घटना आजच्या पजाब प्रातात घडलेली आहे राजा सुदासानें

आपले पुरोहित ऋषि विश्वामित्र याच्या प्रेरणेने अश्वमेध यज्ञ करून अनेक राजाना जिकले व अपमानित केले त्या सर्व राजानी सुदासाविरुद्ध एक मोठा कट केला त्या कटात समाविष्ट असणाऱ्या तुर्वश, पुरु, कविचायमान, वैकर्ण इत्यादि बलाढ्य राजाची नावे पाहून त्याची स्वारी म्हणजे आपल्या सर्वनाशाचाच प्रसग होय हे सुदासाने ओळखले व या वेळी आपद्ग्रस्त तृत्सूना वाचविणाऱ्या महर्षि वसिष्ठाची आपण कास धरली तरच वाचू शकू असे त्याला वाटू लागले त्याने आपले पौरोहित्य वसिष्ठाना समर्पण केले. दहा राजाच्या स्वारीची वावटळ वसिष्ठानी आपल्या अपूर्व बुद्धि-मत्तेने दूर सारली व सुदासाला निर्विवाद विजय प्राप्त करून दिला ऋग्वेदाने या घटनेचे मोठे उत्कृष्ट व अलकारिक वर्णन केले आहे ऋग्वेद म्हणतो, "एवेन्नु क दाशराज्ञे सुदास प्रावदिन्द्रो ब्रह्मणा वो वसिष्ठा " (७-३३-३) (हे वसिष्ठ हो ! याप्रमाणे दाशराज्ञ युद्धात इंद्राने सुदास राजाचे रक्षण केले तो तुमच्या मत्र-सामर्थ्याचा प्रभाव होय !) दोन्ही सैन्याच्या बलाबलाचा विचार करता ही केवढी अशक्य गोष्ट होती हे ऋग्वेदाने पुढील वाक्यानें सुचविले आहे "सिह्य चित्पेत्वेना जघान" (७-१८-१७) शेळीने सिहाची शिकार मारली कौटिल्यासारख्या राज्यशास्त्रज्ञाने पुरोहिताचे महत्त्व वर्णन करण्याचे कारण यावरून स्पष्ट झाल्या-विना राहणार नाही

( २ ) **सेनापति** – सेनानी अथवा सेनापति हा रत्नी अथवा राज्यकर्त्या मडळातील दुसरा महत्त्वाचा अधिकारी होय 'सर्व-युद्धप्रहरणविद्याविनीत ' म्हणजे युद्धशास्त्र व शस्त्रविद्या याचे अत्यत सूक्ष्मज्ञान असलेला, असे कौटिल्याने याचे लक्षण केलेले आहे सेना हे राज्याचे खरे सामर्थ्य होय त्यामुळे सेनाधिपतीनें राजाचे सपूर्ण नेतृत्व समत करणे हे सर्वात अधिक महत्त्वाचें होय वैदिक राष्ट्रातील शस्त्रास्त्रविद्या व युद्धशास्त्र याचें विवेचन करताना सेनापतीचे दायित्व व राज्यसस्थेतील महत्त्व पुढे स्पष्ट होणारच असल्यामुळे येथे त्याचा विस्तार करीत नाही. सेनापति हे राज्यसस्थेचें प्राणरूप अग होय येवढे सागितलें म्हणजे पुरे

( ३ ) **महिषी अथवा राणी** – महिषी अथवा राणीचा रत्नि-मंडळात समावेश असून पदग्रहणाच्या वेळी पुरोहित, सेनापति इत्यादिकाप्रमाणेच तिच्या संमतीचाही भाग असल्यामुळे राणी म्हणजे केवळ राजाची बायको असा साधा अर्थ नाही हे सहजच ध्यानात येईल राजाला स्त्रिया पुष्कळ असत पण राज्ञीपद त्यापैकी एकीच्याच वाट्याला येई, व हे सूचित करण्यासाठीच पुढे संस्कृत साहित्यात पट्टमहिषी, पट्टराज्ञी असे शब्द रूढ झाले आहेत पट्टराणी हीच राज्याची राणी होय तिच्याशिवाय राजा हा अपूर्ण आहे राज्यारोहणाच्या वेळी आवश्यक असलेला राजसूय यज्ञ पत्नीविना होऊ शकत नाही राणीला राज्ञीपदावर यावयास अभिषेक संस्कार राजाबरोबरच होत असे महाभारतात युधिष्ठिराच्या राज्याभिषेकाचे पुढीलप्रमाणे वर्णन आहे –

> दाशार्हेणाभ्यनुज्ञात तत्र धौम्य पुरोहित ।
> प्रागुदक्प्रवणे वेदी लक्षणेनोपलिख्य च ।। १२ ।।
> व्याघ्रचर्मोत्तरे शुक्ले सर्वतोभद्र आसने ।
> दृढपादप्रतिष्ठाने हुताशनसमत्विषि ।। १३ ।।
> उपवेश्य महात्मान कृष्णा च द्रुपदात्मजाम् ।
> जुहाव पावक धीमान्विधिमत्रपुरस्कृतम् ।। १४ ।।
> तत उत्थाय दाशार्हः शखमादाय पूजितम् ।
> अभ्यषिञ्चत् पति पृथ्व्या कुन्तीपुत्र युधिष्ठिरम् ।। १५ ।।
>
> महाभारत शातिपर्व, अ ४०

( नतर श्रीकृष्णाच्या अनुमतीने पुरोहित धौम्याने वेदी तयार करून, शुक्ल, व्याघ्रचर्मवेष्टित अशा कल्याणकारक व अग्नीप्रमाणे तेजस्वी आसनावर महात्मा युधिष्ठिर व द्रौपदी याना बसवून विधिपूर्वक होमहवन केले नतर भगवान् श्री-कृष्णाने पाचजन्य शख आपल्या हातात घेऊन त्यातील पाण्याने पृथ्वीपति म्हणून युधिष्ठिराला अभिषेक केला ) यावरून राणी हे संस्कारित असे राज्यातील अधिकार पद ( Official Post )

होते हे स्पष्ट होईल रामचद्रानी सीतेचा जो परित्याग केल तो राणी सीतेचा परित्याग होय प्रजाजनाना राणीपदावर सीत नको होती या पदाचे हे स्वरूप ध्यानात घेतले तर या प्रकरण सबधीचे अनेक वाद आपोआपच निकालात निघतात

(४) **मृत** – आपण सामान्यत मूत म्हणजे राजाच्या स्तुति पाठकापैकी एक असे समजतो पण सूत म्हणजे राज्यशास्त्राप्रमा राज्यातील सर्व बऱ्यावाईट प्राचीन व अर्वाचीन वृत्तान्ताच्य सरक्षण खात्याचा प्रमुख होय अर्थशास्त्रात कौटिल्याने अधिकार म्हणून त्याची गणना केली आहे प्रसिद्ध चिनी प्रवासी युवान च्वा याला हर्षवर्धनाच्या राज्यातील प्रत्येक प्राताबून चागल्या व वाई गोष्टीचे वृत्तान आणि दुर्दैवी व भाग्यशाली घटनाची व्यवस्थित नो ठेवणारे अधिकारी भेटले या सर्व अधिकाऱ्याच्या वरचा ज अधिकारी तोच या रत्निमडळातील सूत होय

(५) **छत्री** – राजाचे छत्र साभाळणारा अधिकारी

(६) **ग्रामणी** – गावे व खेडी याच्या समूहाचा अधिकारी.

(७) **सग्रहित्री** :– म्हणजे कोषाध्यक्ष यालाच कौटिल्या आपल्या अर्थशास्त्रात सनिधात्री असे म्हटले आहे

(८) **भागदूघ्** – राज्यातील महसूल खात्याचा अधिकारी कौटिल्याच्या अथशास्त्रात याला समाहोत्रन् असे नाव आहे.

(९) **अक्षवाप** – अक्षवाप ह्याचा अर्थ टीकाकारानी द्यूतगृहाच अधिकारी असा केलेला आहे द्यूतावर पूर्वी राजसत्तेचे नियत्रण असे व ती राज्यातील उत्पन्नाची एक बाब मानली जात असे हे ख असले तरी या वरील अधिकाऱ्यासारख्या क्षुद्र अधिकाऱ्याला रत्नि अथवा राज्यकर्त्या मडळात स्थान असण्याची यत्किचित्हि शक्यत नाही' अर्थातच या टीकाकाराची **अक्ष** या शब्दावरून ही चुकीच समजूत झालेली दिसते. पण **अक्ष** शब्दाचा ज्याप्रमाणे फास असा अर्थ होतो, त्याचप्रमाणे सख्या मोजण्यासाठी असलेले चिन्ह असाहि त्याचा अर्थ आहे,व तोच येथे विवक्षित आहे. अर्थशास्त्रात कौटिल्याने अक्षशालाचा उल्लेख केलेला असून तेथे सोने, रु

इत्यादि धातूचे मोजमाप करून त्या ताब्यात घेण्यात येत असत कौटिल्याने ज्याला **अक्षपटल** असे नाव दिले आहे त्यालाच वेद-वाङमयात अक्षवाप असे म्हटले आहे हल्लीच्या परिभाषेप्रमाणे अकाउटट जनरल ज्याला म्हणतात तसा हा अधिकारी होय

(१०) **गोविकर्त्रिन्** – हा जगल खात्याचा मुख्याधिकारी श्वापदसंहार हे त्याचे महत्त्वाचे काम असे शिकारी ह्याच्या ताब्यात असत मेगॅस्थेनिसच्या काळीहि हा अत्यंत महत्त्वाचा अधिकारी गणला जात असे

(११) **पालगल**–हा श्रमजीवि वर्गाचा प्रतिनिधी असून सामान्य दूतकर्म करणाऱ्या लोकांवरील अधिकारी होता हा लाल फेटा बांधीत असे असे वर्णन आढळते

या मडळाकडून पदग्रहणाचा विधि होत असे आणि याची अनुमति घेतल्यावर लोकपालाची अनुज्ञा घेण्याचा एक विधि असे त्याप्रमाणे वेगवेगळ्या देवताच्या नावे हविर्भाग अर्पण करण्यात येत राज्यसिंहासन हे धर्मरक्षणार्थ असल्यामुळ वरुणदेवतेला हविर्भाग देणे ही तर सगळ्यात महत्त्वाची गोष्ट होती कारण वरुण ही वेदातील कायद्याची देवता होय अभिषेकापूर्वी होमपूर्वक, सद्गुण-संपादनार्थ उत्साहशक्तीसाठी सवित्याची, कौटुबिक सदगुणासाठी गृहयाग्नीची, स्थावरसरक्षणाच्या सामर्थ्यासाठी सोमाची, बुद्धीसाठी बृहस्पतीची, राज्य करण्याच्या सामर्थ्यासाठी महेन्द्राची, पशुसरक्षण सामर्थ्यासाठी रुद्राची, सत्यासाठी मित्राची व न्याय-सरक्षणाच्या सामर्थ्यासाठी वरुणाची याप्रमाणे देवताची प्रार्थना करण्यात येत असे शतपथ ब्राह्मणाने येथील देवताची स्तुति हे एक रूपक होय असे सागून अग्नि म्हणजे ब्राह्मणवर्ण, इन्द्र म्हणजे क्षात्रवर्ण व पूषा म्हणजे शेष जनता याची या पद्धतीने अनुमति घेऊन नतरच तो स्वत ला राज्याभिषेकास योग्य झाल्याचे समजत असे (तैरनुमत सूयते) असे म्हटले आहे त्यानतर शभर छिद्राच्या सुवर्णकलशाने त्याला पवित्र जलाचा अभिषेक करण्यात यई. देव सद्गुण देतात पण पवित्र जल राजाला पृथ्वीवर राज्य करण्याचा अधिकार देते

अशी समजूत होती शतपथ ब्राह्मणात पाण्याला उद्देशून म्हटले आहे, 'स्वराज्यस्थ राष्ट्रदा राष्ट्रममुष्मै दत्त" (आपल्या राज्यात असलेल्या गृहस्थास राज्य देणाऱ्या हे पवित्र जलानो, तुम्ही या राजाला राज्य द्या.) नतर अगात रेशमी काड घालून राजा व्याघ्र-चर्मावर पाय देऊन किरीट मस्तकावर चढवी त्या वेळी तो राजा झाल्याची पुरोहित घोषणा करी ती घोषणा अशी – 'आविमर्योऽ आवित्तोऽग्निर्गृहपतिरावित्तऽइन्द्रो वृद्धश्रवाऽआवित्तौ मित्रावरुणौ धृतव्रतावावित्त पूषा विश्ववेदाऽआवित्त द्यावापृथिवी विश्वशम्भुवा वावित्तादितिरुरुशर्मा ।" (हा यजमान अखिल राष्ट्राचा अधिपति झाला आहे हे तुम्ही जाणलेच आहे गृहाचा पालक असलेल्या अग्नीने हे जाणले आहे ज्याची कीर्ति एकसारखी वृद्धिगत होत आहे अशा इद्राने हे जाणले आहे कर्तव्यपालनाचे व्रतच ज्यानी चालविले आहे अशा मित्रावरुणानी हे जाणले आहे सर्वज्ञ अशा पूषाने हे जाणले आहे ज्याच्यामुळे सर्व जगाला सुख होते त्या द्यावापृथिवीनी हे जाणले आहे, इतकेच नव्हे तर सर्वांना अत्यत सुखप्रद अशा देवमाता अदितीनेही हे जाणले आहे ) नतर राजा सर्व लोकासमक्ष पुढील प्रतिज्ञा घेई व ही प्रतिज्ञा सामान्य राजा-पासून सम्राटापर्यंत व कोणत्याहि घटनच्या पुरस्कर्त्या ा घ्यावीच लागे त्याशिवाय कोणताहि अभिषेक कधीहि पूर्ण होऊ शकत नसे व राज्यपदाधिष्ठित व्यक्तीचा राजेपणाहि तिच्यावाचून मान्यता पावत नसे ऐतरेय ब्राह्मणात म्हटले आहे की, "स य इच्छेदेववित्क्षत्रियमय सर्वा जितीर्जयेताय सर्वाल्लोकान्विन्देताय सर्वेषा राज्ञा श्रैष्ठ्यमातिष्ठा परमता गच्छेत साम्राज्य भौज्य स्वाराज्य वैराज्य पारमेष्ठ्य राज्य महाराज्यमाधिपत्यमय समन्त-पर्यायी स्यात्सार्वभौम सार्वयुष आऽन्तादापरार्धात्पृथिव्यै समुद्र-पर्यन्ताया एकराडिति तमेतेनैन्द्रेण महाभिषेकेन क्षत्रिय शापयित्वाऽ भिषिचेत् ।। स ब्रूयात् सह श्रद्धया याञ्च रात्रीमजायह याञ्च प्रेतास्मि तदुभयमन्तरेणेष्टापूर्त मे लोक सुकृतमायु प्रजा वृञ्जीथा यदि ते द्रुह्येयमिति ।।" (ज्या कोण्या क्षत्रियाला आपण इहपर-

लोकी सर्वत्र विजयी व्हावे व सर्व राजामध्ये श्रेष्ठस्थान मिळवावें साम्राज्य, भौज्य, स्वाराज्य, वैराज्य इत्यादि वेगवेगळ्या राज्यघटनामधील सर्वश्रेष्ठपद आपणास मिळावे किबहुना आपण आपल्या आयुष्यात या समुद्रवलयाकित पृथ्वीचे एकछत्री सम्राट् व्हावे व ते आपले साम्राज्य जीवनभर टिकावे असे वाटत असेल तर त्या क्षत्रियाकडून पुढील शपथ घेऊन नतरच त्याला अभिषेक करावा ती शपथ त्या क्षत्रियाने श्रद्धेने उच्चारावी ती अशी की, मी जर माझ्या प्रजापालनाच्या कर्तव्यात चुकलो आणि माझ्या हातून प्रजाद्रोह झाला तर ज्या रात्री मी जन्माला आलो व ज्या रात्री मी मरेन तेथपर्यंतच्या जीवनात मी इष्टापूर्तादिकाचे अनुष्ठान करून परलोकाच्या दृष्टीने जे काही पुण्य सपादन केले असेल ते सर्व नष्ट होवो माझी मुलेबाळे इत्यादि नष्ट होऊन माझा सर्वनाश होवो यानतर राजाला अभिषेक करीत असता तपस्विसस्थेचा प्रतिनिधी जो ब्राह्मण पुरोहित तो पुढीलप्रमाणे महत्त्वाची घोषणा करी —

" सोमस्य त्वा द्युम्नेनाभिषिञ्चाम्यग्नेर्भ्राजसा सूर्यस्य वर्चसेन्द्रस्येन्द्रियेण । क्षत्राणा क्षत्रपतिरेध्यति दिद्यून् पाहि ॥१७॥ इम देवाऽअसपत्न सुवध्व महते क्षत्राय महते ज्यैष्ठ्याय महते जानराज्यायेन्द्रस्येन्द्रियाय । इमममुष्य पुत्रममुष्यै पुत्रमस्यै विशऽएषवोऽमी राजा सोमोऽस्माक ब्राह्मणाना राजा ॥१८॥ (हे राजा! चद्राच्या यशाने मी तुला अभिषेक करतो तू क्षत्रियेश्वर हो शत्रूनी तुझ्यावर टाकलेल्या बाणाचे अतिक्रमण करून तू स्वतःच्या शरीराचे रक्षण कर मी अग्नीच्या तेजाने, सूर्याच्या कान्तीने व इद्राच्या सामर्थ्याने तुला अभिषेक करतो हे देवहो! महनीय अशी क्षात्र पदवी, सवमान्य असे सर्वश्रेष्ठत्व, अत्यत विस्तीर्ण असे हे राज्य आणि देवराज इद्राचे सामर्थ्य सपादन करण्याची तुम्ही या राजाला प्रेरणा करा सर्व जातीच्या लोकानो, हा तुमचा राजा आहे आम्हां तपस्वी ब्राह्मणांचा मात्र नक्षत्रराज चद्र हाच राजा आहे ) नतर

राजा पृथ्वीची पुढीलप्रमाणे प्रार्थना करी "पृथ्वीमातर्मा हिंसी मा अहं त्वा। न हि माता पुत्रं हिनस्ति न पुत्रो मातरम् ॥" ही शतपथातील प्रार्थना असून तीत म्हटले आहे, "हे माते पृथ्वी, तू माझी हिंसा करू नकोस व मी तुझी हिंसा करणार नाही माता कधी पुत्राची हिंसा करीत नाही व पुत्रहि कधी मातेची हिंसा करीत नाही " यानंतर राजसिंहासन हे धर्मदंडाच्या अतीत नसून अधर्म्य ठरल्यास दंड्य ठरते हे सिद्ध करण्यासाठी शतपथ ब्राह्मणात पढील महत्त्वाचा विधि दिलेला आहे .–

अथैनं पृष्ठतस्तूष्णींमेव दण्डैर्घ्नन्ति । तं दण्डैर्घ्नन्तो दण्डवधमतिनयन्ति तस्माद्राजा दण्ड्यो यदेनं दण्डवधमतिनयन्ति ॥ ( शतपथ ब्रा ५–४–४–४ ) ( नंतर पुरोहित त्या राजाच्या पाठीवर दंडाने आघात करीत. हा आघात मौन धारण करून करण्यात येत असे राजा दण्डाच्या अतीत नसून धर्मदण्डाच्या कक्षेत आहे हे त्यायोगे सिद्ध करण्यात येई ) पदच्युत केलेल्या राजाला सौत्रामणि नावाचा याग करावा लागे वेदकालीन राजपद वांशिक नव्हते हे ऐतरेय ब्राह्मणातील पढील मंत्रावरूनहि सिद्ध होण्यासारखे आहे —

भूरिति य इच्छेदिममेव प्रत्यन्नमद्यादित्यथ व इच्छेद्द्विपुरुषं भूर्भुव इत्यथ य इच्छेत्त्रिपुरुष वाऽप्रतिम वा भूर्भुव स्वरिति ॥ (ऐतरेय ब्रा ८–७) (ज्याला स्वतःच्या जीवनभर राज्य हवे असेल त्याने भू असे म्हणावे ज्याला राज्य दोन पिढ्या चालावे असे वाटत असेल त्याने भुव असे म्हणावे व ज्याला राज्य तीन पिढ्या चालावे अशी इच्छा असेल त्याने भूर्भुव स्व असे म्हणावे. तात्पर्य, वैदिक राज्यसंस्थेचे परीक्षण केले तर पुढील गोष्टी निष्पन्न होतात (१) हिंदू राज्यसंस्था ही मानवनिर्मित आहे याची जाणीव वैदिक द्रष्टयाना पूर्णपणे आहे (२) राज्यसंस्था ही निवडणुकीने सिद्ध होणारी असून आपल्या इच्छेनुसार लोक राजा निवडीत (३) हिंदू राज्यसंस्था ही तपस्विसंस्था व जनता याना उत्तरदायी असे (४) राज्यसंस्था हा करार व संस्कार

असून तो राजा, प्रजा व तपस्विसस्था याच्यात झालेला असून तो तिघानाही बंधनकारक असे राज्यसस्था ही एक प्रकारची सह-कारी सस्था असून राज्यपद हे सस्थेच्या इतर अगामारखेच एक अग व इतर अगाना पूर्णपणे उत्तरदायी असे (५) राज्यपद हे एक प्रकारचे विश्वस्तपद असून (trust) आर्थिक हितसबध स्थिर राखणे व पिळवणुकीच्या तत्त्वापासून प्रजाचे सरक्षण करणें हे तिचे प्रधानसूत्र होते वैदिक राज्यसस्था ही कायद्याच्या अतीत नसून नियत्रणाखाली होती, व या राज्यसंस्थेला सार्वभौमत्व नसून सार्वभौमत्वाचा अधिका र समिति नावाच्या लोकसभेकडे होता. तिचें स्वरूप आपण पुढील व्याख्यानात पाहू



## व्याख्यान अकरावे

# समिति

मागच्या व्याख्यानात सार्वभौमत्वाचा अधिकार ज्या **समिति** नावाच्या लोकसभेकडे असल्याचा उल्लेख केला आहे, तिचा निर्देश सहितावाङमयाइतक्या प्राचीन काळी आढळून येतो सम् + इति म्हणजे एकत्रित येणे समिति आजच्या राज्य-शास्त्रीय परिभाषेप्रमाणे राष्ट्र प्रतिनिधीची सभा ( National Assembly or Parliament ) होती राजा नियुक्त करण्याचे व त्याला पदच्युत करण्याचे काम ही समिति करीत असे अथर्ववेद-सहितेत म्हटले आहे की, " ध्रुवाय ते समिति कल्पतामिह " (अथर्व ६. ८८ ३ ) समिति तुला दीर्घकाळासाठी राजा करो " नास्मै समिति कल्पते " त्याला समिति राजा म्हणून नियुक्त करीत नाही या समितीच्या अधिवेशनात राजा स्वत उपस्थित असे व त्याने तसे उपस्थित राहिले पाहिजे अशी अपेक्षाही असे ऋग्वेद सहितेतील पुढील उल्लेख या दृष्टीने महत्त्वाचे आहेत ते असे (१) " राजान सत्य समितो रियान "(ऋ ९–१२–६) सत्यप्रेमी राजा नित्य लोकसभेत प्रवेश करतो (२) " यत्रौषधी समग्मत राजान समिताविव " ( लोकसभेमध्ये जसे राजे लोक उपस्थित असतात तसे खऱ्या वैद्याचे ठिकाणी औषधि-विज्ञान उपस्थित असते ) औषधिविज्ञान हे वैद्याच्या ठिकाणी लहरी-नुसार कधी कधी उपस्थित राहून चालत नसून ते नेहमीच उपस्थित असले पाहिजे अर्थातच या गोष्टीला राजाच्या समितीतील उपस्थितीची उपमा देण्यात तेथे राजाची नित्य उपस्थिति असे हेच सूचित होते राजाच्या अनुपस्थितीत समितीचे कामकाज समितीचा अध्यक्ष पहात असे ऋग्वेदापासून छदोग्योपनिषदाच्या काळापर्यंत या समितीचे अस्तित्व होतें असे

दिसून येते वेदकाळाच्या आधी अत्यंत प्राचीन व ज्याचे स्वरूप 'अनादि' शब्दाने व्यक्त होणारे, पण त्या काळातहि या संस्था प्राचीन वाटत होत्या असे दर्शविणारे उल्लेख वेदवाङमयातून आहेत या उल्लेखाची नीट तपासणी केली तर समितीत चालणाऱ्या कामकाजाची व तिच्या कार्याची कल्पना येते राजाची निवड हे समितीचे महत्त्वाचे कार्य असल्याचा वर उल्लेख केलाच आहे ऋग्वेद व अथर्ववेदात असलेल्या संघटन सूक्तावरून समितीमध्ये महत्त्वाच्या राजकीय प्रश्नाची चर्चा होऊन निर्णय घेण्यात येत असत असे दिसते उदाहरणार्थ त्या सूक्तातील पुढील काही ऋचा पहा —

"संगच्छध्वं संवदध्वं सं वो मनांसि जानताम् । देवाः भागं यथा पूर्वे संजानाना उपासते ॥ २ ॥ समानो मंत्रः समितिः समानी समानं मनः सहचित्तमेषाम् । समानं मंत्रं अभिमंत्रये वः हविषा जुहोमि ॥ ३ ॥ समानीव आकूतिः समाना हृदयानि वः । समानमस्तु वो मनो यथा वः सुसहासति ॥ ४ ॥" (ऋ म १०–१९१) (मित्रानो, तुम्ही एकत्र होऊनच कार्य करा आणि परस्परविचारविनिमय करण्यासाठी संवाद करीत जा आणि पूर्वकाळी देव ज्याप्रमाणे यज्ञमंदिरात एकत्र येऊनच हविर्भागाचा स्वीकार करीत असत त्याप्रमाणे तुम्हीहि एकत्र बसून एकमेकाचे विचार समजावून घ्या हे जे तुम्ही त्याच्या सर्वांचा मंत्र म्हणजे राजकीय धोरण (Common Policy of State) एकसारखेच असू द्या तुमची समिति ही सर्वांची एकात्म असावी त्या योगाने तुमचे मन आणि तुमचे चित्त (म्हणजे विचाराने ठरविलेली गोष्ट) हेहि एकसारखेच राहील, म्हणून तुम्हा सर्वासाठी मी आता एकच मंत्र (गुरुकिल्ली) सांगतो, आणि सर्वांचा मिळून एकच हा विर्भाग अग्नीला अर्पण करतो ती तत्त्वाची गोष्ट ही की तुमचा विचार आणि योजना एकच असू द्या तुमची अंतःकरणे एकसारखी, एकाच भावनेने परिपूर्ण असू द्या. तसेच तुमचे मनहि सारखें एकाच ध्येयाकडे लागलेले असू द्या म्हणजे तुम्हाला पाहिजे असेल ती गोष्ट सहज साध्य होईल)

समितीत भाग घेणाऱ्या सभासदाला आपले म्हणणे सर्वांना पटावे असे स्वाभाविकपणेच वाटत असे कधी कधी समितीत सामाजिक प्रश्न व तत्त्वज्ञानाचे विषय यांचीहि चर्चा होऊन निर्णय घेतले जात, असे उपनिषदातील समासंबंधीच्या उल्लेखा-वरून दिसते छांदोग्योपनिषदात अधीतविद्य ब्रह्मचारी काही तात्त्विक प्रश्नांची उत्तरे विचारण्यासाठी पंचालाच्या समितीत गेल्याचा आणि त्या वेळी तेथे राजा प्रवहणजैवली स्वत उपस्थित असल्याचा व त्याने संवादात भाग घेतल्याचा स्पष्ट उल्लेख आहे. राजाच्या अनुपस्थितीत समितीचे काम पहाणाऱ्या अध्यक्षाचा पुढीलप्रमाणे उल्लेख शतपथ ब्राह्मणात आहे – "अस्या पर्षद ईशान सहसा मुदुष्टरो जन "येथे पर्षद हा शब्द समितीचा पर्याय शब्द असून ईशान म्हणजे अध्यक्ष होय आर्थिक धोरणाचीहि समिती-मध्ये चर्चा होत असे तैत्तिरीय संहितेत म्हटले आहे – "संग्रामे संयते समयकाम " संग्राम म्हणजे गावाची प्रातिनिधिक सभा अथवा समिति, व समय म्हणजे समान. आर्थिक हितसंबंध असणाऱ्या व्यक्तींचे आर्थिक धोरणासंबंधीचे एकमत होय (आर्थीयैः सुहृद्भि ऐकमत्य समय )

समितीच्या अंतर्गत एक सभा नावाची संस्था असे सभा म्हणजे आजच्या राज्यशास्त्राच्या परिभाषप्रमाणे एक प्रकारचे न्यायमंडळ ( National judicature ) असे. या दोन्ही संस्था वेदकाळालाही पुरातन वाटत होत्या हे दर्शविणारा अथर्व-वेदाच्या संहितेतील पुढील उल्लेख पहा

सभा च मा समितिश्चावतां प्रजापतेर्दुहितरौ संविदाने ।
येना संगछा उप मा स शिक्षा चारु वदानि पितर संगतेषु ॥

–अथर्ववेद अ ७ – १३

सभा व समिति या प्रजापतीच्या दोन कन्या आहेत ( प्रजापतीच्या कन्या हा शब्दच या संस्थांचे अतिप्राचीनत्व दर्शवितो ) या दोन कन्यांनी मला साह्य करून माझे संरक्षण करावें मी ज्याची भेट घेईन त्याने माझ्याशी सहकार्य करावे. हे

वडील माणसानो, सर्व सभासदाना समत होईल असें त्याच्याशीं मधुर भाषण करा या उल्लेखावरून लोकतत्रवादाची बीजे भारतीय राष्ट्रजीवनात किती प्राचीन काळापासून नादत होती याची कल्पना यते सभातत्र व लोकतत्र म्हटले की तेथे साऱ्याच प्रश्नाच्या सबधान एकमत होण्याची शक्यता नसल्यामुळे बहुमतानुसार अतिम निर्णय घ्यावा लागतो वेदकालीन समितीत हीच प्रथा असे व त्यामुळे सभेला ' **नरिष्टा** ' असे वेदवाङ्मयात पारिभाषिक नाव मिळाले आहे अथर्ववेदाचे भाष्यकार 'नरिष्टा' या शब्दाचे स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे करतात –

' नरिष्टा, अहिंसिता परैः अनभिभाव्या बहव सभूय यदि एक वाक्य वदेयु तर्हि न परैः तत् अतिलघ्यम् अत अनतिलंघ्यवाक्यत्वात् नरिष्टेति नाम । '

(नरिष्टा या शब्दाचा अर्थ जिचे कोणी अतिक्रमण करू शकत नाही अथवा कोणी पराभव करू शकत नाही अशी सभा होय. पुष्कळ लोक जर एक निर्णय सागतील तर अल्पमताचे लोक त्याच्या त्या निर्णयाचे उल्लघन करू शकत नाहीत असें सभेचे स्वरूप असल्यामुळे तिच्या या अनतिक्रम्य स्वरूपास्तव तिला नरिष्टा असे म्हणतात त्यामुळ सभेतील प्रत्येक सभासदाला या बहुमताची कदर बाळगावी लागे व ते आपल्या बाजूला वळविण्याची खटपट करणे आवश्यक वाटत असे वैदिक समितीचा एक सभासद म्हणतो –

विद्म ते सभे नाम नरिष्टा नाम वा असि ।
ये ते के च सभासद ते मे सन्तु सवाचस

– अथर्ववेद ७ १३ २

( हे सभे, मला तुझी प्रतिष्ठा व तुझे महत्त्व याची पूर्णपणे कल्पना आहे तुझे नाव नरिष्टा असे आहे म्हणून येथें सभेत जे सभासद उपस्थित आहेत त्यानी मला अनुकूल व माझ्याशी सवादी असेच बोलावे अशी प्रार्थना आहे ) सभातंत्रात बहुमत आपल्या बाजूला असावे असे ज्याला अपेक्षित

असतें त्याचे प्रतिपाद्य विषयाचे ज्ञान अचूक व व्यक्तिमत्त्व अत्यंत प्रभावी असावे लागते पण या दोनच गोष्टींनी नेतृत्व प्राप्त होईल असे नसून भाग्यदेवताहि अनुकूल असणे आवश्यक ठरते वैदिक समितीच्या सदस्याला आजच्या पार्लमेंटमधील वेगवेगळ्या पक्षनेत्याप्रमाणेच या गोष्टीची पूर्ण जाणीव आहे म्हणून तो म्हणतो –

एषामह समासीनाना वर्चो विज्ञानमा ददे ।
अस्या सर्वस्या समदो मामिन्द्र भगिन कुरु ।।

– अथर्ववेद ७ १२ ३

या ससदेत बसलेल्या सभासदात ज्ञान व प्रभावशाली व्यक्तिमत्त्व या दृष्टीने मीच सर्वश्रेष्ठ ठरो हे इद्रा! महभाग्याचे प्रदान करून तू मलाच यश प्राप्त होईल अशी कृपा कर ' या समितीमध्ये अनेक समाजहिताच्या विषयाची मनमोकळी चर्चा होत असे, पण आजच्या ससदेत ज्याप्रमाणे पुष्कळदा महत्त्वाच्या विषयावर चर्चा व भाषण चालू असताना ज्याना त्यात स्वारस्य वाटत नाही असे सभासद आपल्या स्थानी झोपा घेताना अथवा दुसरीकडे लक्ष देत असताना आढळतात, तसा प्रकार त्या वेळीही होत असावा असे दिसते. वैदिक समितीतील एक सदस्य या प्रकाराला उद्देशून सभासदाची पुढीलप्रमाणे प्रार्थना करीत आहे

यद्वो मन परागत यद् बद्धमिह वेह वा ।
तद् व आवर्तयामसि मयि वो रमता मन ।।

– अथर्ववेद ७–१२–४

(जर तुमचे मन माझ्याकडे नसून दूर अतरावर कोठे भटकत असेल अथवा इकडे तिकडे गेले असेल तर तुमच्या मनाने माझ्यावर स्थिर होण्यात आनद मानावा ) या समितीच्या अतर्गत ' न्यायमंडळाचे '(National Judicature) काम करणारी जी सभा असे तिचे सभासद मुरब्बी, विद्वान् व वजनदार असे लोकच असत या मडळातील सभासदाना उद्देशून ' पितर ' असा शब्द वेदवाङ्मयात येतो त्याचे स्पष्टीकरण करताना वेदभाष्यकार म्हणतात

' हे पितरः, पालका पितृभूता वा सभासदो जना ।

( हे पालक अथवा पित्याप्रमाणे मार्गदर्शक असणाऱ्या सभासदहो,) या वरिष्ठ न्यायमंडळात जसे समाजाच्या अनुशासनाचे नियम ठरत, त्याचप्रमाणे अपराध्याची चौकशी होऊन गभीर अपराध्याना शिक्षाही होत असे शुक्ल यजुर्वेदामध्ये पुरुषमेध प्रकरणात अशा सभेत आणण्यात येणाऱ्या अपराध्याचा स्पष्ट उल्लेख 'धर्माय सभाचरम्' म्हणजे 'न्याय मिळविण्यासाठी सभेत प्रवेश केलेला' या शब्दानी केला आहे शुक्ल यजुर्वेदामध्ये सभेतील शासनार्ह पातक्याचा उल्लेख पुढीलप्रमाणे आहे –

यद्ग्रामे यदरण्ये यत्सभाया यदिन्द्रिये । यच्छूद्रे यदर्थे यदेनश्चकृमा वय यदेकस्याधि धर्माणि तस्यावयजनमसि ॥

– शुक्लयजुर्वेद २०–१७

(जे गावात, जे अरण्यात, जे सभेत, जे इद्रियाविषयी, जे शूद्रासबधी व जे वैश्यासबधी आम्ही काही पातक केले असेल, अथवा धर्मकार्यासबधी जे काही पातक घडले असेल त्या सर्व पापाचा तू नाश करणारा आहेस )

अपराध्याच्या अपराधाचा अतिम विचार या सभेत होई या सभेच्या निर्णयानतर पुन्हा कोणाकडे दाद मागण्याची सोय नसे सभेच्या या विशिष्ट स्वरूपामुळे पारस्कर गृह्य सूत्रात सभेला उद्देशून 'त्रास' असे अपराध्याच्या दृष्टीचे वर्णन आले आहे. असा अपराधाचा आळ आलेला मनुष्य अतिम निर्णयास्तव सभेसमोर उभा राहून तेथे निर्दोष सुटला तर केवढ्या आनदानें घरी परत येत असेल ! व त्याचे नातलग आणि सुहृद त्याचे स्वागतही किती उत्साहाने करीत असतील, या गोष्टीचे ऋग्वेदसहितेत पुढीलप्रमाणे वर्णन आहे –

सर्वे नन्दन्ति मनसा आऽगतेन सभाऽसहेन सख्या सखाय ।
किल्बिषऽस्पृत् पितुऽसनि हि एषा अर हित: भवति वाजिनाय ॥

– ऋग्वेद १०–७१–१०

(सभेतून आपला मित्र यशस्वी होऊन येताच सर्व मित्र आनदाने त्याचे स्वागत करतात व तोही पूर्ण निर्दोष ठरल्यामुळें

मोकळ्या मनाने शौर्यशाली व ओजस्वी कृत्य करण्यास समर्थ आणि मित्राना हितकारक ठरेल असा होवो ) पुढे बौद्धवाङमयात आढळणारे सभेचे लक्षण या वैदिक काळातील सभेला पूर्णपणे लागू पडणारे होते ते लक्षण असे –

" न सा सभा यत्थ न संति सतो न ते सतो ये न भणन्ति धम्मम् ।
राग च दोस च पहाय मोह धम्मं भणन्ताव भवन्ति सतो ।।

(जेथे सत नाहीत ती सभा नव्हे जे धर्म म्हणजे न्याय सागत नाहीत ते सत नव्हेत राग, द्वेष व मोह याच्या अतीत राहून जे न्यायाचे असेल तेच बोलतात तेच खरे सत होत ) सभेच्या सभासदाचा विशिष्ट वेषही असे व सभेचा स्वतत्र अध्यक्षहि असे (नम सभाभ्यः सभापतिभ्यश्च) हा उल्लेख तर प्रसिद्धच आहे

वेदकाळी समितीच्या अतर्गत असणारी आणखी एक 'विदथ' नावाची सस्था होती राष्ट्राचे सैनिकीजीवन नियत्रित करणे हे तिचे काम होते विदथ म्हणजेच सेना विभाग असेहि काही विचारकाचे मत आहे सभा, समिति व सेना या तीन लोकसस्थाचे स्वतत्र अस्तित्व अथर्ववेदाने "त सभा च समितिश्च सेना च" या वाक्याने स्पष्ट केले आहे काही लोकाच्या मते विदथ हीच मूळ सस्था असून ती विकसित झाल्यावर सभा, समिति व सेना असे तिचेच तीन प्रकार झाले आहेत पण या म्हणण्यास निर्णायक पुरावा उपलब्ध नाही. विदथ सस्थेचा उल्लेख ऋग्वेदात पुढील-प्रमाणे आढळतो. ऋग्वेदाच्या प्रथम मडलात, ६० व्या सूक्तातील पहिल्याच ऋचेत 'विदथस्य केतु म्हणजे विदथाचा ध्वज या नात्याने अग्नीचे वर्णन आहे ऋग्वेदाच्या तृतीय मडलातील अड-तिसाव्या सूक्तात 'विदथस्य धीभिः क्षत्र राजाना प्रदिवो दधाथे' असा उल्लेख असून त्यावरून विदथमध्ये होणाऱ्या चर्चेतून राजाला विशिष्ट धोरणासबधीचे मार्गदर्शन मिळे हे उघडच दिसते.

तात्पर्य, अशा रीतीने दायित्वपूर्ण व लोकसस्थानी नियत्रित अशा प्रकारच्या भारतीय राज्यसस्थेने आदर्श जीवन उत्पन्न केले असल्यास त्यात नवल नाही या पद्धतीने उभारण्यात आलेली

वैदिक राज्यसंस्था कशा स्वरूपाची होती याचे वर्णन छांदोग्यो-पनिषदात पहावयास सापडते छांदोग्योपनिषदाच्या सातव्या अध्यायात केकयाचा राजा अश्वपति तपस्व्याना म्हणतो, 'न मे स्तेनो जनपदे न कदर्यो न मद्यप । नानाहिताग्निर्ना यज्वा न स्वैरी स्वैरिणी कुत ॥' (माझ्या राज्यात औषधालासुद्धा चोर, कद्रू व मद्यपी सापडावयाचा नाही तसेच अग्निपूजक नसणारा व विद्वान् नसलेलाहि कोणी नाही स्वैरवर्तन करणारा कोणी पुरुषच जर येथे नाही तर स्वैरिणी स्त्रिया कोठून असणार ?) या औपनिषदिक वर्णनात व रामायणातील रामराज्याच्या आदर्श वर्णनात तत्त्वदृष्टया काय भेद दाखविता येईल ? तात्पर्य, वैदिक राष्ट्राची राज्यसंस्था याप्रमाणे पूर्ण आदर्शवादी होती व तदनंतरच्या भारतीय इतिहासात हाच आदर्श कसोटीने पाळण्याचा प्रयत्न झालेला आहे

भारतीयाच्या या राज्यसंस्थेवर तत्त्वदृष्टया कोणताहि आक्षेप घेता येण्याची शक्यता नसल्याचे वैषम्य आमच्याच काही तथाकथित विद्वान् भारतीय मित्राना वाटते, ही अत्यत दुर्दैवाची गोष्ट आहे आपली तात्त्विक उच्चता या लोकाना मान्य आहे पण त्या सत्याचा उघडउघड पुरस्कार करण्याचे मनोधैर्य त्याच्याजवळ नाही आजच्या पाश्चात्य विचारप्रणालीचा आपल्या विचारप्रणालीशी सबध जोडण्याची परिभाषा वापरल्यावाचून आजच्या न्यूनगडात्मक वातावरणात आपण पुरेसे पुरोगामी ठरणार नाही, उलट प्रतिगामी व सकुचित मनोवृत्तीचे ठरू असे त्याना भय वाटते जडवादाच्या आहारी गेलेल्या पाश्चात्यानी भारतीयापासून जीवन-मूल्याचे प्रकाशकिरण घेतले पाहिजेत हे त्याना पटते, पण अशा काही किरणाचा अगीकार भारताने पाश्चात्यापासून केल्याविना त्याचे जीवन आदर्श होणार नाही असे दाखविल्यावाचून आपण पुरेसे समतोल विचाराचे ठरणार नाही अशा भावनेने ते प्रेरित झालेले आहेत असा काही उणेपणा भारतीय सस्कृतीच्या प्रत्येक अगात केवळ याचसाठी दाखविणे त्याना आवश्यक वाटते की, ज्याची

परिपूर्ति पाश्चात्य जीवनदृष्टीशी विशेष प्रकारचा समन्वय साधूनच करता येईल वस्तुत भारतीय जीवनात जे वास्तविक उणे आहे त्याचा त्यानी पुरस्कार केला व त्याच्या परिपूर्तीसाठी पाश्चात्याच्या सुधारणावादाचे ऋण घेतले तर त्याविषयी कोणाचेच काही म्हणणे नाही उदाहरणार्थ, आजच्या यत्रयुगात जगावयाचे असले तर आपण आपल्यात आज नसलेल्या पाश्चात्याच्या यत्रोपासनेची कास धरली पाहिजे, हे म्हणणे कोणाही विचारवतास मान्य होण्यासारखेच आहे पण त्याना या पद्धतीने पाश्चात्याच्या सुधारणावादाचा (Civilisation) पुरस्कार केवळ नको असून त्याच्या सस्कृतीचाही (Culture) अथवा जीवन-दृष्टीचाहि पुरस्कार हवा आहे त्यासाठी आसुरी पाश्चात्य सस्कृतीला दैवी ठरविण्याच्या खटाटोपात जसे ते आहेत तसेच दैवी भारतीय सस्कृतीला आसुरी ठरविण्याच्या खटाटोपातही आहेत अर्थातच भारतीयाच्या राज्यसस्थेचा विषयही त्याच्यासमोर या दृष्टीने आहेच या राज्यसंस्थेवर आक्षेप घेताना उपरिनिर्दिष्ट सस्कृतीचा भारतात फैलाव करण्यासाठी कटिबद्ध झालेल्या काही लोकानी सहस्रावधि वर्षाच्या हिंदु इतिहासात हाताच्या बोटावर मोजण्यासारखे जे काही थोडे आसुरी प्रवृत्तीचे राजे झाले त्याची नावे उल्लेखून 'हे पहा, भारतीय सस्कृतीच्या आसुरी-पणाचे ढळढळीत उदाहरण' म्हणून अगुलिनिर्देश केला आहे. त्याकडे वळण्यापूर्वी एक गोष्ट प्रथम लक्षात घेतली पाहिजे की, भारतीय राज्यसस्थेच्या मागे असलेल्या विचारप्रणालीत असे मूलभूत स्वरूपाचे काही दोष आहेत काय? जर ते असतील तर त्या तत्त्वप्रणालीला अथवा सस्कृतीला नावे ठेवणे उचित होईल, व जर तत्त्वप्रणालीत हे दोष नसून मनुष्याच्या स्वभावातच असलेल्या पशुतेमुळे ते उत्पन्न झाले असतील तर तत्त्वप्रणालीला नावे ठेवणे अर्थातच चुकीचे ठरेल या दृष्टीने विचार केला तर सत्तासामर्थ्याच्या पोटी उफाळणारे पशुत्व अधिकात अधिक नियत्रित करण्याचा प्रत्न भारतीय राज्यशास्त्रज्ञानीच केलेला आहे हे मान्य करणे भाग पडेल

कोणत्याहि संस्कृतीला आसुरी किंवा दैवी ठरविताना त्या संस्कृतीत देहात्मवादावर आधारलेल्या पशुत्वाच्या भावनांचा उफाळणारा वेग पद्धतशीरपणे कमी करण्याचा तेथील समाजशास्त्रज्ञांनी व शासनशास्त्राने प्रयत्न केला आहे की नाही हे पाहणे अवश्य असते. जर असा प्रयत्न केला असेल व इतिहासात त्याची इतरांच्या तुलनेने अधिकात अधिक चांगली फळे दिसून येत असतील तर त्या संस्कृतीला दैवी म्हटले पाहिजे. आणि या प्रयत्नात व त्याच्या पाठीशी असलेल्या विचारप्रणालीत कोठे चूक असली आणि त्यामुळे या ना त्या स्वरूपात रानटी व रक्तपिपासू पशुत्वाची अभिवृद्धि होत असली तर त्या प्रयत्नांना व त्या विचारप्रणालीला आसुरी हेच विशेषण लावले पाहिजे. दोन संस्कृतींचा संगम घडवून आणण्याचा विचार मांडणाऱ्या लेखकांनी भारतातील चारदोन राजांच्या अत्याचारी उदाहरणावरून वैदिक अथवा भारतीय संस्कृतीला आसुरी ठरविण्याचा केलेला प्रयत्न या दृष्टीने केवळ अपरिपक्व व हास्यास्पद ठरतो. अशाच रीतीचा एक प्रयत्न मुंबईच्या रामनारायण रुइया कॉलेजचे एक प्राध्यापक श्री द. के. केळकर यांनी आपल्या संस्कृतिसंगम या नावाच्या पुस्तकात केला होता. आम्ही ह्याच शंका उपस्थित केल्या असता त्यांनी आपल्या पुस्तकाच्या द्वितीयावृत्तीत आम्हाला उत्तर असल्याचे आपल्या पुस्तकाच्या वृत्तपत्रातून प्रसिद्ध होणाऱ्या विज्ञापनात प्रकटपणे घोषित केले. पण प्रत्यक्ष पुस्तक उघडून पाहतो तो त्यात आमच्या शंकेला मूलभूत उत्तर कोठेहि नसून केवळ चारदोन अत्याचारी राजाऐवजी तसे दहा-पंधरा राजे असल्याचा निर्वाळा दिला आहे. पण हे अर्थातच उत्तर नव्हे. इस्लामी व आजच्या जडवादी पाश्चात्य संस्कृतीला आम्ही आसुरी म्हणतो ते तेथे दोनचार राजे चांगले अथवा वाईट झाले त्यावरून मुळीच म्हणत नाही; तर त्या त्या विचारप्रणालीने पशुत्वाला नियंत्रित करण्याऐवजी त्याच्या प्रसरणाला प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रीतीने वाव दिला म्हणून म्हणतो. इस्लामी संस्कृतीत मनुष्याच्या

शुवृत्तीना इस्लामेतर समाजावर सूड उगविण्याची व त्याद्वारें आपली भूक शमन करून घेण्याची जी सधि इस्लामच्या प्रवर्तकाकडून देण्यांत आलेली आहे त्यामुळे आम्ही त्या सस्कृतीला आसुरी असे म्हणतो आम्हीच नव्हे तर इस्लामी सस्कृतीवर लिहिणाऱ्या पाश्चात्य लेखकानीही इस्लामच्या मूळ ग्रथात जे लिहिले आहे याविषयी असाच अभिप्राय लिहिला आहे मूर या महमद पैगबराच्या प्रसिद्ध चरित्रलेखकाने इस्लामच्या धर्मग्रथातील उपदेशावरून इस्लामला स्त्रियाचा घोर शत्रू ठरविले आहे. जित स्त्रियासबधी कुराणात जी धारणा व्यक्त करण्यात आली आहे व जितासबधी ज्या धोरणाचा पुरस्कार करण्यात आलेला आहे त्याचे विवेचन करताना कुराणाचा भाषातरकर्ता पामर म्हणतो —

( " Captived women are to be reduced to slavery and hough already married, may be taken as concubines. The aithful are forbidden to contract friendship with Jews, Christians and unbelievers " (the Koran By G. H Palmer, chap 4 pp 193)

(विजित शत्रु स्त्रियाच्या स्थानाचा विचार न करता त्याना गुलाम केले पाहिजे व जरी त्या आधीच विवाहित असल्या तरी याची रखेल्या म्हणून नियुक्त करावी इस्लामच्या अनुयायाना ज्यू, खिश्चन व इस्लामवर विश्वास न ठेवणाऱ्या इतर लोकाशी मैत्रता राखण्याची पूर्णपणे बदी आहे ) प्रत्यक्ष इस्लामच्या धर्मग्रथातील ही आज्ञा पाहिली म्हणजे चारदोन उदाहरणे केवढीही वागली असली तरी आम्ही तिला आसुरी का म्हणतो हे स्पष्ट होईल यूरोपच्या आजच्या भौतिक सस्कृतीत आत्मा व मन याच्या पद्धतशीर व स्वतत्र विकसनाचा कोणताहि विचार नसल्यामुळे मनुष्याचे आतर जीवन घडविण्याची तिला शक्यता नाही यामुळे आम्ही तिला आसुरी सस्कृति म्हणतो कारण, या दोन्ही सस्कृतीच्या मनुष्य घडविण्याच्या मूलभूत विचारप्रणालीत व प्रक्रियेतच भयानक स्वरूपाचे दोष आहेत. पाश्चात्य जडवादाच्या

साम्यवादी घोषणाना संस्कृतिसंगमाचे पुरस्कर्ते सर्वांत अधिक भाळले. पण साम्यवादी संस्कृतीचे कृष्ण अंतरंग आजचे रशियाचे सूत्रधार श्री क्रुश्चेव्ह यानी स्टालिनच्या कारकिर्दीचा आढावा घेताना नुकतेच जे स्पष्ट केले आहे ते यासंबंधीचा भ्रमनिरास करण्यास सर्वथा समर्थ आहे वैदिक अथवा भारतीय संस्कृतीनें देश, काल व संप्रदाय यांच्या सीमा ओलांडून मानवमात्रातील पशुत्व नष्ट करण्याकडेच आपले लक्ष केन्द्रित केले आहे. हे भारतीय समाजशास्त्र व शासनशास्त्र यांच्या स्वरूपाकडे पाहिले असता ध्यानात येते, व म्हणून तिला आम्ही दैवी संस्कृति म्हणतो. प्रस्तुत पुस्तकाच्या पूर्वार्धांत यासंबंधी आम्ही पुराव्यानिशी विस्तृत विवेचन केले असून मेगॅस्थेनिसपासून मार्कोपोलोपर्यंतच्या परकीय प्रवाशांच्या साक्षी उद्धृत करून भारतीय संस्कृतीने या देशात कोणतें जीवन निर्माण केले होते याची यथार्थ कल्पना दिली आहे येथे त्याचा पुन्हा निर्देश करण्याची आवश्यकता नाही. पायाशुद्ध विचार न करता आपल्याच राष्ट्राच्या इतिहासाचे विडंबन करून आम्ही कसे कलंकित आहोत हे दाखविण्यातच भूषण मानण्याचे करंटेपण दास्याच्या प्रभावाने आमच्या येथील तथाकथित पंडितात उत्पन्न केले आहे, व ते जायला अजून काही दिवस लागतील हे खरे. या दैवी संस्कृतीचा प्रभाव वैदिक राष्ट्राच्या युद्धशास्त्रादि सर्वच अंगोपांगावर पडला होता. त्याचे स्वरूप आपण पुढील व्याख्यानात पाहू.

✦ ✦ ✦

# व्याख्यान बारावे

## धनुर्वेदांतील शस्त्रास्त्रे

समाज म्हटला की सुष्ट, दुष्ट, स्वार्थी, सरक्षक, भले व वाईट सर्वच प्रकारचे लोक त्यात नादत असल्यामुळे युद्ध ही गोष्ट समाजजीवनात अनिवार्य ठरते सस्कृतीच्या विकसनात विजयाच्या आकाक्षेने प्रेरित झालेले बुद्धिमान् लोक त्या युद्धाची एक पद्धति बसवीत असल्यामुळे युद्धाचेही एक स्वतत्र शास्त्र बनते असे युद्धाचे शास्त्र इतर अनेक दृष्टींनी विकसित झालेल्या वैदिक आर्यांच्या समाजातहि उत्पन्न झाले होते. ऋग्वेदाचे सपूर्ण वातावरण रणदुदुभीच्या नादाने दुमदुमलेले आहे तर अथर्ववेदाचे वातावरण कूट युद्धाच्या वेगवेगळ्या पद्धतींनी व मत्रानी अथवा मुत्सद्दीपणाच्या आत्मपत्ययाने भारावलेले आहे असे या दोन्ही वेदसंहिताचे वरवर वाचन केले तरी आढळून येते

तेजस्वी व युद्धप्रिय वैदिक राष्ट्राची इन्द्र ही सग्रामदेवता होय. या पवित्र भरतभूमीचे स्वामित्व त्यानेच आर्यांना समर्पण केले आहे. आपल्या कर्तृत्वाचे वर्णन करताना इद्र म्हणतो –

अह भूमिमददामार्यायाह वृष्टि दाशुषे मर्त्याय ।
अहमपो अनय वावशाना मम देवासो अनुकेतमायन् ।।

–(ऋग्वेद ४ २६. २)

(ही भूमि मीच आर्यांना दिलेली आहे. दानशूर भाविक जनाकरिता मीच पर्जन्यवृष्टि केली धो धो शब्द करून वाहणाऱ्या उदकांना मीच वाट करून दिली आणि माझ्याच ईश्वरी सकेताप्रमाणे देव वागत आले आहेत ) अशा या वैदिक राष्ट्राचे भौतिक जीवन सर्वतोपरि सुसपन्न करून दैवी सामर्थ्याची त्याला जोड प्राप्त करून देणाऱ्या देवाधिदेवावर वैदिकानी सर्वांत अधिक प्रेम करणे अत्यत स्वाभाविकच आहे. रणोत्साहासाठी पुन्हा पुन्हा

सोमपान करणारा महेन्द्र शंभर शभर किल्ल्यांना फोडून आंत दडून बसलेल्या शबरादि दैत्याना ठार मारतो वैदिकाची ही इतकी आवडती देवता आहे की ऋग्वेदात सर्वात अधिक सूक्ते इन्द्रावर आहेत इद्रदेवतेवर ऋग्वेदात एकदर दोनशे सूक्तें आहेत. या देवतेचे सर्वश्रेष्ठत्व या सूक्तामधून वारवार वर्णन केलेले असून राष्ट्रीय संकटाच्या वेळी वैदिक आर्य या रणदेवतेचा धावा करीत इद्र हा कश्यपाचा पुत्र असून त्याची माता अदिति होय. या तपोमय दपतीने हे पुत्ररत्न केवळ युद्धविजयास्तवच निर्माण केले ऋग्वेदात म्हटले आहे –

वृषा जजान वृषणम् रणायतमु चिन्नारी नर्य ससूव।
प्र य सेनानी अधनृभ्य अस्ति इन स त्वा गोएषण.सधृष्णु ॥
–(ऋग्वेद ७ २०. ५)

(शूर पित्याने पुत्र उत्पन्न केला तो युद्धासाठीच उत्पन्न केला, आणि त्या पुत्राची माता जी त्याला प्रसवली ती त्याने लोकाचे हित करावे म्हणूनच प्रसवली शूराचा कोणी खरा सेनानायक असेल तर तो इन्द्रच होय तोच खरा प्रभू असून सेनानायक आहे. तोच गोप्रतिपालक व शत्रूना धडक देणारा आहे. जो ह्या न्यायनिष्ठुर इन्द्राचे उग्रमन प्रसन्न करून घेतो तो कधीही कर्तव्यापासून ढळत नाही किवा कधीही भेदरून जात नाही जो यज्ञद्वारा इन्द्राला आपली सेवा अर्पण करतो तोच वैभव भोगतो, तोच न्यायाचे पालन करतो, त्याचाच न्यायानुवर्ती लोकात जन्म होतो ) मातेच्या गर्भांत हे अद्भुत बालक किती दिवस होतें व जन्मक्षणी आणि नतर त्याने काय केले याचें वर्णन करताना ऋग्वेदात म्हटले आहे –

कि स ऋधक् कृणवत् यं सहस्र मास जभार शरद. च पूर्वीः।
नहि नु अस्य प्रतिमान अस्ति अन्त जातेषु उत मे जनित्वा ॥
–(ऋग्वेद ४ १८. ४)

(ज्याला अदितीने हजारो महिनेच काय पण असख्य वर्षे धारण केले, त्या इद्रानें आणखी अलौकिक ते काय करावयाचे? पहा, आजपर्यंत जे जे उत्पन्न झाले आहेत किवा ह्यापुढे होणार आहेत त्यांत ह्या इंद्राच्या तोडीचा एकही सांपडणार नाही )

अवद्यम् इव मन्यमाना गुहा अक. इन्द्रम् माता वीर्येण निऋष्टम् ।
अथ उदस्थाम् स्वयमत्कम् वसान आ रोदसी इति अपृणात् जायमान.।।
—(ऋग्वेद ४. १८. ५)

(वीर्यभराने अत्यत ओजस्वी असलेल्या इन्द्राला कोणी तरी भलताच समजून प्रथम अदिति मातेने अगदी गुह्य स्थळी ठेवून दिले परतु तेथूनसुद्धा चिलखत चढवून तो उठला आणि आपल्या आपण प्रकट होऊन त्याने पृथ्वी आणि आकाश असे दोन्ही लोक तेजाने ओतप्रोत भरून टाकले.)

विश्वा रोधासि प्रवतःच पूर्वी द्यौ ऋष्वात् जनिमन् वेजतक्षा.।
आ मातरा भरति शुष्मी आ गो नृवत् परिज्मन् नोनुवन्त वाताः।।
—(ऋग्वेद ४ २२ ४)

(यच्चयावत् उच्च गिरिदुर्ग, असख्य जलौध, आणि स्वर्ग व भूलोक हे सुद्धा इन्द्र प्रकट झाला त्या वेळी त्या अत्युदात्त विभूती-पुढे कापू लागले. तथापि ज्योतिर्मय वृषभ जो सूर्य त्याच्या माता-पितराचा साभाळ तो प्रभावशाली देवच करतो म्हणून वायु हेही अतरिक्षात मनुष्याप्रमाणे मोठमोठ्याने स्तुतिघोष करू लागले.) जन्मल्याबरोबर इद्राने आईचे स्तनपान न करता प्रखर सोमरसाचेच आकठ पान केले (सद्यो यज्जातो अपिबो ह् सोमम् ।।) – (ऋग्वेद ३. ३२. ९) ऋग्वेदातील वर्णनाप्रमाणे इद्र हा स्वरूपाने अत्यत सुदर (सुसदृश) असून त्याची मान भरीव, उदर विशाल व भुजदड पिळदार आहेत. तो आजानुबाहू व उदारहस्त असून त्याचे सुदर बाहू उत्तम कसलेले व म्हणून शत्रूना सग्रामात लोळविणारे व सत्यधर्माने परिपुष्ट असे आहेत त्याचे शरीर बळकट हाडपेराचे (वृषपर्वा) व कणखर असून अत्यत तेजस्वी आहे स्वर्ग व पृथ्वी हे दोन्ही त्याच्या एका मुठीतच सामावून गेले इतका तो भव्य आहे. तो अमर (अमर्त्य. ऋ. ५।३३।६) असून भव्य, सुदर, अजर व नित्य तरुण आहे ऋग्वेदाच्या सग्रामसूक्तात म्हटले आहे .–

न य जरन्ति शरदः न मासाः न द्यावः इन्द्रम् अवकर्शयन्ति।
वृद्धस्य चित् वर्धताम् अस्य तनूः स्तोमेभिः उक्थै च शस्यमाना ।।७।।

न वीळवे नमते न स्थिराय न शर्धते दस्युजूताय स्तवान् ।
अज्राः इन्द्रस्य गिरय चित् ऋष्वा गभीरे चित् भवति गाधमस्मै ॥८॥
— (ऋग्वेद ६ १८)

कितीही महिने अगर शरद ऋतु लोटले तरी ज्या इद्राला वार्धक्य येत नाही, ज्या इद्राला असख्य दिवस लोटले तरी सुद्धा दौर्बल्य येऊ शकत नाही असा जो अति वृद्धिगत इन्द्र त्याचे अमूर्त शरीर आमच्या स्तवनानी आणि सामगायनानें सकीर्तन झाल्या-मुळे आणखी वृद्धिगत होवो ज्याचे यशोवर्णन नेहमी होतच असते असा हा इद्र कोणत्याही ताठर माणसापुढे लवत नाही, हट्टाने अडून बसलेल्यापुढे वाकत नाही किंवा धर्मभ्रष्ट लोकानी पाठविलेल्या मारेकऱ्याच्या सैन्यापुढेहि मान खाली करीत नाही. गगनचुबी पर्वत इद्राला मैदानाप्रमाणे सखल वाटतात आणि अत्यत खोल जलाशय त्याच्यापुढे उथळ होतात इन्द्र जसा शरीरानें भव्य व विशाल आहे त्याचप्रमाणे बुद्धीने अत्यत श्रेष्ठ व तीक्ष्ण आहे तो धृतिमान्, कातिमान् व पाणीदार असून सपत्तीचा स्वामी, सामर्थ्याचा अधिपति, अभीष्टदाता व सर्व बाजूनी निष्कलक चारित्र्यसपन्न असा आहे त्याचे नियत्रण कोणालाहि मोडता येत नसून वरुणादि सर्व देव त्याच्या आज्ञेत राहतात. ऋग्वेद म्हणतो :—

अध त्वा विश्वे पुर इन्द्र देवा एकम् तव सम् दधिरे भराय ।
अदेव यत् अभि औहिष्ट देवान् स्व माता वृणते इन्द्र अत्र ॥
—(ऋग्वेद ६-१७-८)

(हे इद्रा, तूच एक सर्वात अधिक बलाढ्य आहेस हे ओळखून सर्व देवानी युद्धप्रसगी व अन्यत्र तुलाच स्वसंरक्षणार्थ आपला अग्रेसर केले. कारण देवाच्या शत्रूने जेव्हा देवावर हत्यार उपसलेले असते त्या वेळी दैवी प्रकाश प्राप्त करून घेण्याकरिता चालविलेल्या सग्रामात इद्रच विजयी होतो.) याप्रमाणे स्वसामर्थ्यानें देवराट् झालेला इद्र सर्व भुवनाचा एकमेव राजा आहे (एको विश्वस्य भुवनस्य राजा ॥ – ऋग्वेद ३-४६-२) इद्राचा रथ अत्यत

विशाल व बळकट असून तो मनापेक्षाही वेगवान रथ त्वष्टयानें त्याच्यासाठी खास तयार करविला इद्राच्या या रथाचे करड्या रगाचे घोडेहि असेच अलौकिक असून त्याची निर्मिति ऋभूनी खास इद्रासाठीच केलेली आहे त्याचे अवयव बळकट असून डोस सूर्याप्रमाणे तेजस्वी, शेपूट मोराच्या पिसाऱ्याप्रमाणे सुदर, केळे सुवर्णाप्रमाणे पीत व तकतकीत असून ते नेहमीच सज्ज असतात व कधीच थकत नाहीत त्याच्यासाठी इद्र जो प्रतोद वापरतो तो सुवर्णाचा आहे. इद्राचे धनुष्य भव्य, सर्वोत्कृष्ट असे सुवर्णाच्या बुध्याचे आहे.

तुविक्षत ते सुसंस्कृत सुमय धनु साधुर्बुन्दो हिरण्मय ॥

–(ऋग्वेद ८-७७-११)

भाला व खड्ग ही त्याची आयुधेही अलौकिक असून दधीचि ऋषीच्या तपःपूत अस्थीनी बनविलेली इतर अनेक तीक्ष्ण व प्रभावशाली शस्त्रे त्याच्याजवळ आहेत पण त्याचे सर्वांत आवडते, सर्वांत अधिक प्रभावशाली, व सर्वात अधिक प्रसिद्ध आयुध म्हणजे विश्वविजयी वज्र होय इन्द्र हा वज्रधारी म्हणूनच खरा प्रसिद्ध आहे वज्र हे पोलादी असून त्याला सहस्र धारा आहेत त्याला शभर अग्रे असून ते शुभ्र व चकचकीत आयुध त्वष्टयाने केलेले आहे हे वज्र इतके प्रखर व भयकर आहे की इद्राने जेव्हा त्याचा वृत्रासुरावर प्रयोग केला तेव्हा त्याचा एवढा मोठा कडकडाट झाला की तो ऐकून द्यावापृथिवी घाबरून भयाने थरथर कापू लागली

अरेजता रोदसी भियानेकनिक्रदतो वृष्णो अस्य वज्रात् ॥

–(ऋग्वेद ७-११-९)

इद्राने सूर्य उत्पन्न केला व पख कापून उडत्या व हलत्या पर्वताना स्थिर केले त्याने नक्षत्र, पृथ्वी व द्युलोक स्थिर करून स्वर्गातील उदकाला पृथ्वीवर वहातें केले त्याने वृत्र, दैत्याग्रणी शुष्ण, चुमुरी दैत्य, दासाग्रणी नमुची, पिप्रू, मायावी व शभर किल्ल्याच्या आत दडून बसलेला शबरासुर, अहि, अर्बुद, मृगय, सृबिद, अनर्शनि, दास, अहिशु, कृष्णासुर, इत्यादि दुष्ट व प्रबल दैत्याना ठार मारले

आणि दभीतीसाठी तीस सहस्र दासाना ठार मारून पणीचा धुव्वा उडविला कविचायमान, श्रुतकवष, वृद्ध, द्रुहयू, नास्तिकाग्रणी, भेद, मन्यमान पुत्र देवक व शिम्यू इत्यादि आसुरी प्रवृत्तीच्या आक्रमक मानवानाही त्याने कठस्नान घातले आहे असा लोकोत्तर पराक्रमशाली व या अतिपवित्र भरतभूमीचे आर्याना प्रदान करणारा महेन्द्र त्याची सग्रामदेवताच नव्हे तर राष्ट्रदेवताहि बनल्यास त्यात नवल ते काय ? बृहद्देवता ग्रंथामध्यें इद्राची व्याख्या पुढीलप्रमाणे केलेली आहे

चतुर्विधाना भूताना प्राणो भूत्वा व्यवस्थित ।
ईष्टे चैवास्य सर्वस्य तेनेद्र इति स स्मृत ॥
–(बृहद्देवता २-३५)

(जारज, उद्भिज, अडज व स्वेदज अशा चारहि प्रकारच्या प्राणिमात्राचे प्राणतत्त्व म्हणजे इद्र असून तो सर्वांचा इष्ट असल्यामुळे त्याला इद्र असे म्हणतात).प्राणतत्त्वातच सर्व बल अतर्निहित असते ही गोष्ट ध्यानात घेतली म्हणजे इद्रदेवतेचे महत्त्व ध्यानात येईल. प्रत्येक सग्रामाच्या वेळी वैदिक योद्धे या विजयशाली देवाची जी प्रार्थना करीत तिच्यातील काही ऋचा पाहण्यासारख्या आहेत

माते ऊतिः अवमा या परमा या मध्यमा इद्र शुष्मिन् अस्ति ।
ताभि ऊम् सुवृत्रहत्ये अवी न एभि वाजे महान् नः उग्र ॥१॥
आभि स्पृध मिथतीः अरिषण्यन् अमित्रस्य व्यथय मन्यु इद्र ।
आभि विश्वा.अभियुज विषूचीः आर्याय विश अवतारी दासी ॥२
इन्द्र जामयः उत मे अजामय अर्वाचीनास वनुष युयुज्रे ।
त्वम् एषाम् विथुरा शवासि जहि वृष्ण्यानि कृणुहि पराच ॥३॥
अध स्म ते चर्षणय यत् एजान् इन्द्र त्राता उत भव वरूता ।
अस्माकास ये नृततमास अर्य इद्र सूरय दधिरे पुर न ॥७॥
एव न स्पृध समज समत्सु इद्र गुन्धि मिथती अदेवी. ।
विद्याम वस्तो अवसा गृणन्त भरद्वाजा उत ते इद्र नूनम् ॥९॥
–(ऋग्वेद ६-२५)

(हे उग्र इन्द्रा, तुझी जी कनिष्ठ, मध्यम किंवा उत्कट अशी सर्व प्रकारची साहाय्य सामग्री असेल ती घेऊन आमचा कोंडमारा करणाऱ्या शत्रूंचा नाश करण्याच्या कामी आम्हास साह्य कर. हे घोररूपा, तू थोरच आहेस तेव्हा अशी सामग्री आणि सत्त्वयुक्त सामर्थ्य आम्हास देऊन त्या योगाने आम्हावर कृपा कर आमच्याशी झुंजणाऱ्या शत्रुसेनेला ह्याच सामर्थ्याने जर्जर कर आणि ज्या तुला कोणताही अपाय होणे शक्य नाही अशा हे इन्द्रा! तू शत्रूंच्या त्वेषाची नांगी मोडून टाक आणि आमच्यावर हल्ला करणाऱ्या आणि सर्वत्र पसरलेल्या अधार्मिक शत्रूंच्या यच्चयावत् टोळ्यांना आम्हा आर्यांपुढे दाती तृण धरावयास लाव इन्द्रा! आमचा नाश करावयास टपलेले शत्रू, मग ते कोणाचे नातलग असोत की तिऱ्हाईत असोत आमच्यासमोर दंड थोपटून जे उभे राहतील, त्यांची ती धमक तू पार ढिली पाडून त्यांचा संहार कर. त्यांच्या त्या उद्दाम सेनेलाही जीव मुठीत धरून पळावयास लाव आम्ही तुझे भक्त लोक जेव्हा कूच करतो अशा वेळेस तू आमचा रक्षक आणि त्राता हो इन्द्रा! आमचे अत्यंत शूर आर्यधुरंधर आमच्या सेनेचे पुढारी झाले आहेत त्यांचा तू संरक्षक हो समरांगणातून आमच्या प्रतिस्पर्ध्यांना हाकून लाव आणि आम्हाला उपद्रव देणाऱ्या देवभक्तिविहीन दुष्टांना आमच्या स्वाधीन कर तसेच हे इन्द्रा, आम्ही भरद्वाज सर्वस्वी तुझे असून तुझे स्तवन करितो तर तुझ्या कृपेने ह्या उष कालीं आम्हाला अभीष्ट वस्तूंचा लाभ होवो.

असो. या संग्रामदेवतेचे भक्त असणारे वैदिक राष्ट्र स्वतःच्या पराक्रमाच्या आत्मप्रत्ययाने पूर्णपणे भारलेले असून त्याच्यांत पद्धत-शीर युद्धशास्त्र निर्माण झालेले होते त्यांच्या त्या युद्धशास्त्राचे नांव **धनुर्वेद** असे आहे धनुर्वेद या शब्दावरून केवळ धनुर्युद्धाची व धनुष्याची माहिती सांगणारे शास्त्र असा अर्थ काढणे अत्यंत चुकीचे होईल धनुर्वेद म्हणजे संपूर्ण युद्ध व सैनिक शास्त्र (Military science) होय. या शास्त्राला धनुर्वेद असें नाव देण्यात वैदिक राष्ट्राचे धनुष्यावरील उत्कट प्रेम चांगलेच व्यक्त होतें.

धनुष्य हे वैदिक राष्ट्राचे अत्यंत आवडते आयुध असून त्यासंबधीं पराक्रमी आर्य ऋग्वेदाचा परिसर निनादित करीत म्हणतो.–

धन्वना गा धन्वना आजि जयेम धन्वना तीव्रा समदा जयेम ।
धनु. शत्रो अपकाम करोति धन्वना सर्वा प्रदिशः जयेम ॥२॥
वक्ष्यन्ती इव इत् आगनी गन्ति कर्ण प्रिय सखाय परि सस्वजाना।
योषा इव शिङ्क्ते वितता अधिधन्वन् ज्या इय समने पारयन्ती ॥३॥
ते आचरन्ती समना इव योषा माता इव पुत्रं बिभृता उपस्थे ।
अप शत्रून् विध्यता सविदाने आर्त्नी इमे विस्फुरन्ती अमित्रान् ॥४॥
बह्वीना पिता बहु अस्य पुत्र चिश्चाकृणोति समना अवगत्या।
इषुधि सङ्का पृतना च सर्वा पृष्ठे निनद्ध. जयाति प्रसूत. ॥५॥
सुपर्ण वस्ते मृग अस्या दन्तः गोभि. सन्नद्धा पतति प्रसूता ।
यत्र नर स च वि च द्रवन्ति तत्र अस्मभ्य इपव. शर्म यसन् ॥११॥
–( ऋग्वेद ६–७५ )

(धनुष्याच्या साहाय्याने आम्ही शत्रूंचे गोधन जिकू धनुष्याच्या सामार्थ्याने आम्ही शत्रूचा पाडाव करू. धनुष्याच्या बळावर आम्ही शत्रूच्या कडव्या सैन्यावर विजय मिळवू, हे आमचे धनुष्य शत्रूचे सर्व मनोरथ हाणून पाडो फार काय, धनुष्याच्या साहृयानें आम्ही सर्व दिशातील शत्रूवर विजय मिळवूं (२) हळूच काहीं तरी सागण्याच्या उद्देशानेच की काय ती पहा धनुष्याची प्रत्यचा तिचा खरा प्रियकर जो वीराचा कर्ण त्याला दृढ आलिगन देण्यासाठी त्याच्याकडे कशी हलके हलके जात आहे आणि त्यानेही प्रिय वल्लभेप्रमाणे तिला अगदी जवळ ओढून घेताच ती धनुष्यावर चढलेली प्रत्यचा त्याच्या कानात पहा कशी गुणगुणू लागली आहे. तीच त्या वीराचे युद्धात सरक्षण करते (३) त्याच्या धनुष्याची दोन्ही टोके पतीला अनुकूल असणाऱ्या स्त्रियाप्रमाणे त्याच्यापुढे लवतात आणि आई जशी मुलाला माडीवर घेते त्याप्रमाणें बाणाला अकावर घेतात तर अशा या धनुष्याच्या कोटींतून बाण सुटतांच भर्र भर्र आवाज करीत अगदी ठरल्याप्रमाणे शत्रूची वक्ष.स्थले अचूक विदारण करोत. (४) आता हा भाता पहा, अस्त्ररूपी पुष्कळ कन्यकांचा तो पिता आहे त्याचे बाणरूप पुत्रहि पुष्कळ आहेत.

तो समरामध्ये शिरला म्हणजे एकच धामधूम उडवून देतो. असा हा भाता वीराने पाठीशी बाधला म्हणजे तो आपली बाणरूप सतति प्रसवून शत्रूचे मर्व व्यूह आणि सर्व सैन्य ह्याचा अगदी धुव्वा उडवून देतो (५) ज्याच्या मुठीला हस्तिदंत आहे अशा ह्या बाणाला सोनेरी पिसारा लावला आहे आणि तो गव्याच्या चामड्याच्या वादीने दृढ बाधला आहे असा हा बाण धनुष्यापासून सुटला म्हणजे शत्रू एकेच ठिकाणी गोळा झालेले असोत, किवा पागलेले असोत, त्याच्यावर तेथल्या तेथे जाऊन आदळतो. (११)

ऋग्वेद सहितेपासून तर रामायण, भारत काळापर्यंत आणि तेथून हर्षवर्धनाच्या काळापर्यंत भारतीय योद्धयाचे धनुष्यबाण हे सर्वश्रेष्ठ आयुध होते मर्यादापुरुषोत्तम रामचद्र, पार्थ, भीष्म, कर्ण, द्रोणाचार्य अभिमन्यु हे आपापल्या काळातील अद्वितीय योद्धे धनुर्धारी होते हे प्रसिद्धच आहे त्यामुळे सर्व शस्त्रात धनुष्याचे स्थान सर्वश्रेष्ठ मानण्यात येई धनुष्याच्या युद्धविद्येतील या वैशिष्टचपूर्ण स्थानामुळेच युद्ध व तदनुषगिक शास्त्राला धनुर्वेद हे यथार्थ नाव मिळाले आहे धनुर्वेद म्हणजे केवळ धनुर्विद्या मात्र नव्हे

धनुर्वेद हा अथर्ववेदाचा उपवेद मानलेला असून त्याचे प्रणते महर्षि विश्वामित्र होत वैदिकाचे हे युद्धशास्त्र पहावयाचे म्हणजे प्रथम शस्त्रास्त्रे पाहणे आवश्यक ठरते शस्त्रास्त्राचे धनुर्वेदात (१) सरक्षक व (२) आक्रमक असे द्विविध वर्गीकरण असून या दोन्ही प्रकारच्या शस्त्रास्त्राचे पुन्हा चर्तुविध वर्गीकरण केलेले आहे ते म्हणजे (१) मुक्त (२) अमुक्त (३) मुक्तामुक्त व (४) यत्रमुक्त हे होय. नीतिप्रकाशिकेने या ऐवजी (१) मुक्त (२) अमुक्त व (३) मत्रमुक्त असे तीनच प्रकारचें वर्गीकरण केलेले आहे मुक्तवर्ग म्हणजे शत्रूच्या अगावर सोडण्यात अथवा फेकण्यात येणारी शस्त्रे होत. अमुक्त म्हणजे न फेकता आपल्या हातात ठेवूनच ज्याचा प्रहार करावयाचा असतो अशी शस्त्रे होत, व मत्रमुक्त म्हणजे मंत्राने अथवा गुप्त पद्धतीनें अथवा यत्राच्या साहाय्यानें ज्याचे सामर्थ्य प्रकट

होते अशी शस्त्रे होत धनुष्य व बाण ही मुक्त वर्गातील प्रधान आयुधे होती धनुष्याला शाङ्‌र्ग, कोदड, कार्मुक व पिनाक अशी वेगवेगळी नावे आढळतात पण हे वेगवेगळे शब्द धनुष्याचे केवळ पर्याय शब्द आहेत की, धनुष्याच्या वेगवेगळ्या जातीचा अथवा रचनाचा त्यावरून बोध होतो हे सागणे कठीण आहे ऋग्वेदात आपणास इषुकृत्व, इषुकार असे शब्द आढळतात. त्या शब्दाचा बाण तयार करणारा असा अर्थ असून एका मनुष्यवर्गाला ही सज्ञा दिलेली असल्यामुळे त्यावरून बाण तयार करणे हा ज्याचा जीवनव्यवसाय होऊ शकत होता असा एक वर्ग त्या काळी होता हे सिद्ध होते मुख्य बाणकार बाणाचे फाळ तयार करी व त्याचे इतर भाग त्याच्या हाताखालचे लोक तयार करीत फाळावरच लक्ष्यवेधाचे सारे यश व दायित्व असल्यामुळे ते तयार करण्यास विशेषच कौशल्य लागे बाणाचे महत्त्व वैदिक आर्याना केवढे वाटे हे ऐतरेय ब्राह्मणातील देवानी तयार केलेल्या देवतात्मक बाणाच्या वर्णनावरून स्पष्ट होते ते वर्णन असे –

इषु वा एता देवा समस्कुर्वत यदुपसदस्तस्या अग्निरनीकमासीत् सोम शल्यो विष्णुस्तेजन वरुण पर्णानि तामाज्यधन्वानोव्यसृजस्तया पुरो भिन्दन्त ॥

–(ऐतरेय ब्राह्मण प्रथम पचिका अध्याय ४ खड ८ वा)

सोमभागातील उपसद देवतानी बाण निर्माण केला त्याच्या मुखाच्या ठिकाणी अग्निदेवतेची स्थापना केली. (बाणाचे मुख म्हणजे पिसे जोडलेल्या बाणाच्या मुठीच्या वरचा भाग होय. मुख म्हणजे अग्र नव्हे,) बाणाच्या शल्याच्या म्हणजे पोलादी फाळाच्या ठिकाणी सोम देवतेची स्थापना केली बाणाचा सर्वात महत्त्वाचा अवयव जे त्याचे तेजन म्हणजे तीक्ष्ण अग्र त्या ठिकाणी महाविष्णूची स्थापना केली व बाणाच्या पिसाऱ्याच्या ठिकाणी म्हणजे पृष्ठभागाच्या ठिकाणी वरुणाची स्थापना केली. नतर त्या बाणाची सज्ज धनुष्यावर योजना करून त्यानी तो असुर नगरीवर सोडून तिचा विध्वस केला व ते विजयी होऊन परतले.) वरुण ही आर्यांची

न्यायदेवता असून विष्णु ही पालनदेवता होय हे ध्यानांत घेतले म्हणजे न्यायासाठी त्याचें शस्त्र बाहेर निघे व लोकहितांत शस्त्रधारणाचे पर्यवसान त्याना अभिप्रेत होते हे स्पष्ट होते.

मुक्त आयुधाच्या वर्गात प्राचीन ग्रथकारानी एकदर बारा आयुधाचा समावेश केलेला असला तरी त्यात धनुष्याचे महत्त्व अनन्यसामान्य आहे आता हे धनुष्य कसे असे व ते कसे तयार करीत तें पाहू. धनुष्य चार हात अथवा चार गज ( अठरा इचाचा एक गज या प्रमाणात ) उच व लाब असे, व ते तीन ठिकाणी वाकवून त्याची घडी करता येत असे धनुर्वेदामध्ये धनुष्याची एकदर चौदा प्रकारची प्रात्यक्षिके ( कवाईत ) व त्याचे भिन्नभिन्न चौदा प्रकारचे उपयोग दिलेले आहेत धनुष्याचा दड पोलाद, शिगे किवा काष्ठाचा बनविण्यात येत असे. धनुष्याची ज्या अथवा प्रत्यचा मुख्यतः बैलाच्या वळलेल्या आतड्याची बनविण्यात येत असे तिच्या आघाताने हाताला व मनगटाना इजा होऊ नये म्हणून चामड्याचे मणिबध मनगटावर व अगुलीत्रमाणे बोटावर बाधीत. ते गोधामृगाच्या चर्माचे असत. व म्हणूनच रामायण अथवा महाभारतातील योद्धयाच्या वर्णनात 'बद्धगोधागुलित्राण' असे शब्द येतात या मणिबधावर होणाऱ्या प्रत्यचेच्या आघाताचेही घट्टे अथवा चिन्हे मनगटावर उमटतच असत. व त्यावरून ही प्रत्यचा किती मजबूत असेल याची कल्पना येते अशी चिन्हे असणे हे क्षत्रियाना अतिशय अभिमानास्पद भूषण वाटत असे आदर्श धनुर्दंड चार गज किवा सहा फूट लाबीचा असे याचा उल्लेख केलाच आहे त्यापेक्षा कमी लाबीचा धनुर्दंड कनिष्ठ प्रतीचा समजण्यात येई. धनुष्यदडाची मूठही बाणप्रक्षेपाच्या यशस्वितेत अत्यत महत्त्वाची असल्यामुळे स्थिर व सुलभ लक्ष्यवेधाला उपयुक्त ठरावी म्हणून काम नसेल त्या वेळी ती जाड आच्छादनाने झाकून ठेवीत असत. पोलादाचा धनुर्दंड अर्थातच लहान असे. धनुष्याचा मध्यभाग स्त्रीच्या भुवईसारखा कमानदार असे. वर सागितल्याप्रमाणे

धनुष्य हें त्रिभागात्मक असल्यामुळे त्याचा एकेक भाग वेगवेगळा तयार करण्यात येई व त्यावर जडावाचे व सुवर्णाचे कामही करण्यात येत असे. महाभारताच्या विराट् पर्वांत शमी वृक्षावर चढलेल्या उत्तराने अर्जुनाला पाडवाच्या धनुष्याची माहिती विचारताना त्या धनुष्याचे जे वर्णन केले आहे ते या दृष्टीनें पाहण्यासारखे आहे ते असे –

बिदवो जातरूपस्य शत यस्मिन् निपातिता ।
सहस्रकोटिसौवर्णा कस्यैतद्धनुरुत्तमम् ।। १ ।।
वारणा यत्र सौवर्णा पृष्ठे भासन्ति दशिता. ।
सुपार्श्वं सुग्रह चैव कस्यैतद्धनुरुत्तमम् ।। २ ।।
तपनीयस्य शुद्धस्य पृष्ठे यस्येंद्रगोपका ।
पृष्ठे विभक्ता शोभन्ते कस्यैतद्धनुरुत्तमम् ।। ३ ।।
सूर्या यत्र च सौवर्णा त्रयो भासन्ति दशिता ।
तेजसा प्रज्वलन्तो हि कस्यैतद्धनुरुत्तमम् ।। ४ ।।
शलभा यत्र सौवर्णा तपनीयविभूषिता ।
सुवर्णमणिचित्रच कस्यैतद्धनुरुत्तमम् ।। ५ ।।

– (महाभारत विराटपर्व अ. ४२ )

ज्याच्यावर सुवर्णाचे शभर बिंदू आहेत व ज्याच्या कोटी म्हणजे धनुर्दण्डाचे भाग सहस्र म्हणजे कातिमान् व बळकट आहेत ते हें उत्कृष्ट धनुष्य कोणाचे आहे ? ज्याच्यावर सुवर्णाचे हत्ती काढलेले दिसतात व ज्याचा पृष्ठभाग आणि मध्यभाग अत्यत सुदर आहे ते हे धनुष्य कोणाचे आहे ? ज्याच्यावर शुद्ध सुवर्णाच्या इद्रगोपाची वेगवेगळी चित्रे काढलेली आहेत ते हे धनुष्य कोणाचे आहे ? ज्याच्यावर सुवर्णाचे तीन सूर्य वेगवेगळे प्रकाशत आहेत तें हें धनुष्य कोणाचे ? ज्याच्यावर सुवर्णाचे शलभ काढलेले आहेत व सुवर्णाचें आणि जडावाचे सुदर काम केलेले आहे ते हे धनुष्य कोणाचे ? ) यातील पहिलें धनुष्य अर्जुनाचें असून अन्य अनुक्रमे भीमसेन, युधिष्ठिर, नकुल व सहदेव याची होती. अशी धनुष्ये ऋग्वेदकाळीही होती हे आपण इद्राच्या सुवर्णदडाच्या धनुष्याचा

ऋग्वेदातील उल्लेख नुकताच पाहिला आहे त्यावरून स्पष्ट होईल शिंगाची जी धनुष्ये बनवीत त्यासाठी रेडा, म्हैस, गेंडा किंवा शरभाची शिंगे वापरीत. त्यापैकी शरभ आज अस्तित्वात नाही धनुष्यासाठी वापरावयाचे काष्ठ चंदन, शाल्वृक्ष, वेत इत्यादिकाचे असे त्यापैकी वेत अथवा बांशाचे बनविलेले धनुष्य सर्वोत्कृष्ट समजले जाई वर दिलेल्या मूल्यवान् व वजनदार द्रव्यानी विख्यात महाभारतीय योद्धा पार्थ याचे धनुष्य बनविलेले होते कधी कधी संपूर्ण धनुर्दंडहि सुवर्ण, रुपे अथवा तांब्याचा असे कौटिल्याने आपल्या अर्थशास्त्रात धनुष्याचे (१) कार्मुक (२) कोदंड (३) द्रुण व (४) धनु असे चार प्रकार दिले असून त्यापैकी कार्मुक हे ताडाच्या वृक्षाच्या काष्टाचे असे. कोदंड बांसाचे अथवा वेताचे बनवीत द्रुण हे कमावलेल्या चंदनादिकाष्ठाचे असे तर धनु हे अस्थीपासून अथवा शिंगापासून तयार करीत भगवान् श्रीकृष्णाचे सुविख्यात शार्ङ्गधनुष्य हे शिंगाचे बनविलेले होते धनुष्याच्या प्रत्यंचेच्या जडपणावरून व हलकेपणावरूनही धनुष्याच्या वेगवेगळ्या जाती ठरत व कौटिल्याने त्याचा संक्षेपाने उल्लेख केलेला आहे कोदंडमंडन नावाच्या ग्रंथात अशा एकंदर अठरा प्रकाराचा उल्लेख असून धनुष्याच्या वजनदारपणावरून व हलकेपणावरूनही त्याचे वेगवेगळे प्रकार होत दोन पलाश वजनाच्या धनुष्यापासून तर हजार पलाश वजनाच्या धनुष्यापर्यंतचा उल्लेख धनुर्वेदातून आढळतो रामायणातील कोणालाही न उचलता येणारे शिवधनुष्य प्रसिद्धच आहे महाभारतात अश्वत्थाम्याला श्रीकृष्णाचे शार्ङ्ग धनुष्य उचलता न आल्याचा उल्लेख आहे. पुष्कळदा स्वयंवरासारख्या प्रसंगी क्षत्रिय योद्ध्याची परीक्षा पहावयास्तव जड व पेलण्यास वा सज्ज करण्यास कठीण अशा धनुष्यांची योजना करीत. महाभारतातील द्रौपदी स्वयंवराच्या प्रसंगी असे खास धनुष्य मत्स्ययंत्रभेदास्तव राजा द्रुपदाने ठेवले असल्याचा उल्लेख आहे त्या धनुष्याने जरासंध—शिशुपालासारख्या गाजलेल्या वीरांचीही फजिती केली, व येवढ्या विशाल राजसमूहात केवळ

कर्ण व अर्जुन हे दोघे काय ते ते धनुष्य सज्ज करू शकले आपल्या राष्ट्राप्रमाणेच ग्रीक राष्ट्रही धनुर्धारी लोकाचेच होते पण ग्रीक योद्धयाच्या धनुष्याच्या उंचीचे प्रमाण सामान्यत छातीपर्यंत होते व भारतीय योद्धयाच्या धनुष्याच्या उचीचे माण सामान्यत काना-पर्यंत असे धनुष्याचा हा विशेष आहे की प्राचीन काळच्या चतुरग-दळातील सर्वच सैनिकाना प्रभावशालीपणाने ते आयुध वापरता येई त्यामुळे ते सर्वाच्याच दृष्टीने उपयुक्त असे विल्सनने भारतीय धनुर्धाऱ्याचे वर्णन करताना घोडयावरून मफाईने धनुष्य चालविणाऱ्या वीराची प्रशसा केलेली आहे

धनुष्य म्हटले की बाण आलाच कारण बाण हाच धनुष्याचा खरा प्राण असल्यामुळे धनुष्याला बाणासन ही अन्वर्थ सज्ञा मिळालेली आहे. बाणाची लाबी सामान्यत तीन गज असावी असे सागितले आहे बाणाला शर असेहि नाव आहे. शतपथ ब्राह्मणात या शर शब्दाची उपपत्ति पुढीलप्रमाणे दिली आहे इद्राने जेव्हा आपले वज्र वृत्रासुरावर फेकून मारले तेव्हा त्याचे चार तुकडे झाले त्यापैकी एका तुकडयाची यज्ञात आग्नीध्र नावाच्या ऋत्विजाच्या हाती असणारी स्फ नावाची तरवार झाली दुसऱ्या तुकडयाचा यज्ञातील यूप (यज्ञीय पशू बाधावयाचा स्तभ) झाला, तिसऱ्या तुकडयाचा रथ झाला व चवथा शेष तुकडा जो जमिनी-वर पडला तो बाण झाला, तो गळून पडला म्हणून त्याला शर असे म्हणतात. (शतपथ ब्राह्मण १. २. ४ व ६, ५. २ १०) तात्पर्य, देवराट् महेन्द्राच्या दिव्य वज्रापासून बाणाची उत्पत्ति झालेली आहे बाणात फाळाला सर्वात महत्त्वाचे स्थान असल्या-मुळे ब्राह्मण ग्रथानी त्याला यज्ञाग्नोची उपमा दिलेली आहे यज्ञात जे स्थान अग्नीला तेच बाणरचनेत फाळाला असे या उपमेचे रहस्य आहे. बाण हे सपूर्णच पोलादाचे बनवीत अथवा वेताचे तयार करीत, बाणासाठी उपयोगात आणावयाचा वेत चागला कमावून तयार करीत व त्याला सोनेरी रग देत क्वचित् त्याच्या-वर सुवर्णाचे कामही असे. विख्यात योद्धे स्वत. वापरावयाच्या

बाणावर आपले नाव टकित करीत असत अशा आपले नाव टकित केलेल्या बाणाचा वापर महारथी कर्ण करीत असे असा महाभारतातील कर्णपर्वात निर्देश आहे असो बाणाच्या मागच्या टोकाला पिसे लावलेली असत बाणाला वेग यावा हा त्याचा उद्देश असे व तैलादि द्रव्याचा उपयोग करून तो परिणामकारक असावा याची काळजी घेण्यात येत असे कधी कधी बाणाग्राच्या अथवा फळाच्या मूलभागी सुवर्णाचे बिंदूही शोभेसाठी असत. हस्तिदताचे काम असलेल्या बाणाचा ऋग्वेदातील उल्लेख आपण नुकताच पाहिला आहे धनुर्वेदाने बाणाचे उत्तम, मध्यम व कनिष्ठ हे तीन प्रकार सागितले आहेत बाणसधानात हाताच्या अगठ्याचे विशेषच महत्त्व असते, व म्हणूनच धनुर्वेदाचार्य द्रोण गुरूनी अर्जुनापेक्षा वरचढ होऊ नये म्हणून निषादपति एकलव्याच्या अगुष्ठाचीच गुरुदक्षिणा मागितली होती उत्तम बाणाचा दड बारा मुष्टि अथवा सामान्यपणे १२ पल लाबीचा असे मध्यम बाण अकरा मुष्टि लाबीचा व कनिष्ठ बाणदड दहा मुष्टि लाबीचा असे कौटिल्याने बाणाचे (१) वेणु (२) शर (३) दडशर (४) शलाका व (५) नाराच असे पाच प्रकार सागितले आहेत वसिष्ठानी नाराचाचे लक्षण असे केले आहे की, तो पोलादाचा असून त्याला पाच अग्रे असतात व पाच पिसे असतात नाराचाचा युद्धात कुशलतेने उपयोग करू शकणारे योद्धे श्रेष्ठ समजण्यात येत असत धनुर्युद्धाची त्रिकोण, मडल इत्यादि विविध प्रात्यक्षिके (कवाइती) असत ग्रीकाच्या काळी येथे आलेल्या भारताबाहेरील प्रवाशानी भारतीय धनुर्धाऱ्याच्या कौशल्याची चित्तवेधक वर्णने केली आहेत आपले तीन गज लाबीचे धनुष्य भूमीवर रोवून पायदळ सैन्यातील भारतीय धनुर्धारी जेव्हा आपल्या तीक्ष्ण बाणाचा प्रयोग करी त्या वेळी त्याच्या होणाऱ्या परिणामाचे चित्र रेखाटताना एरियन म्हणतो –

There is nothing which can resist an Indian archer's shot; neither shield nor breast-plate nor any stronger defence if such there be –Indika of Arrian by McCrindle

( भारतीय धनुर्धाऱ्याने केलेल्या बाणप्रक्षेपाच्या आघाता-पासून वाचविण्यास कोणतेही साधन समर्थ ठरत नसे ढाल—छातीच्या सरक्षणासाठी असलेली मोठी ढाल, कवच वा अन्य कोणतेहि बळकट साधन त्या बाणाघातासमोर अपुरेच ठरे. ) धनुर्विद्यची भगवान् महादेव ही देवता असून त्याच्या धनुर्धारी ध्यानाचे उत्कृष्ट वर्णन महाभारताच्या द्रोणपर्वात पहावयास सापडते रोमन व ग्रीक लोकातही धनुर्विद्या होती ग्रीकाचा प्रसिद्ध देव अपोलो हा धनुर्देवच होता पण भारतीयाच्या इतकी त्याची धनुर्विद्या श्रेष्ठ नव्हती असे ग्रीक लोकानीच लिहून ठेवलेले आहे महाभारत व रामायण सहिताचे सूक्ष्म अध्ययन केले तर भारतीयाची धनुर्विद्यतील प्रगति केवढी विलक्षण होती याची चागली कल्पना यते अतिम हिदू सम्राट पृथ्वीराज चव्हाण याच्या काळापर्यत ही धनुर्विद्येतील प्रगतीची परपरा होती शब्दवेधी पृथ्वीराजाच्या कौशल्याची परीक्षा घेत असता शहाबुद्दीन घोरीचे डोकेच भाट चदवरदाईच्या सूचनेवरून अध पृथ्वीराजाने कसे उडविले हे पृथ्वीराजरासो या काव्यातील कथानक प्रसिद्धच आहे धनुर्वेदाप्रमाणे मुक्त वर्गात येणारी आणखी आयुधे म्हणजे भिन्दिपाल, शक्ति, द्रुघन, तोमर, नलिका, लगुड, पाश, चक्र, दतकात व मुसुन्दि ही होत भिन्दिपाल हे जड सोटयासारखे आयुध असून ते पकडण्याची मूठ रुद असे व ती वाकविण्याची सोय असे. त्याची धार चागलीच रुंद असे असुरानी कार्तवीर्यार्जुनाशी केलेल्या युद्धात या शस्त्राचा उपयोग केला असल्याचा प्राचीन वाङमयात उल्लेख आहे हे एक गज लाबीचे आयुध होते शक्ति हे आयुध भाल्यासारखे असून ते दोन गज लाबीचे असे त्याचे पाते उघडे व रुद असून ते झाडाच्या पानाच्या आकाराचे असे त्याचा उपयोग दोन्ही हातानी करावयाचा असे त्याचे पाते लोखडाचे अथवा सस्कारित धातूचे अत्यत तीक्ष्ण असून दड लाकडी असे धनुर्वेदात त्याची सहा प्रात्यक्षिके दिली आहेत द्रुघन हे मुद्गराच्या जातीचे आयुध

असून त्याची लाबी चार फूट दोन इच असे त्याचा दाडा लाकडी असून तोडावर जड लोखडी गोळा असे

कौटिल्याने या आयुधाचा उल्लेख केलेला असून धनुर्वेदात त्याची चार प्रकारची प्रात्यक्षिके सागितली आहेत तोमर हे फारच प्रसिद्ध आयुध आहे त्याची लाबी प्राचीन साहित्यात तीन गज सागितलेली आहे बाणासारखीच धार असलेला हा एक विशेष प्रकारचा दड असून उत्तम, मध्यम व कनिष्ठ असे या आयुधाचे वर्गीकरण आहे पाच हात लाबीचा तोमर उत्तम गणला जात असे, तर साडेचार हात लाबीचा मध्यम व चार हात लाबीचा कनिष्ठ समजण्यात येई त्याचीही तीन प्रकारची प्रात्यक्षिके सागितली आहेत नलिका दोन प्रकारच्या असत छोट्या नलिकाचा उपयोग पायदळातील सैनिक करीत व मोठ्या गाड्यावर घालून मध्ययुगीन तोफाप्रमाणे युद्धस्थळी नेत त्या अर्थातच पोकळ असत व त्यातून तापलेल्या लोखडी गोळ्याचा व अग्निगोलकाचा वर्षाव करण्यात येई इतक्या प्राचीन काळी बदुकीच्या दारूचा शोध लागला होता काय व ती उपयोगात आणीत असल्याचे पुरावे आढळतात काय हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे लगुड हा एक प्रकारचा जड व वजनी पण गोलाकृति दड असून तो दोन गज लाबीचा असे उजव्या हाताने अथवा दोन्ही हातानी करावयाच्या त्याच्या प्रात्यक्षिकाचे वर्णन प्राचीन साहि-त्यातून आढळते. पाश हे वरुण देवतेच्या नावावर प्रसिद्ध असलेले आयुध असल्यामुळे त्याला वरुणपाश असेहि म्हणतात. अग्नि-पुराणात त्याची अकरा प्रकारची प्रात्यक्षिके दिलेली आहेत दहा गजापासून तीस गजापर्यंत या पाशाच्या लाबीचे प्रमाण दिलेले असून तो सुताचा, मुजगवताच्या वळलेल्या दोऱ्याचा, कातड्याचा अथवा वळलेल्या आतड्याचा बनवीत असत. त्याच्या शेवटी धातूचे भरीव गोळे लावलेले असत. तो नेहमी डाव्या हातात वागवीत व प्रयोगाच्या वेळी उजव्या हाताने त्याचा शत्रूच्या मस्तकावर प्रयोग करीत. भारतीय योद्धे या कलेत इतके

प्रवीण होते की, या पाशाच्या एकाच आघाताने शत्रूच्या मस्तकाच्या ठिकऱ्या उडत असत चक्र हे मडलाकृति असून त्याच्या मध्यभागी ते उघडण्याचे वा धारण करण्याचे साधन असे त्याला चार, सहा अथवा आठ तीक्ष्णाग्र आरा असत व त्याची सहा प्रात्यक्षिके धनुर्वेदात सागितली आहेत भगवान् श्रीकृष्णाचे सुदर्शन चक्र प्रसिद्धच आहे कौटिल्याने चलयत्र म्हणून चक्राचा उल्लेख केलेला आहे दतकान्त हें दताकृति आयुध असून ते लोखडाचे असे त्याची मूठ बळकट असून धारदार फाळ सरळ असे त्याची धनुर्वेदात दोन प्रात्याक्षिके सागितली आहेत. मुसुन्दी हा एक प्रकारचा जाड सोटा असून त्याला आघाताच्या आठ कडा असत, व त्याची मूठ रुद, भक्कम व बळकट असे

अमुक्त, यत्रमुक्त व मुक्तामुक्त या वर्गातील शस्त्राकडे व इतर रणसाहित्याकडे आपण पुढील व्याख्यानात वळू व प्राचीन भारतात बदुकीच्या दारूचा उपयोग होत असे काय याही प्रश्नाचा विचार करू



## व्याख्यान तेरावे

# मंत्रविद्या व विविध शस्त्रास्त्रे

धनुर्वेदाने केलेल्या वर्गवारीपैकी मुक्त वर्गात समाविष्ट होणाऱ्या शस्त्राचा उल्लेख मागच्या व्याख्यानात केलाच आहे अमुक्त वर्गात एकदर एकवीस आयुधे येतात. ती आयुधे वज्र, पट्टिश, इषु, परशु, गोशिरस्, असिधेनु अथवा असियष्टि, अस्तार, लवित्र, कुत, स्थूण, प्रास. पिनाक, गदा, मुद्गर, शिर, मुसल, मुष्टिक, परिघ, मयूखी, शतघ्नी, असि अथवा खड्ग ही होत

या आयुधापैकी देवराट् महेद्राचे वज्र हे आयुध विख्यात असून त्याचे वर्णन मागच्या व्याख्यानात केले आहे. तप पूत दधीचीच्या अस्थीपासून हे वज्र निर्माण करून ते देवराष्ट्रावरील आपत्तीच्या निवारणासाठी महेद्राच्या स्वाधीन करण्यात आले असे महाभारतात सागितले आहे वज्राला सहा धारदार कडा असून त्याच्या प्रक्षेपाच्या वेळी मोठा आवाज होत असे त्याची मूठ भक्कम असून धार तीक्ष्ण असे त्याची चार प्रात्यक्षिके असत पट्टिश म्हणज हल्लीचा पट्टा होय डॉ ऑपर्टचे मत असे आहे की इषु ही एक लहान तरवार होती ते बाणाच्या धर्तीचे पण थोडेसे रुद असे आयुध असावे असा दुसऱ्या कित्येकाचा तर्क आहे त्याचा पुढचा भाग वक्र असून लाबी दोन गज असे त्याची चार प्रात्यक्षिके धनुर्वेदात सागितली आहेत वाल्मीकीय रामायणातील लक्ष्मण व रावणाचा मुलगा अतिकाय याच्या युद्धात अतिकायाने या शस्त्राचा उपयोग केला होता परशु हे परशुरामाच्या पराक्रमामुळे अत्यत प्रसिद्ध झालेले आयुध आहे त्याचे फाळ पोलादाचे असून मूठ लाकडाची असे गोशिरस् हा एक प्रकारचा भाला असून त्याचे फाळ दोन फूट लाबीचे असून त्या फाळाचा आकार गाईच्या

शिगासारखा असे त्याची धनुर्वेदात पाच प्रात्यक्षिके सागितली आहेत. महेद्राने हे शस्त्र राजर्षि मनूला दिले अशी पारपरिक दतकथा आहे असिधेनु ही एक गज लाबीची सुरी असे तिचा उपयोग हातघाईच्या लढाईत होत असे याच आयुधाचा कौटिल्याने असियष्टि या नावाने उल्लेख केला आहे लवित्र हे कोयत्याच्या जातीचे आयुध असून त्याचे फाळ वाकडे व टोकाला तीक्ष्ण असे त्याची मूठ रुद असून दोन्ही हातानी त्याचा उपयोग करण्यात येत असे अस्तार हे दोन्ही बाजूनी आघात करण्याची सोय व मध्य-भागी वाक असलेले आयुध असे कुत हा एक विशेष प्रकारचा भाला असून त्याची सहा प्रात्यक्षिके धनुर्वेदात वर्णन केलेली आहेत हा लोखडी भाला असून त्याच्या अग्राला सहा तीक्ष्ण धारा असत शुक्राचार्यांनी या भाल्याची लाबी दहा हस्त प्रमाण असावी असे सागितले असून शत्रूच्या घातक वारापासून सरक्षण व्हावे म्हणून त्याचे फाळ नागराच्या आकाराचे असावे असे सुचविले आहे ऋग्वेदामध्ये या आयुधाचा उल्लेख आहे कौटिल्याच्या मते ह्या आयुधाचा दड काष्ठाचाच असून तो पाच ते सात हस्त प्रमाण असावा याच्यात कौटिल्याने उच्च, मध्यम व हलका असे तीन प्रकार सागितलेले असून सात हस्त प्रमाणाचा उत्तम, सहा हस्त प्रमाणाचा मध्यम व पाच हस्त प्रमाणाचा कनिष्ठ असे म्हटले आहे. स्थूण हे एक सरळ स्तभाकृति आयुध असून मनुष्याइतकी त्याची उची असे व त्याच्या अग्रभागी लोहमय गोळे असत. प्रास हे भाल्याच्याच जातीचे चार ते सात हस्त प्रमाण लाबीचे आयुध असून त्याचे अग्र अथवा फाळ अत्यत धारदार असे. त्याची चार प्रात्यक्षिके सागितलेली असून ऋग्वेदात त्याचा उल्लेख आढळतो. कौटिल्याने या आयुधाचा उल्लेख केला आहे पण तें दोन मुठीचे व २८ इच लाबीचे सागितलेले असल्यामुळे ते एखादे वेगळे आयुध असण्याचीहि शक्यता आहे रूढ सकेत व पुराणवाङमयातील उल्लेख यावरून पिनाक म्हणजे महादेवाचे धनुष्य म्हणून प्रसिद्धच आहे पण औशनस् धनुर्वेदाप्रमाणे पिनाक म्हणजे त्रिशूल होय.

त्याला तीन अग्रे असून दोन लोखडाची व मधले थोडे लाब असणारे अग्र पितळेचे असे शुक्राचार्यांच्या मते या आयुधाची लाबी चार गज किंवा तीन हस्तप्रमाण असावी **गदा** हे भरीव व लोखडी मुद्गरासारखे आयुध असून त्याच्या अग्रभागी शभर तीक्ष्ण अग्रे असत गदेची लाबी चार गज सागितलेली असून तिची वीस प्रात्यक्षिके धनुर्वेदात वर्णन केली आहेत हत्तीची गडस्थळे व एखादी नटबदी भारतीय योद्धे गदाघाताने लीलेने शतधा विदीर्ण करीत असत नाभीच्या खाली गदेचा आघात करू नये असा नियम होता दुर्योधनाशी केलेल्या युद्धात भीमाने या नियमाचा भग केल्यामुळे श्रीकृष्णाचे वडील बधु बलराम त्याला ठार करण्यासाठी धावल्याची महाभारतातील कथा प्रसिद्धच आहे मुद्गर हा एक तीन गज लाबीचा लोहदण्ड असून त्याचे अग्र हातोड्यासारखे व मूठ गोलाकृति व बळकट असे शिर हे नागराच्या जातीचे आयुध असून त्याचे अग्र दोन्ही बाजूला वक्र असे त्याची उची मनुष्यशरीराएवढी सागितलेली आहे मुसल हे बत्त्याच्या जातीचे आयुध असून त्याचा अग्रभाग लोहाचा व दण्ड खदिर वृक्षाचा असे हे बलरामाचे आवडते हत्यार होते मुष्टिका ही तीक्ष्ण धारेची छोटी सुरी असून हातघाईच्या द्वद्व युद्धात तिचा विशेषकरून उपयोग करण्यात येत असे तिच्या चमकेची युद्धरसिक कवीनी चद्रजोत्स्नेशी तुलना केलेली असून तिची मूठ बळकट असे व धार अत्यत तीक्ष्ण असे परिघ हा एक अत्यत वजनी असा गोलाकृति लाकडी दण्ड असे मयूखी हा तरवारीसारखी मूठ असलेला एक दण्ड असून त्याची लाबी मनुष्य शरीराइतकी असे व त्याला लहान लहान घटा लाविलेल्या असत खड्गाप्रमाणेच मयूखीने करावयाच्या युद्धातहि ढालीचा उपयोग करीत असत शतघ्नीचा शब्दार्थ शभर अथवा शभरावर लोकाना एकदम ठार करण्याचे साधन असा आहे. शतघ्नी ही चार गज लाबीची असून ती गदेच्या आकृतीसारखी दिसत असे. तिची मूठ अत्यत बळकट असून अनेक तीक्ष्ण पोलादी खिळे तिच्यावर सर्व बाजूनी असत.

आधुनिक तोफेशी तिची मारक शक्तीत पुष्कळदा तुलना करतात कौटिल्य शतघ्नीचा अतर्भाव यत्रात करतो यत्राच्या साहाय्याने त्या शत्रुसैन्यावर टाकण्यात येत व किल्ल्याच्या तटावर त्या सरक्षणासाठी लाविलेल्या असत असि अथवा खड्ग हे अमुक्त वर्गातील शेवटचे आयुध असून भारतीयाचे सर्वात लाडके शस्त्र होय प्रत्येक वीराच्या डाव्या कटीला खड्ग लटकलेले असलेच पाहिजे असा सकेत असे खड्गाची लाबी साधारणतः पन्नास अगुले असून पाते चार इच रुदीचे असे तरवारीला असलेली विविध नावेच भारतीयाचे तिच्यावरील प्रेम व्यक्त करतात निस्त्रिश, खड्ग, तीक्ष्णधार, दुरासद, श्रीगर्भ, विजय, धर्ममूल, ही तरवारीची नावे क्रौर्य, सामर्थ्य, भयदता, विजय, धनलाभ, धर्मसरक्षण इत्यादि विशेषावरून तरवारीला मिळाली आहेत पण हे विशेष केवळ तरवारीचेच नसून ते सर्वच शस्त्राशी सबद्ध असे आहेत तरीही ही गौरवशाली नावे मात्र त्यानी तरवारीलाच दिलेली आहेत भारतीयाचे या शस्त्रावर विशेष प्रेम होते हे मी येवढ्यासाठीच उल्लेखिले महाभारतात असे उल्लेखिले आहे की असुराच्या सहारासाठी सहारक शक्ति तरवारीच्या रूपाने विश्वात प्रकट झाली ती प्रथम रुद्राच्या स्वाधीन होती. रुद्राने ती विष्णूच्या हातात दिली व नतर क्रमाने ती मनु, इक्ष्वाकु इत्यादिकाच्या परपरेने मानवात स्थिर झाली खड्गाचे नक्षत्र कृत्तिका असून देवता अग्नि व गण रोहिणी आहे रुद्र हा खड्गाचा सर्वप्रथम धारयिता आहे व म्हणूनच योद्ध्याच्या शस्त्रपूजनात खड्गाला अग्रस्थान आहे

मुक्तामुक्त, यत्रमुक्त व मत्रमुक्त या वर्गात अस्त्रे येतात व धनुर्वेद आणि महाभारत सहिता यावरून त्या कविकल्पना नसून ती अस्त्रे प्रत्यक्ष वापरात होती असेहि दिसते त्याची येथे केवळ नावनिशी व यादी देण्यात फारसे स्वारस्य नाही पण त्यातील सारीच केवळ मत्रबलावर चालत होती असे मात्र नाही केवळ मत्रावरच चालणाऱ्या अस्त्राची नावे महाभारताचा वक्ता वैशपायन

याने पुढीलप्रमाणे सांगितली आहेत (१) विष्णुचक्र (२) वज्र (३) ब्रह्मास्त्र (४) कालपाशक (५) नारायणास्त्र व (६) पाशुपतास्त्र. धनुर्वेदाचा प्रवक्ता महर्षि विश्वामित्र हा अनेक महास्त्रांचा जसा ज्ञाता तसाच स्वयं निर्मातीही होता ही अस्त्रे म्हणजे यंत्रे होती असे कौटिलीय अर्थशास्त्रातील विवेचनावरून दिसते. अग्न्यस्त्राचा एक यंत्र म्हणून प्रयोग अर्थशास्त्रात कौटिल्याने दिला आहे व त्याचे साधन म्हणून कौटिल्याने बाणाचाच उपयोग करावयास सांगितले आहे आणखीहि काही यंत्रे कौटिल्य अस्त्रे म्हणून उल्लेखितो ती (१) सर्वतोभद्र (२) जामदग्न्य (३) बहुमुख (४) विश्वासघाती (५) संघाती (६) यानक (७) पर्जन्यक (८) बाहू (९) अर्धबाहू इत्यादि होत सर्वतोभद्र हे शत्रुसैन्यावर चोहो बाजूंनी दगडांचा वर्षाव करणारे यंत्र होते जामदग्न्य हे शत्रुसैन्यावर तीक्ष्णाग्र व भयानक बाणांचा वर्षाव करणारे यंत्र होते विश्वासघाती म्हणजे शत्रू प्राकार फोडून आत प्रवेश करीत असताना त्याच्यावर एकदम पडणारी मोठी व वजनदार तुळई होय. संघाती हे शत्रूच्या किल्ल्यांना आगी लावणारे यंत्र होते पर्जन्यक हे अशा रीतीने लावलेल्या आगी विझविण्याचे एक यंत्र होते त्याचा पर्जन्यास्त्र म्हणूनही निर्देश आढळतो तात्पर्य, यंत्रमुक्त आयुधे व विनाशकारी यंत्रे यांना उद्देशून अस्त्र शब्द अनेक ठिकाणी वापरण्यात आलेला असल्यामुळे अस्त्रविद्या ही यंत्रविद्या होती असे म्हणावयास प्रत्यवाय नाही. काही विशिष्ट शास्त्रबीजे आपला नाश होऊ नये व शत्रूला आपल्यापेक्षा वरचढ होता येऊ नये म्हणून कोणालाच सांगावयाची नसून ती गुप्तच ठेवावयाची असतात म्हणून तिला **मंत्र** म्हणजे गुप्त ठेवावयाची विद्या असेही म्हणत असत खास मंत्रशास्त्राशी संबद्ध अशी काही संहारक साधने होती व शास्त्रीय दृष्टीनेही ध्वनिसामर्थ्याचा असा उपयोग करून घेता येण्याची शक्यता आहे हे निर्विवादच आहे पण अस्त्रविद्या म्हणजे जारणमारणात्मक मंत्रविद्याच केवळ होय ही समजूत मात्र चुकीची होय उलट भारतीय अस्त्रविद्या ही प्राचीन वैदिकांच्या यंत्रसुधारणात्मक प्रगतीची निदर्शकच होय असे म्हणता येईल

असो युद्धशास्त्राचा विचार करताना युद्धसाहित्याचें **प्रथम** निरीक्षण करणे आवश्यक होते त्यातील प्रधान गोष्ट जी शस्त्र-सामुग्री तिचे स्वरूप आपण येथवर पाहिले खड्ग (स इषुहस्तै स **निषंगिभिः**, ऋ १०-१०३-३), चक्र (**चक्रेण** ता अपवप ऋजीषिन्, ऋ ८-९६-९), भाला (**सृके** यत् त्वा प्रत्यहन् देव एक ऋ १-३२-१२), बर्ची (**शक्ती**वन्तो गभीराः, ऋ. ६-७५-९) **परशु** (अभिदु शक्र परशु यथा वने, ऋ ७-१०४-२१) इत्यादि अनेक शस्त्रास्त्रांची नावे ऋग्वेदासारख्या प्राचीनतम समजण्यात येणाऱ्या संहितेतूनाह आढळतात

शस्त्रास्त्राप्रमाणेच ऋग्वेदसंहितेइतक्या प्राचीन काळी कवच, शिरस्त्राण, अंगुलित्राण, मणिबन्ध इत्यादि सैनिक वेषाचाहि स्पष्ट उल्लेख आढळतो कवच अथवा चिलखताला वैदिक वाङमयात द्रापि असे नाव आहे 'वर्मन्' हेहि दुसरे नाव आढळते हे पोलादाचे तनवीत पण त्यावर नक्षीचे व सुवर्णाचे काम करण्या-इतका सुधारणावादाचा विकाससुद्धा ऋग्वेदातच आढळून येतो. वरुणाचे कवच सुवर्णाचे व उत्कृष्ट होते असे वर्णन ऋग्वेदाच्या प्रथम मंडलातच केलेले आहे ( बिभ्रद्**द्रापिं हिरण्मयं** वरुणो वस्त निर्णिजम्, १-२५-१३) डोक्यावर घालावयाच्या शिरस्त्राणाला वेदवाङमयात **शिप्र** असे नाव आहे ऋग्वेदाचा मंत्रद्रष्टा कवचाचा महिमा वर्णन करताना म्हणतो –

जीमूतस्येव भवति प्रतीकं यद्वर्मी याति समदामुपस्थे ।
अनाविद्धया तन्वा जयत्वं स त्वा वर्मणो महिमा पिपर्तु ।।
–(ऋ ६-७५-१)

(रणभूमीवर जाणारा राजा अंगात जेव्हा कवच धारण करतो, तेव्हा तो मेघासारखे गंभीर स्वरूप धारण करतो हे राजन् ! अनाविद्ध शरीराने तू शत्रूशी लढून त्यावर विजय संपादन कर कवचाचे हे प्रसिद्ध सामर्थ्य रणात तुझे संरक्षण करो ) ही कवचे अथवा चिलखते अस्थि व पशूंच्या चामड्याचीही बनविण्यात येत असत कासव, गेंडा, रेडा, हत्ती, बैल इत्यादि पशूंच्या त्वचेचा

त्यासाठी उपयोग करीत चिलखताच्या वेगवेगळ्या प्रकाराची वर्णने वेदसहिता, व पुराणवाङ्मय यातून विपुल आढळतात

युद्धसाहित्यातील यानतरच्या इतर महत्त्वाच्या गोष्टी म्हणजे रणवाद्ये व ध्वज हे होत वेदवाङमयात तीन प्रकारची वाद्ये आढळतात काही वाद्ये धार्मिक व कलात्मक समारभात उपयोगात येत, काही केवळ रणवाद्ये होती, तर काही रणवाद्ये व इतर प्रसगीही उपयोगात येणारी अशी द्विविध होती आघाटी म्हणज करताळ किवा झाज, कर्करी म्हणजे वीणा, गर्गर, गोधा, तृणव (म्ह बासरी) वेणू, द्रुवय, नलिका, आडम्बर, काण्डवीणा इत्यादि वाद्ये यज्ञासारख्या धार्मिक व सास्कृतिक समारभातून नृत्यादिकाच्या प्रसगी उपयोगात आणीत केवळ युद्धानच उपयोगात येणारे रणवाद्य म्हणजे बकुर हे होय बकुर म्हणजे तुतारी असे ग्रिफिथचे म्हणणे आहे, तर तो एक प्रकारचा कर्णा होता असे दुसऱ्या कित्यकाचे म्हणणे आहे दस्यूशी केलेल्या युद्धात आपल्या सैनिकाचा उत्साह वाढावा म्हणून अश्विनीनी बकुर या रणवाद्याचा उपयोग केला होता असे ऋग्वेदाच्या प्रथम मडलातील २८ व्या सूक्तात वर्णन आहे भेरी, महाभेरी, व दुदुभि याचा उपयोग जसा रणवाद्य म्हणून होता, तसाच एखाद्या मोठ्या धार्मिक समारभात समाजाचे आवाहन करण्यासाठीही या वाद्याचा उपयोग होत असे दुदुभि अथवा पडघम हे वैदिक राष्ट्राचे अत्यत आवडते असे रणवाद्य होते. या दुदुभीचे (१) रणदुदुभि व भूमिदुर्दुभ असे दोन प्रकार असत भूमिभागी एक खड्डा खणून त्यावर ते कातडे घट्ट पसरीत या प्रकाराला भूमिदुदुभि असे म्हणत वतो बैलाच्या शेपटीने वाजवावयाचा असे. याचा उपयोग कधी कधी राष्ट्रीय सकटाच्या वेळी जनसभेतील सभासदाना एकत्रित करावयासही करीत असत अर्जुनाने सुभद्राहरण केले त्या वेळी याच पद्धतीने यादवाची सुधर्मा सभा बोलाविल्याचा महाभारतात उल्लेख आहे. जरासधाच्या गिरिव्रज नावाच्या राजधानीच्या बाहेरही असेच सात भूमिदुदुभि असल्याचा उल्लेख महाभारतात आहे. जरासध-वधाच्या वेळी नगरप्रवेश करताना श्रीकृष्ण, भीमसेन व अर्जुन

यानी ते फोडले रणामध्ये लढणाऱ्या सैनिकाना उत्साहित करणे व त्याना चढाई करण्याची, माघार घेण्याची वा अन्य सचलनाची सूचना देणे ही कार्ये रणदुदुभीच्या साहाय्याने करता येत दुदुभि हे वैदिक राष्ट्राचे इतके आवडते रणवाद्य आहे की, ऋग्वेद व अथर्व-वेदाचा परिसर या वाद्याच्या हर्षोत्फुल्ल स्तुतिगीतानी वैदिक ऋषीनी निनादित केला आहे उदाहरणार्थ ऋग्वेदाचे पुढील दुदुभिस्तोत्र पहा :–

उपश्वासय पृथिवीम् उत द्याम् पुरुत्रा ते मनुताम् विस्थितम् जगत् ।
स. दुन्दुभे सजू इन्द्रेण देवै दूरात् दवीय अप सेध शत्रून् ॥२९ ॥
आ क्रन्दय बल ओज न आ धा नि स्तनिहि दु इना बाधमान ।
अप प्रोथ दुन्दुभे दुच्छुना इत इन्द्रस्य मुष्टि असि वीळयस्व॥ ३०॥
आ अमू अज प्रतिऽआवर्तय इमा केतुमत् दुन्दुभि वावदीति ।
समश्वपर्णा चरन्ति न नर अस्माक इन्द्र रथिन जयन्तु ॥३१
—(ऋग्वेद ६ ४७ )

(पृथिवी आणि नक्षत्रमडळ ह्याना धीर दे ताराबळ उडालेल्या जगाने हरतऱ्हेने तुझी आठवण ठेवावी असे कर. हे रणदुन्दुभे, इन्द्र आणि त्याच्या दिव्य विभूति ह्याच्याशी प्रेमैक्य साधून तू शत्रूना देववेल तितके दूर पिटाळून दे जोराने आवाज कर आणि आम्हा-मध्ये बल आणि आवेश आण. तू सकटा ना हुसकून देणारा आहेस म्हणून तुझा गभीर निनाद होऊ दे हे दुन्दुभ आपल्या धुमधुम आवाजाने सकटाना येथून उडवून दे इद्राचे मनगट तू आहेस तर आता जोर धर त्या सेनेला अशी इकडे पुढे आण आणि ह्या सेनेला परत माघारी आण पहा ही रणमैदानाची खूण पटवणारी नौबत कसा आवाज करीत आहे ती ! आमचे शूर सैनिक जणू अश्वाचे पख लावून की काय वाऱ्यासारखे फिरत आहेत तर हे इद्रा, आमच्या रणधुरधराना विजय प्राप्त होईल असे कर )
ऋग्वेदातील हे दुन्दुभिवर्णन जसे त्या वाद्याचे महत्त्व सागते, तसेच सेनेला पुढे आणणे व पाठीमागे नेणे (प्रति-आवर्तय) या उल्लेखावरून

सैन्यसञ्चलनासारखी युद्धशास्त्रातील सकेतात्मक प्रगति ऋग्वेदासारख्या प्राचीनकाळीही झाली होती हेही स्पष्ट होते अथर्ववेदातील दुदुभिनादाचे वर्णन तर फारच बहारीचे आहे. त्यातील काही ऋचा पहा --

उच्चैर्घोषो दुदुभि सत्वनायन् वानस्पत्य सभृत उस्रियाभि ।
वाच क्षुणुवानो दमयन्सपत्नान् सिंह इव जेष्यन्नभि तस्तनीहि॥१॥
वृषेव यूथ सहसा विदानो गव्यन्नभि रुव सन्धनाजित् ।
शुचा विध्य हृदय परेषा हित्वा ग्रामान् प्रच्युता यन्तु शत्रवः ॥३॥
अन्तरेमे नभसी घोषो अस्तु पृथक् ते ध्वनयो यन्तु शीभम् ।
अभिक्रन्द स्तनयोत्पिपान श्लोककृन्मित्रतूर्याय स्वर्धी ॥७॥
धीभि कृत· प्रवदाति वाचमुद्धर्षय सत्वनामायुधानि ।
इद्रमेदी सत्वनो निह्वयस्व मित्रैरमित्राँ अवजङ्घनीहि ॥८॥
श्रेय केतो वसुजित् सहीयान् सग्रामजित् सशितो ब्रह्मणासि ।
अंशूनिव ग्रावाधिषवणे अद्रिर्गव्यन् दुन्दुभेधि नृत्य वेद ॥१०॥

-- (अथर्ववेद काण्ड ५ सू. २०)

विहृदय वैमनस्यं वदामित्रेषु दुन्दुभे । विद्वेष कश्मशं भयममित्रेषु नि दध्मस्यवैनान् दुन्दुभे जहि ॥१॥

उद्वेपमाना मनसा चक्षुषा हृदयेन च । धावन्तु बिभ्यतोऽमित्रा प्रत्रासेनाज्ये हुते ॥२॥ यथा मृगा सविजन्त आरण्या पुरुषादधि। एवा त्व दुन्दुभेऽमित्रानभि क्रन्द प्रत्रासयाथो चित्तानि मोहम् ॥४॥

यथावृकादजावयो धावन्ति बहु बिभ्यती ।
एवात्व . ॥५॥
यथाश्येनात् पतत्रिण सविजन्ते अहर्दिवि सिहस्यस्तनयोर्यथा ।
एवात्वं . ॥६॥
परामित्रान् दुन्दुभिना हरिणस्याजिनेन च ।
सर्वे देवा अतित्रसन् ये सग्रामस्येशते ॥७॥
ज्याघोषा दुन्दुभयोऽभि क्रोशन्तु या दिश ।
सेना· पराजिता यतीरमित्राणामनीकश ॥९॥

--(अथर्ववेद ५-२१)

(लाकडाचा बनविलेला, वाद्यानी आवळलेला, वीराप्रमाणे आचरण करणारा, दुदुभि गभीर व उच्च नाद करीत आहे आपला आवाज चढवून शत्रूना जेरीस आणणारा तू, विजयी सिहाप्रमाणे मोठ्याने गर्जना कर (१) गाईच्या कळपात वावरणाऱ्या साडा-प्रमाणे आपल्या बळाने विजय प्राप्त करणारा व प्रसिद्धीस आलेला तू लूट जमा करीत व गाईची प्राप्ति करीत गर्जना करीत रहा दु खाने शत्रूची हृदये विदारण कर व त्याची धुळधाण उडून ते आपली घरेदारे सोडून दूर पळून जावोत. (३) हे दुदुभि या द्युलोकाच्या आणि पृथ्वीच्या मध्य भागातील पोकळीत तुझा गभीर घोष भरून राहो तुझा घोष सर्व दिशाना व्याप्त करो प्रगतिशील व यशस्वी असा तू मित्राच्या हितासाठी सपन्न होत गर्जना करीत रहा (७) बुद्धीच्या प्ररणेतून निर्माण झालेला हा दुदुभि शब्द करीत आहे दुदुभे, तू वीराच्या आयुधाना उच कर शूराच्या हृदयाना आनद देणारा तू वीराना आवाहन कर व मित्राच्या द्वारे सर्व शत्रूना ठार कर (८) हे दुन्दुभे! तू कल्याणकारी, धन जिकणारा, बलवान्, सग्रामात विजय प्राप्त करून देणारा व ज्ञानरूपी साधनाने निर्माण झालेला आहेस सोमरस (सोमवल्ली दगडानी ठेचून सोमरस काढतात) काढ-ण्याच्या वेळी ज्याप्रमाणे दगड सोमावर नाचतात त्याप्रमाणे भूमि जिकण्याची इच्छा करणारा तू शत्रूच्या धनावर नृत्य कर (१०)

हे दुदुभे! तू शत्रूच्या हृदयात खिन्नता व व्याकुलता उत्पन्न कर द्वेष, तळमळ, आपसातील (बळ खच्ची करणारे) झगड, भय, यानी शत्रूची हृदये भरून टाक तू शत्रूना परास्त कर (१) अग्नीत घृताची आहुति द्यावयास जितका वेळ लागतो तितक्या थोड्या वेळात शत्रूचा थरकाप उडून मन, डोळे व हृदय यात भीति भरलेले ते पलायन करतील असे सामर्थ्य प्रकट कर. (२) ज्याप्रमाणे वनातील पशु मनुष्याला पाहताच भिऊन पळून जातात, ज्याप्रमाणे लाडग्याला पाहताच शेळ्या मेढ्या भीतीने भिऊन जातात अथवा पळून जातात, ज्याप्रमाणे बहिरी ससाण्याला पाहून

इतर पक्षी पळून जातात, ज्याप्रमाणे सिंहगर्जनेला सारेच जण भितात त्याप्रमाणे तुझ्या गर्जनेने शत्रूची विकल अवस्था होवो. तू त्याच्याविरुद्ध भयकर गर्जना करून त्याना भयकंपित व मोहित कर (४, ५, ६) ज्या युद्धाच्या अधिदेवता आहेत त्या हरिण चर्माने बनविलेल्या दुदुभीच्या साहाय्यानेच शत्रूचा थरकाप उडवीत असतात (७) हे दुदुंभि, धनुष्याच्या प्रत्यंचेची साथ करीत तू दशदिशात भरून रहा त्या समिश्र आवाजाने सघश. पराजित झालेली शत्रुसेना पळून जावो. (९)

अथर्ववेदातील हे दुदुभिस्तोत्र रणगाजी वैदिकाची रणपिपासा उत्कृष्टपणे व्यक्त करते यात शका नाही शख हेही रणोत्सुक वीराचे बाहू प्रस्फुरित करीत. महाभारतातील युद्धात तर प्रारंभीच पितामह भीष्मांनी फुकलेल्या शंखाचे व त्याच्या मागोमागच श्रीकृष्ण व पार्थ याच्या शखाच्या आस्फुरणाचे मनोरम वर्णन आढळते. पाचजन्य, देवदत्त, अनतविजय, सुघोष, मणिपुष्पक इत्यादि काव्यमय नावावरून भारतीय योद्धयाचे आपापल्या शखावर असणारे प्रेम उत्कटतेने व्यक्त होते याशिवाय तूर्य, पणव आनक, गोमुख इत्यादि रणवाद्याची नावे आढळतात इतकेच नव्हे तर रणवाद्यातहि पद्धतशीरपणे दोन प्रकार आढळतात. सैन्याची छावणी पडली असता शिबिरातून सैनिकाचे मन रिझविणारी वाद्ये वेगळी व प्रत्यक्ष रणागणावर त्याच्या वीरबाहूना स्फुरण आणणारी वाद्ये वेगळी असत

एक अत्यत महत्त्वाचा रणसाहित्यविषयक प्रश्न मी मागच्या व्याख्यानात उपस्थित केला होता, व तो म्हणजे प्राचीन भारतात बदुकीच्या दारूचा शोध लागला होता की नाही हा होय तदनुषगानेच हा दुसराही प्रश्न उपस्थित होतो की तोफा व बदुका याचा त्या वेळी युद्धात वापर होत असे काय ? सर ए एम् इलिएट् याने असें प्रतिपादन केले आहे की अरब लोकाना बदुकीची दारू तयार करण्याचे शिक्षण हिदुस्थानातूनच मिळाले व हिदुस्थानशी सबध येण्याच्या पूर्वी ते मातीच्या अथवा ज्वालाग्राही

तेलाचे बाण वापरीत असत. जरी पर्शियामध्ये बंदुकीची दारू तयार करावयास लागणारी द्रव्ये असली तरी तिचे मूलस्थान हिंदुस्थानच होय. तोप ( तोफ ) हा तुर्की शब्द अथवा तुपाग अथवा तुफाग हा पर्शियन् शब्द मुळात धूप या संस्कृत शब्दावरूनच निघालेला आहे. अग्निपुराणामध्ये धूप असा शब्द येतो त्याचा वास्तविक अर्थ अग्निबाण असा आहे कौटिल्याने यालाच नलदीपिका असें म्हटले आहे. भारतातील युद्धसाहित्यात अग्निमय आयुधाचा उपयोग ऋग्वेदकाळात इतक्या प्राचीन काळीसुद्धा होत असावा असें दिसते. ऋग्वेदामध्ये अग्निसूक्तातून शत्रूच्या नाशासाठी अग्नीची प्रार्थना केल्याचे आढळते. ऋग्वेदाचा सूक्तकर्ता म्हणतो,

घृतावहन दीदिव प्रति ष्म रिषतो दह ।
अग्ने त्व रक्षस्विन ।।

—(ऋग्वेद १-१२-५)

( घृताहुतीनी प्रज्वलित होणाऱ्या अग्निदेवा, आमच्या शत्रूचा नाश कर, त्यानी राक्षसाशी सगनमत केले आहे ) अथर्ववेदामध्ये बंदुकीची गोळी मारण्याची एका ठिकाणी स्पष्ट शब्दात धमकी दिल्याचे आढळते अथर्ववेदातील चोरनाशन सूक्तात म्हटले आहे–

येऽमावास्या रात्रिमुदस्थुर्व्राजमत्त्रिण ।
अग्निस्तुरीयो तुहाया सो अस्मभ्यमधि ब्रवत् ।। १ ।।
सीसायाध्याह वरुण सीसायाग्निरुपावति ।
सीस म इद्र प्रायच्छत्तदग यातुचातनम् ।। २ ।।
इद विष्कध सहत इद बाधते अत्त्रिण ।
अनेन विश्वा ससहे या जातानि पिशाच्या ।। ३ ।।
यदि नो गा हसि यद्यश्व यदि पूरुषम्
त त्वा सीसेन विध्यामो यथा नोऽसो अवीरहा ।। ४ ।।

–(अथर्ववेद, काड १ सू. १६)

(अमावास्येच्या अंधाऱ्या रात्री जे दरोडेखोर आमच्या समूहांवर हल्ला करण्याचा संभव आहे त्याच्याविषयी आम्हांला ज्ञानी

लोकानी सावध केले आहे वरुण देवतेने आम्हाला शिशाच्या गोळीचा प्रयोग करण्याची प्रेरणा दिली आहे इद्राने शिशाची गोळी आम्हाला दिली आहे हे बधूनो ! ती दरवडेखोराना दूर पळविणारी आहे २ ही शिशाची गोळी दरवडेखोराना हटविणारी आहे आणि आपल्याला निष्कारण प्रतिबध करणाऱ्याना दूर पळविणारी आहे. सर्व रक्तपिपासू जमातीना दूर पळविण्याचे सामर्थ्य या गोळीत आहे ३ हे चोरा ! जर तू माझी गाय, घोडा, अथवा मनुष्याचा वध करशील तर मी तुझ्यावर गोळी चालवीन. व एकदा मी गोळी चालविली तर पुन्हा आम्हाला त्रास देण्यासाठी तू जिवत राहू शकणार नाहीस) या सूक्तातील सीसेन विध्याम या पदावरील आपल्या प्रतिपादनात प श्री दा सातवळेकर यानी जे विचार व्यक्त केले आहेत ते या दृष्टीने मननीय आहेत प सातवळेकर म्हणतात ' इस सूक्त मे सीस की गोली का प्रयोग डाकुओपर करने को कहा है। सूक्त मे केवल 'सीस' शब्द है। गोली वाचक शब्द नही है। तथापि ' सीसेन विध्याम ' (सीसे के द्वारा वध करेगे) इस प्रयोग से सीस शब्द से सीसे की गोली का भाव समझना उचित है। केवल सीसे का उपयोग डाकुओ के नाश मे किसी अन्य प्रकार सभवनीय नही दिखता है। (विध्याम ) वेध करने का भाव दूर से चादमारी के समान निशाना मारना है। आजकल सीसे की गोली बदूक की नली मे रख कर दूर से ही निशाने पर फेकी जाती है। तात्पर्य, इन मत्रो के शब्द बता रहे है कि सीसे की गोली से दूर से ही डाकुओ का वेध करना चाहिये। लाठी सोटी के समान यह पास मे नही प्रयोग होता है इतना ही यहाँ बताना है।' ऐतरेय ब्राह्मणातही अग्निबाणाचे—खरे म्हणजे फाळावर अग्नि धारण करणाऱ्या बाणाचे वर्णन आहे (ऐतरेय ब्राह्मण १-४-८) रामायण व महाभारतातून अग्न्यस्त्राच्या आकृतीचे व वेगवेगळ्या प्रकाराचे वर्णन आढळते त्याची या दृष्टीने सूक्ष्म तपासणी करणे आवश्यक आहे वासिष्ठ धनुर्वेदात नाराच, नलिका, शतघ्नी याची जी वर्णने येतात ती नि सशय बदुका व तोफाचीच आहेत.

आचार्य शुक्र व वासिष्ठ ज्याचा शतघ्नी म्हणून उल्लेख करतात त्या निर्विवादपणे तोफाच होत्या पण त्या पूर्वी त्याचे अस्तित्व होते काय हा विवाद्य प्रश्न आहे. यावर या विषयाचे एक तज्ज्ञ श्री रामचंद्र दीक्षितार यांनी पुढीलप्रमाणे आपला अभिप्राय व्यक्त केला आहे

It is doubtful whether in earlier times, for instance in the epoch of the Epics, it meant a cannon. Possibly it did not In its literal sense it meant a machine able to kill a hundred men. It seems to have been a heavy column of stone or timber fixed with iron spikes on the ramparts of fortress Kautilya refers to it in this sense only The ancient fortresses of Ayodha and Lamka had these machines provided on their ramparts. There is the authority of the Hariwamsha to indicate that there were smaller types of these machines carried in hand But these types do not find mention in the later military literature, the term used there unmistakably refers to cannon It can therefor be safely concluded that these weapons. guns. and cannon were popular in India at the best from about the commencement of the Christian Era

(शतघ्नी शब्दाचा तोफ या अर्थाने वापर प्राचीनकाळी म्हणजे रामायण महाभारतकाळी होता की नाही हे संशयपूर्ण आहे बहुधा तसें नसावे शब्दार्थाच्या दृष्टीने शंभर माणसांना ठार करावयास समर्थ असे यंत्र येवढाच शतघ्नी शब्दाचा अर्थ होईल ही वस्तु म्हणजे एक अतिशय वजनी असा दगडाचा वा काष्ठाचा मोठ-मोठ्या लोखंडी खिळ्यांनी मढलेला स्तंभ असावा व तो किल्ल्याच्या प्राकारावर ठेवीत असावेत कौटिल्य याच अर्थाने शतघ्नी शब्दाचा वापर करतो प्राचीन अयोध्या व लंका येथील दुर्गावर या शतघ्नी असल्याचे रामायणात उल्लेख आहेत. अशी

लहान यत्रे योद्धे हातात वागवीत असल्याचा उल्लेख हरिवशांत सापडतो पण त्यानतरच्या युद्धशास्त्रावरील वाङमयात या यत्रांचा उल्लेख नसून तेथे आढळणाऱ्या शतघ्नी शब्दाचा तोफ हाच निश्चित अर्थ आहे म्हणून असे निश्चयात्मकतेने म्हणता येईल की ही शस्त्रे, बदुका, तोफा, इत्यादि ख्रिस्तयुगाच्या उगमापूर्वी भारतात पूर्णपणे प्रचलित होती) जर अथर्ववेद संहितेच्या सारख्या प्राचीन वाङमयात या पद्धतीचे उल्लेख आढळतात तर ते नाकारण्याचे न्यूनगण्डाशिवाय दुसरे काही कारण आहे असे आम्हास वाटत नाही तरी पण हा केवळ विचारणीय प्रश्न आहे येवढेच आपण म्हणू या

या युद्धसाहित्यावरून सग्रामकलेत वैदिक राष्ट्राने उत्कृष्ट प्रगति केली असून तत्कालीन इतर राष्ट्राना ते चागलेच भारी झालेले होते असे दिसते दुदुभीसबधीच्या ऋग्वेदातील उल्लेखात सेनासचलनासाठी त्या वाद्याचा उपयोग करीत हे आपण पाहिले सेनासचलन हे पद्धतशीर सेनारचनेवाचून निर्माण होत नाही वैदिक राष्ट्रात सेनापद्धति कोणत्या प्रकारची होती हे या दृष्टीने पाहणे आवश्यक आहे. त्याकडे आपण पुढील व्याख्यानात वळू



व्याख्यान चौदावे

## सेनापद्धति

ध्वजाच्या मानबिंदूची तेजस्वी कल्पना भारतीय समाजजीवनात ऋग्वेदकाळापासूनच बद्धमूल झालेली आहे सार्‍या राष्ट्राची प्रतिष्ठा ध्वजाच्या ठिकाणी एकवटलेली असून राष्ट्राच्या ऐतिहासिक परपरेचे, तेजस्वी अस्मितेचे व प्रखर जीवन ज्योतीचें एकमात्र प्रतीक म्हणजे ध्वज होय.प्रत्यक्ष राजमस्तक की राष्ट्रध्वज असा प्रश्न उपस्थित झाला असता ध्वजाच्या ततूसाठी राजमस्तकाचेही अहेर देण्यास आपल्या सिहपराक्रमी पूर्वजानी मागे पुढे पाहिले नाही म्हणूनच कविवर्य मोरोपतानी 'मोले राजशिराहुनि अधिक " असे ध्वजाच्या महत्त्वाचे वर्णन केले आहे प्राचीन महाकवीनी तर महापुरुषाची सर्वश्रेष्ठता वर्णन करताना त्याना ध्वजाची अनेकवार उपमा दिली आहे उदाहरणार्थ श्रीरामचद्राचें महत्त्व वर्णन् करताना महर्षि वाल्मीकीनी म्हटले आहे " तेषा ध्वज इव श्रेष्ठ राम सत्यपराक्रम " "इतर भरतलक्ष्मणादि रामचन्द्राच्या परिवारातील व्यक्तीना व्यक्तिमत्त्वाचे प्रासाद म्हटले तर श्रीरामचद्र हे ध्वज होत." ध्वजाची उची प्रासादापेक्षा हातभर अधिकच असते हे प्रसिद्धच आहे ऋग्वेदामध्ये ध्वज शब्दाचा वापर (१) "येषु ध्वजेषु दिद्यव पतन्ति ॥" ऋ ७-८५-२ व (२) 'अस्माक इन्द्र संऋतेषु ध्वजेषु' ( ऋ १०-१०३-११ ) असा दोनदा करण्यात आलेला आहे शिवाय अक्र (ऋ १ १४३ ७ व ३. १. १२), कृतध्वज (ऋ ७ ८३. व २), केतु(१.२७ १२). बृहत्केतु ( ५. ८ २ ), सहस्रकेतु ( १. ११९. १ ) इतकी नावें ध्वजाला उद्देशून ऋग्वेदातच वापरण्यात आलेली आहेत. युद्धात शत्रुसैन्यात गडबड उडावी म्हणून प्रतिपक्षीय योद्धे

ध्वजावर बाण सोडून तो खाली पाडण्याचा प्रयत्न करीत व ध्वज खाली पडणे म्हणजे इभ्रत जाणे असे समजून त्यासाठी वीर प्राणार्पणाने पराक्रमाची शर्थ करीत युद्धात ध्वजावर प्रहार केंद्रित करणे महत्त्वाचे असे व ध्वज तोडला अथवा जिंकला म्हणजे पराभव सिद्धच होत असे या दृष्टीने ऋग्वेदातील पुढील काही वर्णने पाहण्यासारखी आहेत –

स्पर्धन्ते वै ऊ (इति) देवहूतये अत्र येषु ध्वजेषु दिद्यव पतन्ति।
युवम् तान् इन्द्रावरुणौ अमित्रान् हतम् पराच शर्वा विषूच ।।
— (ऋग्वेद ७-८५-२)

( ज्याच्या ज्याच्या ध्वजावर युद्धात अस्त्रे येऊन आदळतात ते ते भक्तजन देवाचा धावा करूनच येथे (युद्धात) आपली पराकाष्ठा करतात, तर हे इन्द्रावरुणानो, तुम्ही आमच्या शत्रूंना आपल्या आयुधांनी अशा रीतीने ठार करा की (बाकीचे) दश दिशा पळून जातानाही मारले जातील )

अस्माक इन्द्र सऽऋतेषु ध्वजेषु अस्माक या. इषवः ता जयन्तु ।
अस्माक वीरा उत्तरे भवन्तु अस्मान् ऊ (इति) देवा अवन हवेषु ।।
–( ऋग्वेद १०-१०३-११ )

(आमच्या सैन्याचे ध्वज शत्रुसैन्यामध्ये मिसळून गेले म्हणजे हे इन्द्रा ! तू त्याच्याजवळ सरक्षणार्थ रहा आमच्या सैनिकांनी सोडलेले बाण शत्रूंची शिरे छाटून विजयी होवोत, आमचेच वीर उत्कृष्ट ठरोत, त्यांचीच सरशी होवो आणि ह्या संग्रामप्रसंगी दिव्य विबुध आमच्याच बाजूला असोत.) ऋग्वेदातील उपर्युक्त दोन्ही प्रकारच्या वर्णनावरून युद्धप्रसंगी ध्वजसंरक्षण किती महत्त्वाचे समजले जात असे याची कल्पना येते. श्रेष्ठतेचा वाचक या अर्थाने ध्वजाची उपमा देण्याची प्रथा रामायणातच आहे असे नसून ऋग्वेदसंहितेतही ही उपमा आलेली आहे उदाहरणार्थ अग्नीचे पुढील वर्णन पहा –

स रेवान् इव विश्पतिर्दैव्य केतु शृणोतु न ।
उक्थैर् अग्निर्बृहत्भानु. । –(ऋ १-२७-१२)

(एखाद्या ऐश्वर्यवान् नृपतीप्रमाणे आमच्या स्तुतीनी प्रसन्न होऊन हा अग्नि आमची प्रार्थना श्रवण करो तो आम्हा मानवाचा राजा आहे दिव्य सौदर्याचा ध्वज आहे त्याचे तेज प्रखर असतें )

'त्वा अग्ने अतिथि पूर्व्यं विश शोचि केश गृहपति नि सेदिरे।
बृहत्केतु पुरुरूपं धनस्पृत सुशर्माण सुअवसम् जरद्विषम् ।।
-(ऋग्वेद ५ ८-२)

(हे अग्न ! तू भक्ताचा पुरातन अतिथि आहेस तुला तेजोमय केशमण्डित गृहस्वामीला भक्तजनानी वेदीवर अधिष्ठित केले. **तुझा ज्वालारूप ध्वज विशाल,** तुझी स्वरूपे असख्य, तू भाग्यधन यथान्याय देणारा, तुझा आश्रय सर्वोत्कृष्ट, तुझे सरक्षण सुविख्यात, अशा तुला वेदीवर अधिष्ठित केले ) ध्वज व दुदुभि ही प्राचीन वैदिक राजाची सन्मानचिन्हे होती. अथर्ववेदामध्ये सूर्य चिन्हाकित ध्वजाचे सेनेशी सबद्ध असें वर्णन आढळतें उदाहरणार्थ, पुढील ऋचा पहा –

एता देवसेना सूर्यकेतव सचेतस:।
अमित्रान् नो जयन्तु स्वाहा।। –(अथर्ववेद ५-२१-१२)

(या दिव्य सेना सूर्याचा ध्वज (सूर्य चिन्हाकितध्वज) घेऊन चालणाऱ्या आहेत त्या हृदय दृढ करून आमच्या शत्रूचा पराभव करोत. विजयासाठी आमचे आत्मसमर्पण होवो ) प सातवळेकर याची या मत्रावरील टीप मात्र चिन्त्य वाटते. ते लिहितात : 'यह वर्णन देखनेसे आर्योंका ध्वज सूर्यचिन्हयुक्त था यह बात स्पष्ट हो जाती है।' एवढ्या केवळ एकाच उल्लेखावरून असे कांही अनुमान काढणे दूरान्वयाचे होईल असे आम्हास वाटते असो ध्वज हे जसे प्रत्ययोत्पादक अथवा आपले वैशिष्टच व्यक्त करणारे चिन्ह होते, तसाच तो मानबिंदूही होता केवळ प्राचीन भारतीय राष्ट्रातच नव्हे तर ईजिप्शियन, असीरियन्, ग्रीक व रोमन राष्ट्रातूनही वेगवेगळ्या वर्णाचे व वैशिष्टचाचे पण याच गोष्टीचे प्रतीक या नात्याने ध्वज होते आजही ध्वजाचे हेच महत्त्व आहे. प्रत्येक राष्ट्राचा एक स्वतत्र ध्वज असतो, व तो जसे त्या राष्ट्राचे

वैशिष्टय व्यक्त करतो त्याचप्रमाणे त्याचा मानबिंदूही असतो. राष्ट्र म्हणजे एका जीवनविषयक तत्त्वज्ञानाच्या सूत्राने उपनिबद्ध असणारा समाज ही गोष्ट ध्यानात घेतली तर प्राचीन भारतीय राष्ट्रात राष्ट्राराष्ट्रातील वैमनस्याचा व युद्धाचा प्रश्न उत्पन्न झालेला नाही असे दिसून येईल. आज जसे शास्त्रीय चर्चेचे स्वरूप कोणतेहि असले तरी स्वतंत्र राष्ट्र व राष्ट्राचेच स्वतंत्र राज्य असे स्वरूप दृष्टोत्पत्तीस येते तशी प्राचीन भारतीय राष्ट्रातील वस्तुस्थिति नव्हती या एकाच विशाल भारतीय राष्ट्रात अनेक राज्ये नादत होती व त्यामुळे प्रत्येक राजाचा नि राज्याचा एक स्वतंत्र ध्वज असे. तसेच आपल्या पराक्रमाने प्रसिद्धीस आलेल्या वीराचेहि पृथक् पृथक् ध्वज असत महारथ्याचा रथ म्हटला की तो ध्वजपताकानी युक्त असावयाचाच असे दिसून येते ऋग्वेदातही अशी वर्णने आढळतात. उदाहरणार्थ,अश्विनीच्या रथाचे पुढील वर्णन पहा:

आ वा रथ पुरुमाय मनोजुव जीराश्व यज्ञिय जीवसे हुवे ।
**सहस्रकेतु** वनिन शतद्वसु श्रुष्टीवान वरिवोधामभि प्रय ।।
–(ऋग्वेद १-११९-१)

(आमच्या जीवनासाठी आमच्या अभीष्ट वस्तूकडे मी तुमच्या रथास पाचारण करितो, ह्या रथावर नाना प्रकारच्या योजना केलेल्या आहेत, त्याचा वेग मनाप्रमाणे त्वरित आहे, त्याचे अश्व चपल आहेत. तो यजनार्ह आहे, त्याच्यावर **हजारों ध्वजा** फडकत आहेत, तो फारच मनोहर आहे, त्याच्यावर शेकडो प्रकारचे उत्कृष्ट धन भरलेले असून त्याची प्रसिद्धि सर्वत्र झालेली आहे आणि त्याच्यापासून भक्ताचे उत्तम रीतीने सरक्षण होते.) महाभारताच्या द्रोणपर्वात तत्कालीन विख्यात योद्धयाच्या वेगवेगळया ध्वजाचे मनोरम वर्णन आढळते उदाहरणार्थ पुढील काही नावे व त्याचे ध्वज पहा :—

| | |
|---|---|
| १ अर्जुन | १ कपिध्वज |
| २ अश्वथामा | २ सिहलांगलध्वज |
| ३ कर्ण | ३ स्वर्णमय हस्तिकक्ष |

| | |
|---|---|
| ४ कृप | ४ वृषभध्वज |
| ५ वृषसेन | ५ मयूर |
| ६ शल्य | ६ सितध्वज |
| ७ जयद्रथ | ७ वराहध्वज |
| ८ दुर्योधन | ८ सुवर्णमय नागध्वज |
| ९ भीष्म | ९ तालध्वज |
| १० द्रोणाचार्य | १० कमडलू |
| ११ भीम | ११ सिहध्वज |

श्रीमद्वाल्मीकीय रामायणातील सूर्यवशाचा कोविदार ध्वज प्रसिद्धच आहे. वृषभध्वज शकर व गरुडध्वज महाविष्णु हे प्रसिद्धच आहेत त्यावरून देवताचेहि स्वतत्र ध्वज असल्याचे स्पष्ट होते

असो निश्चित व योग्य सघटन हा सैन्याचा आत्मा होय. निश्चित सघटन याचा अर्थ युद्ध ही ज्याची जीवननिष्ठा झालेली आहे अशा लोकाचे सघटन होय बेकनचे पुढील वाक्य या दृष्टीने सस्मरणीय आहे. तो म्हणतो –

'Walled towns, stored arsenals, and armouries, goodly races of horses, all this is but a sheep in a lion's skin except the breed and disposition of the people to be stout and warlike.

(उच तटबदी, उत्कृष्ट शस्त्रसभार, वाऱ्याशी स्पर्धा करणारे जातिवत घोडे इत्यादि सर्व साधने असूनही जर अनुवशाचे तत्त्व सभाळून विशिष्ट पद्धतीने शरीर व मन तयार केलेल्या लोकाचे सैन्य नसेल तर ते सैन्य जातिवत सैन्यासमोर सिहाचे कातडे पांघरलेल्या शेळीसारखे ठरते ) वैदिक राष्ट्राच्या सैन्यविभागासबधी लिहिताना ऋग्वेददशन या पुस्तकाचे लेखक श्री रा गो. कोलगडे यानी लिहिले आहे 'त्या वेळी हल्लीप्रमाणे पगारी खडे सैन्य असल्याचे दिसत नाही पण राष्ट्रांत बहुतेक सर्व पुरुष लढाईचें खाजगी रीतीने शिक्षण घेऊन तयार होत असत प्रत्येक कुटुबांत हे शिक्षण घेऊन एकादा तरी तयार असे. ब्राह्मणदेखील युद्धकलेत

निष्णात असत परशुराम, द्रोण, कृप, अश्वथामा ही उदाहरणे पुराणात प्रसिद्ध आहेत अर्थात् लढाऊ वृत्ति ही त्या वेळी प्रत्येक पुरुषात कमी अधिक मानाने असेच असे राजा हा आपल्या रक्षणार्थ काही शस्त्रधारी लोक वाड्यावर व देशरक्षणार्थ किल्ल्यावर ठेवीत असे पण खडे सैन्य असे फारच थोडे असे तथापि लढाईचा प्रसग आला म्हणजे राष्ट्रातील सामान्य प्रजाजन आपण होऊनच सैन्यात येऊन दाखल होत असत व आपला पराक्रम गाजवून विजयी झाल्यावर शत्रूच्या शिबिरात व राज्यात शिरून तेथील सपत्ति व इतर मौल्यवान् चीजवस्त लूटमार करून घरी आणीत' श्री. कोलगडे याचे हे विवेचन केवळ मन कल्पित काव्य होय चातुर्वर्ण्य ऋग्वेदकाळीच अस्तित्वात होते हे एकदा मान्य केल्यावर खडे सैन्य त्या वेळी नव्हते या म्हणण्यात काही तात्पर्य रहात नाही कारण चातुर्वर्ण्यातर्गत क्षात्रवर्ण या केवळ युद्धप्रवृत्तीसाठीच हेतुतः व विशिष्ट सस्कारित पद्धतीने निर्माण केलेला असून राजाच्या सैन्यात शिरून त्याची सेवा करणे हे त्या वर्णाचे नियत कर्म आहे. ब्राह्मण योद्धे असत यात नवल नाही कारण विद्येत धनुर्वेदाचा अतर्भाव असल्यामुळे व विद्या शिकविणे हे त्या वर्णाचे कर्म असल्यामुळे युद्धशास्त्र हा ब्राह्मणाच्या अभ्यासाचा विषय होताच धर्मसूत्रकारानी उल्लेखिलेली आणखीही एक महत्त्वाची गोष्ट ब्राह्मणयोद्ध्याच्या प्रकरणावर प्रकाश टाकते ती ही की, ब्राह्मवृत्तीने जीवन चालविणे अशक्य झाले तर ब्राह्मणानी क्षात्रवृत्तीने आपले जीवन चालवावे ही त्याना केलेली सूचना होय धनुर्वेदाची व युद्धशास्त्राची माहिती असल्याविना क्षात्रवृत्तीने कोणालाही जीवन चालविता येणे केवळ अशक्य आहे ज्या अर्थी ही स्पष्ट सूचना आहे, त्या अर्थी विद्या म्हणून हे ज्ञान त्याना असलेच पाहिजे अशी धर्मशास्त्रकाराची अपेक्षा स्पष्टच होते स्मृतिकारानी धर्म सकटात असताना ब्राह्मणानी शस्त्र धारण करावे असा जो सहजगत्या नियम सागितला आहे तोही या विद्येचे ब्राह्मणाना पूर्ण परिज्ञान असते हे गृहीत धरूनच होय.

त्यामुळे ब्राह्मण योद्धयांच्या संबधीच्या कोलगडे याच्या उल्लेखावरून काहीही सिद्ध होत नाही परशुरामाचे शस्त्रधारण केवळ धर्म-संरक्षणासाठी व म्हणूनच समर्थनीय होते पण भलत्या वेळी केलेल्या शस्त्रधारणाचा दुष्परिणाम त्याना भोगावा लागला व कर्तव्य-भ्रष्टतेचा आरोप सहन करावा लागला द्रोण, कृप, अश्वत्थामा याना आदर्श ब्राह्मण प्रत्यक्ष भारतातही म्हटलेले नसून राजप्रेष्य म्हणून त्याची हेटाळणीच केलेली आहे स्वत श्री कोलंगडे हे आपल्या ग्रथात ऋग्वेदकाळी चातुर्वर्ण्य व त्रैवर्ण्य होते असे म्हणतातच कर्माने त्या वेळी वर्ण पालटत होता व कर्म म्हणजे जीव-नाचा व्यवसाय हे भोगळ तत्त्व मान्य केले तरी क्षात्रवर्ण ज्या अर्थी होता त्या अर्थी त्याचे कर्म होतेच हे स्पष्ट आहे सैन्यात जीवनव्यवसायार्थ शिरणे हे क्षात्रकर्म असल्यामुळे व खडे सैन्य असल्यावाचून जीवनव्यवसायार्थ सैन्यात शिरण्याची शक्यताच नसल्यामुळे त्या वेळी खडे सैन्य होते हे मान्य करणेच भाग आहे अस्मिन्राष्ट्रे राजन्य इषव्य शूर ' हे वैदिकाच्या राष्ट्रगीतातील क्षात्रवर्णाचे वर्णन हे सिद्ध करावयास पुरेसे आहे क्षत्रिय म्हणजे काय व तो कसा निर्माण करण्यात येई इत्यादि वर्णन मागे येऊन गेलेले असल्यामुळे येथे त्याच्या पुर्नानिर्देशाची आवश्यकता नाही ऋग्वेदा-तील संग्रामगीते, सेना या शब्दाचा अनेकवार येणारा प्रयोग, सुसज्ज युद्धसाहित्याची पद्धतशीर वर्णने व दाशराज्ञ युद्धासारखी ऋग्वेदीय युद्धे ऋग्वेदकाळी वेळेवर उभारण्यात येणारी भाडोत्री सैन्ये होती असे सिद्ध करतात काय ? पद्धतशीर संग्रामशास्त्रात खडे व संस्कारित सैन्य ही अत्यत महत्त्वाची बाब आहे व ते तसे ऋवेदकाळी होते असेच उपर्युक्त ऋग्वेदातील वर्णनावरून स्पष्ट दिसते असो जातिवत सैन्याची बेकनने ही जी आवश्यकता प्रति-पादन केलेली आहे तिची वैदिक राष्ट्रात जागृत जाणीव होती व क्षात्रवर्णाची पद्धतशीर निर्मिति करून योग्य, कडवे व पद्धतशीर विभागणी केलेले सैन्य त्यानी उभारून ती जाणीव प्रत्यक्षात उतर-विली होती. सैन्य चतुरग असावे असे भारतीय युद्धशास्त्रज्ञांनी

प्रतिपादन केले असून सैन्याची ती चार अगे म्हणजे (१) पदाति (२) रथी (३) अश्वदल व (४) गजदल ही होत पण चतुरग सैन्य ही सैन्याची युद्धशास्त्रेतर साहित्यातून आढळणारी अत्यत स्थूल विभागणी होय राज्यशास्त्रविषयक वाङमयातून सैन्य हे षडग म्हणजे सहा अगाचे व अधिक पद्धतशीर विभागणी म्हणजे आठ अंगाचे सागितलेले आहे कामदकीय नीतिशास्त्रात सैन्याची सहा अगे पुढीलप्रमाणे वर्णन केली आहेत –

एतन्मौलादि षड्भेद चतुरगबल विदु ।
षडङ्ग मत्रकोशाभ्या पदात्यश्वरथद्विपै ॥

–(कामदकीय नीतिशास्त्र १९–२४)

उपर्युक्त चतुरग दलात सल्लागार मडळ व कोश अथवा खजिन्याचे रक्षक दल याचा समावेश केला की,सैन्याची सहा अगे स्पष्ट होतात. महाभारताने सैन्याची एकदर आठ अगे सागितलेली आहेत व या आठ अगाना केवळ प्रकट अगे असे म्हटलेले असून अप्रकट अथवा गुप्त अगे पुष्कळच असतात असे म्हटले आहे त्यावरून विजयावर बद्धलक्ष्य असलेल्या आपल्या प्राचीन पूर्वजांनी यासबधात किती सूक्ष्म विचार केला होता याची कल्पना येते महाभारतकार म्हणतात ––

प्रकाशश्चाप्रकाशश्च दण्डोऽथ परिशब्दित ।
प्रकाशोऽष्टविधस्तत्र गुह्यश्च बहुविस्तर ॥
रथा नागा हयाश्चैव पादाताश्चैव पाण्डव ।
विष्टिनीवश्चराश्चैव देशिका इति चाष्टम ॥
अगान्येतानि कौरव्य प्रकाशानि बलस्य तु ॥

" सैन्य हे (दण्ड म्हणजे सामर्थ्य येथे हा शब्द सैन्य या अर्थी वापरण्यात आलेला आहे )प्रकट व अप्रकट असे दोन प्रकारचे असते अप्रकट सैन्यागाचा विस्तार अनेक प्रकारचा असून प्रकट सैन्यागे आठ आहेत. " ही सैन्याची आठ अगे म्हणजे रथी, पदाति, गजसैन्य, अश्वदळ, रणभूमीवर डावपेच करणारे मुत्सद्दी, खजिन्याचे सरक्षकदल, साहित्याचा पुरवठा करणारे व जखमी लोकांची

शुश्रुषा करणारे लोक व हेर हे होत यापैकी चार रथी पदाति इत्यादि अगे ही सैन्याची मुख्य अगे असून इतर चार तितकीच आवश्यक अशी उपागे म्हणता येतील श्री विमलकाति मुजुमदार व डॉ पी सी चक्रवर्ती यानी असे म्हटले आहे की, "ऋग्वेदकाळी पदाति व रथ असे दोनच प्रकारचे सैन्य होते अश्वदल व गजदल नव्हते याच्या उलट प्रो रामचद्र दीक्षितार याच्या मते ऋग्वेदकाळी गजदल होते पण अश्वदल नव्हते तर डॉ अविनाश चद्रदास याच्या मते वेदकाळी गजदल नसून अश्वदल मात्र होतें याचा अर्थ इतकाच आहे की, केवळ सहितीकरणावरून कालनिर्णयाची शक्यता कशी नाही, हे लक्षात न घेताच अभावाचा पुरावा या थोर सशोधकानी प्रमाण मानला आहे आपण वैदिक राष्ट्रदर्शनासाठी साहित्याची जी व्याप्ति मानलेली आहे तिच्या आधारे वैदिक राष्ट्रात या अष्टाग सैन्यविभागापैकी कोणकोणती अंगे सापडतात व त्याचे स्वरूप काय हे प्रत्यक्षच पाहू प्रथम **रथी** या सेनागाकडे वळू

रथ व रथी याचे उल्लेख प्राचीन भारतातील युद्धसाहित्यात विपुल प्रमाणात आढळतात वेदसहिता व ब्राह्मण ग्रथ यामधून रथाचे सदर्भ अनेक ठिकाणी दिलेले असून सर्वात प्राचीन समजण्यात येणाऱ्या ऋग्वेदसहितेत युद्धरथाच्या वर्णनाला एक सपूर्ण सूक्त वाहिलेले आहे ऋग्वेदाचे सूक्तकार रथाचे वर्णन करताना म्हणतात –

वनस्पते वीळुऽअङ्ग हि भूया अस्मत्ऽसखा प्रऽतरण सुऽवीर । गोभि सन्नद्ध आसिवीळयस्व आऽस्थाता ते जयतु जेत्वानि ॥२६॥ दिव पृथिव्या परि ओज उत्ऽभृतम् वनस्पतिऽभ्य परि आऽभृतम् सह । अपाम् ओज्मानम् परि गोभि· आऽवृतम् इन्द्रस्य वज्रम् हविषा रथम् यज ॥२७॥ – ऋग्वेद ६–४७

"वृक्षवर्या, (हे रथकाष्ठा) तू कणखर (आहेस तर) आमचा तारक-मित्र आणि उत्तम सैनिक हो. तुला गव्याच्या चामड्याच्या वादीने मढविले आहे तर तू चागला बळकट रहा. तुझ्या ठिकाणी आरोहण करून युद्ध करणारा वीर विजयी होवो ॥२६॥

पृथ्वी आणि आकाश ह्याच्यापासून तुला सुदृढता उत्पन्न झाली. वृक्षापासून चिवटपणा आला पाण्यापासून तजेला मिळाला गव्याच्या चामड्याच्या वादीने तुला आवळून टाकले असा तू रश्मिपरिवेष्टित झाला आहेस तर आता इंद्राचे वज्र व थर याच्यासाठी हवन करा ॥ २७ ॥"

पुढच्या ऋचेत हा सूक्तकार म्हणतो :—

इंद्रस्य वज्र मरुता अनीक मित्रस्य गर्भ वरुणस्य नाभि ।
स इमाम् न हव्यऽदातिम् जुषाण देव रथ प्रति हव्या गृभाय ॥२८॥
—ऋ म ६ सू. ४७

(तू इंद्राचे वज्र, मरुताचे सैन्य, सूर्यबिंबाचा गाभा, आणि वरुणाचे अंतरंग आहेस हे दिव्य रथा ! हा आमचा हविभाग गोड करून घेऊन आमच्या पाचारणाचा स्वीकार कर ) अथर्ववेदाच्या ६ व्या कांडात हे सूक्त जसेच्या तसे उद्धृत केलेले असून त्यावरून वैदिक राष्ट्राच्या सैन्यविभागात रथी हे केवढे महत्त्वाचे अंग असले पाहिजे याची कल्पना येते वेदकाळी रथ हे अत्यंत महत्त्वाचे युद्धसाहित्य समजण्यात येत असे व युद्धातील विजय रथी या सेनांगाच्या सुदृढतेवर अवलंबून असे ऐतरेय ब्राह्मणात व तैत्तिरीय ब्राह्मणात रथी व सारथी यांचे उल्लेख आहेत. तैत्तिरीय ब्राह्मणात रथकाराचाही उल्लेख आहे त्यावरून रथ तयार करणे हा ज्याच्या उपजीवनाचा व्यवसाय होता असा वर्ग वेदकाळी होता व इतकी युद्धरथाची राज्याकडून मागणी होती हे सिद्ध होते रथ्याच्या प्रेक्षणीय द्वंद्वयुद्धाची वर्णने महाभारत संहितेतून पुष्कळच आढळतात अथर्ववेदात इंद्र रथी व चंद्र सारथी असे वर्णन आढळते ते असे — "संवत्सरो रथ परिवत्सरो रथोपस्थो विराडीषाग्नी रथमुखम् । इंद्र सव्यष्ठाश्चन्द्रमा सारथि ॥" (अथर्ववेद कांड ८ सू. ८ ऋ २३) "संवत्सर, परिवत्सर, विराट्, अग्नि हे क्रमश. रथ, बसण्याची जागा, दण्ड व रथमुख असून इंद्र या रथात रथी म्हणून वाम भागाला बसतो व चंद्रमा या रथाचे सारथ्य करतो " प्राचीन साहित्यातून भगवान्

श्रीकृष्ण, मातलि, ब्रह्मदेव, शल्य व अर्जुन हे विख्यात सारथी म्हणून प्रसिद्ध आहेत ब्रह्मदेवाने त्रिपुरासुराच्या युद्धात भगवान् महादेवाचे सारथ्य केल्याची प्राचीन कथा प्रसिद्ध असून उपमान म्हणून तिचा महाभारतात अनेक ठिकाणी उपयोग केल्याचे आढळून येते मातलि हा महेन्द्राचा सारथी असून रामरावणाच्या युद्धात महेन्द्राच्या आज्ञेवरून त्याने भगवान् श्रीरामचंद्राचे सारथ्य केले होते कर्णार्जुनाच्या युद्धात श्रीकृष्णाच्या सारथ्यकुशलतेला भिऊन कर्णाने त्याच्यासारखाच सारथ्यकुशल म्हणून आपल्या तेजोवधाची आपत्ति पत्करूनही शल्याची सारथी म्हणून प्रार्थनापूर्वक नियुक्ति केली होती हे प्रसिद्धच आहे. यावरून शल्याची या विद्येतील योग्यता स्पष्टच होते भगवान् श्रीकृष्णाना तर हे कर्म इतके प्रिय होते की पार्थसारथी ही त्याची पदवीच झालेली आहे. श्रीकृष्णाच्या सारथ्यकुशलतेचे महाभारतात अत्यंत सूक्ष्म वर्णन असून त्यावरून त्याची या संबंधातील अद्वितीय योग्यता व्यक्त होते मार्कण्डेय पुराणात सारथ्याच्या अंगी आवश्यक असणाऱ्या गुणाचे पुढीलप्रमाणे वर्णन आहे —

देशकालौ च विज्ञेयौ लक्षणानीङ्गितानि च ।
दैन्य खेदश्च हर्षश्च रथिनश्च बलाबलम् ॥
स्थलनिम्नानि भूमेश्च समानि विषमानि च ।
युद्धकालश्च विज्ञेयो परस्यान्तरदर्शनम् ॥
उपयानापयानेच स्थान प्रत्यपसर्पणम् ।
सर्वमेतद्रथस्थेन ज्ञेय रथकुटुंबिना ॥

( देश व काल याची अनुकूलता, लक्षणे, इंगित, रथ्याचे व घोड्याचे दैन्य, श्रमाच्या मुळे आलेला थकवा, हर्षित वा उदासीन मनोवृत्ति, प्रतिपक्षीय रथ्याचे व आपल्या रथ्याचे बलाबल, युद्ध भूमीची उंचसखलता व भेगा, सपाट भूमि व भूमीचा वाकडे तिकडेपणा, युद्धाचा समय, शत्रूचे असामर्थ्य व संकट ओळखणे, हल्ला करणे, माघार घेणे, एका जागी राहणे, वार चुकविण्यासाठी रथाची वेगवेगळी मंडले घेणे (म्ह वर्तुळाकार रथ फिरविणे

इत्यादि सर्व गोष्टीचे सारथ्याला अतिसूक्ष्म ज्ञान असणे आवश्यक आहे कारण रथरूपी कुटुम्बाचा तोच खरा सचालक होय. ¹ यावरून रथी या सैन्यागाच्या दृष्टीने सारथ्याचे महत्त्व किती आहे हे ध्यानात येईल सारथ्याला सूत असेही म्हणतात. पण **सूत** या शब्दासबधाने अनेक प्रकारचे अपसमज आहेत पौराणिक सूत व हा सूत एक नव्हे तसेच मागच्या व्याख्यानातून **राज्यकर्ते** अथवा राजाची निवड करणारे जे अधिकारी वर्णन केले आहेत त्यात उल्लेखिलेला सूत नावाचा अधिकारी व सारथी हेही एक नव्हेत रामायणातील विख्यात सुमत्र हा असा अधिकारी 'सूत' होता पौराणिक सूत हे प्राचीन वृत्तान्ताचे सरक्षक अधिकारी होते व सूत पौराणिक हा तर ज्याला ऋग्वेदाचार्य शौनिकानी ब्रह्मास्त्र द्यावे अशा योग्यतेचा ऋषि होता सारथ्यकर्म करणाऱ्या सूताची एक स्वतत्र जात असून ते प्रतिलोमज होते क्षत्रियापासून ब्राह्मण स्त्रीच्या ठिकाणी होणाऱ्या सततीला सूत असे म्हणत व त्याचा सारथ्यकर्म हा व्यवसाय होता. पण या कर्माचे युद्ध-शास्त्रातील महत्त्व इतके असामान्य होते की त्यात श्रीकृष्णा-सारख्या युगपुरुषानीही भाग घेतला सारथ्याचे सगळ्यात महत्त्वाचे कार्य म्हणजे युद्धभूमीवर कुशलतेने रथ चालविणे व रथ्याचे सरक्षण करणे हे होय सामान्यत: रथ्याच्या आज्ञेप्रमाणे वागावे हा सारथ्यासबधातील ठरलेला सकेत आहे, पण महत्त्वाच्या प्रसगी रथ्याची आज्ञा जर घातक वाटली तर सारथी ती पाळण्याचे नाकारीतही असे रथ्याला तो पुष्कळ वेळा हितोपदेश करी. हॉपकिन्सने सारथ्याच्या कौशल्याचे वर्णन करताना असे म्हटले आहे की,

His true art consisted in wheeling and turning, in bringing the car rapidly about so as to attack the antagonist with such speed from all quarters that the chariot seemed to advance from all sides at once The names of the circles are apparently technical . . . the effect of circling was produced by goading the steeds and hauling on the reins. '

(त्याचे खरे कौशल्य रथाची वळणे घेणे व तो विशिष्ट गतीनें चालविणे यात असे. तो अशा पद्धतीने व वेगाने रथ चालवी कीं शत्रूला सर्व बाजूनी रथ आपल्यावर चालून येतो आहे असें वाटावे. रथाची ही जी मंडलाकृति प्रात्यक्षिके असत त्यांतील प्रत्येक प्रात्यक्षिकाचे वेगवेगळे पारिभाषिक नाव असे. रथाच्या जातिवत घोड्याला प्रेरणा देणे व लगामाच्या साहाय्याने तो हवा तसा वळविण्याच्या दृष्टीने स्वाधीन राखणे यावर या मंडलाकृति प्रात्यक्षिकाचे यश अवलंबून असे. महाभारतात श्रेष्ठ सारथ्याची जी वर्णने आहेत त्यावरून सारथ्याच्या कलेची कल्पना येऊ शकते. शाल्वराजाशी झालेल्या युद्धात भगवान् श्रीकृष्णाचा पुत्र प्रद्युम्न मूर्छित झाला असता त्याला त्याच्या सारथ्यानेच रणातून बाहेर काढून वाचविले. अभिमन्यूच्या चक्रव्यूहप्रवेशाच्या वेळी त्याच्या सारथ्याने साहस न करण्याचा सल्ला अनाहूतपणे देऊन आपले कर्तव्य योग्य रीतीने पार पाडले. कर्णाच्या नागास्त्र प्रयोगाच्या वेळी घोड्यांना एकदम गुडघे टेकावयास लावून भगवान् श्रीकृष्णांनी अर्जुनाचे प्राण वाचविले. त्यामुळेच अर्जुनाचा शिरच्छेद व्हावयाचा तो मुकुट उडून जीव वाचला असो. ऋग्वेदापासून तर चंद्रगुप्त मौर्याच्या काळापर्यंत रथ हे भारतीय सैन्याचे महत्त्वाचे अंग समजण्यात येत असे. कौटिल्याच्या अर्थ-शास्त्रात, 'रथाध्यक्ष' (Superintendent of chariots) म्हणून या विशिष्ट खात्याच्या अधिकाऱ्याचा स्वतंत्र निर्देश आहे व त्याच्या कार्याचे इतके सूक्ष्म विवरण आहे की त्यावरून या सेनांगाचे मौर्यकालीन महत्त्व ध्यानात येते. अर्थशास्त्राने रथाध्यक्षाची कर्तव्ये सांगताना (१) रथ्याच्या युद्धशिक्षणाची व्यवस्था करणे, (२) रथनिर्मितीसाठी लागणाऱ्या खर्चाची नोंद ठेवणे, व (३) तो सज्ज राहण्यासाठी आवश्यक ती व्यवस्था करणे ही तीन मुख्य कर्तव्ये उल्लेखिली आहेत. रथाचें प्रमाण सांगतांना कौटिल्य म्हणतो "दशपुरुषो द्वादशांतरो रथ । तस्मादेकान्तरावरा आषदन्त-

रादिति रथाः।" सामान्यत रथाची उची दहा पुरुष व त्याच रुदी सहा ते बारा पुरुष असे. रथाचे एकदर सहा प्रकार सागितले आहेत त्यापैकी तीन प्रकार युद्धात उपयोगात आणीत, ए शिक्षण घ्यावयाच्या दृष्टीने उपयुक्त असे, एक सकटप्रसगी एक शत्रूवर हल्ला करण्याच्या वेळी उपयुक्त असे रथ सामान्य पणे दोन चाकाचे, तर कधी कधी चार व आठ चाकाचेहि असत प्रत्येक रथाबरोबर साहाय्यक म्हणून कमीतकमी दहा व अधिका अधिक पन्नास गजस्वार असत. रथसैन्य शत्रूचा हल्ला थोपवू धरण्याच्या दृष्टीने, एकदम चढाई करून महत्त्वाची स्था स्वाधीन करून घेण्याच्या दृष्टीने, विखुरलेले सैन्य व्यूहरचने शीघ्र सुस्थिर करण्याच्या दृष्टीने व शत्रुसैन्याची व्यूहरचनेच फळी फोडण्याच्या दृष्टीने अतिशय उपयुक्त ठरत असे मौर्य कालीन रथाचे वर्णन करताना मेगॉस्थेनिसने म्हटले आहे की,

'The chariots are drawn on the march by oxen bu the horses are led along by a halter, that their legs ma not be galled and inflamed, nor their spirits damped b drawing chariots In addition to the charioteer ther are two fighting men who sit in the chariot beside him

(रथ युद्धभूमीवर नताना त्याना ओढण्यासाठी बैल जुपी असत. व काढणीने घोडे बेगळे बाधून युद्धभूमीवर घेऊन जात घोड्याच्या पायाना व्यर्थ पीडा होऊ नये व रथ ओढण्याच्य परिश्रमाने रणक्षेत्रावरील हालचाली सुरू होण्याच्या आधीच त्याची उत्साहशक्ति क्षीण होऊ नये हा त्यांत हेतु होता रथां मुख्य रथ्याच्या आजूबाजूला त्याला साहाय्यक म्हणून आणख दोन योद्धे असत.) बैल रथ ओढून नेत हा उल्लेख महत्त्वाच आहे अश्वाचा मुख्य गुण गति हा असून भारवाहन काही नव्हत आणि भारवाहनात त्याची शक्ति क्षीण झाल्यास रणक्षेत्रावरी हालचालीच्या प्रसंगी ते पूर्ण निरुपयोगी ठरतील ही जाणी यात होती. प्राचीन वाङमयातून रथाला घोड्यांबरोबर

अन्यवाहनेही जोडलेली आढळून येतात. रथनिर्मितीच्या वेगवेगळ्या द्रव्यांचे व वेगवेगळ्या रथप्रकाराचे वर्णन प्राचीन साहित्यातून आढळते रथावर सरक्षक व आक्रमक अशी सर्व प्रकारची शस्त्रास्त्रे ठेवलेली असून त्याच्या मागोमाग बाणाचे अनेक भाते असलेले गाडे चालत. याशिवाय महत्त्वाचा वीर ज्या रथावर बसावयाचा असेल त्यावर त्याचे सुवर्णाचा दड असलेले श्वेतच्छत्र व ध्वज असे. या सेनागाचें महत्त्व विशेष असल्यामुळे त्यावरील ध्वजावरून सेनेलाच ध्वजिनी असे नाव मिळाले आहे याप्रमाणे रथाचे महत्त्व केवढेही असले तरी त्यात काही अगगत उणेपणा हाताच उदाहरणार्थ, भलत्या वेळी रणभूमीवर पाऊस पडून जमीन चिखलमय झाली की रथाचा उपयोग होण्याऐवजी ते घातक ठरत. ते चिखलात रुतून बसत व त्याच्या अवजडपणा- मुळे ते रेसभरहि हलू शकत नसत येवढ्याचकरता श्रीकृष्णांनीं कुरुयुद्धाच्या प्रारभी दुर्योधनाला सदेश पाठविताना 'पावसाळा सपून गेला असल्यामुळे आता रथसचाराला भूमि अगदी योग्य आहे' असे उद्गार काढले आहेत भूमि उच सखल असली व तिच्यात खाचखळगे भरपूर असले तर ती रथयुद्धाला अगदी अयोग्य ठरे कारण एकदा का रथचक्र अशा खळग्यात रुतून बसले तर रथ्यावर मरणाचाच प्रसग ओढवे. कर्णार्जुन युद्धात कर्णाचे रथचक्र पृथ्वीने गिळल्याचा दैवी भाग सोडून दिला तर या तऱ्हेच्या विपत्तीत कर्ण फसला व जीवित गमावून बसला असे आढळून येईल ऋग्वेदकाळापासून तर सम्राट् चद्रगुप्त मौर्याच्या काळापर्यंत भारतीय सैन्यात या अत्यत महत्त्वाच्या मानण्यात येणाऱ्या सेनागाचा – रथाचा – सातव्या शतकात अस्त झालेला दिसतो कारण त्याच शतकात लिहिलेल्या बाणभट्टाच्या हर्षचरितात सम्राट् हर्षवर्धनाच्या सैन्याचे जे वर्णन केलेले आहे त्यात रथाचा निर्देश केलेला नाही. हर्षाचाच समकालीन व त्याचा पराभव करणारा महापराक्रमी द्वितीय पुलकेशिन् याच्या सैन्याचे जे वर्णन तत्कालीन चिनी प्रवासी

हुएन्त्सग याने केले आहे त्यातही रथाचा निर्देश नाही व त्या नतरच्या कुठल्याहि युद्धात रथाचा निर्देश आढळत नाही यावरून मौर्य काळानतर हळूहळू या सेनागाचा लोप झाल असला पाहिजे असे दिसते आपण ज्या काळातील राष्ट्रदर्श घेत आहोत त्या काळात मात्र रथसैन्य हे अत्यत महत्त्वाचे सेनाग होते. उर्वरित सेनागाकडे आपण पुढील व्याख्यानात वळू



## व्याख्यान पधरावे

# सेनेचीं विविध अंगें

रथानतरचे भारतीय सैन्याचे महत्त्वाचे सेनाग म्हणजे गजसैन्य होय अतिशय प्राचीन काळापासून हत्तीचे महत्त्व भारतीयानीं ओळखलेले असून शाततेच्या काळात बादशाही वाहन म्हणून व युद्धाच्या वेळी धडक घेणारा म्हणून त्यानी हत्तीकडे नेहमीच पाहिलेले आहे वैभवाचे प्रतीक म्हणून आपल्या सस्कृतीत गजाला मोठा मान असून ‘गजान्तलक्ष्मी’ हा शब्दप्रयोग तर सर्वांच्याच परिचयाचा आहे. गज अथवा हत्तीचा सेनाग म्हणून वैदिक राष्ट्रांत उपयोग होत असे काय हा महत्त्वाचा प्रश्न आहे श्री. विमल-काति मुजुमदार, डॉ पी सी चक्रवर्ती, व डॉ. अविनाशचद्र दास या तीन सशोधकाच्या मते ऋग्वेदकाळी हत्तीचा युद्धात उपयोग होत नसे. पण प्रत्यक्ष ऋग्वेदातच हत्तीचा युद्धसाधन म्हणून उपयोग करण्याइतके ज्ञान असल्याचे अनुमान करण्यासारखा उल्लेख आढळतो तो असा ––

“सृण्याऽइव जर्भरी (इति) तुर्फरीतू (इति) नैतोशाऽइव तुर्फरी (इति) पर्फरीका। उदन्यजाऽइव जेमना मदेरू (इति) ता मे जराय् अजरम् मरायु ।।६।।

–(ऋग्वेद म. १० सू, १०६)

(मस्त हत्तीला जसा अकुश, त्याप्रमाणे तुम्ही दुष्टाला वठणीवर आणता, नाहीतर नितोशाप्रमाणे त्याचा फडशाच उडविता, त्याची सर्वतोपरी दुर्दशा करून टाकता, उदकामध्ये जसे रत्न सापडावें, त्याप्रमाणे तुम्ही अमोल आहात, मदपरिहारक आहात आणि म्हातारपणामुळे कोणी थकलेला असला तरी त्याला तुम्ही तरुण करता आणि मरू घातलेल्यानाही पण तसाच धडधाकट करतां.)

या ऋचेतील " मस्त हत्तीला असा अंकुश " ही उपमा युद्धगजाला उद्देशूनच आहे हे उघडच आहे ज्या सूक्तातील ही ऋचा आहे तें सूक्त ऋग्वेदातील दुर्बोध सूक्तातीलही अति कठीण सूक्त होय असे स्वत वेदभाष्यकार सायणच म्हणतात त्यामुळे त्यातील ऋचाचे वेगवेगळे अर्थ करण्यात येतात आम्ही वर जो अर्थ उद्धृत केला तो ऋग्वेदाच्या पटवर्धनी अनुवादातील होय पाश्चात्य लेखकाच्या मते " सृण्या इव जर्भरी तुर्फरीतू " या पूर्वार्धाचा अर्थ दोन हत्ती आपली गडस्थळे किंचित् वाकून व रोखून जोडीने जसे शत्रूवर चाल करून जातात इ असा आहे अर्थातच हा अर्थ तर पटवर्धनी अनुवादापेक्षाही अधिक स्पष्टपणे युद्धगजाचा ठरतो. त्यावरून प्रो रामचद्र दीक्षितार म्हणतात, This is a fairly early reference to the animal being used in war (हा अत्यत प्राचीन असा हत्तीचा युद्धात उपयोग करण्यात येत असे हे दाखविणारा स्पष्ट उल्लेख आहे ) तात्पर्य, ऋग्वेदकाळ म्हणून वेगळा मानला तरी गज हे युद्धसाधन म्हणून त्या काळीही होते असे दिसते. यजुर्वेद सहितेवरून तर हत्तींना युद्धाचे शिक्षण देण्याची कला चागली प्रचारात होती हे स्पष्टच दिसते कौटिलीय अर्थशास्त्रात या गजसैन्य विभागाच्या अधिकाऱ्याचा स्पष्टच उल्लेख असून या गजामात्याची अथवा गजाध्यक्षाची सर्व कर्तव्ये सांगितली आहेत. कौटिल्य म्हणतात -- " हस्त्यध्यक्षो हस्तिवनरक्षा दम्यकर्म-क्षान्ताना हस्तिहस्तिनी-कलभाना शालास्थान शय्याकर्म विधा-यवस प्रमाण कर्म स्वायोग बन्धनोपकरण साङ्ग्रामिकमलङ्कार चिकित्सकानीकस्थायुकवर्ग चानुतिष्ठेत् " ( हत्ती ठेवावयाच्या वनाचे सरक्षण, वेगवेगळ्या प्रकारे त्याना द्यावयाच्या शिक्षणाने थकलेल्या हत्ती, हत्तिणी व छावे याच्या राहण्याची स्थाने, त्याच्या विश्रामाची व खाद्यभक्ष्याची व्यवस्था, त्याचे पद्धतशीर शिक्षण त्याना बाधावयाची उपकरणे, सग्रामाच्या वेळी त्याना चढवावयाचा साज, त्याना होणाऱ्या रोगावर ओषधोपचार करणारे व त्याची चिकित्सा करणारे हस्तिवैद्य, रणात त्याना प्रेरणा देणारे

अधिकारी, या सर्वांवर देखरेख ठेवणे व याच्याशी संबद्ध अशा विभागाची कामे पाहणे हे हस्त्यध्यक्षाचे काम आहे कौटिल्याच्या मतें हस्त्यध्यक्षाची कामे पुढीलप्रमाणे – (१) हत्तीचे व हत्तिवनाचे संरक्षण करणे, (२) हत्तीचा चारा व त्याना द्यावयाचे इतर भक्ष्य पदार्थ याचे प्रमाण ठरवणे व ते त्याना पुरविण्यात येतात की नाही हे पाहणे, (३) त्याच्यावर येणाऱ्या खर्चाची नोंद ठेवणे व हत्तिपाल आणि माहूत याच्या कामावर देखरेख ठेवणे, (४) आजारी व जखमी हत्तीची नियुक्त करण्यात आलेल्या पशुवैद्याकडून योग्य चिकित्सा करण्यात येते की नाही हे पाहणें, (५) गजशाळेवरील अधिकाऱ्याच्या वेतनाची व पारितोषिकाची व्यवस्था पाहणे, (६) रोज सकाळी व अपराण्हकाळी हत्तीना योग्य पद्धतीने स्नान घालण्यात येते की नाही व स्नान झाल्या-बरोबर त्याना तात्काळ योग्य आहार देण्यात येतो की नाही हे पाहणे.

हत्तीचा अपराण्हकाळचा व्यायाम झाल्यावर त्याना स्नान घालावे व नंतर विश्राम करू द्यावा असे सांगितलेले आहे युद्धा-साठी सिद्ध करावयाच्या हत्तीला शिकविण्याची सात प्रायोगिकें सांगितलेली आहेत.

(१) **उपस्थान** – म्हणजे उंच निशाणापर्यंत उडी मारणे अथवा उडी मारून ते पार करणे

(२) **समावर्तन** – खंदकावर बसणे अथवा रेलणे.

(३) **संयान** – सरळ चालून जाणे अथवा इतस्तत डुलत डुलत चालणे.

(४) **वधावध** – पदाति अथवा अश्वदल यांना पायाखाली चिरडून टाकणे.

(५) **हस्तियुद्ध** – शत्रुसैन्यातील हत्तीशी करावयाचे द्वंद्वयुद्ध

(६) **नगरयान** – किल्ले व प्रासाद यावर चालून जाणे.

(७) **सांग्रामिक** – प्रत्यक्ष रणघाईमध्ये पट्टा वगैरे तोंडात धरून शत्रुसैन्यात धुमाकूळ घालणे

ही ती हत्तीला शिकवावयाची सात प्रात्यक्षिकें होत. हत्तीला विविध प्रकारे सजविण्यात येत असे त्याच्यावर ठेवावयाच्या अबारीत ध्वजस्तंभही असे मेगॉस्थेनिसने हत्ती कसे माणसाळवीत; त्याना शिक्षण कसे देण्यात येई, त्याच्या रोगावर औषधोपचार कसा करण्यात येई इत्यादि गोष्टीचे सूक्ष्म वर्णन केले आहे. रण-हत्तीवर एक माहूत व तीन धनुर्धारी असत हे रणहत्ती आपल्या कामात किती कुशल असत हे अलेक्झाडर व पोरस याच्या झालेल्या युद्धात राजा पोरसच्या हत्तीचे प्लुटार्कने जे वर्णन केले आहे त्यावरून ध्यानात येईल. प्लुटार्क म्हणतो –

His elephant, waxing furious though not yet wounded, kept changing the ranks of the enemy untill the driver, perceiving the king's condition, turned the beast round and fled Tne Indian driver, thinking the king wished to alight, made the elephent kneel down in the usual manner. . Alexander, supposing that he was dead, ordered his body to be stripped–when the elephant turned upon them in defence of his master and lifting him up placed him once more on its back

–(Mc Crindle : Invasion of Alexander pp. 212)

(जरी जखमी झाला नव्हता तरी राजा पोरसचा हत्ती खवळून शत्रूवर चाल करीत होता तो वारवार शत्रूची फळी त्याना बदलावयास लावीत होता राजाची स्थिति ओळखून माहुताने हत्तीला मडलाकृति फिरवून माघार घ्यावयास लावीपर्यंत त्याचा हा क्रम चालू होता माहुताला असे वाटले की राजाला खाली उतरावयाचे आहे म्हणून त्याने नेहमीच्या पद्धतीने हत्तीला गुडघ्यावर बसावयास लाविले अलेक्झाडरला तो मेला असे वाटले व त्याने त्याचे शरीर ताब्यात घेण्यास्तव आपल्या सैनिकाना आज्ञा दिली. पण तेवढ्यात हत्ती एकदम आपल्या मालकावरील हल्ल्यापासून त्याचे सरक्षण करण्यासाठी मागें वळला व त्यानें

आपल्या स्वामीचे शरीर एकदम उचलून पाठीवर घेतले ) भारतांतील या गजसैन्याची धास्ती आक्रमक ग्रीक सैन्याने इतकी घेतला होती की अलेक्झाडरने स्वत च पुढीलप्रमाणे उद्‌गार काढले आहेत ' It is the elephent only which makes it impossible for the horse to land on the other bank "

प्राचीन युद्धात हत्तीचे महत्त्व अत्यत असे सैन्यसचलनाच्या वेळी ते सर्वात पुढे असत व झाडाझुडपानी भरलेला सैन्याचा रस्ता साफ करीत ते सैन्याची डावी व उजवी बाजू सरक्षण करीत नदी व पाण्याचे अडथळे त्याच्यामुळे तरून जाता येत प्रत्यक्ष युद्ध चालू असताना सहसा भग न पावणारी सुदृढ आघाडी त्याचीच असे शत्रूचा सैन्यव्यूह ते शीघ्र गतीने धुळीस मिळवीत, शत्रु-सैन्य चिरडून त्यात ते भय व सभ्रम उत्पन्न करीत, आपल्या सैन्याचे सरक्षण करीत व खजिन्याचे सरक्षण करीत तटबदी तोडणे व प्रासादाच्या भिती नि प्राकार ढासळविणे हा त्याचा खेळ होता. सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे रणहत्ती युद्धांतून कधी माघार घेत नसे व आपल्या धन्यासाठी जीवित समर्पण करी त्याची ही उपयुक्तता ओळखून धनुर्वेदामध्ये उत्कृष्ट लक्षणानी सपन्न अशा हत्तीची निवड कशी करावी याचे विवेचन करणारे व त्याच्या शिक्षणादिकाचे विशदीकरण करणारे गजशिक्षा अथवा हस्ति-शास्त्र या नावाचे एक स्वतत्र प्रकरणच सागितलेले आहे.

तिसरे महत्त्वाचे सेनाग म्हणजे अश्वदल होय कौटिल्याच्या अर्थ-शास्त्रावरून व मेगॅस्थेनिसच्याही लेखनावरून चद्रगुप्त मौर्याच्या सैन्यात उत्कृष्ट अश्वदल होते असे दिसते कौटिलीय अर्थशास्त्रात अश्वदलाचा स्वतत्र विभाग मागितला असून त्या विभागाच्या मुख्याधिकाऱ्याला अश्वाध्यक्ष असे म्हणत गजाध्यक्षाकडे असलेल्या कामाचे स्वरूप आपण पाहिलेच आहे अश्वाध्यक्षाकडे असलेल्या कामाचेही हेच स्वरूप असून विशेष म्हणजे त्याला घोड्यांची सुव्यवस्थित नोद ठेवावी लागे अश्वाला द्यावयाच्या शिक्षणात व त्याच्या रोगाची चिकित्सा करण्यात विचक्षण असतील

त्याचीच अश्वाध्यक्ष म्हणून नियुक्ति करावी असे अर्थशास्त्रात म्हटले आहे. अश्वाध्यक्षाची कर्तव्ये सांगताना चाणक्य म्हणतो – ‘अश्वाध्यक्ष पण्यागारिक क्रमोपागत आहवलब्धमाजातं साहाय्यागतकपणस्थित यावत्कालिक वाश्वपर्यग्र कुवलयोवर्ण-चिन्ह् कर्म वर्गागमलेखयेत् ।’ मेगॅस्थेनिसने मौर्यांच्या अश्व विभागाचे वर्णन केले आहे त्यात त्याला कसे शिक्षण देत असत याची माहिती दिलेली असून तो म्हणतो की, अश्वदलासाठी घोड्याची निवड करताना त्याचे वय शक्ति व आकार याचा विचार प्रामुख्याने करण्यात येत असे महाभारतात अभिमन्यूच्या रथाला जुपलेल्या घोड्याचे वर्णन करताना ते केवळ तीन वर्षांचे असल्याचा स्पष्ट उल्लेख आहे (तत स नोदयामास हयानाशुत्रिहायनान् । अतिहृष्टमनाः सूतो हेमभाण्डपरिच्छदान्) एरियन् भारतीय रणाश्वाचे वर्णन करताना सांगतो –

‘ The horsemen are equipped with two lances like the lances called Saunia and with a shorter buckler than that carried by the foot–soldiers; but they do not put saddle on their horses nor do they curbe them with bits like the bits in use among the Greeks or the Kelts but they pit on round the extremety of the horse’s mouth a circular piece of stiched raw ox-hide studded with pricks of iron or brass pointing inwards but very sharp There are also ivory pricks The reins are connected with iron prongs in their mouth It is practically this prong that keeps the animal in check To this prong are connected the pricks which have their own share in controlling these animals

(अश्वदळातील योद्ध्याच्या हातात दोन छोटे भाले व पाय-दळातील स्वाराच्या हातात असणाऱ्या ढालीपेक्षा लहान आकाराच्या संरक्षक ढाली असत पण त्यांच्या घोड्यावर खोगीर व लगाम

वगैरे ग्रीक अथवा केल्ट घोडेस्वाराप्रमाणे नसे त्याऐवजी ते घोडयाच्या तोडात, जबडयापर्यंत पोहोचेल असा एक गोल तुकडा ठेवीत त्याला लोखड किंवा पितळेची तीक्ष्णाग्र टोके असत कधी कधी ती हस्तिदताचीहि असत त्याच्या तोडाला लाविलेल्या या अणीदार टोकाच्या नबकडीला लगाम अडकविलेला असे याच्या भरवशावर अश्वस्वार अश्वाचे नियत्रण करीत असत ) प्राचीन भारतात अश्वविद्येची अत्यत प्रगति झाली होती असे प्राचीन साहित्यावरून दिसून येते अश्वविद्येचे निर्मातृत्व शालिहोत्र नावाच्या ऋषीकडे असल्याचे सागितलेले आहे, व म्हणून अश्वविद्येला शालिहोत्रम् असेही नाव आहे जयदेवाचा अश्वायुर्वेद व नकुलाचा अश्वशास्त्र या नावाचा ग्रथ प्राचीन साहित्यात प्रसिद्ध आहे आज मात्र नावापलीकडे या ग्रंथाची कोणतीही माहिती मिळत नाही. महाभारतातील पाडवाचा बधु नकुल हा अश्वविद्येत निष्णात असून त्याने राजा विराटाच्या घरी आपल्या अज्ञानवासाचे दिवस अश्वपाळ म्हणूनच काढले हे प्रसिद्ध आहे अश्वचिकित्सित या नावाचा नकुलाच्या नावावर आणखी एक ग्रंथ मोडतो. महाभारतातील वनपर्वात ज्याचे वर्णन येते तो राजा नल अश्वविद्येत अत्यत निष्णात म्हणून प्रसिद्ध असून त्याने अयोध्येचा राजा ऋतुपर्ण याच्या जवळून अक्षविद्या घेऊन तिच्या मोबदल्यात त्याला आपली अश्वविद्या दिली होती. नलाच्या अश्वविद्याकौशल्याच्या सबधात महाभारतात पुढीलप्रमाणे एक गोष्ट उल्लेखिली आहे. वनवासात परागदा झालेल्या नलाच्या पुन प्राप्तीसाठी दमयतीनें आपल्या पुनर्स्वयवराचे एक नाटक रचलेले असते व त्याचे निमत्रण नल ज्या ठिकाणी बाहुक या नावाने सारथ्याची नोकरी करीत असतो त्या अयोध्येच्या ऋतुपर्ण राजाला देण्यात येतें राजा ऋतुपर्ण बाहुकाला अयोध्येहून विदर्भ नगरीला एका दिवसात जातां येईल काय असे विचारतो बाहुकवेषधारी नलानें त्याला तसें आश्वासन दिल्यावर तो त्याला अश्वशाळेतील अश्वाची परीक्षा करून योग्य ते अश्व घेऊन यावयास सागतो महाभारतकार यानतरच्या प्रसगाचें वर्णन पुढीलप्रमाणें करतात --

तत: परीक्षामश्वाना चक्रे राजन्स बाहुक ।
अश्वशालामुपागम्य भाङगासूरिनृपाज्ञया ॥११॥
स त्वर्यमाणो बहुश ऋतुपर्णेन बाहुक. ।
अश्वाञ्जिज्ञासमानो वै विचार्य च पुन पुन ।
अध्यगच्छत्कृशानश्वान् समर्थानध्वनि क्षमान् ॥१२॥
तेजोबलसमायुक्तान्कुलशीलसमन्वितान् ।
वर्जितान् लक्षणैर्हीनै पृथुप्रोथान्महाहनून् ॥१३॥
शुद्धान्दशभिरावर्तै: सिंधुजान्वातरहस ।
दृष्ट्वा तानब्रवीद्राजा किंचित्कोपसमन्वित ॥१४॥
किमिदं प्रार्थित कर्तु प्रलब्धव्या न ते वयम् ।
कथमल्पबलप्राणा वक्ष्यन्तीमे हया मम ॥१५॥
बाहुक उवाच –एको ललाटे द्वे मूर्ध्नि द्वौ द्वौ पार्श्वोपपार्श्वयो ।
द्वौ द्वौ वक्षसि विज्ञेयौ प्रयाणे चैक एव तु ॥१६॥
एते हया गमिष्यन्ति विदर्भान्नात्र सशय: ॥

–(महाभारत वनपर्व अ ७१)

(मग अश्वशाळेत जाऊन बाहुकाने अश्वपरीक्षा केली व कृश दिसणारे पण बल-तेजाने युक्त, जातिवत व शीलवान्, हीन लक्षण नसलेले, मोठ्या हनुवटीचे अश्व निवडून काढले ते सिधुदेशचे, दहा भोवरे असलेले व वायुवेगाचे होते त्याना पाहून त्याच्या कृशपणामुळे ऋतुपर्ण बाहुकावर रागावला तेव्हा बाहुक त्याला शातपणे म्हणाला की 'एक ललाटाच्या ठिकाणी, दोन मूर्धभागी, दोन पार्श्वभागी व दोन उपपार्श्वभागी, दोन वक्षस्थलाचे ठिकाणी व दोन पृष्ठ भागाचे ठिकाणी असे आवर्त ज्या घोड्याच्यावर असतील ते अश्व सर्वश्रेष्ठ होत असे हे अश्व असल्यामुळे मी त्याची निवड केली आहे.' व खरोखरीच त्या अश्वानी त्यांचा प्रवास यशस्वी झाला.

यावरून महाभारतकाली अश्वविद्येचे ज्ञान किती सूक्ष्म होतें याची कल्पना येते. जातिवत घोड्याची लक्षणे घोड्यावर असणारी त्यांच्या उत्कृष्टत्वाची व निकृष्टत्वाची चिन्हे, घोड्याचा वर्ण, व

त्याची निगा राखावयाचे नियम याचे वर्णन अश्वशास्त्रातून सागितलेलें आहे सिधु देश, काम्बोज व बाल्हिक येथील घोडे सर्वांत उत्कृष्ट व जातिवत म्हणून प्राचीनकाळी अतिशय प्रसिद्ध असून महाभारतीय युद्धात काम्बोज देशीय अश्वाचा उल्लेख आढळतो. अश्वस्वाराजवळ अश्वास नियत्रित करण्यासाठी असलेला लगाम त्याच्या मणिबधाला बाधलेला असे, व त्यामुळे धनुर्बाणाचा उपयोग करण्यासाठी त्याचे दोन्ही हात मोकळे असत या रणाश्वाना क्वचित् मद्यहि पाजीत.

भारतीय सैन्यातील हे अश्वदल ऋग्वेदकाळी नव्हते असे प्रो. रामचद्र दीक्षितार याचे मत आहे. ते म्हणतात.'Though we have references to horses and war-chariots drawn by horses, we have no indication that the cavalry as a disciplined force existed in the days of the Rigveda

(जरी ऋग्वेदामध्ये अश्वाचा व युद्धरथाला जुपलेल्या अश्वाचा उल्लेख आढळत असला तरी अश्वदल नावाचे सुघटित सेनांग ऋग्वेदकाळी होते असे मानावयास सबळ पुरावा नाही ) ऋग्वेद म्हणजे ऋग्वेद सहिता या हट्टवादी संकुचिततेची येथें प्रा दीक्षितार याना बाधा झालेली आहे हे उघड दिसते अथर्ववेद संहितेंत चवथ्या काडातील २१ व्या सूक्तात पायाने धूळ उडविणाऱ्या घोड्याचे वर्णन आहे अश्वपाल व अश्वपति असे शब्द वेदवाङ्मयात आहेत राजसूय व वाजपेय यज्ञात घोड्याच्या शर्यती होत श्री दीक्षितार हे जर्फरी तुर्फरीतू' या एका अत्यन्त कठिण व निश्चित अर्थ नसलेल्या ऋचेवरून ऋग्वेदकाली हत्तीचा युद्धात उपयोग होत असे असे सागतात पण त्यापेक्षा अश्वस्वाराचा व अश्वयोध्यांचा अधिक स्पष्ट उल्लेख ऋग्वेदात असताहि अश्वदलाच्या बाबतीत सशय व्यक्त करून नकारार्थी निर्णयाकडे स्वत.चा कल असल्याचे दाखवितात हे महदाश्चर्य होय आम्ही ऋग्वेदांतील अश्वविषयक काही उल्लेखच येथें उद्धृत करतो. ते असे --

(१)प्रऽस्तोकः इत् नु राधसः ते इन्द्र दश कोशयी. **दश वाजिन**. अदात् ॥२२॥ दश **अश्वान्** दश कोशान् ॥२३॥ दश **रथान्** **प्राष्टिऽमतः**

–(ऋग्वेद ६, ४७)

(इन्द्रा! तुझ्या कृपादानामुळे प्रस्तोकाने दहा धनकोश आणि दहा अश्वारूढ लढाऊ सैनिक दिले (२२) दहा अश्व व दहा कोश दिले व जोडीजोडीने जोडलेले दहा रथ दिले. या ठिकाणी सज्ज केलेले रथ व अश्व याचा वेगळा व स्वतंत्र निर्देश असल्यामुळे "वाजिन्" या शब्दाचा 'अश्वारूढ सैनिक' याशिवाय दुसरा अर्थ होऊ शकत नाही व म्हणूनच पटवर्धनानी तो अर्थ केला आहे

(२) जनमित्र न दऽपती अनक्ति बृहस्पते **वाजय** आशून्ऽइव **आजौ** ॥२॥"

–(ऋग्वेद १०–६८)

(हे बृहस्पते! सग्रामामध्ये जलद धावणाऱ्या **घोड्यांना घुसवितात** त्याप्रमाणे तूहि तडफदार वीराना शत्रूवर चढाई करण्यास प्रोत्साहन दे) ज्या जलद धावणाऱ्या घोड्याचा येथे उल्लेख आहे ते घोडदळातील अश्वस्वाराचेच वर्णन असू शकते

(३)" अभि श्याव न कृशनेभि अश्व नक्षत्रेभि पितर द्या अपिशन् ॥ ११॥"

–(ऋग्वेद १० – ६८)

(मौक्तिकालकारानीं काळ्या घोड्याला सजवावे तसे पितरानी काळ्या आकाशाला तेजवी तारागणानीं मडित केले आहे." या काव्यवर्णनावरून अश्व,आपल्या वैदिक पूर्वजाच्या किती दाट परिचयाचे, किती आवडीचे असत व त्याना सजविण्याची योद्धयाची प्रवृत्ति सर्वांच्याच किती परिचयाची होती हे स्पष्ट होत नाही काय?

(४) युद्धसूक्तात महेन्द्राची प्रार्थना करताना वैदिक ऋषि म्हणतो "उत् हृषय मघऽवन् आयुधानि उत् सत्वना मामकाना मनासि । उत् वृत्रऽइन् **वाजिनां वाजिनानि** उत् **रथानां** जयता यन्तु घोषाः ॥१०॥

–(ऋग्वेद १०–१०३)

(हे भगवता आपली आयुधे परजून सरसावून सत्त्वबळाने युक्त असलेल्या आमच्या सैनिकांची मने आवेशाने भरून सोड हे व्रज-धरा, **अश्ववीरांचीं** मनेहि रणोत्सुक कर आणि आमच्या रथाच्या चाकाचा ध्वनि आमच्या भावी यशश्रीचा जयघोष ठरेल असे कर ) येथे अश्ववीर व रथ याचा स्पष्ट भिन्न निर्देश आहे ऋग्वेदकाळी अश्वदळ होते असेच हे व अनेक निर्देश सिद्ध करतात

या नतरचे महत्त्वाचे मुख्य सेनाग म्हणजे पायदळ होय. पायदळाला **पत्ति** अथवा **पदाति** असे म्हणत पायदळाचे महत्त्व सागताना अग्निपुराणात असे म्हटले आहे की, सेना पदातिबहुला शत्रूञ्जयति सर्वदा "(ज्या सेनेत पायदळाची सख्या पुष्कळ असते त्या सेनेला शत्रूवर नेहमीच विजय प्राप्त करता येतो )कौटिल्याने आपल्या अर्थशास्त्रात या सेनाविभागाचा स्वतत्र निर्देश केला असून इतर विभागाप्रमाणे याच्या स्वतंत्र अधिकाऱ्याचाहि निर्देश केला आहे. नीतिप्रकाशिकेमध्ये प्रत्यक्ष युद्धाबरोबरच पदाति सेनेच्या कामांचा पुढीलप्रमाणे निर्देश केलेला आहे

शोधन कूपतीर्थाना मार्गाणा शिबिरस्य च ।
स्कधावारस्य करण विष्टिकर्मप्रसाधनम् ॥
कोशागारायुधागारधान्यागारादिरक्षणम् ।
व्यूहप्राकारकरण पत्तिकर्म प्रचक्षते ॥

– (नीतिप्रकाशिका ६ ६६–६७)

या वर्णनाप्रमाणे पदाति सैन्याची कामे पुढीलप्रमाणे होती.—(१) शिबिररचना करणे, (२) सैन्याच्या अधीन असणाऱ्या कामकऱ्याच्या कामावर देखरेख करणे; (३) कोशाचे, शस्त्राचे, धान्यादिकाचे इतर सैन्योपयोगी पदार्थसग्रहाचे सरक्षण करणे, (४) पाण्याचे साठे शुद्ध राखणे, (५) सैन्याचा मार्ग नीट राखणें व (६) व्यूहासाठी आवश्यक ती व्यवस्था करणे. शुक्रनीतीमध्ये असे सागितलें आहे की पदातीच्या भरवशावर शत्रूच्या मनांत भीति उत्पन्न करण्यासारखी सेनेची भव्य रचना करता येते. भारतीय पदातिसेनेच्या युद्धपद्धतीविषयीं लिहितांना एरियन्नें म्हटले आहे :-

'They carry a bow made of equal length with the man who bears it This they rest upon the ground and pressing it with their left foot, thus discharge the arrow having drawn the string backwards, for the shaft they use is little short of being three yards long, and there is nothing which can resist an Indian Archer's shot–neither shield nor breast plate, nor any stronger defence if such there be In their left hand they carry bucklers made of undressed ox–hide which are not so broad as those who carry them but are about as long

(हे पदातिवीर आपल्या उंचीचे धनुष्य वापरीत ते धनुष्य भूमीवर टेकवून व आपल्या डाव्या पायाने त्यावर दाब देऊन आकर्ण प्रत्यचा ओढून ते शरप्रक्षेप करीत. त्याचा बाण जवळ जवळ तीन गज लाबीचा असे. आणि त्याचा आघात इतका जोरकस व अमोघ असे की ढाल, छातीच्या सरक्षणासाठी असणारे कवच अथवा इतर कोणत्याही सरक्षणार्थ वापरावयाच्या साधनांचा त्याच्यासमोर टिकाव लागू शकत नसे. त्याच्या डाव्या हातात ते बैलाच्या न कमाविलेल्या कातडयाची ढाल वापरीत ती ढाल विशेष रुद नसे, पण लाबट असे ) धनुष्य बाणाऐवजी पदाति सैन्याची काही पथके बरची वापरीत. पण रुद पात्याचे व तीन गज लाबीचे खड्ग हे पदातिसैन्याचे आवश्यक शस्त्र असून ते प्रत्येक सैनिकाजवळ असेच. पदातिसैन्याचा योद्धा युद्धस्थळी जाताना त्याची जी सिद्धता करून देण्यात येई त्याचे वर्णन करताना अथर्ववेदात म्हटले आहे – "मर्माणि ते वर्मणा छादयामि सोमस्त्वा राजामृतेनानु वस्ताम्। उरोर्वरीयो वरुणस्ते कृणोतु जयन्त त्वानु देवा मदन्तु ॥

—(अथर्ववेद ७–११८–१.)

(मी या कवचाने तुझी मर्मस्थाने झाकून टाकतो. राजा सोम तुला अमृताने आच्छादित करो वरुणाने तुला श्रेष्ठ स्थान द्यावें व युद्धात विजयी होणाऱ्या तुला पाहून सर्व देव आनदित होवोत.)

पत्ति असा शब्द पायदळ या अर्थी वेदात येतो. ऋग्वेदातील सग्रामगीताचे वातावरण या पदातिसैन्याच्या हालचालीनी पुष्कळच व्यापलेले आहे प्रत्यक्ष ऋग्वेदसहितेतच साठ हजार सैन्याचा सहार झाल्याच्या युद्धाची वर्णने यतात उदाहरणार्थ पुढील उल्लेख पहा –

त्वम् एतान् जन राज्ञो द्विर्दश अबधुना सुश्रवसो पजग्मुष । षाष्टी सहस्रा नवतिं नव श्रुतो नि चक्रेण रथ्या दुष्पदाऽवृणक्॥९॥ (ऋ म १ सू. ५३) (ज्यावेळी सुश्रवस ह्याला साह्य करण्यास कोणी नाही असे पाहून वीस राजानी त्याच्यावर स्वारी केली त्या वेळी ज्याच्यापुढे कोणाचा टिकाव लागणार नाही असें एक रथचक्र घेऊन सत्कीर्तिमडित अशा तू त्या राजाचा आणि त्या बरोबरच त्याच्या साठ हजार नव्व्याण्णव लोकाचा उच्छेद करून टाकलास.) दाशराज्ञ युद्धाचे ऋग्वेदातील प्रकरणहि शिस्तबद्ध सैनिक सचलनाचे एक मोठे निदर्शनच होय

याप्रमाणे वैदिक राष्ट्राच्या मुख्य चतुरगबलाचे स्वरूप पाहिल्या-वर आपण अन्य उपागाकडे वळू. त्यातील सर्वात महत्त्वाचे उपांग म्हणजे सैन्याला साहित्याचा पुरवठा करणारे लोक होत त्याना भारतीय युद्धशास्त्रात **विष्टि** असे नाव आहे. ज्याला अलीकडे Commissariat असे म्हणतात ते हे सैन्याला अन्न व अन्य साहि-त्याचा पुरवठा करणारे सेनाग प्राचीन भारतात सुव्यवस्थित स्वरूपात होते याचे पुष्कळच पुरावे उपलब्ध आहेत. कुरुपांडवाचें सैन्य युद्धास्तव कुरुक्षेत्रावर आले त्या वेळी राजा युधिष्ठिराच्या सेनानिवेशाचे महाभारतात पुढीलप्रमाणे वर्णन आहे

"शकटापणवेशाश्च यानयुग्म च सर्वश ।
कोश यन्त्रायुध चैव ये च वैद्याश्चिकित्सका ॥
पाण्डु यच्च बल किचित् यच्चापि कृशदुर्बलम् ।
तत्सगृह्य ययौ राजा ये चापि परिचारका ॥
तत्रासन्शिल्पिन: प्राज्ञा: शतशो दत्तवेतना: ।
सर्वोपकरणैर्युक्ता वैद्या शास्त्रविशारदा ॥

ज्या धनुर्वर्मशस्त्राणा तथैव मधुसर्पिषो ।
रसर्जरसपासूना राशय: पर्वतोपमा ।।
बहूदकं सुयवस तुषाङ्गारसमन्वितम् ।
शिबिरे शिविरे राजा सञ्चकार युधिष्ठिर ।।

( बैलगाड्या, मालवाहू गाड्या, इतर वाहने कोश (खजिना) शस्त्रे, यत्रे, वैद्य, शस्त्रवैद्य, सैन्यातील आजारी व अन्य दृष्टीने प्रत्यक्ष युद्धात निरुपयोगी असे बाजारबुणगे, व नोकरवर्ग याना राजाने बरोबर घेतले होते. त्या ठिकाणी अनुभवी असे शकडो शिल्पी होते व ते सगळे नियमित पगार मिळणारे होते. तसेच सर्व प्रकारच्या उपकरणानी युक्त असे वैद्यशास्त्र-विशारदही त्या ठिकाणी होते तसेच प्रत्यचा, धनुष्य, कवचे व अन्य शस्त्रास्त्रे याचे ढीग लागलेले होते. पिण्याच्या व अन्य उपयोगाच्या पाण्याचा विपुल साठा केलेला होता अन्न व धान्य. कोळसा व इतर जळण याच्या राशीच्या राशी तेथे लागलेल्या होत्या तसेच मध, तूप व दळलेली लाख याचाहि अमाप सग्रह केलेला होता ) याच्या पुढच्याच अध्यायात दुर्योधनाच्या शिबिराच्या सिद्धतेचे वर्णन आहे ते पाहण्यासारखे आहे. त्यात निरनिराळी विषाक्त शस्त्रेहि सगृहीत करण्यात आल्याचे वर्णन आढळते या विभागाचे मुख्य कर्तव्य सेनेतील लोकाना आवश्यक तसा कपड्याचा व शस्त्राचा पुरवठा करणे हे होते. जखमी लोकाना शिबिरातून वैद्य व शस्त्रवैद्य याच्याकडून उपचार करण्यात येत भीष्माना असे उपचार करून विशल्य होण्याची विनति त्याच्या अतिम शरशय्येच्या वेळी राजा दुर्योधनाने केली होती पण देह ठेवण्याच्याच निश्चयामुळे त्यानी ती नाकारली ही गोष्ट वेगळी जशी सैनिकाची, तशीच जखमी घोडे, हत्ती इत्यादि पशूचीही शुश्रूषा करण्यात येत असे तात्पर्य, मनुष्य व पशु याची शुश्रूषा हेही या विभागाचे एक महत्त्वाचे काम होते. मेगॅस्थेनिसच्या वर्णनाप्रमाणे मौर्य सैन्याचा विष्टि हा विभाग परिपूर्ण स्वरूपाचा होता. कौटिल्याने सैन्य सचलनाच्या वेळी या

विभागासबधी लिहिले आहे – " चिकित्सका , शस्त्रयत्रागदस्नेह-वस्त्रहस्ता स्त्रियश्च अन्नपानरक्षिण्य पुरुषाणामुद्धर्षणीया पृष्ठत तिष्ठेयु ' (चिकित्सक, शस्त्र, यत्र औषधि, तेले, वस्त्रे इत्यादि-काचे साठे असणारे लोक व अन्नपानांचे सरक्षक स्त्री अधिकारी यांनी पाठीमागे उभे रहावे ) नीतिप्रकाशिकेमध्ये **विष्टि** या विभागांत काही खेडेविभागातील लोक, कोशाचा पुरवठा करणारे. छत्रधारी, राज्यातील मुलकी अधिकारी, कामकरी खनक इंजिनियर्स, जमिनीचे मोजमाप करणारे, रणभूमीवर, उपयुक्त असणारे कामकरी व जगलाचे माहितगार शिकारी याचाही समावेश करण्यात आलेला आहे अर्थात् यात उपयुक्ततेच्या अनुसार कमी अधिक भरती होणे अथवा काही जुन्या गोष्टी रद्द होऊन नव्या गोष्टीचा समावेश होणे अत्यत स्वाभाविक आहे. विष्टि हा विभागच पद्धतशीर व शिस्तबद्ध युद्धशास्त्राच्या विकसनाचा प्रत्यक्ष पुरावा होय या विभागा-मुळेच कूटयुद्धात या विभागाचा नाश करण्याच्या बाबीचा समावेश झाला आहे कारण त्यामुळे सैन्याचा प्रत्यक्ष पराभव न करताही त्याला विनाशकारी विपत्तीच्या गर्तेत लोटता येते पण अवाढव्य सैन्यातील या अवजड विभागाचा कधी कधी जलद हालचालीच्या दृष्टीने मोठाच अडथळा होऊन शत्रूना त्याचा अतिशय उपयोग करून घेता येई. औरगजेबाच्या सैन्य-शिबिराच्या याच असामर्थ्याचा छत्रपती शिवाजी महाराजानी भरपूर उपयोग करून घेतला होता

वेदकाळी हा सैन्यविभाग असल्याचा पुरावा ऋग्वेदातच मिळतो, तो पुढीलप्रमाणे – खेल राजाची पत्नी विश्पला ही मोठी विदुषी असून अत्यत शूर होती. एकदा तिच्या पतीच्या साहाय्यासाठी ती संग्रामात त्याच्या बरोबर गेली असता शत्रूनी हातघाईच्या युद्धात तिचा पाय तोडून टाकला. पण न घाबरता अश्विनीच्याकडून तिने दुसरा एक कृत्रिम लोखडी पाय जसाच्या तसा त्या जागी बसवून घेतला व पुन्हा ती दुसऱ्याच दिवशी

सग्रामात गेली सग्रामात लढून व शत्रूवर विजय सपादन करून तिने ऋग्वेदाचा परिसर आपल्या पराक्रमाने निनादून टाकला आहे. ऋग्वेदात म्हटले आहे –

चरित्रं हि वेरिवाच्छेदि पर्णमाजा खेलस्य परितक्म्यायाम् ।
सद्यो जङ्घमायसी विश्पलायै धने हिते सर्तवे प्रत्यधत्तम् ॥
–(ऋग्वेद, १–११६–५६)

(एखाद्या पक्ष्याचा ज्याप्रमाणे पख तुटावा त्याप्रमाणे खेलाच्या युद्धात रात्रीच्या वेळेस विश्पलेचा पाय तुटला पण लढाई सुरू झाल्याबरोबर तिला समरागणावर वाटेल तेथे जाता यावे म्हणून, हे अश्विनीनो, तुम्ही तिला लगेच लोखडाचा पाय बसविला. )

याभिर्विश्पला धनसाम् अथर्व्यम् सहस्रमीळ्हे आजौ अजिन्वतम् ।
याभिर्वशम् अश्व्यं प्रेणिम आवतम् ताभिरूषु ऊतिभिरश्विना गतम्॥
– (ऋग्वेद, १–११२–१०)

( अथर्व्याच्या कुळात उत्पन्न झालेल्या धनवान् विश्पलेचे ज्या आपल्या भक्तरक्षक सामर्थ्याने तुम्ही हजारो माणसे लढत असता सरक्षण करून तिला विजय प्राप्त करून दिला आणि तुमच्यावर निष्ठा ठेवणाऱ्या अश्वकुलातील वशाचे तुम्ही सरक्षण केले ती आपली सामर्थ्ये बरोबर घेऊन तुम्ही इकडे आगमन करा. )

या वर्णनावरून ऋग्वेदकाळासारख्या प्राचीनतम काळातही भारताची शस्त्रवैद्यकात केवढी विलक्षण प्रगति झाली होती हे ध्यानात येते ही गोष्ट रणागणावरच झालेली आहे हे ध्यानात घेतले म्हणजे वैदिक राष्ट्रात या सेनागाचे असलेले प्रगत स्वरूप स्पष्ट होते

आता नौदल व दुर्ग या सेनागाचे स्वरूप पाहू. भारतीय युद्ध-शास्त्राच्या युक्तिकल्पतरू इत्यादि ग्रथावरून लढाऊ आरमाराची वर्णने आढळतात डॉ व्ही ए स्मिथ याने आपल्या इतिहासात भारतीय नौदलासबधी असे प्रतिपादन केले आहे की "The creation of the Admiralty Department was an innovation due to the genius of Chandragupta.

(सैन्यागातील नौदलाची निर्मिति (मौर्य) चद्रगुप्ताच्या प्रतिभेतून झाली आहे ) पण डॉ. स्मिथचा हा तर्क बरोबर नाही नौका व नौकानयन ऋग्वेदकाळी होतें असे दाखविणारे पुरावे ऋग्वेदात आहेत उदाहरणार्थ, ऋग्वेदातील पुढील उल्लेख पहा –

अनारभणे तत् अवीरयेथाम् अनास्थाने अग्रभणे समुद्रे ।
यत् अश्विनौ ऊहथुर्भुज्युम् अस्त **शतारित्रा नावम्** आतस्थिवांसम्।
–(ऋग्वेद १–११६–५)

( हे अश्विहो, जिला शभर वल्ही लागत होती अशा नौकेत बसलेल्या भुज्यूला तुम्ही त्याच्या घरी सुखरूप पोहोचता केला हा तुमचा समुद्रावरचा मोठाच पराक्रम होय. कारण त्यास समुद्राचा आरभ कोठे झाला, त्याला आधार कशाचा असतो आणि त्याला ताब्यात कसे आणावे हे काहीच समजत नव्हतें )

अश्व न गूळ्हम् अश्विना दुरेवै ऋषि नरा वृषणा रेभम् अप्सु ।
सत रिणीथो विप्रुत दसोभिर्न वा जूर्यति पूर्व्याकृतानि ।।
–– (ऋ १–११७–४)

( रेभ ऋषि पाण्यात बुडून जाऊन दुष्ट लोकाच्या कृतीमुळे एखाद्या घोड्याप्रमाणे जलात अदृश्य होऊन गेला होता. तरी पण हे वीर्यशाली वीरानो, तुम्ही अद्भुत कृति करून त्याचा बचाव केला ही तुमची कृत्ये कितीही पुरातन असली तरी ती कधीहि जुनी होत नाहीत. )

येथे उल्लेखिलेल्या दोन ऋचापैकी पहिल्या ऋचेत शभर वल्ह्याच्या नावेचा स्पष्ट उल्लेखच आहे व दुसऱ्या ऋचेत नावेचा उल्लेख नसला तरी पाण्यात व तेहि अगाध समुद्राच्या पाण्यात बुडालेल्या जीवाला ज्या अर्थी वर काढून व उपचार करून वाचविले आहे त्या अर्थी ते नौकेच्या साहाय्यावाचून शक्य नाहीं हे स्पष्टच आहे वेदामध्ये या मोठ्या नावेप्रमाणेच वादळात टिकाव धरू शकणाऱ्या, दिसायला सुदर असलेल्या व आजूबाजूला पख असलेल्या नावाचाहि **प्लव** या संबोधनाने उल्लेख केलेला आढळतो. ऋग्वेदातील हा व असे काही उल्लेख तपासण्यासारखे

आहेत ते असे – वेदा यो वीना पद अन्तरिक्षेण पतताम् । वेद नाव. समुद्रिय ॥७॥ (जो अन्तरिक्षातून परिभ्रमण करणाऱ्या पक्ष्यांचा मार्ग जाणतो, समुद्राधिपति असल्याकारणाने नौकानयनाची वाटही ज्याला माहीत आहे )

आ यत् रुहाव वरुण च नाव प्रयत् समुद्रम् ईरयाव मध्यम् । अधियत् अपास्नुऽभि चराव प्र प्रऽइखे इखयावहे शुभेकम् ॥ ऋ. ७–८८–३ (पूर्वी एकदा जेव्हा वरुण आणि मी (वसिष्ठ) असे दोघे एकाच नौकेत आरूढ झालो आणि आम्ही ती नौका भर समुद्रामध्ये हाकारली तेव्हा आम्ही लाटाच्या उच शिखरावरून वर खाली अशा रीतीने सरकू लागलो की जणो काय हिंदोळ्यावर बसून आम्ही मजेने झोकेच घेत आहो )

ऋग्वेदकाळी नौकानयन होते व समुद्रावरील सफरी हा त्याच्या जीवनातील अत्यत परिचयाचा भाग होता हे यावरून निर्विवादपणेच सिद्ध होते अथर्ववेदात तर नोकेने समुद्रतरणाच्या उपमा अनेक ठिकाणी येतात

बौधायन धर्मसूत्रात समुद्रयानाचा उल्लेख असून ' नावा द्वीपान्तरगमनम् ' असे त्याचे स्पष्टीकरणहि आढळते कौटिल्याच्या अर्थशास्त्रात नावध्यक्ष या सबोधनाने या सेनागाच्या अधिकाऱ्याचा निर्देश केलेला आहे पुराणवाङमयात तर नौकाचे हवे तितके उल्लेख सापडतात वराह पुराणात समुद्रातील रत्नाच्या शोधासाठी सुदूर सचार करणाऱ्या व्यापाऱ्याचा उल्लेख आहे व आंध्र प्रातात ज्याच्यावर नौकाची मुद्रा आहे अशी प्राचीन राजाची नाणीही सापडली आहेत. भोजाने लिहिलेल्या युक्तिकल्पतरू नावाच्या ग्रंथात नौकाचे शास्त्रशुद्ध वर्णन व माहिती सापडते तशी मात्र दुसरीकडे कोठेही सापडत नाही या ग्रथात सर्व मदिर, मध्यमदिर व अग्रमदिर अशा तीन प्रकारच्या नौका सागितलेल्या आहेत सर्वमदिर नौकेला सर्वमदिर म्हणण्याचे कारण असे की तिच्यात भोवताली सर्वत्र राहण्याच्या खोल्या (Cabins) असत. या नौकेतून खजिना, जनावरे व स्त्रिया नेण्याची व्यवस्था असे.

यांचा उपयोग शांततेच्या काळी राजे लोक करीत मध्य मदिर नौकेत राहण्याची जागा केवळ मध्यभागी असे. ही विहारनौका होती व हिचा उपयोग वर्षाकाळात करीत असत अग्रमदिर नौकेत राहण्याची खोली समोर अथवा नौकेच्या वरच्या माथ्यावर असे. अग्रमदिर नौकेचा उपयोग सुदूरच्या व सकटमय जलप्रवासात शाततेच्या काळी करीत असत वस्तुत ही युद्धनौका होती व हिचा उपयोग सागताना युक्तिकल्पतरू ग्रथात म्हटले आहे "चिरप्रवास-यात्राया रणकाले घनात्यये ।" मेगॅस्थेनिसने मौर्याच्या नौदलाचें उत्कृष्ट वर्णन केले असून कौटिल्याने म्हटले आहे – " हिस्त्रिका निर्घातयेद्, अमित्रविषयातिगा पण्यपत्तनचारित्रोपघातिकाश्च ॥" (हिस्त्रिका म्हणजे युद्धनौका व्यापार व नागरी जीवनाला उपद्रव देणाऱ्या शत्रूच्या युद्धनौकाचा नाश करावा ) असो वेदा-मध्ये नौकाचे सपूर्ण वर्णन आढळत नसल्यामुळे तदुत्तर वाङ्मयातील उल्लेख येथे उद्धृत केले आहेत पण वेदात ज्या पद्धतीने युद्धांत जखमी झालेल्याना बाहेर काढण्याचे इत्यादि उल्लेख आढळतात त्यावरून श्री दीक्षितार यानी काढलेले अनुमान विचार करण्या-सारखे आह ते म्हणतात – From this we may conclude that in ancient India, ships were employed in warfare at least as early as the Rigvedic times, though only on a scale which would appear insignificant today, what with U boats and submarines

(या पुराव्यावरून प्राचीन भारतात ऋग्वेदकाळी नौकाचा युद्धात उपयोग करण्यात येत असे असा निर्णय आपण घेऊ शकतों. अर्थातच आजच्या यू बोटी व सबमरीन्सच्या काळाच्या तुलनेनें तो फारसा महत्त्वाचा म्हणता येणार नाही ) तात्पर्य नौदल हे शिस्तबद्ध सेनाग म्हणून होते की नाही हा प्रश्न जरी विवाद्य असला तरी रणात नौकाचा उपयोग करण्याचे ज्ञान वेदकाळीं होते असें मानावयास जागा आहे पाश्चात्य सशोधकानी वेदकाली नौकानयनाचे ज्ञान नव्हते हे आपले अनुमान वेदात मुकाणू, गलबत

टाकावयाचा नागर व मासे खाण्याचे उल्लेख आढळत नाहीत यावर बसविलेले आहे पण याच्या उलट वल्ही व लाटांवर झोके घेण्याचा अनुभव याचा उल्लेख समुद्राची वैदिक लोकांना चागलीच माहिती होती हे सिद्ध करावयास पुरेसे आहेत महा-भारताच्या शातिपर्वात तर सेनाग म्हणूनच नौकेचा निदश आढळतो: लाक्षागृहातून पाडव सुरक्षितपणे बाहेर पडल्यावर विदुराने त्याना नदी तरून जाण्यासाठी जी नौका ठेविली होती तीवर युद्धसामुग्री असल्याचा उल्लेख आहे सभापर्वातील दिग्विजय प्रकरणात महदेवाने समुद्र तरून व अनेक म्लेछाना जिकून समुद्रांतील द्वीपे ताब्यात आणल्याचा उल्लेख आहे वाल्मीकीय रामायणात हनुमान आकाशमार्गाने सचार करीत असता त्याला नौकेची उपमा दिलेली आढळते सुग्रीव सीताशोधासाठी वानराना पाठवावयाच्या वेळी सुमात्रा, जावा इत्यादि बेटे व ताबड्या समुद्राचा उल्लेख करतो दुर्मुख राक्षस रावणाला वानराशी समुद्रातून युद्ध करण्याविषयी आज्ञा मागत असल्याचे वर्णन रामायणात आहे मनुस्मृतीत तर रणनौका व नौकायुद्ध याचे स्पष्ट उल्लेख असून युद्धनौकांच्या नायकाला नौकाकर्माजीव असे नावहि दिलेले आढळते याप्रमाणे वैदिक, धर्मशास्त्रवाङ्मयातील व रामायण महाभारतासारख्या इतिहासग्रथातील उल्लेखाचा नि पक्षपातीपणाने विचार केला तर वदिक राष्ट्राचे नोदल हे सेनाग त्या काळच्या मानाने पुरेसे प्रगत होते असे म्हणता येते

यानतर महत्त्वाचे सेनाग विवाद्य आहे ते म्हणजे विमानाचे होय मध्यतरीच्या काळातील भौतिक सामर्थ्याच्या दृष्टीने आपल्या राष्ट्राचा झालेला ऱ्हास आपल्याला वेदकाळाइतक्या प्राचीन काळी विमाने असू शकतात या गोष्टीवर विश्वास ठेवू देत नाही पण जर नि पक्षपातीपणे विचार केला तर आकाशसचारी याने ऋग्वेदाइतक्या प्राचीन काळी असली पाहिजेत असे मानण्या-इतके पुरावे आढळतात ब्राह्मण ग्रथातून अग्निहोत्रादिक क्रियाच्या वर विमानाची रूपके केलेली आढळतात. प्रत्यक्ष उल्लेख

ऋग्वेदसहितेतील पुढील वर्णनावरून नाकारता येण्यासारखे नाहीत ऋग्वेदाच्या प्रथम मडलातील ११६ व्या सूक्तात म्हटले आहे –

"तुग्रो ह भुज्युम् अश्विना उदमेघे रयि न कश्चित् ममृवाँ अवा हा । तम् ऊहथु नौभिर् आत्मन्वतीभिर् अतरिक्षपृत्भि अपोदकाभि ॥३॥ (हे अश्विहो ! जसा एखादा मृत मनुष्य ऐहिक वैभव सोडून देऊन निघून जातो, त्याप्रमाणे खरोखर त्या तुग्राने भुज्यूला उदकाच्या प्रवाहात टाकून दिले होते पण अतरिक्षातून उड्डाण करणाऱ्या व पाण्यापासून अलिप्त राहणाऱ्या अशा नौके-मध्ये बसवून त्यास तुम्ही सुरक्षित घेऊन आला ) या ठिकाणी असलेले वर्णन विमानाशिवाय दुसऱ्या कशाचेहि असू शकत नाही यानतरच्या पुराणवाङमयात तर विमानाचे विपुल उल्लेख सापडतात श्रीकृष्णाचा विख्यात शत्रु शाल्व याने विमानातूनच द्वारकेवर चढाई केली होती असे वर्णन पुराणवाङमयात आहे असुर मय ह्याचे चार चाकी व बारा हजार गज लाबीचे सोनेरी विमान असल्याचा उल्लेख हरिवशात सापडतो रावण लकेतून आकाशमार्गाने रथाच्या साहाय्याने येई, व त्याच्या त्या रथाचा विध्वस सीताहरणाच्या वेळी जटायूने केला होता असा उल्लेख वाल्मीकि रामायणात आहे हा आकाशसचारी रथ विमाना-शिवाय दुसरा कोणता असू शकेल ? रावणाचे पुष्पक विमान तर प्रसिद्धच आहे या विमानातून रामचद्रानी लकेपासून अयोध्ये-पर्यंत केलेल्या प्रवासाचे महर्षि वाल्मीकीनी केलेले वर्णन अत्यत मनोरम आहे. विमानाचे, त्याच्या महत्त्वाचे व त्याच्या वेगवेगळ्या प्रकाराचे, भोजाच्या समरागणसूत्रधार या ग्रथात उत्कृष्ट वर्णन आढळते व भारतीयाना यत्राची महत्ता किती वाटत होती याचीहि त्या ग्रथावरून पुरेशी खात्री पटण्यासारखी आहे. समरागण सूत्र-धार ग्रथात म्हटले आहे:—

एक बहूनि चलयेत् बहुभिश्चालयते परम् ।
सुश्लिष्टत्वमलक्ष्यत्व यत्राणा परमो गुण. ॥
तथा जात्यानुगाश्चेष्टा विरुद्धा यास्तु जातितः ।
ता: सर्वा अपि सिद्धयन्ति सम्यक्यत्रस्य साधनात् ॥

भूचराणां गतिर्व्योम्नि तथा व्योमचरागमः ।
चेष्टितान्यपि मर्त्यानां तथा भूमिस्पृशामिव ॥
जायन्ते यन्त्रनिर्माणाद् विविधानीप्सितानि च ।
दुष्करं यद्यदन्यच्च तत्तद् यन्त्रात् प्रसिद्धयति ॥
— समरांगण सूत्रधार ३१ ४५-७९

(एक मनुष्य अनेक यंत्रे चालवू शकतो व अनेकांकडूनहि कधीं कधी एक यंत्र चालविण्यात येते. सुश्लिष्टता व गुप्तता हा यंत्राचा सर्वश्रेष्ठ गुण आहे. पदार्थांच्या गुणधर्मानुरूप त्याचे व्यवहार व त्या गुणधर्मांत परिवर्तन घडवून त्याचे उपयोग या सर्व गोष्टी योग्य यन्त्राच्या निर्मितीने सहज साध्य शकतात. भूमीवरच चालू शकणाऱ्या लोकांना आकाशसंचार करता येणे शक्य व आकाश-संचारी पदार्थांना भूमीवर आणणे, मर्त्यांच्या विविध अशा आश्चर्य-कारक चेष्टा या सर्व गोष्टी यंत्राने होऊ शकतात. विविध ईप्सिते यंत्राने पूर्ण होऊ शकतात. जे जे दुष्कर वाटेल ते ते यंत्राने सहज साध्य होते.) या उताऱ्याचे नीट मनन केले तर भारतीय लोक यंत्राविषयी व त्याच्या उपयुक्ततेविषयी अथवा महत्त्वाविषयी अनभिज्ञ होते असे म्हणण्याची निःपक्षपाती माणसाची तरी छाती व्हावयाची नाही. असो. विमानाचे प्रत्यक्ष वर्णन पहा.

'लघुदारुमयं महाविहङ्गं दृढसुश्लिष्टतनुं विहाय तस्य ।
उदरे रसयन्त्रमादधीत ज्वलनाधारमधोऽस्य चाग्निपूर्णम् ॥
तत्रारूढः पुरुषः तस्य पक्षद्वन्द्वोच्चालप्रोज्झितेनानिलेन ।
सुप्तस्यान्तः पारदस्यास्य शक्त्या चित्रं कुर्वन्नम्बरे याति दूरम् ॥
इत्थमेव सुरमन्दिरतुल्यं सञ्चलत्य लघुदारुविमानम् ।
आदधीत विधिना चतुरोऽन्तस्तस्य पारदभृतान् दृढकुम्भान् ॥
अयः कपालाहितमन्दवह्नि प्रतप्ततत्कुम्भभुवा गुणेन ।
व्योम्नोझगित्याभरणत्वमेति संतप्तगर्जद्रसराजशक्त्या ॥
वृत्तसन्धितमथायसयंत्रं तद् विधाय रसपूरितमन्तः ।
उच्चदेशविनिधापिततप्तं सिंहनादमुरजं विदधाति ॥
— समरांगण सूत्रधार ३१. ९५-९९

( वजनात हलक्या असणाऱ्या लाकडाचे, दृढ व सुश्लिष्ट बांधणीचे विमान तयार करून त्याच्या आतल्या भागात पारद-रसाचे यंत्र ठेवावे व त्याला खालून आंच देणारे अग्नीचे यंत्र अग्नि पूर्ण करून ठेवावे या विमानात बसलेला पुरुष, विमानाच्या दोन पंख्यांनी गति उत्पन्न केल्यावर आत असलेल्या पारदरसाच्या शक्तीने सर्वांना आश्चर्यात टाकीत दूर आकाशात संचार करतो. याचप्रमाणे वजनात हलक्या असणाऱ्या काष्ठाचे देवमंदिरासारखे सुन्दर विमान चतुर पुरुषाने शास्त्रशुद्ध पद्धतीने तयार करावे व त्याच्या आत पारदरसाने भरलेले व सुदृढ असे कुंभ ठेवावे लोखंडाच्या कपालाकृति भांड्यात ठेवलेल्या मंदाग्नीने तापलेल्या पारदरसाच्या गुणाने व तापलेल्या व गर्जना करणाऱ्या पारद-रसाच्या शक्तीने ते विमान तळपत आकाशसंचार करू लागते लोखंडी, वेगवेगळे अवयव सांधलेले असे विमान, पारदरसाने परिपूरित करून तो रस व्यवस्थित तप्त केला म्हणजे ते विमान सिंहनादासारखा मोठा आवाज करीत जातें ) प्रश्न असा आहे की ऋग्वेदापासून रामायण महाभारताच्या काळापर्यंत ज्याचे उल्लेख आढळतात व वरीलप्रमाणे ज्याचे शास्त्रशुद्ध वर्णन आढळते त्या विमानाचा व विमानविद्येचा लोप का झाला असावा ? त्याचे कारण समरांगणसूत्रधारातच आढळते येवढे विमानाचे वर्णन व त्याच्या आतील द्रव्याचे वर्णन दिल्यावर समरांगणसूत्रधाराचा कर्ता म्हणतो " यंत्राणां घटना नोक्ता गुप्त्यर्थं नाज्ञतावशात् । तत्र हेतुरयं ज्ञेयो व्यक्ता नैते फलप्रदा ॥ कथितान्यत्र बीजानि यंत्राणां घटना न यत् ॥"

या ठिकाणी विमाने कशी तयार करावी ते लिहिलेले नाहीं. त्याचे कारण या विषयाची अज्ञता हे नसून हे प्रायोगिक ज्ञान गुप्त राखले पाहिजे हे आहे. कारण हे ज्ञान सार्वजनिक करून उपयोग नाही ( उलट ते शत्रूच्या व अन्य अहितकारी लोकांच्या हाती लागून त्याचा वाईट, व आपल्याला अहितकारी उपयोग होण्याचा संभव आहे ) येवढ्याचसाठी येथे केवळ विमानविद्येचे बीज सांगितले. संपूर्ण प्रायोगिक ज्ञानाचें प्रतिपादन केलें नाहीं.)

याच कारणास्तव कौटिलीय अर्थशास्त्रासारखा ग्रथहि प्रचाराच्या क्षेत्रापासून दूर ठेवण्यात आला होता, व म्हणूनच पुष्कळ दिवस त्याचा पत्ता लागला नाही ही विमानविषयक विद्या तर कौटिलीय अर्थशास्त्रापेक्षाही अधिक महत्त्वाची व भयानक आहे अर्थातच त्याची निपज व त्याचा उपयोग आणि त्याच्यातील सुधारणा आजच्या इतकी होती किवा नाही हे सागता येत नाही या बाबतीत असावा इतका विपुल पुरावा मात्र नाही या वेदवाङमयातील प्राचीन भारतीय साहित्यातील विमानाच्या अस्तित्वाच्या पुराव्याचे समालोचन करून श्री रामचद्र दीक्षितार यानी असे उद्गार काढले आहेत की " Still some writers have expressed a doubt and asked " Was that true ? " But evidence in its favour is overwhelming ( तरीही काही लेखक सशय प्रगट करून असे विचारतात की ' हे खरे असेल काय ?' पण या सबधातील अनुकूल पुरावा विपुलतर आहे )'

विमाने सोडली तर आरमाराच्या सेनागाचे महत्त्व शिव-छत्रपतीच्या काळापर्यंत मानले जात होते रामचद्रपताच्या आज्ञा पत्रात म्हटले आहे " आरमार म्हणजे एक स्वतत्र राज्यागच आहे जसे ज्यास अश्वबल तशी त्याची वृद्धि, तद्वतच ज्याच्याजवळ आरमार त्याचा समुद्र "

उत्तम सैन्य कोणतें याचा विचार भारतातील प्राचीन सेना-शास्त्रज्ञानी अतिशय सूक्ष्मपणें केला आहे. त्या विचाराप्रमाणे खडे सैन्य व विशेष अडचणीच्या प्रसगी उभारलेले सैन्य असे सैन्याचे दोन विभाग आहेत. अडचणीच्या प्रसगी उभारलेल्या सैन्यात वैश्य व शूद्रादि समाजातील सर्वच वर्गाचा समावेश होत असला तरी खडे सैन्य मात्र क्षत्रियाचेंच होय कौटिल्याच्या मते शुद्ध क्षत्रियाचे सैन्य हेच सर्वोत्कृष्ट व विश्वसनीय सैन्य होय. जातिवत क्षात्रकुळात जन्म पावलेले, बळकट बांध्याचे, उत्कृष्ट शिस्तबद्ध, रणकर्तव्या-विषयी सतत जागरूक राहण्याच्या झालेल्या सस्कारामुळे घर व घरगुती भावनाना मनात विशेष स्थान न देणारे, सतताभ्यासामुळे

कठिणातल्या कठिण मार्गाने कितीही वेळ न थकता सचलन करू शकणारे, उत्साही, निरनिराळ्या हवामानात टिकाव धरू शकण्याची सवय असलेले, सर्व प्रकारच्या युद्धकलेचा जीवननिष्ठा व कर्तव्य म्हणूनच अभ्यास केलेले, सर्व शस्त्रास्त्रांचा उपयोग करण्याचा सतताभ्यास केलेले, व कर्तव्य म्हणूनच राजसत्तेशी सदैव एकनिष्ठ असलेले व तिच्या अनुशासनात राहणारे अशा लोकांचे सैन्य हेच कौटिल्याच्या मते खरे विश्वासू व म्हणून उत्कृष्ट सैन्य होय इतकेच नव्हे तर वेगवेगळ्या जमातींच्या लोकांच्या संमिश्र सैन्या-पेक्षा जातिवंत क्षत्रियांचे क्वचित् अनुशासनात नसलेले सैन्यहि गुणांच्या दृष्टीने अधिक श्रेष्ठ होय कारण या सैन्याला, असंस्का-रित बाजारबुणग्यापेक्षा कितीतरी लवकर व थोड्याशा प्रयत्नाने पुन्हा अनुशासनात आणता येते. कौटिल्याचे हें मत इतके ठाम आहे की त्याचा ब्राह्मण, वैश्य व शूद्र यांच्या सैन्यावर काडीचाही विश्वास नाही कारण क्षात्रवर्ण या कामासाठीच संस्कारित करण्यात येत होता इतरांची ती संस्कारित जीवननिष्ठा नव्हती कौटिल्याचे हे विचार आजच्या युद्धशास्त्र विशारदानाही असंमत नाहीत. उदाहरणार्थ Clauswitz म्हणतो –

Military virtue is a quality of standing armies only

सैनिकाला आवश्यक तो स्वभावविशेष केवळ सैनिकी पेशा असलेल्या खड्या सैन्यातच उत्पन्न होऊ शकतो येथे स्वाभाविक-पणेच ब्राह्मण जातीतून सैन्यभरती करण्यात येत असे की नाही असा प्रश्न उत्पन्न होईल ब्राह्मणांना सैन्यात मोठ्या अधिकाऱ्यांच्या जागा असत व ते सेनापतिपद विभूषित करतानाही दिसतात. महाभारताच्या इतिहासात द्रोणाचार्य, कृपाचार्य व अश्वत्थामा हे सेनापतिपद विभूषित करताना आढळून येतात कुमारामात्य पृथ्वीसेन हा ब्राह्मण कुमारगुप्ताचा सेनापति होता. महामल्ल या पदवीने अलंकृत असलेला पल्लवनृपति प्रथम नरसिंहवर्मा याचा सेनापति परज्योति हा वर्णाने ब्राह्मणच होता. त्याने द्वितीय पुलकेशिन्वर विजय संपादन करून त्याची राजधानी वातापी जिंकली होती. विजयानगरच्या साम्राज्यातहि पुष्कळच ब्राह्मणवीर

सैन्यात मोठमोठ्या अधिकारावर काम करताना आढळून येतात व महाराष्ट्राने बाळाजी विश्वनाथ पेशव्यापासून तर थोरले माधवराव पेशवे याच्यापर्यंत जी थोर योद्धयांची परपरा निर्माण केली ती ब्राह्मणाची याविषयीची योग्यता सिद्ध करावयास पुरेशी समर्थ आहे धर्मशास्त्राने धर्मसकटात ब्राह्मणांना शस्त्र धारण करावयाची अनुज्ञा देण्यात त्याची ही योग्यता मान्य केलेली आहेच. पण कौटिल्याच्या मते प्रणिपाताने अथवा शत्रूच्या शरणागतीने वश होणे हा ब्राह्मणसैन्याचा संभवनीय दोष आहे असो वैदिक राष्ट्राचे मुख्य सैन्य क्षत्रियाचें होतें. व सकटप्रसगी सर्वच वर्णांतून सैन्य-भरती करीत असत या सैन्याचे पत्ति, सेनामुख, गुल्म, गण, वाहिनी, पृतना, चमू, अनीकिनी व अक्षौहिणी असे सख्येनुसार विभाग असत सर्वांत लहान विभाग पत्ति हा असून सर्वात मोठा विभाग अक्षौहिणी हा होता एक रथ, एक हत्ती, तीन घोडेस्वार, व तीन पदाति मिळून एक पत्ति होत असे तीन पत्ति म्हणजे एक सेनामुख, तीन सेनामुख म्हणजे एक गुल्म, तीन गुल्म म्हणजे एक गण, तीन गण म्हणजे एक वाहिनी, तीन वाहिनी म्हणजे एक पृतना तीन पृतना म्हणजे एक चमू, तीन चमू म्हणजे एक अनीकिनी व अशा दहा अनीकिनी म्हणजे एक अक्षौहिणी असे याचे प्रमाण होते एक अक्षौहिणी म्हणजे २१,८७० रथ, २१८७० हत्ती, ६५,६१० घोडे व १०९,३५० पायदळ असे मनुस्मृतीचे म्हणणें आहे व अशा १८ अक्षौहिणी सैन्याचा महाभारतातील युद्धात सहार झाला होता

याप्रमाणें वैदिक राष्ट्राच्या युद्धसाहित्याचे व सेनागाचे स्वरूप आपण पाहिले आता सेनाविभागाशी संबद्ध अशी महत्त्वाची उपागे व प्रत्यक्ष युद्धपद्धति याचे स्वरूप पाहणे आवश्यक आहे त्याकडे पुढील व्याख्यानात वळू

✦ ✦ ✦

## व्याख्यान सोळावे

# सेनेची विविध उपांगे

युद्धे ही सैन्यापेक्षा वस्तुत बुद्धिमत्तेने व मुत्सद्देगिरीने जिकली जातात असे मुत्सद्दी सैन्याचे मार्गदर्शन करीत नसतील तर समर्थ सत्ताधिशालाही पराभव पत्करावा लागतो. म्हणूनच शुकनीतीत म्हटले आहे —

अनीतिज्ञ समर्थोऽपि रिपुणा परिभूयते ।
गजोऽपि चाम्बुधौ मग्नो महामत्स्यैर्यथा तथा ।।
अनीतिरेव सच्छिद्र राज्ञो नित्य भयावहम् ।
शत्रुसवर्धन प्रोक्त बलऱ्हासकर महत् ।।
अस्ति बुद्धिमता श्रेणिर्न त्वेको बुद्धिमानत ।
देशे काले च पुरुषे नीतियुक्तिमनेकधा ।।
कल्पयन्ति च तद्विद्या दृष्ट्वा रुद्धा तु प्राक्तनाम् ।।

(ज्याप्रमाणे मोठा समर्थ गजेन्द्रही समुद्रात अडकला असता त्याच्या मानाने असमर्थ असलेले मत्स्य त्याचा फडशा पाडतात त्याचप्रमाणे मोठा समर्थ सत्ताधीशही राजनीतीमध्ये अज्ञानी असला तर शत्रूकडून त्याचा पराभव होतो छिद्रे पडलेल्या भांड्याप्रमाणे राजास नीतिविरहित असणे धोक्याचे असून त्याच्या योगाने शत्रूचे सवर्धन होते व त्याची शक्ति व कार्यक्षमता क्षीण होते बुद्धिमान् पुरुष एकएकटे असत नाहीत, तर त्याचे गट असतात स्थळ, काळ आणि परिस्थिति यास अनुसरून एखादे जुने राजनीतीचें तत्त्व निरुपयोगी आहे असे ठरल्यास नीतिशास्त्रपारंगत पुरुष युक्ति आणि नीति याचा आश्रय करून नूतन राजनीतीच्या तत्त्वाची योजना करतात.) अशा राजनीतिज्ञ अथवा मुत्सद्दी लोकाचे एक सैन्याला सहाय्यक असे मत्रिमडळ असे. अलीकडच्या

परिभाषेत त्यालाच War council असे म्हणतात व प्रत्यक्ष सैन्य बळापेक्षाहि या लोकांच्या बुद्धिबळाचाच विजयात खरा भाग असतो याचे महत्त्व विशद करताना महाभारतात भीष्म युधिष्ठिराला म्हणतात की,

वर्तस्व बुद्धिमूलं तु विजयं मनुरब्रवीत् ।
बुद्धिश्रेष्ठानि कर्माणि बाहुमध्यानि भारत ।।

(मनूने असे सांगितले आहे की 'विजय नेहमी बुद्धिमत्तेनेच मिळत असतो कोणतेही कार्य बुद्धीच्या साहाय्यानेच साधते. बाहुबलाचें त्याला होणारे साह्य हे त्या मानाने दुय्यमच समजले पाहिजे हे ओळखून वाग ' वाल्मीकीय रामायणात तर असे म्हटले आहे की –

'त्रिविधा पुरुषा लोके उत्तमाधममध्यमा ।
तेषां तु समवेताना गुणदोषौ वदाम्यहम् ।।
मंत्रिभिर्हितसंयुक्तैः समर्थैर्मंत्रनिर्णयम् ।
मित्रैर्वापि समानार्थैर्बान्धवैरपि वा हितैः ।।
सहितो मंत्रयित्वा य कर्मारम्भान्प्रवर्तयेत् ।
दैवे च कुरुते यत्न तमाहु पुरुषोत्तमम् ।।
एकोर्थं विमृशेदेको धर्मे प्रकुरुते मन ।
एक कार्याणि कुरुते तमाहुर्मध्यम नरम् ।।
गुणदोषावनिश्चित्य त्यक्त्वा धर्मव्यपाश्रयम् ।
करिष्यामीति य कार्यमुपेक्षेत्स नराधम ।।
यथेमे पुरुषा नित्यमुत्तमाधममध्यमा ।
एवं मंत्रा हि विज्ञेया उत्तमाधममध्यमा ।।
ऐकमत्यमुपागम्य शास्त्रदृष्टेन चक्षुषा ।
मंत्रिणो यत्र निरतास्तमाहुर्मंत्रमुत्तमम् ।।
बह्वीरपि मतीर्गत्वा मंत्रिणामर्थनिर्णये ।
पुन मंत्रैकता प्राप्त स मंत्रो मध्यम स्मृत ।।
अन्योन्य मतिमास्थाय यत्र संप्रति भाष्यते ।
नचैकमत्य श्रेयोऽस्ति मंत्र· सोऽधम उच्यते ।।

(वाल्मीकि रामायण युद्धकांड, स ६ श्लोक ६ ते १४)

(जगामध्ये मसलतीच्या बाबतीत उत्तम, मध्यम व अधम अशी तीन प्रकारची पुरुषाची वर्गवारी आहे. त्याचे स्वरूप मी तुला सांगतो. आपल्या हिताविषयी जागरूक, समर्थ असे मंत्री समान हेतु असणारे मित्र अथवा हितबुद्धीचे बांधव याच्याशी पूर्ण विचारविनिमय करून जो कार्यास हात घालतो व तें कार्य सफळ व्हावें म्हणून दैवी प्रयत्नही चालू ठेवतो त्याला पुरुषोत्तम असे म्हणतात एक विचार करतो, दैवी प्रयत्न दुसराच करतो, प्रत्यक्ष कार्यास तिसराच हात घालतो अशी वस्तुस्थिति जेथे असेल त्याला मध्यम पुरुष असे म्हणतात. व कार्याच्या प्रयत्नाच्या गुण-दोषाचा व साफल्य आणि असाफल्य याचा काडीइतकाही विचार न करता दैवी प्रयत्नाच्याकडे संपूर्णपणे पाठ फिरवून केवळ धमक म्हणूनच जो कार्यास हात घालतो त्याला पुरुषाधम असे म्हणतात ज्याप्रमाणे कार्यकर्त्यामध्ये हे उत्तम, मध्यम व अधम असे प्रकार असतात त्याचप्रमाणे मंत्र अथवा मसलतीही उत्तम, मध्यम व अधम अशा तीन प्रकारच्या असतात राजनीतिशास्त्राच्या अध्य-यनाने ज्ञानचक्षू संपूर्णपणे समर्थ बनविलेले मंत्री एकमतानें जेव्हा कार्यविवेकात गढून गेलेले असतात तेव्हा तो मंत्र अथवा ती मसलत सर्वोत्तम होय. कार्याचे धोरण ठरविण्याच्या बाबतीत प्रथम तीव्र मतभेद व वादविवाद होऊन शेवटी जथे एकमत होतें तो मंत्र अथवा ती मसलत मध्यम श्रेणीची होय. जेथे मतभेद होऊन एकाचे दुसऱ्याशी असे आपापसात केवळ वादविवादच होत राहतात व कधीही धोरणासंबंधात एकमत होतच नाही त्याला अधम मंत्र अथवा निकृष्ट मसलत असें म्हणतात. तिच्यातून कोणाचेंच कल्याण होत नाही.) जेथे हा विचारविनिमय व्हाव-याचा त्या युद्धसमितीचा निर्णय नेत्याला अथवा राजाला बंधन-कारकच असे काय, व तसा तो असावा काय हा विचारार्ह प्रश्न आहे. बहुधा तो बंधनकारक असे. पण कधी कधी नेता आपल्या इच्छेनुसारही वागत असे. त्याचे सुपरिणाम व दुष्परिणामही झालेले इतिहासाच्या क्षेत्रांत दिसून येतात. दुर्योधनानें आपल्या

युद्धसमितीचें ऐकले नाही त्यामुळे त्याचा सर्वनाश झाल्याचे जसे उदाहरण आहे त्याचप्रमाणे नेपोलियनने इटालीवरील स्वारीत तो अतिशय तरुण असताना देखील युद्धसमितीवर स्वत.चे निर्णय लादूनही विजयी झाला असेही उदाहरण आहे. त्यामुळे हा एक सर्वसामान्य नियम होता व त्याला अपवादही असत असे म्हणता येईल वैदिक राष्ट्रातील पुरोहित व त्याचे साहाय्यक हे काम करीत असे दिसून येते पुरोहित वसिष्ठाच्या मार्गदर्शनानेच दाशराज्ञ युद्धातील देदीप्यमान विजय राजा सुदासाने संपादन केला असे ऋग्वेदात वर्णन आहे. श्रुतबधु, मेधातिथि, भरद्वाज इत्यादि पुरोहितानी स्वत.च्या मत्रबलाच्या भरवशावर आपापल्या राजसत्ताना घनघोर युद्धात विजय प्राप्त करून दिल्याची ऋग्वेदातील उदाहरणे या उपागाची प्राचीनता दिग्दर्शित करतात **कोश** अथवा खजिना हेही सैन्याचे अत्यत महत्त्वाचे उपाग होय शुक्रनीतीमध्ये कोशाचे महत्त्व सागताना असें म्हटले आहे की ––

> बलमूलो भवेत्कोश कोशमूल बल स्मृतम् ।
> बलसरक्षणात्कोशराष्ट्रवृद्धिररिक्षय ॥१४॥
>
> –(शुक्रनीति अ. ४ प्रकरण २)

सैन्याचे मूळ कोश आणि कोशाचे मूळ सैन्य सैन्याच्या योगाने कोशाची वृद्धि, राज्याची भरभराट व शत्रूचा नाश होतो ) पण शुक्रानी येथे जे सैन्याला विशेष महत्त्व दिले तें कौटिल्याना मान्य नाही त्यानी अर्थशास्त्रात सैन्यापेक्षाही कोश हेच राजसत्तेचे खरे बळ असल्याचे सागून असे प्रतिपादन केले आहे की, "एकाद्या वेळी सैन्य कमी असले तर कोशाच्या भरवशावर नवें सैन्य उभारता येते पण कोशच नसेल तर असलेले समर्थ सैन्य उलटून आपलाच विनाश केल्याविना राहात नाही." कौटिल्याचे हे विचार महाभारतकाराच्या विचाराचा एक प्रकारे अनुवादच होत असे म्हणता येईल महाभारतातील (शान्तिपर्व अ. १३०) पुढील उताऱ्यावरून हे सहज ध्यानात येऊं शकेल. तो उतारा असा:—

राज्ञः कोशबलं मूलं कोशमूलं पुनर्बलम् ।
तन्मूलं सर्वधर्माणां धर्ममूलः पुनः प्रजा ॥३५॥
नान्यानपीडयित्वेह कोशः शक्यः कुतो बलम् ।
तदर्थं पीडयित्वा च दोषं प्राप्तुं न सोऽर्हति ॥३६॥
अकार्यमपि यज्ञार्थं क्रियते यज्ञकर्मसु ।
एतस्मात्कारणाद्राजा न दोषं प्राप्तुमर्हति ॥३७॥

(कोश आणि सैन्य हेच काय ते राजाचे आधारस्तंभ असून कोश हाच सैन्यास मूलभूत आहे सैन्य हे सर्व धर्माच्या प्रवृत्तीस मुख्य आधार असून धर्म हाच प्रजाचा मुख्य आधार आहे. साराश, कोश हाच प्रजेचा मुख्य आधार असल्यामुळे राजाने त्याची अभिवृद्धि केली पाहिजे. इतराना पीडा दिल्यावाचून कोशाचे सपादन होणे अशक्य आहे, मग सैन्य कोठून मिळणार ? यास्तव कोश-सपादनार्थ जरी इतराना पीडा द्यावी लागली तरी ती दोषास्पद होऊ शकणार नाही. यज्ञसिद्धीसाठी यज्ञकर्मात हिंसादि अकार्य करावे लागते त्याप्रमाणेच प्रजापालनाच्या कामी द्रव्यसपादनार्थ पीडा द्यावी लागली म्हणून राजाला दोष लागणे शक्य नाही व म्हणून महाभारतकारानी असा सिद्धान्त सांगितला आहे की,

"राज्ञः कोशक्षयादेव जायते बलसक्षयः"

(कोश क्षीण झाला की राजाचे सैनिक सामर्थ्य क्षीण झालेच म्हणून समजावे. ) सैनिकाचे वेतन व पारितोषिके, सेनाधिकाऱ्याचे वेतन, परसैन्यात पचमस्तभी कारस्थाने करणाऱ्या विभागावर होणारा खर्च, मोडतोड दुरुस्ती व नव्या निर्माणयोजना, सैन्याला आवश्यक त्या साहित्याचे संपादन, शत्रूच्या हालचालीची बित्तबातमी मिळविण्यासाठी ओतावा लागणारा पैसा व शत्रु-प्रदेशात उपद्रव करण्यासाठी करावा लागणारा खर्च या सर्व गोष्टीसाठी कोशसग्रह अपार असणे आवश्यक आहे. कौटिल्याच्या अर्थशास्त्रात सैन्यविभागावर करावा लागणारा खर्च व त्याची वेगवेगळी अगे याचा दिलेला तपशील पाहण्यासारखा आहे. सैनिकाची निष्ठा ढळू नये अशी इच्छा असली तर सैन्याला भरपूर

वेतन व तेही वेळच्या वेळी दिले पाहिजे असे महाभारतातील सभापर्वांतर्गत युधिष्ठिर-नारद सवादात आग्रहपूर्वक सागितलेलें असून कौटिल्यानेही त्याचा जोराचा पुरस्कार केलेला आहे. शुक्रनीती-मध्ये त्याचा तपशील देऊन प्रमाणाचेही स्वरूप सागितलेले आहे. पण या सबधात कौटिल्याने अधिक मुक्तहस्त धोरणाचा पुरस्कार केलेला असून सैन्यविभाग निष्ठावत राखण्यासाठी तें अत्यावश्यक असल्याचे सागितले आहे कौटिल्य व समकालीन ग्रीक लेखक याच्या वर्णनावरून मौर्य चद्रगुप्ताच्या राज्यांत सैन्य-विभागावर किती खर्च होत असेल याची कल्पना देतांना श्री. रामचद्र दीक्षितार् म्हणतात –

The Mouryan king had a standing army of 600,000 foo soldiers, 30,000 horses, and 9,000 elephants. This alone entailed an expenditure roughly of £17,000,000. This does not include the pay of the army officers such as commander–in–chief and commanders The expenses of the fleet, of the armoury and arsenal, of the commissariat and several minor departments which were so many adjuncts to the Defence Department If these were included, we have to estimate the defence expenses of the Mauryan state to be several million pounds sterling Arrian (Indika ch. 12) tells us that the army officials were all paid very liberally. It appears that the Mouryan Government believed in a contented army

(मौर्य राजाच्या जवळ ६ लक्ष पायदळ, ३०,००० घोडदळ, ९००० हत्तीदळ एवढे खडे सैन्य असे हा खर्चच १७,००,००० पौण्ड (सुमारे १६ कोटि रुपये) असे यात सरसेनापति व इतर सेनापति याचा पगार समाविष्ट नाही. आरमार, शस्त्रास्त्रें, व इतर युद्धसाहित्य याचा खर्च वेगळाच असे तसेंच इतर अनेक बारीकसारीक खाती सरक्षण खात्याला जोडलेली असत. पण

त्यावरील खर्चही वेगळाच असे. हा सर्व खर्च एकत्र केला तर म
राजाचा सैन्यावरील एकदर खर्च कित्येक कोटी पौण्ड होई
एरियन (इंडिका प्र १२) याने म्हटले आहे की, सैन्यात
अधिकाऱ्याना भरपूर पगार असे )मौर्य राजनीतीचा सैन्य सत्
ठेवण्यावर कटाक्ष असे. छत्रपति श्रीशिवाजीमहाराजानीही हे त
कटाक्षाने पाळलेले दिसून येते फॉरेन बायॉग्राफीज ऑफ शिवा
या ग्रथात म्हटले आहे –

Sevaji gave them on this account a good salary a
with such a punctuality that on the appearance of the n
moon each one received what had been promised at t
time of enlistment (P. 17) By his people, he was exceeding
loved. Both in matters of reward and punishment, he w
so impartial that while he lived he made no excepti
for any person. No merit was left unrewarded, no offen
went unpunished and this he did with so much care a
attention that he specially charged his Governors to info
him in writing of the conduct of his soldiers intimati
in particular those who had distinguished themselv
and he would at once order their promotions either
rank or pay according to their merits. (p 50)

(शिवाजी आपल्या शिपायाना भरपूर पगार देत असे.
शिपायास सैन्यात दाखल करते वेळी जी रक्कम त्यास देण्य
तो ठरवी, ती नियमितपणे दर प्रतिपदेस तो आपल्या शिपाया
देत असे. शिवाजीच्या सैनिकाचे त्याच्यावर अत्यत प्रेम अ
एखाद्यास शिक्षा करणे अथवा बक्षीस देणे या बाबत
शिवाजी इतका नि.पक्षपाती असे की, त्याने त्याच्या हयातीत
विषयी केव्हाही अपवाद केला नाही. कोणत्याही माणसानें केले
उत्तम कामगिरीबद्दल त्याने त्यास पारितोषिक दिलें नाही
कधीं झाले नाही; अथवा कोणत्याही इसमाने कांही गुन्हा केल्य

त्यास त्यानें शासन केले नाही असेही कधी झाले नाही ही गोष्ट तो विशेष काळजीनें व लक्षपूर्वक करीत असे त्यानें आपल्या हाताखालील सेनाधिपतीस हुकूम दिले होते की त्यानी त्याच्या हाताखालील शिपायाच्या वागणुकीविषयी व विशेषे करून एखाद्या शिपायाने विशेष पराक्रम केला तर त्या विषयीची माहिती आपणास तत्काल द्यावी अशा प्रकारची माहिती त्याला मिळताच तो त्या सैनिकाच्या वेतनाची वा श्रेणीची वाढ तात्काळ करीत असे )पुढे पेशवाईत हे धोरण सुटून सैनिकाचे वेतन थकू लागले व त्याचाच परिणाम नारायणराव पेशव्याच्या हत्येचे षड्यंत्र यशस्वी होण्यात झाला. असो वैदिक राष्ट्रात ऋग्वेदकाळापासून चतुरग सैन्य असल्याचा उल्लेख मागे केलाच आहे. अर्थातच कोश (war finance)व्यवस्था त्या वेळी असलीच पाहिजे कारण त्याचे महत्त्व व्यक्त करणारा उल्लेख ऋग्वेदात पुढीलप्रमाणे आढळतो

एभिर्नृभिरिन्द्र त्वायुभिष्ट्वा मघवद्भिर्मघवन् विश्व आजौ।
द्यावो न द्युम्नैरभि मन्तो अर्य क्षपो मदेम शरदश्च पूर्वी ॥
(ऋ ८-१६-१९)

(हे इन्द्रा! सर्व सग्रामात, धनवान् अशा तुझ्या भक्ताबरोबर द्युप्रदेशाप्रमाणे प्रकाशणारे आम्ही शत्रूचा पराभव करण्याकरिता पुष्कळ रात्री व पुष्कळ वर्षे तुला स्तवू )

आसयतामिन्द्र न स्वस्ति शत्रुतूर्याय बृहतीममृध्राम् ।
यया दासान्यार्याणि वृत्रा करो वज्रिन्त्सुतुक नाहुषाणि ॥
(ऋ ६-२२-१०)

(हे इन्द्रा! तू आम्हाला शत्रुनाशाकरिता पुष्कळ व न सपणारी अशी शाश्वत सपत्ति दे की, ज्या योगाने दास आर्य होतील व मनुष्यसबंधी शत्रू मारले जातील "(हा मत्र असाच्या असाच अथर्ववेदातहि आलेला आहे )

या दोन्ही ऋचात कोश अथवा सपत्तीचा शत्रुनाशाचे साधन म्हणून इतका स्पष्टपणे उल्लेख आहे की कोश या सैन्याच्या उपागाचे महत्त्व ऋग्वेदा इतक्या प्राचीन काळीहि भारतीयानी

ओळखलेलें होतें हे उघड दिसते. रणभूमीकडे जाणाऱ्या सैन्या
बरोबर काय असे याचें पुढील वर्णन पहा त्यात तर कोश
स्पष्टच उल्लेख आहे

इन्द्र आसां नेता बृहस्पति दक्षिणा यज्ञ पुर एतु सोम ।
देव सेनानां अभिऽभजतीना जयन्तीना मरुत यन्तु अग्रम् ।
—(ऋग्वेद १०–१०३–८

(बृहस्पति इन्द्र हाच आमच्या सैन्याचा घरीण असो. ने
बरोबर दक्षिणा (कोश) यज्ञ व सोम हेहि पुढे जावोत. देवां
कार्यासाठी युद्ध करणाऱ्या ज्या सेना असतात त्या शत्रूचा निखा
मोड करून विजयी होनात अशा सेनेच्या आघाडीला मरु
असोत.) धर्मसंरक्षणार्थ भरपूर खजिना बरोबर घेऊन घन
युद्ध करण्यासाठी बाहेर पडलेल्या सैन्याचा हा उल्लेख आ
स्पष्टच आहे

यानतर महत्त्वाचा असा सेनेशी सबधित विभाग म्ह
शस्त्रागार अथवा आयुधागार होय. कौटिल्याने या विभाग
उल्लेख शस्त्रशाला असा केला असून त्याच्या अधिकाऱ्याला श
शालाध्यक्ष अथवा शस्त्राध्यक्ष असे म्हणत त्याच्या हाताख
अनेक काम करणारे लोक असत. शस्त्रास्त्रे तयार करणे
शस्त्रागार अद्ययावत् समृद्ध ठेवणे हे त्याचे काम असे. हा वि
अतिशयच महत्त्वाचा असल्यामुळे त्याच्यावरील अधिकारी नि
वान्, दक्ष व कर्तृत्ववान् असण्याची स्वाभाविकपणेच अपेक्षा अ
प्राचीन शस्त्रास्त्राची माहिती यापूर्वी दिलेली असल्याने
शस्त्रागारात सज्ज असणाऱ्या शस्त्राचा येथे पुनश्च उल्लेख क
ण्याची आवश्यकता नाही शस्त्रागाराचें महत्त्व महाभारता
वर्णन केलेले आहे वेदसहितातून प्रत्यक्ष शस्त्रागाराचा उल
आढळत नसला तरी सहितातील सग्रामगीतातून ज्या पद्धती
शस्त्रास्त्राचा, सचलनाचा व युद्धाचा उल्लेख येतो त्याव
वैदिक राष्ट्रात या उपागाचा अथवा विभागाचा विकास झाल
असला पाहिजे असे मानल्याविना गत्यतर उरत न
सहितोत्तर कालीन वाङ्मयातील उल्लेखांवरून असें दिसतें

शस्त्र निर्मिति हा राजसत्तेच्याकडून चालविला जाणारा विभाग असून व्यक्ति अथवा खाजगी संस्था याना हा व्यवसाय करण्याची बंदी होती.

अलीकडच्या युद्धशास्त्रात परराष्ट्रीय खात्याला अतिशय महत्त्वाचे स्थान आहे या खात्याचा उल्लेख प्राचीन युद्धशास्त्रीय साहित्यात महाभारताचा अपवाद सोडून इतरत्र फारसा आढळत नाही. कौटिल्याच्या अर्थशास्त्रात या विभागाचा उल्लेख आढळतो व मेगॅस्थेनिसचाही त्याला पाठिंबा आहे, पण इतर विभागा-इतका तो विस्तृत नाही. गुप्त काळात मात्र हे खाते असल्याचा स्पष्ट पुरावा आहे देशातील अंतर्गत व्यवस्थेला उत्तरदायी असणारा मंत्री व परराष्ट्रीय खात्याचा मंत्री हे दोन भिन्न मंत्री गुप्तकाळात दिसून येतात. समुद्रगुप्ताच्या शिलालेखात ( १ ) संधिविग्राहिक व (२) सचिव अशा दोन मंत्र्याची नावे येतात. पहिले नाव देशातील अंतर्गत व्यवस्था पाहणाऱ्या मंत्र्याचे आहे; तर दुसरे नाव परराष्ट्र खात्याच्या मंत्र्याचे आहे समुद्रगुप्ताच्या परराष्ट्र मंत्र्याचे नाव हरिसेन असे होते. द्वितीय चंद्रगुप्ताच्या वेळीही हे खाते असल्याचा उल्लेख आढळतो ऋग्वेदामध्ये पणि इत्यादि परकीय शत्रूंचा, नौकानयनाचा इत्यादि उल्लेख आढळतो. पण वेदसंहितावरून एखाद स्वतंत्र परराष्ट्रीय खाते ( Foreign Department )असल्याचे मात्र दिसून येत नाही. राष्ट्र या संज्ञेस पात्र असणारे एकही राष्ट्र त्या काळी अस्तित्वात नसणे हेही एक त्याचें कारण असू शकेल पण कारण कोणतेही असले तरी या खात्याचा उल्लेख वेदसंहितातून व तत्संबद्ध साहित्यातून नाही येवढे खरे

यानंतरचा सैन्याशी संबद्ध असलेला महत्त्वाचा विभाग म्हणजे गुप्तचर विभाग ( Intelligence Department ) होय. यातच प्रणिधि, दूत, गूढ पुरुष इत्यादिकांचा समावेश होतो. या विभागा-कडून वेगवेगळ्या मार्गांनी शत्रुराष्ट्राच्या सामर्थ्याची परिपूर्ण माहिती काढणे, माऱ्याच्या व सैन्यनिवेशाच्या जागा आणि

रणक्षेत्र याची निवड करणे इत्यादि गोष्टी प्राचीनकाळी होत असल्याचे उल्लेख आहेत या खात्याचे मुख्याधिकारी प्रकट स्वरूपात परराष्ट्र वकील असत व ते गुप्तचराचे काम करीत. या खात्याचे अतर्गत विभाग अनेक असून त्याच्यावर मुक्तहस्त खर्च करण्यात येई या विभागाचे महत्त्व इतके मानले आहे की महाभारतामध्ये सैन्याच्या आठ अगापैकी त्याला एक महत्त्वाचें अग मानलेले आहे. हेराच्या माहिती काढण्याच्या विविध मार्गामुळे त्याला विविधोपाय असेही नाव प्राचीन वाङमयातून दिलेलें आहे राजदूताचाही समावेश या विभागातच होत असे. ऋग्वेदातील सरमा–पणि सवाद हे या विभागाच्या वेदकालीन अस्तित्वाचे निर्णायक प्रमाण होय पुढे कूट युद्धपद्धतीवर विवेचन करताना मी या विषयाचा अधिक विस्तार करीन

महत्त्वाच्या सेनागासबधी व त्याच्या उपागासबधी येथवर विवेचन केलेले आहे युद्धशास्त्राच्या दृष्टीने आणखी एक अत्यत महत्त्वाचें उपाग म्हणजे दुर्ग किवा किल्ले होत शुक्रनीतीत दुर्गांचे महत्त्व सागताना असे म्हटले आहे की —

एक शत योधयति दुर्गस्थोऽस्त्रधरो यदि ।
शत दशसहस्त्राणि तस्मात् दुर्गं समाश्रयेत् ।।

—(शुक्रनीति ४–६–१०)

(दुर्गाच्या आश्रयाने एक सशस्त्र मनुष्य शभराशी लढू शकतो. शभर माणसें दहा सहस्त्र लोकाशी लढू शकतात यास्तव राजानें किल्ल्याचा आश्रय करावा ) प्राचीन शास्त्रान राज्याला सप्तांग म्हटलेले असून राज्याची ही सप्तागे पुढीलप्रमाणे सागितलेली आहेत –

स्वाम्यमात्यसुहृत्कोशराष्ट्रदुर्गबलानि च ।
सप्ताग-मुच्यते राज्यं तत्र मूर्धा नृपः स्मृत. ।।

(राजा, अमात्य, मित्र, कोश, राष्ट्र, दुर्ग आणि सैन्य ही राज्याची सात अगे आहेत. त्यात राजा हे मस्तक होय ) या सप्तागात दुर्गाचा समावेश आहे यावरूनच त्याचे महत्त्व किती मानण्यांत

येत असे हे स्पष्ट होते शुक्रनीतीत दुर्गाचे वर्णन पुढीलप्रमाणें आहे. "खड्डे, काटेरी झाडे, खडक आणि ओसाड प्रदेश इत्यादिकांनी ज्याचा मार्ग उमगत नाही व जे खदकाने परिवेष्टित असल्याने प्रवेशास दुर्घट असते अशा स्थलास दुर्ग म्हणावे" शुक्राचे असें प्रतिपादन आहे की पारिख, वन, धन्व, जलदुर्ग, गिरिदुर्ग, सहाय दुर्ग आणि सैन्यदुर्ग असे दुर्गाचे विविध प्रकार असून त्यात सहाय दुर्ग व सैन्यदुर्ग सर्वात श्रेष्ठ होय दुर्गाची रचना कशी असावी याचे विवेचन करताना शुक्र म्हणतात –

यद्यत् सहायपुष्ट तु तत्सर्वं सफल भवेत् ।
परस्परानुकूल्य तु दुर्गाणा विजयप्रदम् ।।

(राज्यातील निरनिराळ्या ठिकाणच्या दुर्गांचा परस्पराशीं सबध जोडून त्याच्या योगाने उत्पन्न होणाऱ्या अनुकूलतेने विजय प्राप्त करावा ) एकमेकाचा सबध राहील अशी दुर्गाची व्यूहात्मक मांडणी करण्यावर येथे जोर दिलेला आहे राजर्षि मनूनेही धनुदुर्ग, महीदुर्ग अब्ददुर्ग, वार्क्षदुर्ग, नृदुर्ग, गिरिदुर्ग असे दुर्गांचे सहा प्रकार सागितलेले आहेत मनूच्या मते पर्वतावरील किल्ल्याचे महत्त्व सर्वांत अधिक आहे

या वेगवेगळ्या दुर्गाचे स्वरूप पुढीलप्रमाणे आहे सभोवार वीस कोसापर्यंत उदकरहित प्रदेशाने युक्त असलेल्या प्रदेशास धनुदुर्ग असे म्हणतात पाषाण अगर विटाच्या भिंतीनी परिवेष्टित अशा भूभागास महीदुर्ग असे नाव आहे अथाग पाण्याच्या विशाल खदकाने परिवेष्टित अथवा स्वाभाविक जलाशयाने परिवेष्टित अशा भूभागास जलदुर्ग असे म्हणतात मोठमोठे वृक्ष, काटेरी झुडुपे, जाळ्या इत्यादिकानी परिवेष्टित असलेल्या भूप्रदेशास वार्क्षदुर्ग, चोहोकडून हत्ती, घोडे, रथ, पदाति यानीं सरक्षित असलेल्या भूप्रदेशास नृदुर्ग, व सभोवार वर चढण्यास मार्ग नसून ज्यास जाण्यास एकच मार्ग आहे अशा पर्वतावरील भूभागास गिरिदुर्ग असे म्हणतात मनूने वर्णन केलेला नृदुर्ग म्हणजेच शुक्राचा सैन्यदुर्ग होय हे स्पष्टच आहे. दुर्गाचे महत्त्व व स्वरूप वर्णन करताना मनु म्हणतात –

सर्वेण तु प्रयत्नेन गिरिदुर्गं समाश्रयेत् ।
एषां हि बाहुगुण्येन गिरिदुर्ग विशिष्यते ॥७१ ॥
यथा दुर्गाश्रितानेतान्नोपहिसति शत्रव ।
तथारयो न हिसति नृप दुर्गसमाश्रितम् ॥ ७३ ॥
एक शत योधयति प्राकारस्थो धनुर्धर ।
शत दशसहस्राणि तस्माद् दुर्ग विधीयते ॥ ७४ ॥
तत्स्यादायुधसपन्न धनधान्येन वाहनै ।
ब्राह्मणै शिल्पिभिर्यंत्रैर्यवसेनोदकेन च ॥ ७५ ॥
तस्य मध्ये सुपर्याप्त कारयेद् गृहमात्मन ।
गुप्तं सर्वर्तुक शुभ्र जलवृक्षसमन्वितम् ॥ ७६ ॥
– ( मनु, अ ७ वा )

( या सर्व दुर्गांमध्ये अनेक गुणानी युक्त असल्यामुळें गिरिदुर्ग अथवा डोगरी किल्ला हाच प्रशस्त व सर्वश्रेष्ठ आहे. यास्तव मोठ्या प्रयत्नाने राजाने गिरिदुर्गाचा आश्रय करावा. दुर्गाचा आश्रय करून राहणाऱ्या मृगादिकाना जसे व्याघ्रादिक शत्रू मारीत नाहीत तद्वत् किल्ल्याचा आश्रय करून राहिलेल्या राजाला शत्रू मारण्याविषयी समर्थ होत नाहीत किल्ल्याच्या प्राकाराच्या आश्रयाने लढणारा एक धनुर्धर बाहेरच्या शभर धनुर्धरांशी युद्ध करू शकतो, व असे शभर धनुर्धर बाहेरच्या दहासहस्र धनुर्धराशी युद्ध करूं शकतात म्हणून दुर्गाचे अनोनात महत्त्व आहे सुवर्णादि धन, खड्गादि आयुधे, सर्व प्रकारचे धान्य, वाहन-युक्त सेना, गजशाळा, अश्वशाळा, ब्राह्मण, लोहार, कारागीर, यत्रें, तृण व जल या साहित्याने दुर्ग सर्वतोपरि परिपूर्ण करावा. शिवाय दुर्गामध्ये श्रीगृह, देवगृह, अग्निशाला, आयुधागार, इत्यादि इमारती बाधून खदक, तटबदी इत्यादिकानी सरक्षित, नानाविध उद्यानानी सुशोभित, श्वेतवर्ण व उदकपरिपूर्ण असे राजगृह राजाने बाधावे ) मनूने गिरिदुर्गाचे जे लक्षण सांगितलेले आहे तसा छत्रपति श्रीशिवाजी महाराजाचा रायगड किल्ला होता, व त्याच्या दुर्गमत्वामुळेंच शिवछत्रपतीनीं त्याला

राजधानी केले होतें. किल्ल्यांचें अथवा दुर्गाचे युद्धशास्त्रातील महत्त्व राजर्षि मनूपासून तर पुण्यश्लोक शिवछत्रपतीपर्यंत सर्व धुरंधर राजनीतिशास्त्रज्ञानी मान्य केलेले आहे. शिवकालीन विख्यात राजनीतिज्ञ रामचंद्रपत अमात्य आपल्या 'आज्ञापत्रांत' दुर्गाचें महत्त्व विशद करताना म्हणतात "सपूर्ण राज्याचें सार ते दुर्ग दुर्ग नसता मोकळा देश परचक्र येताच निराश्रय, प्रजाभग्न होऊन देश उद्वस होतो देश उद्वस झाल्यावरी राज्य असें कोणास म्हणावे ? या करिता पूर्वी जे जे राजे झाले त्याणी आधी देशामध्ये दुर्ग बाधून तो तो देश शाश्वत करून घेतला, आणि आलें परचक्र सकट दुर्गाश्रयी परिहार केले हे राज्य तर तीर्थरूप थोरले कैलासवासी स्वामीनी गडावरूनच निर्माण केले. जो जो देश स्वशासनवश न होय त्या त्या देशी स्थल विशेष पाहून गड बाधिलें, तसेच जलदुर्ग बाधिले, त्यावरून आक्रमण करीत करीत सालेरी अहिवंतापासून कावेरी तीरपर्यंत निष्कंटक राज्य सपादिलें गडकोटाचा आश्रय नसता फौजेच्याने परमुलखी टिकाव धरून राहवत नाही फौजेविरहित परमुलखी प्रवेश होणेंच नाही इतक्याचे कारण ते गडकोटविरहित जे राज्य त्या राज्याची स्थिति म्हणजे अभ्रपटलन्याय आहे. याकरितां ज्यास राज्य पाहिजे त्याणी गडकोट हेच राज्य, गडकोट म्हणजे खजिना, गडकोट म्हणजे राज्याचे मूळ, गडकोट म्हणजे सैन्याचें बळ, गडकोट म्हणजे राज्यलक्ष्मी, गडकोट म्हणजे आपली वसतिस्थळे, गडकोट म्हणजे सुखनिद्रागार, किबहुना गडकोट म्हणजे आपलें प्राणसरक्षण, असे पूर्ण चित्तात आणून, कोणाचे भरवशावर न राहता आहे त्याचें सरक्षण करणे व नूतन बाधण्याचा हव्यास स्वत.च करावा कोणाचा विश्वास मानूं नये."

— ( अमात्याची राजनीति, पृ. २८ )

अमात्याचे हे विवेचन इतकें सुस्पष्ट आहे की त्याला कोणतीही नवी पुस्ती जोडण्याची आवश्यकता नाही शिवछत्रपतीना

युद्धशास्त्राच्या दृष्टीने दुर्गाचे महत्त्व किती पटले होतें याविषयीं शिवदिग्विजयातील पुढील उद्‌बोधक परिच्छेद ध्यानात ठेवण्या-सारखा आहे – " असे असता, किल्ल्याचे हिशेब इमारतीचे आले ते मोरोपत पेशवे व निराजीपत मुजुमदार यानी पाहून, महाराजास विनति करते झाले की, " किल्ल्याचे इमारतीस पैका फार लागतो, व लोकाचाही खर्च फार वाढतो याकरिता विचारे जे करणे असेल ती आज्ञा असावी, म्हणजे ठीक पडेल " हें ऐकून " दौलत आहे, जे करवणे ते समजोनच करीत आहों. आपणास धर्मस्थापना करणे व राज्य सपादणे सर्वास अन्नास लावून, शत्रुप्रवेश न होय, तें किल्ल्यामुळे होते सर्वांचा निर्वाह आणि दिल्लीद्रासारखा शत्रू उरावर आहे, तो आला तरी नवे जुने तीनशे साठ किल्ले हजरीस आहेत. एक एक किल्ला वर्ष वर्ष लढला तरी, तीनशे साठ वर्षं पाहिजेत, मसलत पडेल तेथे कुमक करून, शत्रूस पाहजा दुसरा लाविला असता शेकडो वर्षानी राज्य जाणार नाही दोन रुपये कम जास्त खर्च हा प्रपच नव्हे आदा पाहून खर्च करावा हे राज्यकारभागाचे विचार आप्तकार्याकरिता, कोटयावधि खर्च करून हजारो माणसे उत्तम प्रकारची माखावी आणि केली योजिली गोष्ट सिद्धीस न्यावी राज्यात सावकार हेच जामदारखाना वख्तशीर घेऊन फेड करावी असे आहे तुम्हास किती सागावे? असें सागोन पुढे इमारत चालती करण्याची परवानगी देऊन चालविते जाले " असो कौटिल्याच्या अर्थशास्त्रात किल्ले दुराधर्ष कसे बनवावेत, वरून मारा करण्याच्या अट्टालिका व प्राकार कसे बनवावेत, त्यावर माऱ्याची यत्रे कोणती व कशी असावींत याचें सूक्ष्म व तपशीलवार वर्णन केलेले असून दुर्गांचे पुढीलप्रमाणें आठ प्रकार वर्णन केलेले आहेत.– " अतर्द्वीप स्थल वा, निन्मावरुद्ध-मौदकं, प्रारतर गुहा वा पार्वतं, निरुदकस्तबमिरिणं वा धान्वनं खञ्जनोदकं स्तम्बगहन वा वनदुर्गम् ।। (कौटिल्य अर्थशास्त्र अ. २४) (जलवेष्टित, खदकाने वेष्टिलेले, डोंगरावरील दगडात रचलेले किंवा खोदलेले, निर्जल व निर्वृक्ष अशा दलदलीनें ओसाड प्रदेशांत

वसविलेले किंवा कुसळाचे गवताने वेष्टिलेले, काटेरी झाडानी घेरलेले असे किल्ल्याचे आठ भेद आहेत ) किल्ल्यात प्रगट मार्गाचे बरोबरच गुप्त मार्गही असावे व सभोवतालच्या खदकाच्या पाण्यात विषारी वनस्पति लावाव्या असे कौटिल्याचे म्हणणे आहे शिवतत्त्व रत्नाकरात तर विषहीन सर्प व दुर्गहीन राजा सारखाच आहे असे म्हटले आहे असो प्राचीन राजनीतिशास्त्रज्ञानी वर्णन केलेले हे दुर्गाचे महत्त्व हल्ली युद्धविमानानी सपुष्टात आणलेले आहे पण जेव्हा युद्धविमानाची ही विपुलता नव्हती त्या वैदिक काळांत व अजिबात विमानाचा कल्पनासृष्टीतही सभव नव्हता अशा मध्ययुगीन काळात तर किल्ल्याचे अतोनात महत्त्व होते वैदिक वाङमयात या विभागाचा ठिकठिकाणी उल्लेख आहे. ऋग्वेदात दुर्ग व पुर असे दोन्ही शब्द किल्ला या अर्थी येतात व ऋग्वेदात येणारा दुर्ग हा शब्द नपुसकलिगी येतो. ऋग्वेदात महेद्राने मारलेल्या शम्बर नावाच्या बलाढ्य दैत्याचा उल्लेख येतो. त्याचे शभर गिरिदुर्ग अथवा डोगरी किल्ले होते ते सारे फोडून इन्द्राने त्याला ठार केले

ऋग्वेदात म्हटले आहे – त्व शतानि अव शम्बरस्य पुर जघन्थ अप्रतीनि दस्योः।(ऋग्वेद ६–३१–४)

(हे इन्द्रा तू या धर्महीन शबर राक्षसाच्या शेकडो दुर्भेद्य किल्ल्याचा विध्वस करून टाकलास ) ऐतरेय व कौशीतकि ब्राह्मणातही किल्ल्याचे उल्लेख आहेत या उल्लेखावरून किल्ल्याचे वेदकाळी अस्तित्व तर होतेच पण त्याचे महत्त्वहि वेदकाळातील युद्धशास्त्रज्ञ पुरेपुर ओळखून होते असे निर्विवादपणे म्हणता येते ऐतरेय ब्राह्मणात तीन अग्नीना उद्देशून "यज्ञविनाशास्तव आक्रमण करणाऱ्या असुराच्या आक्रमणाला थोपवून धरण्यासाठी हे तीन किल्ले आहेत" असे म्हटले आहे दुर्गाचा युद्धशास्त्रातील उपयोग चिरपरिचित असल्याविना हे उपमानर्भ विधान कोणी करणार नाही हे स्पष्टच आहे. प्राचीनतम काळात दुर्गाच्या रचनेच्या शास्त्रात भारतीयानी किती उत्कृष्ट प्रगति केली होती हे वाल्मीकीय रामायणातील लकेच्या व किष्किधेच्या दुर्गाचे

तपशीलवार असणारे वर्णन पाहिले तर ध्यानात येईल असो आता आपण सेनाधिकारी व साहाय्यक अधिकारी यांच्याकडे वळू

सैन्य म्हटले की त्याचा सर्वांत वरिष्ठ अधिकारी सेनापति (Commander - in -Chief) होय. त्याची श्रेणि राजाच्या खालोखाल समजण्यात येई. रामायण-भारतातून सेनापतीच्याहून निम्नश्रेणीचे सेनाप्रणेते या नावाचे अधिकारी असलेले आढळून येतात एक अक्षौहिणी सैन्यावरील अधिकाऱ्याला सेनाप्रणेता असे म्हणत व त्याच्यातूनच कोण्या विशेष योग्यतेच्या पुरुषाला संग्रामाच्या स्वरूपाचे महत्त्व ओळखून त्या संग्रामापुरते सेनापति नियुक्त करण्यात येई. कुरुपांडव युद्धाच्या वेळी पांडवांच्या सात अक्षौहिणी सैन्याचे पुढीलप्रमाणे सात सेनाप्रणेते होते – (१) द्रुपद (२) विराट (३) धृष्टद्युम्न (४) शिखंडी (५) सात्यकि (६) चेकितान (७) भीमसेन यांच्यापैकी धृष्टद्युम्नाला पांडवांच्या युद्धसमितीने बऱ्याच विचारविनिमयानंतर सेनापति म्हणून नियुक्त केले. पितामह भीष्मांना सेनापति म्हणून याच पद्धतीने कौरवांनी नियुक्त केले. महाभारतोत्तर वाङमयात मात्र सेनापति या शब्दाचा सैन्यातील सर्वश्रेष्ठ अधिकारी (Commander – in –Chief) हा अर्थ राहिलेला दिसत नाही कौटिल्याने आपल्या अर्थशास्त्रात एका ठिकाणी सेनाप्रणेता अथवा सर सेनापतीच्या हाताखालील अधिकारी या अर्थाने सेनापति या शब्दाचा प्रयोग केला आहे दहा सेनापतींच्या वरच्या अधिकाऱ्याला कौटिल्य नायक असे नाव देतो. येथ सेनापति या शब्दाने सर सेनापतीचा बोध होऊ शकत नाही. उलट वेतनाचे प्रमाण सांगताना तो सेनापतीचे वेतन ४८००० पण तर नायकाचे १२००० पण सांगतो येथे सेनापति म्हणजे सरसेनापतीच होय हे उघड आहे. गुप्त काळातील साहित्यात येवढ्यासाठीच महासेनापति, बलाध्यक्ष इत्यादि वेगळ्या संज्ञा रूढ झालेल्या दिसून यतात. असो. सेनापति नियुक्त करताना तो क्षत्रिय असावा असा सर्वसामान्य संकेत होता. ब्राह्मणांचीही या जागेवर कधी कधी नियुक्ति झाल्याचे आढळतें

शक्य तोंवर वेदविद्या व शस्त्रविद्या या दोहोचेंही त्याच्या ठिकाणं सम्मीलन असावे अशा अपेक्षेने वैश्य व शूद्र याचा निषेध केलेल आढळतो. पण शुक्रानी या सबधान दीर्घदर्शिता प्रकट केली आहे ते म्हणतातः—

सेनाधिपः क्षत्रियस्तु ब्राह्मणस्तदभावत ।
न वैश्यो न च वै शूद्र कातरश्च कदाचन ।।
सेनापति शूर एव योज्य सर्वासु जातिषु ।।

मुख्य सेनापति क्षत्रिय नेमावा. त्याच्या अभावी ब्राह्मण नियुक्त करावा. (बृहद्रथ मौर्याचा सेनापति पुष्यमित्र शुग हा ब्राह्मणच होता) पण वैश्याची, शूद्राची व भेकड माणसाची राजानें य जागेवर कधीहि नियुक्ति करू नये पण वस्तुत सेनापतीचा सबध शौर्याशी असल्यामुळें कोणत्याही जातीच्या शूर पुरुषाची य जागेवर नियुक्ति करावयास हरकत नाही सेनापति हा दडनीती मध्ये प्रवीण असून उत्साह, धैर्य, शौर्य, औदार्य, हृदयाची विशालता रणकुशल व सैनिकाचे हृदय जिकून घेणारा असावा असे कामदकीय नीतिशास्त्रात सागितले असून सेनापतित्वाचा अभिषेक झाल्यावर भीष्मानी दुर्योधनाशी जे भाषण केले आहे त्यात सेनापतीच्या विशेषाचे यथार्थ चित्रण पहावयास सापडतें ते म्हणतात —

"नमस्कृत्य कुमाराय सेनान्ये शक्तिपाणये।
अह सेनापतिस्तेऽद्य भविष्यामि न सशयः ।।
सेनाकर्मण्याभिज्ञोऽस्मि व्यूहेषु विविधेषु च।
कर्म कारयितु चैव भृतानप्यभृतास्तथा ।।
यात्रायाने च युद्धे च तथा प्रशमनेषु च।
भृश वेद महाराज यथा वेद बृहस्पतिः ।
व्यूहानां च समारभान् देवगन्धर्वमानुषान् ।
तैरह मोहमिष्यामि पाण्डवान् व्येतु ते ज्वरः ।।
सोह योत्स्यामि तत्त्वेन पालयस्तव वाहिनीम् ।
यथावत् शास्त्रतो राजन् व्येतु ते मानसो ज्वरः ।।

—(महाभारत उद्योगपर्व अ. १६५ श्लो. ७ ते ११)

(देवसेनापति कार्तिकेयाला वंदन करून माझ्यावर तू सोप-विलेले हे सेनापतित्वाचे दायित्व मी आनंदाने स्वीकारतो मी युद्ध-शास्त्र, युद्धकला व सैन्यरचनेचे विविध प्रकार यांत अत्यंत प्रवीण असून खडे व वेळेवर उभारलेले सैन्य आणि सैनिकांच्या विविध निम्नोत्तम श्रेणी यांच्याकडून कोणते व कसे काम घ्यावे यांत अभिज्ञ आहे रणक्षेत्रावरील हालचाली, प्रचलनपद्धति, युद्धमाघार, हूल दाखविणे इत्यादि सर्व रणकार्यांत मी साक्षात् बृहस्पतीशी तुल्य आहे दैव, गान्धर्व व मानुष अशा सैन्यांच्या व्यूह-रचनेत व त्यांच्या उपयोगांत मी अत्यंत प्रवीण असून त्या प्रावीण्याचा मी पाण्डवांविरुद्ध संपूर्णपणे उपयोग करीन शत्रूशी युद्ध करून मी तुझ्या सैन्याचे संरक्षण करीन मनातली सगळी भीति काढून टाक.) युद्धातील विजय व पराजय सर्वस्वी सेना-पतीवर अवलंबून असल्यामुळे व प्रत्येक गोष्टीच्या संबंधात तो राजा व युद्धसमिति यांना उत्तरदायी असल्यामुळे त्याचे दायित्व फार मोठे होते युद्धातील महत्त्वाच्या वीर कृत्याविषयी भरपूर पारितोषिके तात्काळ देऊन त्याला सर्व सेनाधिकाऱ्यांना व सैनिकांना प्रसन्न ठेवावे लागे या पारितोषिकाचे प्रमाण कौटिल्याने पुढीलप्रमाणे दिले आहे --

"शतसाहस्रो राजवधः। पञ्चाशत् साहस्र सेनापतिकुमार-वधः। दशसाहस्र प्रवीरमुख्यवध । पञ्चसाहस्रो हस्तिरथवधः। साहस्रोऽश्ववध । शत पत्तिमुख्यवध । शिरो विंशतिकम् । भोग-द्वैगुण्य स्वयंग्राहश्च ॥" (जो योद्धा युद्धात शत्रुराजाचा वध करील त्याला एक लक्ष पण पारितोषिक द्यावे जो शत्रुसेनापति अथवा युवराज यांचा वध करील त्याला पन्नास सहस्र पणांचे पारितोषिक द्यावे इतर प्रमुख शूर अधिकाऱ्यांचा जो वध करील त्याला दहा सहस्र पण द्यावे गजदळाच्या योद्ध्याचा वा अश्वदळाच्या अधिकाऱ्याचा वध करणाऱ्यास पाच सहस्र पण द्यावे. पदाति-दळाच्या अधिकाऱ्याचा वध करणाऱ्यास शभर पण द्यावे. योद्ध्याचे मस्तक आणून देणाऱ्यास वीस पण द्यावे व अधिकाऱ्याला जीवंत

पकडून आणणाऱ्यास दुप्पट वेतनवाढ करावी ) **पण** हे मौर्य-कालीन प्राचीन नाणे असून त्याचे मूल्य आजच्या शिलिंगाइतके असावे असे पाश्चात्य संशोधकाचे म्हणणे आहे. महाभारतातील शांतिपर्वातहि अशाच धर्तीची पारितोषिके देऊन सैन्याचा रणोत्साह वाढवावा असे सूचित केले आहे **सेनापति** हे राज्यकर्त्या मंडळातील निश्चित असे पद होते याचा उल्लेख मागे केलाच आहे ऋग्वेदामध्ये सेनापति असा शब्द आलेला नाही. पण त्याच अर्थाचा **सेनानी** हा शब्द आलेला आहे. यजुर्वेदसंहितेतील शतरुद्रीय प्रकरण व ब्राह्मणग्रंथ यातही हा शब्द आलेला आहे ऐतरेय ब्राह्मणात मात्र सेनापति असाच शब्द आलेला आहे. वेद-कालीन राजाच्या रत्निमंडळात त्याचा निर्देश असल्यामुळे त्याचे महत्त्व स्पष्टच होते सेनापति अथवा सर सेनापतीनंतर कुमार म्हणजे युवराज, मन्त्रि अथवा संधिविग्रहिक आणि राजा व पुरोहित यांनी युद्धसमिति पूर्ण होत असे यातील सचिव म्हणजे राजदूत अथवा वकील असून त्याला पुढे राज्यशास्त्रात संधि-विग्रहिक अथवा महासंधिविग्रहिक अशी यथार्थ संज्ञा प्राप्त झाली शुक्रनीतीत दूताचे लक्षण पुढीलप्रमाणे सांगितले आहे –

इंगिताकारचेष्टज्ञ स्मृतिमान् देशकालवित् ।
षाड्गुण्यमंत्रविद् वाग्मी वीतभीर्दूत इष्यते ।।८७।।

– (शुक्रनीति अ. २)

( माणसाच्या अंत करणाचा ठाव घेणारा, त्याची चर्या व हालचाल याची बरोबर पारख करणारा, स्मृतिशक्ति तेजस्वी असलेला, देश व काल यांनी निर्माण झालेली परिस्थिति, व संधि-विग्रहादि षड्गुण जाणणारा, निर्भय, बोलण्यात चतुर असा राजदूत अथवा वकील म्हणजे सचिव असावा.) महाभारतात राजदूताविषयी म्हटले आहे –

कुलीन कुलसंपन्नो वाग्मी दक्ष. प्रियंवदः ।
यथोक्तवादी स्मृतिमान्दूत स्यात्सप्तभिर्गुणै. ।।

–(महाभारत, शान्तिपर्व अ. ८५ श्लो. २८)

(कुलीनत्व, संततिसंपन्नता, भाषणचातुर्य, दक्षता, प्रियभाषित्व, स्मरणयुक्तता आणि जे सांगितले असेल तेच बोलणे हे सात गुण राजदूताच्या अंगी असले पाहिजेत ) राजदूताचें अथवा सचिवाचें महत्त्व विशद करताना राजर्षि मनूने केलेले विवेचन त्याच्या महत्त्वावर यथार्थ प्रकाश पाडणारे आहे ते असे –

दूतं चैव प्रकुर्वीत सर्वशास्त्रविशारदम् ।
इंगिताकारचेष्टज्ञं शुचिं दक्षं कुलोद्गतम् ॥६३
अनुरक्तः शुचिर्दक्षः स्मृतिमान् देशकालवित् ।
वपुष्मान्वीतभीर्वाग्मी दूतो राज्ञः प्रशस्यते ॥६४
दूत एव हि संधत्ते भिनत्त्येव च संहतान् ।
दूतस्तत्कुरुते कर्म भिद्यन्ते येन वा न वा ॥६६
स विद्यादस्य कृत्येषु निगूढेङ्गितचेष्टितैः ।
आकारमिङ्गितं चेष्टां भृत्येषु च चिकीर्षितम् ॥६७
बुध्वा च सर्वं तत्त्वेन परराजचिकीर्षितम् ।
तथा प्रयत्नमातिष्ठेद्यथात्मानं न पीडयत् ॥६८

(दूत जो करावयाचा तो दृष्टार्थ व अदृष्टार्थ शास्त्रास जाणणारा, वचन, स्वर, इत्यादीवरून हृदयातील रहस्य सहजपणे ओळखणारा, इंगितास जाणणारा, प्रीति व अप्रीति यास सुचविणाऱ्या मुखप्रसाद, मुखाचा विपर्यय, इत्यादि आकारास ओळखणारा, कोप, भीति इत्यादिकाच्या सूचक क्रियाचे तत्त्व समजणारा, द्रव्य, स्त्री इत्यादि व्यसनानी रहित व त्याच्या मोहात कधीही न फसण्याइतक्या मनोधैर्याचा, चतुर व कुलीन पाहून करावा लोकावर प्रेम करणारा, द्रव्यशुद्धि व स्त्रीशुद्धि यानी युक्त, चतुर, निरोप अथवा सांगितलेला संदेश न विसरणारा, देश-काल पाहून तदनुसार कार्य करणारा, सुस्वरूप व व्यक्तित्वसंपन्न, निर्भय व वक्तृत्वगुणसंपन्न असा राजदूत असला पाहिजे. हत्ती, अश्व, रथ, पदाति इत्यादि चतुरंग सेनारूप दंड सेनापतीच्या अधीन असतो विनय अथवा अनुशासनरूप क्रिया दण्डाच्या अधीन असते. कोश व राष्ट्र ही राजाच्या अधीन असतात आणि संधि व विग्रह ही दूताच्या अधीन असतात

कारण दूतच शत्रू झालेल्या राजाचा सधि व सधियुक्त राजांचा विग्रह करण्यास पूर्णपणे समर्थ असतो सारांश परराष्ट्रामध्ये सधि होणे किंवा विग्रह करणे यातील कोणतेही कर्म दूत करू शकतो दूताने शत्रुपक्षीय राजाच्या कर्तव्यातील आकार, इगित व चेष्टा जाणावी फार काय पण शत्रुपक्षीय राजाचे जे गुप्त रीतीने फिरणारे दूत असतील त्याचे आकार, इगित, व चेष्टा यावरून क्षुब्ध झालेल्या व लुब्ध व अपमान पावलेल्या सेवकाविषयी राजाने काय करावयाचे मनात आणले आहे, ते जाणावे सारांश, अशा दूताच्या द्वारा प्रतिस्पर्धी राजाचा मनोरथ सपूर्णपणे तत्त्वत जाणून तो आपणास पीडा देणार नाही अशी दक्षता ठेवावी )

विख्यात राज्यशास्त्रज्ञ कौटिल्य याने आपल्या अर्थशास्त्रातील १६ व्या अध्यायात दूताच्या उपरिनिर्दिष्ट लक्षणाशिवाय शत्रूच्या सत्काराने फुगून न जाणारा, शत्रूच्या सामर्थ्याने भेदरून न जाणारा व न आवडणारे बोलणे सहन करण्याची शक्ति असलेला, असे तीन विशेष गुण सागितलेले असून त्याच्या कार्याचे विवरण पुढीलप्रमाणे केले आहे – (१) शत्रुप्रदेशातील प्रमुख अधिकाऱ्याशी मैत्री जोडणे, (२) युद्धाचा प्रसग उद्भवल्यास शत्रूच्या सैन्याच्या उपनिवेशाची जागा, त्याचप्रमाणे युद्ध करण्यास योग्य भूमि व आश्रयाची स्थाने याची सूक्ष्म माहिती मिळविणे व या सर्व गोष्टीचा स्वपक्षाला व शत्रुपक्षाला कितपत उपयोग अथवा दुरुपयोग होईल याचे यथार्थ अनुमान करणे, (३) शत्रुप्रदेशातील दुर्ग, मूल्यवान पदार्थ सुरक्षित ठेवण्याची स्थाने व शत्रूची मर्मस्थाने याची माहिती मिळविणे, (४) शत्रुराजावर प्रजेचे प्रेम किती आहे, प्रजेच्या ठिकाणी कोणकोणते दोष आहेत याचा शोध करणे व त्यासाठी जागजागी गुप्तचर पेरणे, शत्रुपक्षीय हेराला लाच देऊन वश करून घेणे व त्याच्याकडून अत स्थ माहिती काढणे, (५) आपल्या राज्याच्या बलाबलाविषयी शत्रुराज्यात माहिती मिळू शकणार नाही याविषयी दक्षता बाळगणे, (६) शत्रूच्या प्रजेत फितुरी माजविणे राजदूताच्या कामाचे स्वरूप याप्रमाणे दिग्दर्शित

केल्यावर कौटिल्य म्हणतो, "शत्रुराजाबरोबर दूताने बोलणे केल्यावर जर त्याच्याकडून होकारार्थी अगर नकारार्थी काहीच उत्तर मिळाले नाही व दूतास आपल्या राष्ट्रात जाण्यास शत्रुराजाने रजा दिली नाही तर आपल्या राजावर सकट येणार असे समजून आपल्या राजास युद्धाची तयारी करण्याची सवड मिळावी म्हणून शत्रुराजाबरोबरचे बोलणे कालहरण करण्याकरिता लाबवावे व शत्रूस न कळत निघून जावे अथवा निघून जाण्यासाठी अनुकूल सधीची वाट पहावी निरोप पोहोचविणे, तहाचे पालन करणे, शत्रूला त्रास देणे, मित्र मिळविणे व राखणे, फितूर करणे, शत्रूच्या मित्रात भाडणे लावणे, गुप्तसैन्याचा नाश करणे, आप्ताजवळच्या राज्याचा अपहार करणे, हेर शोधून काढणे, पराक्रम दाखविणे, शाततेचा भग करणे, ओलीस ठेवलेल्याची सुटका करणे, करविणे, आणि जारण-मारणादि अनुष्ठाने करविणे, ही दूताची कामे होत आपल्या दूताकडून ही कामे करवावीत आणि प्रतिदूताची योजना करून आणि दृश्य व अदृश्य रक्षक नेमून शत्रूच्या दूतापासून स्वकीय दूताचे सरक्षण करावे " हल्लीच्या आतरराष्ट्रीय निर्बंधाप्रमाणे दोन राष्ट्रात युद्ध घोषित केले जाताच दोन्ही राष्ट्राच्या दूताच्या जीविताच्या सुरक्षिततेचे दायित्त्व त्या राष्ट्रावर असतें हे तत्त्व मान्य केलेले आहे त्याचप्रमाणे कोणत्याही राष्ट्राने त्याच्या राजसभेत असणाऱ्या परराष्ट्राच्या दूतास सन्मानाने वागविले पाहिजे व त्याचा अपमान करू नये असाही सर्वसमत आतरराष्ट्रीय निर्बंध आहे हा निर्बंध अतिप्राचीन काळापासून भारतीय राज्यशास्त्रज्ञानी पुरस्कारिलेला असून महाभारतात म्हटले आहे.—

> न तु हन्यान्नृपो जातु दूत कस्याचिदापदि ।
> दूतस्य हता निरयमाविशेत्सचिवै सह ॥२६॥
> यथोक्तवादिन दूत क्षत्रधर्मरतो नृप. ।
> यो हन्यात्पितरस्तस्य भ्रूणहत्यामवाप्नुयु ॥२७॥

**(कोणत्याही प्रकारचें सकट आले तर राजानें दूताचा वध करू नये. दूताचा वध करणाऱ्या राजाला अमात्यासह नरकप्रवेश करावा**

लागतो. आपल्या स्वामीचा सदेश निर्भयपणे जसाच्या तसा सागणाऱ्या दूताला जो राजा ठार मारतो त्याच्या पितराना भ्रूणहत्येचे पातक लागते ) तात्पर्य, आजच्या आतरराष्ट्रीय निबंधातील या महनीय नीतितत्त्वाची देणगी भारतानेच पाश्चात्यांना दिलेली आहे वेदवाङमयात प्राचीनतम ऋग्वेदातही या दूताचे अथवा सधिविग्रहिकाचे उल्लेख आहेत ऐतरेय ब्राह्मणात सचिवाचा उल्लेख असून (ऐ ब्रा ३–२०) इद्राने तो मरुताना उद्देशून केलेला आहे प्रत्यक्ष सहितावाङमयात सचिव शब्द नसला तरी समानार्थक उल्लेख आहेतच उदाहरणार्थ, देवाचा कार्यसाधक दूत म्हणून अग्नीचा ऋग्वेदातील उल्लेख पाहा :—

अग्नि दूत वृणीमहे होतार विश्ववेदसम् ।
अस्य यज्ञस्य सुक्रतुम् ॥

–(ऋग्वेद १–१२–१)

(दिव्य विबुधाचा कार्यसाधक, त्याना हविर्भाग पोहोचविणारा, सर्वज्ञ असा देवाचा दूत जो अग्नि त्याच्या आगमनाची आम्ही प्रतीक्षा करीत आहो आमच्या यज्ञातील खरे सामर्थ्य अग्नि हेच होय या ठिकाणी दूताच्या गुणाचे ध्वनिगर्भ वर्णन स्पष्टच आहे तैत्तिरीय व अथर्ववेद सहितात 'प्रहित' हा शब्द आलेला असून त्याचा परसैन्यवृत्तान्तज्ञापनकुशल असाच अर्थ भाष्यकारानी केला आहे

सेनेच्या तुकडीतील सैनिकाच्या संख्येवरून यानतरच्या सेनाधिकाऱ्याची नावे पडलेली आहेत पाच किवा सहा पदातीवरील अधिकाऱ्याला पत्तिपाल, ३० पदातीवरील अधिकाऱ्याला गौल्मिक, १०० पदातीवरील अधिकाऱ्याला शतानीक अथवा आनुशतिक, १०० च्या तुकडीवरील अधिकाऱ्याला सहस्रानीक व दहा सहस्रावरील अधिकाऱ्याला अयुतानीक अशीही नावे आहेत. याच पद्धतीचा आविष्कार अथर्ववेदात झालला आढळून येतो तो असा :–

अर्बुदिर्नाम यो देव ईशानश्च न्यर्बुदि. ।
याभ्यामतरिक्षमावृतमिय च पृथिवी मही ।
ताभ्यामिन्द्र मेदिभ्यामह जितमन्वेमि सेनया ॥४॥

– (अथर्ववेद काड ११ सू. ९ म. १८)

(जो अर्बुदी नावाचा सेनापति आहे व जो न्यर्बुदी नावाचा सेनापति आहे, ज्यानी हे अन्तरिक्ष व पृथिवी व्यापून टाकलेली आहे व त्या इन्द्र व मेदीच्या द्वारे शत्रूवर विजय मिळविलेला आहे. त्याच्या मागून मी आता जातो )

अर्बुद सेनेच्या अधिपतीला अर्बुदी व त्याच्या खालोखाल असणाऱ्या सेनेच्या अधिपतीला न्यर्बुदी असे येथें म्हटलेले आहे. ही नावे सख्येवरून पडलेली आहेत हे उघड आहे मात्र ही अधिकाऱ्याची नावे केवळ पदातीसारख्या एकाच प्रकारच्या सैन्य विभागाच्या सख्येवरून पडलेली नाहीत तर मागे जे पत्ति, वाहिनी इत्यादि चतुरग दलाच्या प्रमाणबद्ध तुकड्याचे वर्णन केले आहे त्याअनुसार ती देण्यात आलेली आहेत. जसे पत्तिपाल म्हणजे एक गज, एक रथ, एक अश्व व पाच पदाति यावरील अधिकारी होय तसेच गौल्मिक म्हणजे ४५ पदाति, २७ अश्वस्वार, ९ गज व ९ रथ याप्रमाणे ९० योद्ध्यावरील अधिकारी होय. वाहिनीपति म्हणजे ८१ गज, ८१ रथ, २४३ अश्वस्वार, ४०५ पदाति यावरील अधिकारी होय चमूपति म्हणजे ७२९ रथी, ७२९ गज, २१८७ अश्वस्वार व ३६४५ पदाति यावरील अधिकारी होय. या क्रमानेच अक्षौहिणीपति हाहि अधिकारी असे कौटिल्याने या सेनाधिकाऱ्याच्या वेतनाचे प्रमाण पुढीलप्रमाणे दिले आहे :—सरसेनापति ४८००० पण, सेनापति २४००० पण, गजदलाध्यक्ष ८००० पण, अश्वदलाध्यक्ष ८००० पण, रथदलाध्यक्ष ८००० पण, पदात्यध्यक्ष ८००० पण, चतुरगदलाची व्यवस्था पाहणारे अधिकारी प्रत्येकी २००० पण, सारथी २००० पण, सैन्यातील शल्यवैद्य २००० पण, अश्वशिक्षक २००० पण, शिबिरे तयार करणारा शिल्पज्ञ २००० पण, अन्य गजादिकांचे शिक्षक २००० पण, पदाति ५०० पण, माहूत ५०० ते १००० पण

वेदसहिता हे काही अर्थशास्त्रासारखे पद्धतशीर ग्रथ नव्हेत. पण ज्या अर्थी चतुरग दलाचे व साठ साठ सहस्र शत्रुसैन्य कापून काढल्याचे उल्लेख प्रत्यक्ष ऋग्वेदसहितेतच आढळतात त्या अर्थी

विशिष्ट प्रमाणांत ही रचना व वेतनाचें मान त्या काळी असलेंच पाहिजे हे उघड आहे प्रत्यक्ष युद्धात भाग न घेणारा पण युद्ध-स्थली जाऊन उत्साहवर्धक भाषण करणारा व सैनिकाना आपल्या वाणीच्या प्रयोगाने देहभान विसरावयास लावणारा आणखी एक महत्त्वाचा अधिकारी असे तो म्हणजे पुरोहित होय कौटिल्याने असे म्हटले आहे की, युद्धाची यज्ञाशी तुलना करून सैनिकाच्यात पुरोहिताने आवेश उत्पन्न करावा ऋग्वेदकाळातील वैदिक राष्ट्राचा पुरोहित आपल्या योद्धयाना आवाहन करीत प्रेरणा देई –

प्रेता जयता नर इन्द्रो व शर्म यच्छतु ।
उग्रा व सन्तु बाहवोऽनाधृष्या यथासथ ॥

–(ऋग्वेद १०. १०३ १३)

(हे शूर वीरहो, शत्रुसैन्यात आता जोराने घुसा! आणि मोठा पराक्रम गाजवून विजय मिळवा! इन्द्र तुम्हाला वीरोत्साह देईल! तुमचे पराक्रमशाली बाहू आता रणात चागला प्रभाव गाजवोत अर्थात् तुम्ही शत्रूना दाद न देता अजिक्य होऊन रहाल )

याप्रमाणे आपण आयुधे, सेना, सेनागे व अधिकारी याचा जो मागोवा घेतला त्यावरून तत्कालीन जगतात वैदिक राष्ट्राचा सेना-विभाग परिपूर्ण व सर्वोत्कृष्ट होता असे आढळून येईल तो तसा होता म्हणूनच ऋग्वेदातील सग्रामगीतातील विजयी जयगर्जना-पासून तर समुद्रगुप्ताच्या दिग्विजयी वीरगर्जितापर्यंतच्या काल-खडात भारतीय राष्ट्राने विश्वाचे दिक्कोन दुमदुमविले पण वैदिक राष्ट्राचे हे देदीप्यमान सामर्थ्य विश्वाला पददलित करण्यासाठी होतें काय? पुढील व्याख्यानात आपण त्याकडे वळू



## व्याख्यान सतरावे

## रणनीति व डावपेच

प्राचीन भारतीय युद्धशास्त्रज्ञानी युद्धाचे (१) धर्मयुद्ध व (२) कूटयुद्ध असे दोन प्रकारचे वर्गीकरण केलेले आहे. ते अर्थातच नैतिक व धार्मिक दृष्टिकोनातून केलेले आहे देव, आसुर व मानुष असेही युद्धाचे त्रिविध वर्गीकरण आढळते युद्धात मिळ-णाऱ्या विजयावरून व त्या विजयानंतरच्या जेत्याच्या वागणुकी-वरून (१) धर्मविजय, (२) आसुर विजय, व (३) लोभ-विजय असेही वर्गीकरण केलेले आढळून येतें. या सर्व प्रकारच्या युद्धात स्ट्रॅटेजी व टॅक्टिक्स याचा वापर करावाच लागतो या दोन अतिशय रूढ असलेल्या शब्दाच्या अर्थांत इतका सूक्ष्म व श्लेषपूर्ण भेद आहे की त्या दोन वेगळ्या गोष्टी मानण्याचे तसे कारण नाही ब्रिटिश पायदळाच्या अभ्यासक्रमाच्या पुस्तकातून या शब्दाची फोड पुढीलप्रमाणे केलेली आहे :---

Strategy is the art of bringing the enemy to battle, while tactics are the methods by which a commander endeavours to over-reach the enemy when battle is joined.

(शत्रूला प्रत्यक्ष युद्धासाठी रणक्षेत्रावर खेचून आणण्याच्या कलेला स्ट्रॅटेजी असें म्हणतात व प्रत्यक्ष युद्ध सुरू झाल्यावर शत्रूवर मात करण्यासाठी सेनापति जे डावपेच करतो त्याला टॅक्टिक्स असे म्हणतात ) राजर्षि मनूने याहून वेगळे असें रण-क्षेत्रानुसार युद्धाचे पुढीलप्रमाणे वर्गीकरण केले आहे :—

स्यदनाश्वैः समे युद्धचेदनूपे नौद्विपैस्तथा ।
वृक्षगुल्मावृते चापैरसिचर्मायुधै स्थले ॥

-- (मनुस्मृति ७-१९२)

सम भूमीवर रथ व अश्वदळानें, पाण्यात नौका व हत्तीच्या द्वारे, वृक्ष व दाट झाडी असलेल्या अरण्यात धनुष्याच्या साधनाने व काटे, पाषाण इत्यादि नसलेल्या (कुरुक्षेत्रासारख्या) रणक्षेत्रावर ढाल तरवार इत्यादि आयुधानी युद्ध करावें ) येथें अप्रत्यक्षपणे भूमियुद्ध, जल अथवा सागर युद्ध, अरण्ययुद्ध इत्यादि युद्धभेद ध्वनित केले आहेत आपण या सर्व प्रकारच्या युद्धातील स्टॅटेजो व टॅक्टिक्सचे स्वरूप व तत्त्वे याचे सक्षेपाने निरीक्षण करू.

स्ट्रॅटेजीतील पहिले महत्त्वाचे तत्व म्हणजे सेनेचें सचलन होय. (१) मदगति व (२) शीघ्रगति हे संचलनाचे दोन प्रधान प्रकार आहेत. ज्या वेळी स्वत ची परिपूर्ण सिद्धता झालेली नसेल अथवा शत्रुपक्षाशी वाटाघाटी चालू असतील, त्यावेळी आक्रमण करावयास निघालेला सेनापति मंदगति सचलनाचा आश्रय घेतो असे नसले तर शीघ्रगति सचलन अवलविण्यात येतें कारण युद्धात कालाचे महत्त्व अनन्यसामान्य आहे लाबच्या सचलनासाठीं मार्गशीर्ष महिना निवडीत व कमी अतराच्या सचलनास्तव चैत्र महिना निवडीत असे प्राचीन साहित्यावरून दिसते पण राजर्षि मनूने अपवादही पुढीलप्रमाणे सागितला आहे —

मार्गशीर्षे शुभे मासि यायाद्यात्रा महीपति ।
फाल्गुनं वाथ चैत्र वा मासौ प्रति यथाबलम् ॥१८२॥
अन्येष्वपि तु कालेषु यदा पश्येद् ध्रुव जयम् ।
तदा यायाद्विगृह्यैव व्यसने चोत्थिते रिपो ॥१८३॥

— (मनुस्मृति अ. ७)

(मार्गशीर्ष, फाल्गुन अथवा चैत्र या महिन्यात चतुरग सेनेसहित राजाने शत्रू जिकण्याकरिता सैन्याचे सचलन करावे. पण हा काहीं नियम असू शकत नाही नियम हाच आहे की आपणास निश्चित जय मिळेल असें ज्या वेळी दिसून येईल तो कोणताही काल शत्रूवर आक्रमण करण्यासाठी निवडावा. तसेच कोणत्याही काळीं शत्रू संकटात आहे असे दिसून आले की तो आपल्या स्वारीचा शुभ मुहूर्त समजावा.) प्रत्यक्ष उन्हाळ्यात अथवा उष्णतेच्या दिवसात

या स्वारीसाठी गाढवे, उट व अश्व या वाहनाचा उपयोग करीत. तर पावसाळ्याच्या दिवसात हत्तीचा यासाठी उपयोग करीत असत शुक्रनीतीत या सबधीचे विवेचन विस्तारपूर्वक केले असून श्रद्धा-केन्द्रे सकटात असली तर काळाची वाट पहात बसू नये असा सिद्धान्त सागितला आहे यावरून वैदिक राष्ट्र स्वराष्ट्राच्या मार्नबिदूच्या सरक्षणासाठी किती जागरूक होते याची कल्पना येते. शुक्र म्हणतात --

शरद् हेमत शिशिर कालो युद्धेषु चोत्तम ।
वसतो मध्यमो ज्ञेयोऽधमो ग्रीष्म. स्मृत· सदा ॥२२३॥
वर्षासु न प्रशसन्ति युद्ध साम स्मृत तदा ॥२२४॥
कार्येऽत्यावश्यके प्राप्ते कालो नो चेद्यदा शुभः।
विधाय हृदि विश्वेश गेहे चिन्हमियात्तदा ॥
न कालनियमस्तत्र गोस्त्रीविप्रविनाशने ॥२२६॥

--(शुक्रनीति अ ४ प्र. ७)

(शरद, हेमत ऋतु – आश्विन कार्तिक महिना हे थडीचे दिवस युद्ध करण्यास उत्कृष्ट आहेत वसत ऋतूही युद्धास योग्य समजावा. युद्धास सर्वात वाईट दिवस उन्हाळ्याचे होत वर्षाकाळही युद्धास योग्य नसून साम करण्यास्तव योग्य आहे जर निकड उत्पन्न झाली तर युद्ध करण्यास योग्य अशा समयाची वाट पहात बसू नये मगल करून व विश्वेश्वराचें स्मरण करून युद्धास बाहेर पडावें. स्त्रिया, गाई, आणि ब्राह्मण याचो हत्या झाली असतां कालाच्या स्वरूपाचा विचार न करता युद्ध सुरू करावें ) हा सूक्ष्म कालविचार निरनिराळ्या प्रातातील हवामानाच्या दृष्टीनें सागितलेला आहे, व शक्य तोवर त्याचे पालन करणेच इष्ट होतें. तसे न केले तर काय होते याची इतिहासात उद्‌बोधक उदाहरणें आहेत बहामनी राज्याचा एक सरदार व सेनानी मलिक उत् तुज्जार याने पावसाळ्यात कोकणात मोठ्या सैन्यानिशीं स्वारी केली या स्वारीत डोगराळ प्रदेश व दाट झाडी यातून पावसाळ्यामुळें त्याच्या सैन्यास हालचाली करणे कठिण जाऊन त्याच्या शत्रूंनीं

त्याच्या अवाढव्य सैन्याचा पार धुव्वा उडविला व कालाचा विचार न करतां युद्ध करण्याचे घोर प्रायश्चित्त त्याला भोगावे लागले असो. युद्धास्तव निघालेल्या सैन्याच्या आघाडीवर नायक व पिछाडीस सेनापति असे आजच्या प्रमाणेच जसा मार्ग असेल तशी सैन्यरचना व्यवस्थित करून हे सन्य चाले या रचनेला प्राचीनयुद्ध शास्त्रात व्यूह म्हणत व्यूह म्हणजे पद्धतशीर रचना रस्ता जर पुरेसा रुद असला तर आघाडीवर सैन्याच्या तुकडींची मकराकृति रचना (मकर व्यूह) असे व पिछाडीस सैन्याच्या तुकड्या शकट व्यूह करून चालत. पण रस्ता जर निरुद व निमुळता असला तर सैन्य सुईच्या आकाराची रचना (सूचीव्यूह) करून एकामागून एक सैनिक असे जात हे प्रचलन सुद्धा रस्त्यात शत्रूचे केव्हाही आक्रमण होऊ शकेल हे गृहीत धरून अशा आक्रमणाच्या प्रतिकाराच्या सिद्धतेनेच होत असे सैन्यप्रचलनाची प्राचीन पद्धति समजावून घेण्याच्या दृष्टीने उत्तरा फाल्गुनी नक्षत्रावर रामचद्राच्या सैन्याने जे लकेकडे कूच केले त्याचें रामायणातील वर्णन मनन करण्यासारखे आहे, ते असे --

'ततो वानरराजेन लक्ष्मणेन च पूजित ।
उवाच रामो धर्मात्मा पुनरप्यर्थकोविदः ।।९।।
अग्रे यातु बलस्यास्य नीलो मार्गमवेक्षितुम् ।
वृत. शतसहस्रेण वानराणा तरस्विनाम् ।।१०।।
फलमूलवता नीलशीतकाननवारिणा ।
पथा मधुमता चाशु सेना सेनापते नय ।।११।।
दूषयेयुर्दुरात्मान पथि मूलफलोदकम् ।
राक्षसा: पथि रक्षेथाः तेभ्यस्त्व नित्यमुद्यत. ।।१२।।
गयश्च गिरिसकाशो गवयश्च महाबल ।
गवाक्षश्चाग्रतो यातु गवा दृप्त इवर्षभा· ।।१६।।
यातु वानरवाहिन्या वानरः प्लवता पतिः ।
पालयन्दक्षिण पार्श्वमृषभो वानरर्षभ. ।।१७।।
गन्धहस्तीव दुर्धर्षस्तरस्वी गन्धमादनः ।
यातु वानरवाहिन्याः सव्य पार्श्वमधिष्ठित. ।।१८।।

यास्यामि बलमध्येऽहं बलौघमभिहर्षयन् ।
अधिरुह्य हनूमन्तमैरावतमिवेश्वर· ॥१९॥
अगदेनैष सयातु लक्ष्मणश्चान्तकोपमः ।
सार्वभौमेन भूतेशो द्रविणाधिपतिर्यथा ॥२०॥
जाम्बवाश्च सुषेणश्च वेगदर्शी च वानर ।
ऋक्षराजो महाबाहु कुक्षिं रक्षन्तु ते त्रय. ॥२१॥

—(वाल्मीकि रामायण युद्धकाण्ड सर्ग ४)

(नतर रामचद्र म्हणाल, 'सेनापति अथवा नायक नीलाने आपले सैन्य बरोबर घेऊन सैन्याचा मार्ग शोधून साफ करण्यासाठी आघाडीवर जावे सैन्याला खाद्य पदार्थांची टंचाई पडणार नाही, पाणी विपुल असेल व शीतल वायु असेल असा मार्ग त्याने ठरवावा. राक्षस आपल्या मार्गातील पाणी व खाद्यपदार्थ विषदूषित करणार नाहीत व त्याची नासाडी करणार नाहीत अशी दक्षता, सतत सावध राहून सेनापति नीलाने ध्यावी गय, गवय व गवाक्ष या समर्थ व बलवान् सेनापतीनी पहिल्या आघाडीवर असावे. सेनापति ऋषभाने आपल्या सैन्याच्या तुकडीसह सैन्याच्या उजव्या बाजूकडे राहावे व मदोन्मत्त गजाप्रमाणे दुर्धर्ष आणि वेगवान असणाऱ्या गन्धमादन सेनापतीने डावी बाजू सभाळावी. मी व लक्ष्मण अनुक्रमे हनुमान व अगद याच्या स्कधावर आरोहण करून सैन्याच्या मध्यभागी राहू जाम्बवान व सुषेण यानी पिछाडीचे सरक्षक रहावें 'पुढें ही सेना समुद्रतीरावर आल्यावर तेथे नायक नीलाने तिची पद्धतशीर रचना केली; व मैद आणि द्विविद हे सरक्षणासाठी जागते पहारे देण्याच्या कामावर अधिकारी म्हणून नियुक्त झाले युद्धार्थ जाणाऱ्या सेनाप्रचलनाच्या सबंधात प्राचीन भारतीय राष्ट्राची असणारी प्रगति या उताऱ्यावरून ध्यानांत येण्यासारखी आहे.

स्ट्रॅटेजीच्या क्षेत्रातील दुसरी महत्त्वाची बाब म्हणजे सैन्याची छावणी अथवा सेनानिवेश होत. प्राचीन युद्धशास्त्रात याला **स्कंधावार** असें नाव आहे सामान्यत· चतुरग दलापैकी अश्वासाठी

सपाट, खडक नसलेली व तुरळक झाडे असलेली व चिखल नसलेली भूमि लागे रथासाठी उत्तम मार्ग असलेली, व वाळू चिखल, वृक्ष व झुडपे नसलेली भूमि लागे ती रथसंचाराच्या दृष्टीने महत्त्वाची होती हत्तीसाठी चिखल, तीक्ष्ण वाळू असलेली व उंच सखल भूमि त्याज्य होती. पदातीसाठी अशीच पण पाणी पुरवठा जेथून भरपूर प्रमाणात होऊ शकेल अशी भूमि आवश्यक असे. ती विस्तृत असून काटे नसलेली आवश्यक असे महाभारतात युधिष्ठिराच्या सेनाशिबिरासाठी निवडलेल्या भूमीचे पुढील **वर्णन** पहा :–

'ततो देशे समे स्निग्धे प्रभूतयवसेन्धने ।
निवेशयामास तदा सेना राजा युधिष्ठिर ॥

–(महाभारत, उद्योगपर्व अ. १५२ श्लोक १)

सैन्यशिबिर हे सामान्यत चतुष्कोण असून त्याला चार प्रवेशद्वारें व सहा मार्ग असत त्याचे ९ विभाग पाडलेले असून निवेशाभोवती उच भिती, प्राकार व बाहेरच्या बाजूला खडक इत्यादि प्रतिकारार्थ तयार करण्यात येत सैनिकाच्या व्यायामासाठी व प्रात्यक्षिकासाठी प्रागणे वेगळी असत. शत्रूच्या हालचालीवर देखरेख ठेवण्यासाठी प्रामाणिक व निष्ठावान् लोकाना नियुक्त करण्यात येई सामान्यपणे रोज वेगवेगळ्या अठरा तुकड्या पाहऱ्यावर असत व त्यात सारखा बदल करण्यात येई. शिबिराच्या बाहेर काही अतरावर जगलातील लोकाचे पहारे असत. काटे, खिळे, अणकुचीदार लोखडी सुळे यानी भरलेले व वरून पाचोळा टाकलेले खड्डे करीत. चोरून प्रवेश करणाऱ्यासाठी ही दक्षता होती असे खड्डे शिबिराच्या भोवताली असत. पुरवठा करणाऱ्या व सग्रह करणाऱ्या विभागाच्या सरक्षणाचे दायित्व मुख्यत: अश्वदळाकडे असे. शत्रूला अडचणीची व आपणास सोयीची अशी जागा शिबिरासाठी निवडावी असा सकेत होता. शिबिरात मद्यपान, द्यूत, विहार इत्यादीना सपूर्ण बदी असून बाहेर जाणाऱ्या येणाऱ्याना अनुज्ञा लागे. शत्रूच्या हेरानी आत प्रवेश करू नये म्हणून या

सबंधात अतिशय दक्षता राखण्यात येत असे शिबिराचा वैद्यकीय विभाग अत्यत सुसज्ज राखण्यात येई. या छावण्या म्हणजे एक छोटे व स्वयपूर्ण नगरच असे उदाहरणार्थ, महाभारतातील, युधिष्ठिराच्या सेनानिवेशाचे पुढील वर्णन पहा :–

आसाद्य सरित पुण्या कुरुक्षत्रे हिरण्वतीम् ।
रूपतीर्थां शुचिजला शर्करापकर्वजिताम् ।।७।।
खानयामास परिखा केशवस्तत्र भारत ।
गुप्त्यर्थमपि चादिश्य वल तत्र न्यवेशयत् ।।८।।
विधिर्य. शिबिरस्यासीत् पाण्डवाना महात्मनाम् ।
तद्विधानि नरेन्द्राणा कारयामास केशव ।।९।।
प्रभूततरकाष्ठानि दुराधर्षतराणि च ।
भक्ष्यभोज्यान्नपानानि शतशोऽथ सहस्रश ।।१०।।
शिबिराणि महार्हाणि राज्ञा तत्र पृथक् पृथक् ।
विमानानीव राजेन्द्र निविष्टानि महीतले ।।११।।
तत्रासन् शिल्पिन प्राज्ञा शतशो दत्तवेतनाः
सर्वोपकरणैर्युक्ता वैद्या शास्त्रविशारदा ।।१२।।
ज्याधनुर्वर्मशस्त्राणा तथैव मधुसर्पिषोः ।
ससर्ज रसपासूनां राशय पर्वतोपमाः ।।१३।।
बहूदक सुयवस तुषाङ्गारसमन्वितम् ।
शिबिरे शिबिरे राजा मञ्चकार युधिष्ठिर ।।१४।।
महायत्राणि नाराचास्तोमराणि परश्वधाः ।
धनूषि कवचादीनि ऋषयस्तूणसयुता ।।१५।।
गजाः कण्टकसन्नाहा लोहवर्मोत्तरच्छदाः ।
दृश्यन्ते तत्र गिर्याभा सहस्रशतयोधिन ।।१६।।

–(महाभारत, उद्योगपर्व अ. १५२)

वर याचा सर्व आशय येऊन गेल्यामुळे वेगळ्या अनुवादाची आवश्यकता नाही

ग्रँ, स्ट्रॅटेजीमधली तिसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे प्रत्यक्ष रणक्षेत्र होय. रणक्षेत्राच्या निवडीवर पुष्कळदा विजय अवलंबून असल्यामुळे

धनुर्वेदात त्यासबधी वेगवेगळ्या सूचना आढळतात शिवव्यास धनुर्वेदात असे म्हटले आहे की, "उचसखल, टणक, ओलसर, दलदलीचे रणक्षेत्र असू नये सम, धुळीचा पातळ थर असलेले व कोरडे प्रदेश हे उत्कृष्ट रणक्षेत्र होय " अर्थातच दोन्ही तुल्यबल पक्ष समोरासमोर युद्ध करीत असले तर हे योग्य होईल आपले सैन्यबल अल्प असताना अवलबावयाच्या वृकयुद्धपद्धतीत त्याचा उपयोग नाही म्हणूनच अग्निपुराणाने दाट झाडी, नदी-तीर व पावसाळ्याचे दिवस हे त्यासाठी निवडले. अफझुलखानाच्या बृहत्तर सैन्याचा विनाश शिवछत्रपतीनी या पद्धतीनेच केला. या रणक्षेत्रावर करावयाची सैन्याची रचना व राखीव सैन्य आणि पिछाडीचे सरक्षण यावर सेनापतीचे कौशल्य कसास लागते. भारतीय युद्धशास्त्रात राजावर सर्व अवलबून असल्यामुळे त्यानें प्रत्यक्ष युद्धात भाग घेऊ नये व पिछाडीस सुरक्षित राहून सैन्याला प्रोत्साहन द्यावे असे म्हटले आहे राजाचे अथवा नायकाचे महत्त्व असल्यामुळे त्याचे सरक्षण ही विजयाच्या दृष्टीने अनुपेक्षणीय गोष्ट होती. भाऊसाहेब पेशवे गर्दीत मिसळले म्हणूनच विजयाचे पारडें अब्दालीकडे वळून पानपताचे अपयश मराठी राज्याला भोगावें लागले नायकाचे हे महत्त्व ओळखून महाभारताच्या युद्धात कौरवाची व्यूहरचना, दुर्योधनावर मारा करून धनुर्धर अर्जुनानें अनेक वेळा धुळीस मिळविल्याचे वर्णन आहे

स्ट्रॅटेजीची चौथी महत्त्वाची गोष्ट म्हणज दुर्ग अथवा किल्ले हे असून त्याचे महत्त्व मागच्या प्रकरणात विशद केलेच आहे. शत्रुपक्षाचे दुर्ग स्वाधीन करून घेताना अथवा नष्ट करीत असताना त्याचे (१) अपसर्पण म्हणजे माघार घेतल्याची हूल दाखविणे, (२) वमन म्हणजे लोकाना वश करून घेणे, (३) पर्युवासन म्हणजे प्रत्यक्ष मोर्चे लावूनच चढाई करणे, व (४) अवमर्द म्हणजे दग्याने किल्ल्यातील नायकाची हत्या करून किल्ला ताब्यात घेणे, हे चार योग सागितले आहेत. कौटिल्याच्या मतें एकदम मोर्चे लावून चढाई करणे धोक्याचे आहे. कारण

त्यात बऱ्हशी पराभवाचा सभव असतो त्याऐवजी आतील शत्रूला त्याचे बळ क्षीण करून दमविण्यासाठी हल्ले सारखे चालू राहतील व युद्ध रेंगाळत राहील अशा पद्धतीचा अवलब करणे हितावह होय विजयावरच बद्धलक्ष्य असावे व त्यासाठी हव्या त्या मार्गाचा अवलब करावा असे राजनीतिशास्त्र असल्यामुळे वेगवेगळ्या सोंगानी किल्ल्यात कसा प्रवेश करावा, आपल्या अगी दैवी शक्ति वास करीत असल्याचे भासवून विश्वास कसा सपादन करावा व शेवटी फितुरी उत्पन्न करून सधि सापडताच राजाला कसे ठार मारावे याचे प्रयोग कौटिल्यानें दिलेले आहेत किल्ल्याकडे रसद पोहोचण्याच्या वाटा रोखून रसद मारणे, शत्रूचे बाहेरचे सारे सबध तोडणे व किल्ल्याला आतून आगी लावून भय उत्पन्न करणे याचाही स्ट्रॅटेजीत अतर्भाव असतो. मौर्यकालीन युद्धात तापलेल्या तेलाचाही उपयोग होत असे असे मेगॉस्थेनिसने लिहिले आहे किल्ला या उपरिनिर्दिष्ट बिभीषिकानी अधीन होत नसला तर, व स्वामिवधाचे कारस्थानही सफळ होत नसेल तर शत्रूला किल्ल्याबाहेर काढण्यासाठी आपण आपल्या निवेशाना आग लावून देऊन पळावयास सुरवात करावी स्वाभाविकपणेच विजयाच्या कल्पनेने धुंद होऊन शत्रू किल्ल्यातून बाहेर पडून पाठीस लागतो. अडचणीच्या जागी उलटून त्याला वेढावे, व सरसहा सहार करावा किल्ल्याच्या प्राकाराना व प्रवेशद्वाराला खिळखिळे करण्याच्या कामी हत्तीचा फार उपयोग होत असे दुर्गाच्या आश्रयाने राहणाऱ्या सत्तेचा विध्वस करावयास आतील महत्त्वाची व सर्व छिद्रे जाणणारी व्यक्ति आपल्यास अनुकूल करून घेणे म्हणजे स्ट्रॅटेजीचा उच्चाक गांठणे होय. रामचद्राला बिभीषणाचें असें साह्य मिळाल्यामुळे इद्रजित् व रावण याची सामर्थ्यछिद्रे कळून लकेच्या दुर्गाचा नाश होऊ शकला. रामचद्रानीही बिभीषणाला त्याच्या या कामगिरीबद्दल लंकाराज्याचें पारितोषिक दिलें. हल्लींच्या युद्धांत स्ट्रॅटेजीच्या

दृष्टीने किल्ल्याचे महत्त्व गेले आहे असें जे समजण्यात येते त्यावर श्री दीक्षितार याचा अभिप्राय पाहण्यासारखा आहे ते लिहितात –

There is a wrong notion that is still current, namely that these forts have lost their military value and are an anachronism since the invention of gun-powder But gun-powder was in use in ancient India even in very early times and still those strongholds were recommended as safe ones It was during the last Great War as we all know, that the fortresses in Belgium offered stubborn resistance to the Germans, but for which the latter might in all probability have over-whelmed the whole of France In fact they were decisive in arresting the progress of Germany Therefore to decry the value of a fort is to misjudge its merit

असो आता आपण टॅक्टिक्सकडे वळू युद्धाचे भारतीय युद्धशास्त्रात **आसन** व **विग्रह** असे दोन प्रकार आहेत. आसन म्हणजे आपल्या जागेवर राहून आक्रमणाचा प्रतिकार म्हणून केलेले युद्ध व विग्रह म्हणजे शत्रूवर चालून जाणे होय प्रतिकारात्मक युद्धात टॅक्टिक्सचे महत्त्व विशेष असते टॅक्टिक्समध्ये थोडीशी चूक झाली की केवढा भयंकर परिणाम भोगावा लागतो याचे सर्वप्रसिद्ध उदाहरण रामरावणयुद्धात सापडते. या युद्धात आक्रमण रामचद्रानी केले व प्रतिकाराची भूमिका रावणाची होती. रामचद्राच्या मार्गात अनेक अडचणी होत्या व रावणाला त्यापैकी प्रत्येक अडचणीचा फायदा घेण्याची शक्यता होती किष्किधा ते लका एवढे अतर ससैन्य चालून जाणे ही पहिली अडचण, व त्यातहि मार्गात गभीर समुद्र पसरलेला. समुद्रावरून येवढे मोठे सैन्य तरून जाण्यासाठी विशाल सेतु बाधण्यात पुष्कळ कालापव्यय करावा लागणार होता या सर्व गोष्टी रावणाला

दिसत होत्या रामाच्या सामर्थ्याची व त्याच्या लकेत होणाऱ्या पदन्यासाच्या परिणामाची कल्पना रावणाला त्याच्या मंत्र्यानी पूर्णपणे दिली त्यामुळे रामाच्या सेतुबंधनावर आक्रमण करून ते सिद्धीस जाऊं न देणे अथवा सेतूवरून वानरसैन्य येत असताच त्याच्यावर जोर करून आक्रमण करणे आवश्यक होते. पण रामाचे सैन्य लकेत येऊन स्थिर होईपर्यंत स्वतःच्या सामर्थ्याच्या अहंकाराच्या धुंदीत रावण माशा मारीत स्वस्थ राहिला व त्याने शेवटी स्वतःचा सर्वनाश ओढवून घेतला अलीकडच्या भाषेत ज्याला Tactical blunder असे म्हणतात ते हे होय टॅक्टिक्समध्ये परिणामकारी व दूरपाती शस्त्राचा व गूढ शस्त्राचा अतर्भाव होतो अथर्ववेदाच्या दैवासुर संग्रामवर्णनात शत्रूला संभ्रमात टाकणारी अगानुष साधने व त्यानतर संभ्रमित शत्रूचा संहार याची विपुल वर्णने आहेत उदाहरणार्थ, पुढील काही वर्णने पहा –

पूतिरज्जुरुपध्मानी पूतिं सेनां कृणोत्वमूम् । धूममग्निं परादृश्यामित्रा हृत्स्वा दधतां भयम् ।। २ ।। बृहत् जालं बृहत इन्द्र शूर सहस्रार्घस्य शतवीर्यस्य । तेन शतं सहस्रमयुतं न्यर्बुदं जघान शक्रो दस्यूनामभिधाय सेनया ।। ७ ।। अयं लोको जालमासीच्छक्रस्य महतो महान् । तेनाहमिन्द्र जालेनामूंस्तमसाभि दधामि सर्वान् ।।८।।

—(अथर्ववेद, काण्ड ८ सू ८)

शत्रुसेनेवर आक्रमण करण्यासाठी मी पेटविलेली ही बारुदीची वात शत्रुसेनेमध्ये दुर्गंधयुक्त धूर उत्पन्न करो. त्या धुराला व त्याच्या पाठोपाठ उत्पन्न होणाऱ्या ज्वालेला पाहून शत्रु भयकंपित होवोत अनेक पराक्रम करणाऱ्या इंद्राचे शत्रूसैन्याला बांधणारे एक आश्चर्यकारक जाळे (पाश ?) आहे त्या जाळ्याने अथवा पाशाने सहस्रावधि व लक्षावधि शत्रु सैनिक बांधले जातात व नंतर इंद्र त्याचा संहार करतो. हे विशाल विश्व इंद्राचे मोठे जाळेच होते. या इंद्रजालामध्ये सर्व शत्रू अंधाराने बांधले जातात

शक्र सेनया तेन दस्यूना सहस्र जघान ।। –(अथर्ववेद ८-८-७)

(इन्द्राने आपल्या सेनेच्या द्वारे जाळ्यांत बांधल्या गेलेल्या सहस्र दस्यूना ठार मारले ) हे जाल म्हणजे काही गूढ अस्त्र असले पाहिजे असे दिसते जादूटोणा या अर्थी इन्द्रजाल या शब्दाच्या उपयोगाचे मूळ अथर्ववेदातील या सूक्तात असण्याचा सभव आहे

टॅक्टिक्सच्या क्षेत्रातील तिसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे व्यूह अथवा सैन्यरचना होय कौटिल्याने सम, विषम, हस्ति, रथि, अश्व व पत्ति असे सहा व्यूह वर्णन केले आहेत महाभारतात या व्यूहाचे उत्कृष्ट वर्णन आढळते. अभिमन्यूसारख्या अग्रगण्य सेनानायकाचा वध हा व्यूहाचाच परिणाम होय परपक्षविनाश व स्वपक्षसरक्षण याचे व्यूह हे अमोघ साधन होय चक्र, सूचि, वज्र. मकर, शकट, इत्यादि नावे सैन्यरचनेच्या त्या त्या आकृती-वरून पडलेली आहेत या स्ट्रॅटेजी व टॅक्टिक्सचा उपयोग भिन्न भिन्न प्रकारानी कूटयुद्धात व धर्मयुद्धातही होतो युद्धाचे धर्मयुद्ध व कूटयुद्ध असे भेद केवळ भारतीय युद्धशास्त्रज्ञानीच केलेले आहेत आपण प्रथम धर्मयुद्ध म्हणजे काय ते पाहू धर्मविजयाचा अतर्भाव धर्मयुद्धातच होत असल्यामुळे त्याचेही वर्णन यातच येईल. वस्तुत क्षात्रवर्णाच्या वर्णनात धर्मयुद्धाचे थोडेसे स्वरूप दाखविलेच आहे युद्धाची व्याख्या शुक्रनीतीत पुढीलप्रमाणे केलेली आहे —

आबिभ्रतो. शत्रुभावमुभयोस्सयतात्मनो. ।
अस्त्राद्यैस्स्वार्थसिद्ध्यर्थं व्यापारो युद्धमुच्यते ॥२१९॥

(परस्पराशी शत्रुत्वाचें नाते असलेल्या दोन पक्षानी स्वत च्या हितसरक्षणासाठी हातात शस्त्रे घेऊन परस्पराशी लढणे याला युद्ध असे म्हणतात ) असे युद्ध सुरू झाल्यावर अथवा अनिवार्य ठरल्यावर धर्मयुद्धाचे नियम सागताना महाभारतकार म्हणतात, " ज्याने कवच धारण केले नसेल असा क्षत्रिय रणागणात आल्यास त्याच्याशी युद्ध करू नये युद्धाच्या वेळीहि 'तू प्रहार कर, महा मी प्रहार करतो ' असे परस्परानी परस्परास सागावे तो जर तयार होऊन आलाच तर आपणही तयार व्हावे. तो जर बरोबर

सैन्य घेऊन आला तर आपणही बरोबर सैन्य घेऊन त्याला आव्हान करावें अश्वावर आरोहण करून रथातील मनुष्यावर चाल करून जाऊ नये. रथारूढ मनुष्यानेच रथारूढ मनुष्यावर चाल करावी. दुःखाकुल स्थितीत कोणावरही प्रहार करू नये भयभीत झालेल्या आणि पराजित झालेल्या शत्रूवर शस्त्र टाकू नये बाण विषाने माखलेला अथवा सरळ असून उलट काटे असलेला असू नये. कारण अशा प्रकारचे आयुध हे दुर्जनाचे असतें युद्ध खरेपणाने करावे प्रहार करणाऱ्या मनुष्यावर क्रुद्ध होऊ नये उत्कृष्ट प्रकारच्या साहाय्यकर्त्याचा नाश झाल्यामुळे जर एखादा सौजन्यसंपन्न शत्रु दुःखाकुल झाला, अथवा एखादा निर्बल, अपत्य-शून्य, शस्त्रभग्न झालेला, घायाळ झालेला, प्रत्यंचा तुटलेला, आणि वाहनाचा वध झालेला जो शत्रू त्याजवर केव्हाही प्रहार करू नये जखमी झालेल्या शत्रूला आपल्या राष्ट्रामध्ये ठेवून घेऊन औषधोपचार करावे किंवा त्याला त्याच्या घरी नेऊन पोहोचवावें जखमी झालेल्या शत्रूला जखम बरी करून सोडून देणे हा सनातन धर्म होय धर्माने युद्ध केले पाहिजे असे मनूने सांगितले आहे सज्जनाच्या ठिकाणी सद्धर्म नेहमीच वास करतो (युद्धमदाने बेभान होऊ नये असा ध्वनि) अशा धर्माचे अवलंबन केल्यानंतर कोणाचाही नाश करू नये जो क्षत्रिय अधर्माने युद्ध करून शत्रूवर विजय मिळवितो तो वंचकपणावर उपजीविका करणारा दुष्ट आपला आपणच घात करून घेतो अशा प्रकारचे कृत्य दुर्जनाचे होय. धर्मनिष्ठ क्षत्रियाने धार्मिक म्हणजेच वंचनादिरहित अशाच उपायाच्या योगाने दुर्जनाचा पराजय करावा धर्माचे अवलंबन करून जरी मरण आले तरी ते अत्यंत उत्तम. परंतु पापकर्म करून जय मिळाला तरी तो गर्ह्य होय जशी भूमि त्याचप्रमाणे अधर्माचरणही आपलें फळ एकदम देत नाही. पण पुढे ते मुलेबाळे आणि कुलशाखा ह्यांना भस्म करून पापकर्त्यालाही पछाडते. म्हणून राजाने धर्ममर्यादेत राहूनच विजयप्राप्तीची व द्रव्यसंपादनाची इच्छा करावी. अधर्माने जय मिळविणाऱ्या

कोणत्या राजाला लोक अनुकूल होणार आहेत ? अधर्माने मिळविलेला विजय डळमळीत व स्वर्गप्राप्तीस प्रतिबंध करणारा असून तो राजा आणि भूमि या उभयतानाही हीन दशेस पोहोचवितो कवचभग्न झालेला, 'मी तुझा आहे' असे म्हणणारा, हात जोडणारा व शस्त्रत्याग केलेला जो शत्रू त्याला धरावे, पण त्याचा वध करू नये आपल्या सामर्थ्याने ज्याचा पराजय केला असेल त्याच्याशी राजाने युद्ध करीत बसू नये पण एक वर्ष-पर्यंत त्याला ताळचावर आणण्याचा उपाय करावा व वर्षानंतर त्याचा पुनर्जन्मच झाल्यासारखा होतो म्हणून त्याला सोडून द्यावे **पराक्रमानें हरण करून आणलेल्या कन्येला एक वर्ष होण्यापूर्वी विवाहासंबंधानें प्रश्न करू नये** तसेच विचार न करता हरण केलेले जे द्रव्य अथवा दासदासी इत्यादि लोक ते सर्व एक वर्षा-नतर ज्याचे त्यास परत करावे, राजानेच राजाशी युद्ध करावे राजा नसलेल्या दुसऱ्या कोणीही कोणत्याहि प्रकारे राजावर चाल करून जाऊ नये दोही बाजूंची सैन्ये परस्पराशी जाऊन भिडली तरीही दोन्ही पक्षामध्ये शांति असावी अशा इच्छेने ब्राह्मण मध्ये आल्यास युद्ध थांबवावे एखाद्या क्षत्रियाने या मर्यादेचा भग केल्यास त्याला सन्माननीय समजू नये. युद्धात बलात्कार केल्यामुळे क्षुब्ध व म्हणूनच दुर्जनतुल्य होऊन गेलेल्या लोकाना मधुर भाषण आणि उपभोग्य वस्तूंचे दान ह्याच्या योगाने शात करावे. कारण असे करणे ही उत्कृष्ट प्रकारची राजनीति होय आपल्या राष्ट्रात राहून ताप दिलेले जे जित शत्रु त्याच्याशी सामोपचाराने न वागता त्याना जर छळून सर्वस्वी नागविले तर आपल्या सकटाची सतत प्रतीक्षा करणारे ते शत्रु सधि येताच आपल्यावर चाल करून येतील व आपल्या शत्रूला अनुकूल करण्याची कारस्थाने करीत राहतील शत्रूला शाठ्य करून केव्हाहि फसवू नये व कोणत्याही प्रकारे त्याची अतिशय नागवणूकही करू नये. कारण फारच नागवणूक झाली तर तो बिचारा स्वत च्या जीवि-ताचाही त्याग करील राजाजवळ संपत्ति जरी थोडीच असली

तरी प्रतिष्ठेने जगणे हे तो सर्वात महत्त्वाचे समजत असतो हे विसरूं नये याच पद्धतीने वागून इद्र महेंद्र झाला आहे ” (महाभारत शातिपर्व अ.९५व९६) धर्मयुद्धात विजय सपादन केलेला वैदिक राजा वैदिक विजयसूक्ते गात, यज्ञ व देवतापूजन आणि दान याच्या द्वारे आपला विजय साजरा करी सैनिकाना भरपूर पारितोषिके देई शत्रुराष्ट्राशी विजयी सत्तेने कसे वर्तन करावे यासबधी महाभारतात म्हटले आहे — “शत्रूचे राष्ट्र जिकून घेतल्यानतर साहाय्यकर्त्याना बरोबर घेऊन अथवा एकट्यानेच त्या राष्ट्रामध्ये जाऊन तेथील लोकाना “मी तुमचा राजा आहे व मी तुमचे सदैव पालन करीन मात्र तुम्ही न्याय्य असा कर द्या आणि माझे अवलबन करा” असे मागावे नतर त्यानी तेथे गेलेल्या त्या राजाचा अगीकार केला तर बरेच झाले, पण तसे न करता जर ते कोणत्याही प्रकारे विरुद्ध जाऊ लागले तर प्रतिकूल कर्मे करणाऱ्या त्या लोकाचा सर्व प्रकारे निग्रह केला पाहिजे ” (महाभारत शातिपर्व अ ९५ श्लो २, ३ व ४ ) धर्मविजयात जिकलेल्या प्रजेची नासाडी करूं नये व प्रजेला त्रास देऊ नये असा सकेत होता सेनापति, नायक इत्यादि शत्रुपक्षातील अधिकाऱ्याना शक्यतोवर जिवत बदी करीत व आक्रमण केल्याच्या अपराधाबद्दल त्याची विटबना वा उपहास करून सोडून देत यालाच पाच पाट काढणे असे म्हणतात भगवान् श्रीकृष्णानी रुक्मिणीहरणप्रसंगी आपल्यावर चालून येणाऱ्या विदर्भ युवराज रुक्मीची अशीच थट्टा करून त्याला सोडून दिले होते. सामान्यतः प्राणहानि टाळणे हें धोरण असे. पण मानधन पुरुषाला प्राणापेक्षा सन्मानाचीच खरी चाड असल्यामुळे या विटम्बनेनतर तो सहसा जिवत रहात नसे. रुक्मी अथवा जयद्रथ यासारखे प्राणानाच सर्वस्व समजणारे कापुरुष विरळा सम्राट् हर्षवर्धनाच्या काळापर्यंत ही नीति व्यवहारात होती. हर्षाच्या काळी भारतात आलेला चिनी प्रवासी ह्यूएनत्सग आपल्या प्रवासवृत्तात लिहितो :—

**Whenever a general is despatched on a warlike expediton although he is defeated and his army destroyed, he is not**

himself subjected to bodily punishment; only he has to exchange his soldier's dress for that of a woman, much to his shame and chagrin. So, mostly those men put themselves to death to avoid such disgrace

–(Life of Hiuen Tsang by Beal ch IV. P. 147)

(ज्या वेळी प्रमुख अधिकारी अथवा सेनापति हातात सापडे त्या वेळी जरी तो जित असला व त्याच्या सैन्याचा विध्वस झालेला असला तरी त्याला वधाची अथवा कोणतीहि शारीरिक दडाची शिक्षा देत नसत. त्याला आपला सैनिकी गणवेष काढून टाकून स्त्रीवेष परिधान करावा लागत असे ही त्याची अत्यत लज्जास्पद विटबना असल्यामुळे तसा प्रसग आपल्यावर येऊ नये म्हणून पुष्कळ मानधन सेनानी पराभवाचा सभव दिसताच प्राणत्याग करीत.) कौटिलीय अर्थशास्त्रात धर्मविजय या शब्दाचा अर्थ वेगळा व पूर्ण राजकीय स्वरूपाचा आहे. कौटिल्याच्या मते धर्मविजय म्हणजे 'शरण ये किवा युद्धाला सिद्ध हो' असा शत्रूला निरोप पाठविल्यावर, अल्पसामर्थ्याच्या, एकवार जित झालेल्या अथवा अन्य सत्तानी आपले श्रेष्ठत्व मान्य करून आपल्या साम्राज्याचे अकित अथवा माडलिक होण्याचे मान्य केले की त्याच्या शोषणाची अथवा सहाराची लोभी व आसुरी इच्छा न बाळगता तेवढ्यावर सतुष्ट राहण्याचे औदार्य असणे हे होय शक्य तितके युद्ध व प्राणहानि टाळण्याच्या, आणि शेजारी व परकीय सत्ताशी सामोपचाराचे व मुत्सद्दीपणाचे सबध राखण्याच्या धोरणावर भर द्यावा हा त्यातील हेतु असे कौटिल्याच्या या धर्मविजयाच्या व्याख्येकड दुर्लक्ष केल्यामुळे अशोकाच्या शिलालेखातील **धर्मविजय** या शब्दाचा अर्थ उलगडताना नामवत सशोधकाची कशी फसगत झाली याचे श्री रामचद्र दीक्षितार यानी आपल्या War in Ancient India या ग्रथात केलेले वर्णन वाचण्यासारखे आहे. ते लिहितात :–

Before the discovery of the Arthashastra and even **several years after its discovery, the term dharmarajya**

occurring in the inscriptions of Asoka was a puzzle to Asokan Scholars, who unfortunately took for granted that the Emperor was a Buddhist, and connected the term with the Buddhist Dharma, and interpreted it just contrary to what it connotes We are told on no authority that the term which occurs in the XIII Rock Edict means conquest by morality for 'conquest by arms' Suffice it to say here, that if we accept that Asoka became a monk and gave up arms, then according to Hindu and even the Buddhist conception, he relinquished the throne and could not have been an emperor. And with complete disarmament, with states of people professing different faiths and creeds, the vast empire could not be maintained even for a short period In interpreting this term, the whole Edict must be taken into account In the latter part we read according to Hultzsch's translation, "And they (foresters) are told of the power to (punish them) which Devanamapriya ( possesses) in spite of (his ) repentance in order that they may be ashamed (of their crimes) and may not be killed " What is this power to punish and kill them except by the employment of weapons of war? What is that repentance except that he waged in kalinga an unrighteous war involving the slaughter of innocent and that he took a vow from that day to resort only to righteous methods of war Dharmavijaya is a term of much political significance and Asoka born and bred in the kautiliyan school of politics (there is a story that kautilya continued to be the minister of Asoka's father also) must have followed his political injunctions. It is wrong to take all his

edicts as religious Edicts They are all political in character and deserve to be reedited and interpreted from the political stand point of kautilya to do justice to very great emperor of India, who had equal regard for all orthodox and heretic sects of his time

कौटिल्याच्या अर्थशास्त्राचा शोध लागण्याआधी व त्यानतरहि कित्येक वर्षे, अशोकाच्या शिलालेखात आढळणाऱ्या 'धर्मविजय' या शब्दाच्या अर्थासबधी अशोकसबधित सशोधकात मोठाच संभ्रम दिसत असे सम्राट् अशोक बुद्धधर्माचा असल्यामुळे धर्माचा त्यानी बुद्धधर्माशी सबध जोडून दुर्दैवाने या शब्दाचा नेमका उलटा अर्थ केला कोणतेहि प्रमाण न देता १३ व्या शिलालेखातील धर्मविजय शब्दाचा अर्थ 'शस्त्राच्या विजयाऐवजी' 'नीतिमार्गाने विजय' असा चुकीचा गृहीत धरण्यात येई जर अशोक खरोखर बुद्धभिक्षु झाला असता व त्याने खराच शस्त्रसन्यास केला असता तर वैदिकच नव्हे तर बुद्धधर्माच्या अनुशासनाप्रमाणेही त्याला राज्यपदाचा त्याग करावा लागला असता व तो सम्राट् होऊं शकला नसता ज्याच्या राज्यात अनेक भिन्न भिन्न पथाचे व अनुशासनाचे लोक होते ते त्याचे विशाल राज्य सपूर्ण शस्त्रसन्यास केल्यावर त्याला क्षणमात्रहि राखता आले नसते या शब्दाचा खरा अर्थ ध्यानात यावयास सपूर्ण शिलालेखच विचारात घ्यावयास पाहिजे Hultzsch च्या अनुवादाप्रमाणे त्याचा उत्तरार्ध पुढीलप्रमाणे आहे 'आणि जगलखात्याच्या लोकाना अशी खेदपूर्वक चेतावणी देण्यात येत आहे की, देवाचा प्रिय अशोक याच्याजवळ त्याना शासन करण्याचे सामर्थ्य आहे. त्याना वधदड भोगावा लागू नय व त्याच्या गुन्हेगारीबद्दल त्यांना लाज वाटावी यासाठी ही चेतावणी आहे" या लोकांना ठार करण्याची अथवा शासन करण्याची शक्ति युद्धांतील शस्त्राशिवाय दुसरी कोणती असू शकेल? कलिंगावरील स्वारीत निरपराध लोकाची अधर्मयुद्धाने कत्तल करण्यामुळे त्याला जो खेद झाला व त्यानतर धर्मयुद्ध पद्धतीचा त्याने निग्रहपूर्वक आश्रय केला.

त्याचे स्मरण देण्यापलीकडे वरील लेखांतील खेद शब्दाचा दुसरा काय संदर्भ असू शकेल? धर्मविजय हा राजकीय परिभाषेतील शब्द आहे आणि कौटिल्याच्या राज्यानुशासनात अशोक जन्मला व वाढला होता हे ध्यानात घेतले पाहिजे (अशोकाच्या पित्याच्या वेळींही कौटिल्य मंत्री होता असे म्हणतात) अर्थातच आपल्या पितामहाच्या गुरूच्या राज्यानुशासनाचे त्याने अनुकरण केले हे स्पष्ट आहे. अशोकाचे सारे शिलालेख हे केवळ धार्मिक आहेत हे समजणेंच चुकीचे आहे. वस्तुतः त्या सर्वांचे स्वरूप राजकीय आहे व सर्वच संप्रदाय व प्रणालि याविषयी समदृष्टि असलेल्या या श्रेष्ठतम सम्राटाला न्याय द्यावयाच्या दृष्टीने कौटिलीय अर्थशास्त्राच्या परिभाषेप्रमाणे या शिलालेखाचे पुनःसंपादन व पुनर्मीमांसा अत्यावश्यक आहे.)

असो. आता आपण कूटयुद्ध अथवा अधर्मयुद्धपद्धतीच्या स्वरूपाकडे वळू. लोभविजय व आसुरविजय याचा अंतर्भाव त्यातच होतो. या शब्दाचा पहिला वापर अथर्ववेदात केलेला आढळतो तो असा :—

इमं उप्ता मृत्युपाशा यानाक्रम्य न मुच्यसे
अमुष्या हन्तु सेनाया इदं कूटं सहस्रशः ॥

—(अथर्ववेद का. ८-८-१६)

(हे मृत्युपाश मी टाकले आहेत. याचे आक्रमण करून तू सुटू शकणार नाहीस. हे कूट या सेनेचा संपूर्ण फडशा पाडो.) कूटयुद्धालाच चित्रयुद्ध, मायायुद्ध, मंत्रयुद्ध व अप्रकाश युद्ध अशी विविध नावे आहेत. शुक्राचार्य म्हणतात —

न युद्धं कूटसदृशं नाशनं बलवद्रिपोः ॥३६२॥
प्रफुल्लवदनेनैव तथा कोमलया गिरा।
अङ्गीकृतापराधेन सेवादानं नतिस्तवं ॥३६५॥
जलान्नतृणसंरोधैः शत्रून्संपीडच यत्नतः ।
पुरस्ताद्विषमे देशे पश्चात् हन्यात्तु वेगवान् ॥३७०॥
कूटस्वर्णमहादानैर्भेदयित्वा द्विषद्बलम् ।
नित्यविस्रब्धसंसुप्तं प्रजागरकृतश्रमम् ॥३७१॥
विलोभ्यापि परानीकमप्रमत्तो विनाशयेत् ॥३७२॥

क्षण युद्धाय सज्जेत क्षण चापसरेत् पुन ।
अकस्मान्निपतेत् दूरात् दस्युवत् परितस्सदा ।।३७४।।
--(शुक्रनीति अ. ४ प्र ७)

(शत्रूचा सर्वनाश करावयास कूट युद्धासारखे दुसरे उत्कृष्ट साधन नाही. हास्यवदन, मृदुभाषा, स्वत चे अपराध स्वत च कबूल करणे, सेवा, देणग्या, नम्रता, स्तुति आणि शपथा इत्यादि उपायानी शत्रूच्या मनात स्वत.विषयी विश्वास उत्पन्न करावा. प्रबल राजाने आपल्या शत्रूस पाणी, दाणागोटा, घासकडबा मिळण्याचे बद करून त्याला अडचणीच्या प्रदेशात घालावे आणि नंतर त्याचा नाश करावा. गुप्त रीतीने सुवर्णादि देऊन शत्रुसैन्य फोडावे, अथवा अन्य रीतीने त्याचा विश्वास सपादन करून ते निद्रावश झाल्यावर सरसहा त्याचा सहार करावा स्वत. अत्यत सावध राहून शत्रूला वेगवेगळ्या उपायानी बेसावध करून त्याचा सर्वनाश करावा. एकाएकी युद्ध सुरू करावे एकदम माघार घ्यावी दरवडेखोराप्रमाणे एकदम आक्रमण करावे व तत्काल अदृश्य व्हावे ) कूट अथवा अधर्म युद्धात माणुसकी व धर्म याचा काहीच सबंध नसून शत्रूचा कोणत्याही उपायाने विनाश हेच अभिलषित असते. त्यामुळे शत्रुनाश व विजय जेणे करून प्राप्त होईल ते ते सर्व उपाय या युद्धात स्वीकारणीय असतात महर्षि वाल्मीकि व शुक्राचार्य यानी कूटयुद्धाच्या ध्येयाचे स्वरूप सागताना असे म्हटले आहे की --

पीडाकरममित्राणा यच्च कर्तव्यमेव तत्। (वा. रा. युद्धकाड)
भेदनीया कर्षणीया पीडनीयाश्च शत्रव ।।२३।।
विनाशनीयास्ते सर्वे सामादिभिरुपक्रमैः ।।२४।।
--(शुक्रनीति अ ४, प्र. १)

(शत्रूला जे जे पीडा देणारे असेल ते ते सर्व स्वीकारणीय होय. सामादिकाचा अवलब करून त्याच्यात भेद पाडणे, त्यांना स्थानभ्रष्ट करणे, पीडा देणे व येन केन प्रकारेण त्याचा सर्वनाश करणे हेच लक्ष्य आहे.) त्यामुळे विनाशकारी गुप्त शस्त्रांचा

प्रयोग, छोटचा व मोठचा प्रमाणात विषप्रयोग, झोपलेल्याचा सहार, सरमहा गावेची गावे व पिके उभी जाळून टाकून व हाल-हाल करून लोकाना मारून धाक उत्पन्न करणे या सर्व गोष्टीचा अतर्भाव कूटयुद्धात होतो म्हणूनच त्याला आसुरी युद्ध म्हटले आहे कपट हा कूटयुद्धाचा आत्मा होय विश्वासघात आणि क्रौर्य हा तेथील सर्वसमत आचार आहे. या पद्धतीत पाणवठे, तळी, विहिरी विषारी करणे, विषारी धूर इत्यादिकाचाहि समावेश होतो कौटिलीय अर्थशास्त्रात कूटयुद्धाचे एकाहून एक सरस व अंगावर शहारे आणणारे भयकर प्रयोग दिलेले आहेत. हें अधार्मिक युद्ध वैदिक योद्धचाना अपरिचित नसून ते त्यांतही चागलेच परिचित होते ऋग्वेदात अग्नीला 'अमित्रदम्भन (ऋग्वेद ४–१५–४) शत्रूना फसविणारा असे म्हटले आहे. अग्निप्रयोग, कपटाने करून मारणारे प्रयोग कूट युद्धाचेच होत. ऋग्वेदांत राक्षसाना ठार मारणाऱ्या अग्नीचे वर्णन करताना "प्रतिस्पश विसृज" (४ ४ ३) म्हणजे परराष्ट्रात हेर पेरून ठेवणारा असे म्हटले आहे. हेरगिरीची सस्था ऋग्वेद काळापासूनच असून तिचा प्रयोग हा कूट युद्धाचाच प्रकार आहे विषानें माखलेल्या शस्त्राचाही प्रयोग ऋग्वेदकालीन युद्धात होत असे. प्रत्यक्ष उल्लेख पुढीलप्रमाणे – "विष्वाचो अहत विषेण" (ऋ. १–११७–१६) (तुम्ही विश्वाच्या पुत्रास विषारी हत्याराने मारले.) अथर्ववेद तर कूटयुद्धाच्या विविध वर्णनाचे आगरच असून त्यांतील शत्रुसेनेच्या मोहनाचे विविध प्रयोग अभ्यासण्यासारखे आहेत. त्यांतील जालाच्या अथवा पाशाच्या प्रयोगाचा उल्लेख मागे केलाच आहे. आणखी काही वर्णने पहा —

अग्निर्नः शत्रून् प्रत्येतु विद्वान् प्रतिदहन्नभिशस्तिमरातिम् ।
स सेना मोहयतु परेषा निर्हस्ताश्च कृणवज्जातवेदाः ॥१॥
प्रसूत इन्द्र प्रवता हरिभ्या प्र ते वज्र. प्रमृणन्नेतु शत्रून् ।
जहि प्रतीचो अनूचः पराचो विष्वक्सत्य कृणुहि चित्तमेषाम् ॥४॥
इन्द्र सेना मोहयामित्राणाम् अग्नेर्वातस्य ध्राज्या तान्विषूचो

विनाशय॥५॥ इन्द्र. सेना मोहयतु मरुतो घ्नन्त्वोजसा । चक्षूष्यग्नि-रादत्ता पुनरेतु पराजिता ॥६॥

—(अथर्ववेद, काड ३ सू. १)

व्याकूतय एषामिताथो चित्तानि मुह्यत ।
अथा यदद्यैषा हृदि तदेषा परिनिजहि ॥४॥
अमीषा चित्तानि प्रतिमोहयन्ती गृहाणाङ्गान्यप्वे परेहि ।
अभिप्रेहि निर्दह हृत्सु शोकै ग्राह्यामित्रास्तमसा विध्य शत्रून्॥५॥
असौ या सेना मरुत. परेषामस्मानेत्यभ्योजसा स्पर्धमाना ।
ता विध्यत तमसापव्रतेन यथैषामन्यो अन्य न जानात् ॥६॥

—(अथर्ववेद ३–२)

(राजनीतिज्ञ व तेजस्वी अग्नीने घातपात करणाऱ्या शत्रु-सेनेला दग्ध करीत शत्रूवर चढाई करावी शत्रुसेनेला मोहित करावे व त्याना जणू काय हस्तहीन बनवावे हे इन्द्रा ! वेगवान् असा तुझा शस्त्रसमुदाय शत्रूचा फडशा पाडीत पुढे जावो. समोरून, पाठीमागून व सर्वदिशानी पळत असलेल्या शत्रूसेनेची आमच्या सैनिकानी अशी लाडगेतोड करावी की ज्यामुळे ते अत्यत भयभीत होऊन सदाचे काळे करतील हे इन्द्रा ! अग्न्य-स्त्राच्या प्रयोगाने शत्रुसेनेला भयभीत करून तू तिचा विनाश कर इद्राने शत्रुसेनेत थरकाप उत्पन्न करावा व मरुतानी तिची इतकी लाडगेतोड करावी की त्यामुळे डोळ्यासमोर काजवे चमकून तिचा सर्वनाश होईल. शत्रू इतके भयभीत होवोत की त्यामुळे त्याच्यात धोरणासबधी तीव्र मतभेद व वादविवाद उत्पन्न व्हावे व कोणताही निश्चय त्याना उद्यापर्यंतहि टिकविता येऊ नये. व्याधि व अन्य कल्पनातीत विपत्तीनी शत्रूच्या गोटात कहर उडवावा. त्याच्या प्रत्येक सैनिकाचे अगप्रत्यग व्याधीनी जखडले जावो. सधिवात व मूर्छा यानी ते त्रस्त होवोत अशा परिस्थितीत ते सापडले की त्याच्यावर चढाई करून त्याच्या हृदयाला शोकाग्नीने जाळून टाका. हे वीरहो ! जी सेना आमच्याशी स्पर्धा करते व आमच्यावर चढाई करावयास येते त्याना असे

मोहित करा की ज्यामुळे ते पुरुषार्थहीन व भ्रमिष्ट होऊन एकमेकाना ओळखू सुद्धा शकणार नाहीत.) देवता-परिभाषेला बाजूस सारून या सूक्तादा सूक्ष्म विचार केला तर कूटयुद्धाचे सर्व प्रकार यात वर्णिलेले आढळून येतात इंद्रजाल व माया याचेही प्रयोग अथर्ववेदात आहेत. रोगराई उत्पन्न करणारी आजची रोग जंतुप्रसारक अस्त्रे व ही अथर्ववेदोक्त साधने याच्यातील सूत्र एकच आहे कौटिल्याच्या अर्थशास्त्रात या घातक प्रयोगाचे सूक्ष्म व तपशीलवार वर्णन असून त्यावरून कौटिल्यावर अथर्ववेदाचा अतिशय खोल परिणाम झाला असला पाहिजे हे स्पष्ट होते. या मार्गाचे अवलंबन करणारे लोक आपले विजयोत्सवही या मार्गाला साजेसेच करीत त्यातच लोभविजय व आसुर विजय याचा अतर्भाव होतो. लोभविजयात जिताचा प्रदेश व धन अधिकाधिक शोषण करण्याची प्रवृत्ति प्रधान आहे अशा शत्रूला भरपूर धन देऊन विपत्ति टाळता येते आसुर विजयात शत्रूला बदी करून त्याचे राज्य, धन लुटून, मुलाचा कत्तल करून व स्त्रियाना बलात्कारपूर्वक दासी करून त्याला सर्वतोपरि नागविणे व नतर त्याला ठार मारणे आणि त्याचा प्रदेश बेचिराख करणे अभिप्रेत आहे मुसलमानाच्या विजयाचे इतिहास हे आसुर विजयाचे प्रतीक आहेत तर आजच्या तथाकथित सुधारक पाश्चात्याचे विजय लोभ व आसुर यानी मिश्रित आहेत

परिस्थित्यनुसार धर्म व कूट या प्रकाराचा अवलब करणारी राज्यसत्ता पूर्ण राजनीतिज्ञ असावी लागते. या राजनीतिज्ञतेला ‘ नय ’ असे नाव असून कौटिल्य म्हणतो “ नयज्ञ पृथिवी जयति ” “ राजनीतिज्ञ (Diplomacy) विश्वविजेता ठरतो.” राजनीतीचा आधार राज्यसस्था असून तिची व्याख्या पुढीलप्रमाणे आहे:–

स्वाम्यमात्यसुहृत्कोशराष्ट्रदुर्गबलानि च ।
सप्तागमुच्यते राज्य तत्र मूर्धा नृप स्मृतः ।।

—(शुक्रनीति १६१

राजा, अमात्य, मित्र, कोश, राष्ट्र, दुर्ग आणि सैन्य ही राज्याची सात अगे असून त्यात राजा ( नेता ) हे मस्तक होय ही राजनीति अथवा या राज्याचे सरक्षण करणारी मुत्सद्देगिरी सहा प्रकारची असावी असे भारतीय राज्यशास्त्रज्ञाचे मत असून हे सहा गुण अथवा षड्विध वर्गीकरण (१)सधि(२)विग्रह(३) यान (४) आसन (५) आश्रय व (६) द्वैधीभाव असे आहे कौटिल्याने स्वामी, अमात्य, जनपद, दुर्ग, कोश, दण्ड व मित्र ही सप्ताग सागितली आहेत, पण या सबधात शुक्र व कौटिल्य याच्यात शब्दापुरताच भेद आहे, अर्थाचा नाही. मुत्सद्देगिरीचा वापर करताना विजिगीषु सत्तेने अरि म्हणजे प्रत्यक्ष शत्रू, मित्र, अरि-मित्र म्हणजे आपल्या शत्रूचा मित्र, मित्रामित्र म्हणजे आपल्या मित्राचा मित्र, अमित्रामित्र म्हणजे आपल्या शत्रूच्या मित्राचा मित्र, पार्ष्णिग्राह म्हणजे पिछाडीकडून अडचणीचा लाभ घेण्यासाठी आक्रमण करणारा शत्रू, आक्रद म्हणजे पार्श्वभागाचे सरक्षण करणारा मित्र, पार्ष्णिग्राहशर म्हणजे पिछाडीकडून आक्रमण करणाऱ्या शत्रूचा मित्र, आक्रंदशर म्हणजे पिछाडीकडून सरक्षण करणाऱ्या मित्राचा मित्र मध्यम म्हणजे आपण व शत्रू याच्या मधील प्रबल व लक्ष्य घालणे सभवनीय असलेली सत्ता, उदासीन म्हणजे प्रबल पण आपण व शत्रू या दोघाच्याही सबधात विशेष कल कोणाचकडे नसणारी सत्ता इतक्या राजसत्ताच्या सबधात जागरूक राहून व योग्य परिज्ञान मिळवून उपयुक्त षाड्गुण्याचा अथवा सहा प्रकारच्या धोरणाचा अवलब केला पाहिजे. नाहीं तर ते अगावर येऊन स्वत च विनाश पत्कारावा लागतो. या षड्गुणाचे स्पष्टीकरण असे --

(१) **संधि** .--आपणाहून प्रबल व तुल्यबळ अशा सत्ताबरोबर सामोपचाराचे धोरण राखणें. प्रबलाशी विग्रह आत्मनाशक ठरतो तर तुल्यबलाशी विग्रहात उभयपक्षी हानि होते. हे धोरण तात्पुरतें असले तर त्याला कालसधि असे म्हणतात। व नित्याचे असलें तर त्याला स्थावर सधि असें नांव आहे. याचें (१) मित्रसधि

(निश्चित अटीवर मित्राशी करावयाचा तह), (२) हिरण्यसधि (सोने देऊन केलेला तह), (३) भूमिसधि (प्रदेश देऊन केलेला तह), (४) कर्मसधि ( सैन्याचे अथवा धनाचे प्रसगी साह्य द्यावयाचे अभिवचन देणे), व (४) अनवसित सधि ( वसाहती करण्यास्तव साह्य देण्याची अट) असे चार प्रकार आहेत, पण आणखीही होऊ शकतील

(२) **विग्रह** – विग्रहाचे (१) कामविग्रह ( स्त्रीप्रेमासाठी होणारा सघर्ष, (२) लोभज ( लोभ अथवा हाव हे कारण ), (३) भूविग्रह (प्रदेशासाठी), (४) मानसम्भव ( मानभंग झाल्याच्या कल्पनेने) (५) अभय ( मित्र अथवा नातलगांच्या साठी),(६) इच्छाज(महत्त्वाकाक्षेमुळे) (७) मदोत्थित (विकार-वशता अथवा क्रोधामुळे), (८) एकद्रव्याभिलाष ( एकाच गोष्टीची अभिलाषा) असे आठ प्रकार आहेत कौटिल्याचे असें म्हणणे आहे की शक्य तोवर प्रत्यक्ष शस्त्राच्या उपयोगाची पाळी न येऊ देता मुत्सद्देगिरीच्या डावपेचानीच विग्रह जिकावा जसे शिवछत्रपतीनी बादशहा शहाजहानला मिळण्याची नुसती हूल उठवून विजापूरकराच्या वदीत असलेल्या शहाजीराजाची सुटका करविली.

(३) **यान** .– देश, काल, परिस्थिति व मागे वर्णिलेल्या या स्ट्रॅटेजीच्या क्षेत्रातील अनेक गोष्टीची धोरणे सभाळून युद्धार्थ रणक्षेत्रावर होणारे प्रयाण

(४) **आसन** – तटस्थतेच्या धोरणाला आसन म्हणतात. पण हें स्वीकारणारे राष्ट्र सबल असावे लागतें

(५) **आश्रय** :– यालाच संश्रय असेंहि दुसरे नाव आहे आपल्या अडचणीत युक्तीने प्रबल सत्तेचा आधार घेऊन शत्रूवर मात करण्याच्या प्रकारास हे नाव आहे. जिचा आधार घ्यावयाचा ती सत्ताच आपणास गिळकृत करणार नाही अशा धोरणाने हा आधार घ्यावयाचा असतो.

(६) **द्वैधीभाव**:- या धोरणाचा अंगीकार शत्रू अनेक असले व त्यापासून आपणास भय वाटत असले तर करणे आवश्यक ठरतें. द्वैधीभाव म्हणजे दुटप्पी धोरण होय एका वेळी सर्वांशीच युद्धाची आघाडी न उघडता व शत्रूची संघटना न होऊ देता एकाशी युद्धाच्या वेळी इतरांशी संधि असे धोरण पत्करणे. अलीकडच्या इतिहासात शिवछत्रपतींच्या राजकारणात या धोरणाचा उत्कृष्ट आविष्कार दृष्टोत्पत्तीस येतो मोगल, विजापूर व गोवळकोंडा या सत्ता एकत्रित झाल्या असत्या तर शिवाजी महाराजांचा विनाश केव्हाच झाला असता पण त्यानी तसे कधीहि घडू दिले नाही. ज्या वेळी ज्या सत्तेशी ते लढले त्या वेळी तदितर सत्ताचे व त्याचे मित्रत्वाचे व परस्परसाहाय्याचे करार अस्तित्वात असत.

असो या षड्विध धोरणाची जी साधने अथवा जे उपाय त्याना (१) साम, (२) दान, (३) भेद, व (४) दण्ड अशी नावे आहेत हे चारही उपाय प्रसिद्धच आहेत पण कामंदकीय नीतिशास्त्राने (१) उपेक्षा (२) माया, व (३) इंद्रजाल या तीन उपायाचा वेगळा उल्लेख करून एकंदर सात उपाय सांगितलेले आहेत साम म्हणजे दुसऱ्याचे मन वळविण्याचे धोरण होय जगामध्ये स्वभावत.च चांगली व स्वभावत च वाईट अशी दोन प्रकारची माणसे असतात जी स्वभावत च चांगली त्याचे मन प्रामाणिकपणे वळवावे. याला सत्यसाम असे म्हणतात जे दुर्जन त्याना वळविण्यासाठी हव्या त्या भूलथापा द्याव्या याला असत्य साम असे म्हणतात आपल्याहून दुबळ्या सत्ता अंकित करण्यासाठी प्रबळ राजे या धोरणाचा अंगीकार करीत दान म्हणजे मोठमोठ्या देणग्या सढळ हाताने देणे होय. ज्या ठिकाणी सामाने काम पूर्ण होत नसेल तेथे त्याच्या जोडीला या धोरणाचा अंगीकार करावा लागतो आपल्या साम्राज्याच्या लहान सत्ता अंकित करीत असतां सामाने कार्यसिद्धि होत नसल्यास या धोरणाचा अंगीकार करावा असे कौटिल्य म्हणतो देणग्यानी देवसुद्धा वश होतात असें पुराणांतून वर्णन आहे आजचे अमेरिका व रशिया याचें कर्ज, यंत्रसामुग्री,

औषधे, तज्ज्ञ, शस्त्रास्त्रे इत्यादि इंग्लंडपासून भारतापर्यंत व पाकिस्तान-फ्रान्सपर्यंत सर्वच राष्ट्रांना मुक्तहस्ताने पुरविण्याचे धोरण याच विभागात समाविष्ट होईल शत्रूच्या भेदनीतीला बळी पडून स्वसत्तेविरुद्ध बंड करून उठलेल्या महत्त्वाच्या अधिकाऱ्यांच्या संबंधातही याच धोरणाचा अंगीकार करावा असें कौटिल्याने सुचविले आहे भेद म्हणजे फूट पाडून आपले ईप्सित साध्य करणे होय. राज्य म्हटले म्हणजे त्याच्यापुढे राष्ट्रांतर्गत अशांतता व बाह्य शत्रू असे दोन प्रश्न असतात 'फोडा व राज्य करा' (divide and rule) हे राज्यांतर्गत भेदनीतीचे स्वरूप असले तर 'फोडा व नष्ट करा' हे बाह्य शत्रूच्या संबंधातले भेदनीतीचे स्वरूप होय दंड म्हणजे प्रत्यक्ष युद्ध अथवा शारीरिक शासन असा त्याचा अर्थ अनेक लोक करतात. पण मुत्सद्देगिरीच्या धोरणात प्रत्यक्ष युद्ध टाळून काम साधून घेणे हेच तर तत्त्व असते दण्ड याचा खरा अर्थ जरबेनें अथवा धाक दाखवून काम साधून घेणे होय युद्ध सुरू झाल्यानंतरच्या टॅक्टिक्स व स्ट्रॅटेजीचा अंतर्भावही दंडातच होतो उपसेक म्हणजे तटस्थता अथवा पक्षरहित उदासीनतेचे धोरण होय आसन व उपसेक म्हणजे दुर्बळाची स्वसंरक्षणार्थ स्वीकारलेली तटस्थता होय. हल्लीचे स्विट्झर्लंड हे याचे उत्तम उदाहरण होय माया म्हणजे काही गूढ उपायांनी शत्रूला भुरळ घालणे अथवा त्याची वंचना करणे होय. इन्द्रजाल म्हणजे जादूटोणा इत्यादि अतीन्द्रिय उपाय अथवा धार्मिक ढोंगाच्या द्वारे शत्रुनाश करण्याचे धोरण होय यापैकी मायेचा अंतर्भाव दंडात व इंद्रजाल आणि उपसेक याचा अंतर्भाव भेदात होऊ शकत असल्यामुळे साम, दान, भेद व दंड ही चारच खरी साधने होत ती एकत्रित वा वेगवेगळी प्रसंगानुसार वापरून षड्विध राजनीति सफळ करावयाची असते हल्लीच्या राजनीतिशास्त्राचेहि सामान्यत हेच स्वरूप आहे मौ. डी. बर्नस् आपल्या War या ग्रंथात म्हणतो :–

Diplomacy is the name for a method of negotiation, persuation, and conciliation for promoting the common

interests of different nations and adjusting those interests which are opposed.... Without the diplomatic system, war would be more frequent than it is. Behind the diplomatic system, however, lie the preparations for War; and in certain forms of policy, the threat of war is used as an instrument of diplomacy (P 81-83) यातील negotiation म्हणजे साम, persuation म्हणजे दान, Conciliation म्हणजे भेद, व threat of war म्हणजेच दड होय ऋग्वेदातील दाशराज्ञ युद्धात पुरोहित वसिष्ठानी एका दुबळ्या सत्तेला आश्रय देऊन दाखविलेली 'सिहच चित्पेत्वेनाजघान' (ऋ. ७-१८-१७) 'शेळीने सिहाची शिकार मारली' या तऱ्हेची करामत, हेराचे उल्लेख व कूटयुद्धाचे पुरावे हे वैदिक राष्ट्र उत्तम राजनीतिज्ञाचे राष्ट्र होते हे सिद्धच करीत नाही काय ? वरुणाच्या हेराचे अथर्ववेदातील पुढील वर्णन पहा :–

उत यो द्यामतिसर्पात्परस्तान्न म मुच्यातै वरुणस्य राज्ञ ।
दिव स्पश प्रचरन्तीदमस्य सहास्राक्षा अति पश्यन्ति भूमिम् ॥
–(अथर्व ४-१६-४)

(जर कोणी कुकर्म करून द्युलोकापलीकडेही पळून जाण्याचा प्रयत्न करील तरी तो वरुणाच्या शासनाच्या नियत्रणापासून सुटू शकणार नाही कारण त्याचे गुप्त चर सर्व जगतात सचार करतात. अथर्ववेदातील कूट युद्धाच्या सबधीचे विविध पुरावे वर उल्लेखिलेच आहेत तात्पर्य, वैदिक राष्ट्र हे श्रेष्ठ राजनीतिज्ञाचे व समर्थ राष्ट्र होते हे निर्विवाद आहे

एक महत्त्वाचा प्रश्न यावर उत्पन्न होतो, व त्याचा उल्लेख करणे आवश्यक आहे. तो प्रश्न असा की, वैदिकाचे अथवा प्राचीन भारतीयाचे राष्ट्र हे या आसुरी कूट युद्धाचा अगीकार करणारे केवळ विजिगीषूचेच राष्ट्र होते काय ? व तसे असेल तर मग चेगीजखान, तैमूर अथवा आजची हिस्रक व आक्रमक राष्ट्रे व हे राष्ट्र यात भेद काय ? कौटिल्याच्या अर्थशास्त्रातील या तऱ्हेच्या

भयानक वर्णनामुळेच त्याला भारताचा मॅकिव्हिली म्हणण्याचा पुष्कळाना मोह होतो. पण त्याचेंही मूळ वर दाखविल्याप्रमाणे अथर्ववेदात असल्यामुळें वैदिक परपरेवरच ' एक पशुवृत्तीचें राष्ट्र ' असा आरोप येण्याचा सभव आहे. पण वस्तुस्थिति याच्या उलट आहे वैदिक राष्ट्र व त्या परपरेचेच परिणत फळ असलेला कौटिल्य यानी कूटयुद्धाचा पुरस्कार केलेला नसून प्रतिक्रिया म्हणून अगीकार केलेला आहे शत्रु धार्मिक प्रवृत्तीचा असला तर धर्मयुद्धपद्धतीचा अगीकार योग्य ठरतो जी जी गोष्ट राष्ट्र-नाशक व आत्मनाशक असते ती ती दिसायला धर्माची वाटली तरी अधर्म्यच होय व म्हणूनच त्याज्य ठरते दूध पाजणे हें योग्य असले तरी ते सापाला पाजावें काय? कौटिल्याची मॅकिव्हिलीशी तुलना करणे याच दृष्टीने चुकीचें व अज्ञतेचे आहे. मॅकिव्हिली या सर्व गोष्टीना अनीतिकारक समजत नसे व राजसत्तेच्या स्वार्थाला सर्व काही समर्थनीय व योग्य आहे असे त्याचे मत होतें त्या ऐवजी कौटिल्याची भूमिका त्याच्याच शब्दात पाहण्यासारखी आहे कौटिल्य म्हणतो –

न त्वेव विद्यमाने पराक्रमे अग्निमवसृजेत् ।<br>
अप्रतिसख्यातप्राणिधान्यपशुहिरण्यकुप्यक्षयकर ।<br>
चातुर्वर्ण्यरक्षार्थ औपनिषदिकम् अधर्मेषु प्रयुञ्जीत ॥

( जर अगी पुरेसे प्रतिकाराचे सामर्थ्य असेल तर अग्निप्रयोग, विषप्रयोग इत्यादि कूट अथवा अधर्मयुद्धपद्धतीच्या प्रयोगांचा अवलब करूं नये कारण त्यामुळे अमर्याद प्राणिनाश व सपत्ति नाश होतो ज्या वेळी चातुर्वर्ण्यात्मक रचनेचे हे सारे राष्ट्रच स्वत: अधार्मिक आसुरी पद्धतीने आक्रमण करणाऱ्या लोकाच्या भक्ष्यस्थानी पडण्याचा प्रसग येतो त्याच वेळी या मार्गाचा अवलब करावा ) राज्यसुद्धा नव्हे तर एक सपूर्ण सस्कृतिच नष्ट होण्याचा प्रसग येतो, तेव्हाच या मार्गाचा अवलंब करावा असें म्हणणाऱ्या कौटिल्याची मॅकिव्हिलीशी तुलना करणें केवढे मूर्खपणाचें आहे ! मायावी लोकांशी मायावीपणानेच वागावें.

पृथ्वीराज चव्हाणाला हे न कळल्यामुळेच त्याने घोरीशी केलेल्या आत्मनाशक धर्मयुद्धाने राष्ट्रनाश झाला भारवीने म्हटलेंच आहे –

व्रजन्ति ते मूढधिय पराभव भवन्ति मायाविषु ये न मायिन ।

( जे कपटी लोकाशी कपट करीत नाहीत ते मूर्ख नेहमीच पराभव पावतात ) कौटिल्याची हीच भूमिका महाभारतांत पुढीलप्रमाणे आढळते –

" सचेन्निकृत्या युद्धचेत निकृत्या प्रतियोधयेत् ।

अथ चेद्धर्मतो युद्धचेद्धर्मेणैव निवारयेत् ॥ १ ॥

–(शांतिपर्व अ ९५)

(जर शत्रु अधर्माने युद्ध करीत असेल तर आपणही कूट अथवा अधर्मपद्धतीचा आश्रय करावा तो जर धर्मयुद्ध करीत असेल तर आपणही धर्मयुद्ध करावे ) महाभारतकारांनी हे मत धर्मयुद्धपद्धतीच्या वर्णनात नमूद केले आहे हे ध्यानात ठेवण्यासारखे आहे. महाभारताची ही भूमिका वैदिक भूमिकेचाच आविष्कार आहे ऋग्वेदात राष्ट्राच्या राजनीतीचे सूत्र पुढीलप्रमाणे सांगितले आहे ––

अस्माकेभिर्नृभिर्वय सासह्याम पृतन्यतो ।

वनुयाम वनुष्यत नभन्ताम् अन्यके समे ॥

–(ऋग्वेद ८–४० –७)

( तेव्हा आम्ही आमच्या शूर सैनिकासह शत्रुसैन्याला चिरडून टाकू, आणि आमच्याशी सख्य करणाराशी सख्य करू हे खास.) ' जशास तसे ' हेच भारतीयाच्या राजनीतीचें वेदकाळापासूनचे सूत्र आहे ऋग्वेदीय आर्यांनी अग्नि इत्यादि विनाशक साधनाचा वापर केला पण त्यासंबधातली आपली भूमिका स्पष्ट करताना ते म्हणतात –

' पुरुद्रुहो हि क्षितयो जनाना प्रति प्रतीचीर्दहतात् असतीः।

––(ऋग्वेद ३. १८. १)

(खरोखर अशी पुष्कळ माणसें असतात की जी सज्जनांचा मनापासून द्वेष करतात ह्याकरिता असे जे उलटया काळजाचे

शत्रू असतील त्याना तू जाळून टाक.) हीच ‘ कटक कटकेनैव भूमिका ‘ शठासि आणावा शठ ’ या शब्दात समर्थ रामदासांनी सांगितली. शिवछत्रपतीच्या राजनीतीचे वर्णन करताना शिव-दिग्विजयात म्हटले आहे “ हल्ली कलियुगधर्म धर्मप्रवृत्तीचा लोप होऊन, तेव्हा प्रथम विचारे शत्रू उच्छेद करणे त्या प्रसगात हत म्हणजे नष्ट झाला तरी, वृकयुद्ध किंवा चित्याचे युद्ध महाराष्ट्र-धर्मी युक्त योजना केली. ” (शि. दि पृ १८२) तात्पर्य, तेजस्वी वैदिक राष्ट्र परिपूर्ण मानवतावादी होते, पण शत्रूच्या कपटाने फसण्यासारखे बावळट मात्र नव्हतें. व आजची राष्ट्रे व युद्धप्रकार केवळ आसुरी आहेत हाच त्यातील महत्त्वाचा फरक होय. या राष्ट्राला शोषणासाठी सामर्थ्य वापरावयाचे नव्हते. केवळ धर्म व कर्तव्य म्हणून ते विजयसपादन करी पण शोषणाचा सबध त्यांच्या विजिगीषुतेत नव्हता यासाठी आपण वैदिक राष्ट्राच्या अर्थनीतीकडे वळणे आवश्यक आहे पुढील व्याख्यानात आपण या तेजस्वी व विश्वविजयी राष्ट्राच्या अर्थनीतीकडे वळू.

✦ ✦ ✦

## व्याख्यान १८ वे

## जातिसंस्था व व्यवसाय

वैदिक राष्ट्राच्या 'आब्रह्मन्' या सुप्रसिद्ध राष्ट्रगीतात 'योगक्षेमो न कल्पताम' असे उद्गार काढलेले आहेत योग म्हणजे संपादन अथवा उत्पादन, व क्षेम म्हणजे त्याचा विनिमय अथवा त्याचे वाटप होय योगक्षेम शास्त्रीय पद्धतीने कसा करावा हे सांगणारे जे शास्त्र त्यालाच अलीकडच्या राज्यशास्त्रीय परिभाषेत अर्थशास्त्र असे म्हणतात कोणतीही समाजरचना स्थिरपद व्हावयास त्या समाजरचनेचा आर्थिक पाया शास्त्रीय पद्धतीनें व संघर्षाची बीजे उत्पन्न करणाऱ्या त्रुटीपासून अलिप्त अशा पद्धतीचा निर्माण करावयास पाहिजे प्राचीन भारतीय समाजशास्त्रज्ञानी या दृष्टीने अत्यंत सूक्ष्म विचार करूनच आपली समाजरचना केली असे म्हणणे इतिहासाच्या निःपक्षपाती अभ्यासकाला तरी भागच आहे कारण की सहस्रावधि वर्षे टिकून राहिलेल्या या समाजरचनेचे काळावर मात करणारे अस्तित्व हाच या गोष्टीचा अतिशय भक्कम असा पुरावा होय चातुर्वर्ण्यात्मक व जातिघटित अशा त्याच्या समाजरचनेच्या आर्थिक व्यवहारासंबंधी लिहिताना मेरेडिथ टॉन्सेन यानी असे म्हटले आहे की, I firmly believe caste to be a marvellous discovery, a form of socialism which, through ages, has protected Hindu society from the worst of industrial and competitive life. It is an automatic poor-law to begin with, and the strongest form of trade union

माझे असे विचारपूर्वक दृढ मत झाले आहे की, जातिसंस्था ही भारताच्या सामाजिक क्षेत्रातील एक अतिशय आश्चर्यकारक अशी सिद्धि आहे. समाजवादाचाच हा एक प्रकार असून त्याने

औद्योगिक क्षेत्रातील स्पर्धामय जीवनाच्या अत्यंत घातक अशा प्रकारापासून हिंदुसमाजाचे सहस्त्रावधि वर्षे संरक्षण केले आहे. तिचें एक स्वरूप समाजातील गोरगरीबाचा स्वयप्रेरित पद्धतीने सांभाळ करणे हे असून, दुसरे स्वरूप म्हणजे व्यावसायिक संघटनेचा तो एक अतिशय समर्थ असा प्रकार आहे.

या समाजरचनेचा आर्थिक पाया आजच्या कोणत्याहि अर्थरचनातंत्रापेक्षा अधिक श्रेष्ठ स्वरूपाचा आहे ही गोष्ट अनेक पाश्चात्य विचारवतानी याच पद्धतीने गौरवपूर्ण शब्दात उल्लेखिली आहे बानगीदाखल सर जॉर्ज बर्डवूड व जस्टिस वूड्रॉफ याचे पुढील उद्‌गार पहा –

We trace there the bright outlines of self-contained, self-dependent, symmetrical and perfectly harmonious industrial economy, deeply rooted in the popular conviction of its divine character and protected through every political and commercial vicissitude Such an ideal social order we should have held impossible of realization, but that it continues to exist and to afford us, in the living results of its daily operations in India A proof of the superiority, in so many unsuspected ways, of that hieretic civilisations of antiquity over the secular joyless and self-distructive modern civilisations of the west

—(Sir George Birdwood)

(स्वयपूर्ण, स्वावलबी, प्रमाणबद्ध व पूर्णपणे एक दुसऱ्याशी संवादी अशा व्यवसायाच्या आर्थिक नियोजनाच्या तेजस्वी रूपरेषा आपल्याला भारतीयाच्या संस्कृतीत दिसतात व्यवसायाचे पद्धतशीर व स्पर्धेला नियंत्रित करणारे हे नियोजन मानवनिर्मित व म्हणूनच लादलेले नसून ते दैवी आहे अशा प्रकारच्या लोकाच्या अंत:करणातील दृढ श्रद्धेत या नियोजनाची मुळे खोल रुजली आहेत. प्रत्येक राजकीय, औद्योगिक आणि व्यावसायि स्थित्यंतर-

तून हे नियोजन महस्रावधि वर्षे सुरक्षित राहिले आहे अशा प्रकारची ध्येयभत सामाजिक व्यवस्था हिंदुस्थानातील दैनदिन व्यवहाराच्या प्रत्यक्ष परिणामाच्या रूपाने सतत चालू नसती तर ती प्रत्यक्षात येणे ही गोष्ट आम्ही अशक्य मानली असती निव्वळ ऐहिक, आनदरहित, जड व आत्मघातक अशा आधुनिक पाश्चात्य सस्कृतीहून ही पवित्र प्राचीन सस्कृति असदिग्धपणे किती पटीने श्रेष्ठ आहे याचे ही अर्थव्यवस्था हे अत्यत महत्त्वाचे प्रमाण होय )

Caste system is democratic in the truest sense of the term. (1) It insists on the spiritual equality of all men.(2) It makes for individuality which is attained not through an escape from limitations but through the willing acceptance of obligations (3) It points out that all work is socially useful and economically equally important (4)It recognizes that while men are all unequal in capacity it insists that they have the opportunity to contribute to human achivement as far as their capacity goes (5) The essence of democracy is consideration for others Free dom for individual means restriction on abso'ute power. No one class can make unlimited claims (6) The general tendency of men to strive to the summit is due to the impression that the position at the top is one of pleasure, profit and power But in Hindu scheme, life becomes more difficult as we rise higher

—(F Woodroff)

जातिसस्था ही लोकतत्राच्या खऱ्या खऱ्या अर्थाने लोकतत्रात्मक आहे.(१)सर्व लोकाची आध्यात्मिक समता ती साग्रह पुरस्कारिते (२)तिचा रोख व्यक्तिविकासावर आहे हा विकास मर्यादेचे उल्लघन करण्याच्या मार्गाने होत नसून कर्तव्याच्या इच्छापूर्वक स्वीकाराने होत असतो. (३) सर्वच कामे (व्यवसाय) सामाजिक दृष्टीने

सारखीच उपयुक्त व आर्थिक दृष्टीने सारखीच महत्त्वाची असतात. (४) सर्वांचीच पात्रता सारखीच असू शकत नाही हे मान्य करून सुद्धा सर्वांना आपापल्या पात्रतेनुसार समाजहिताच्या कामी साह्य करावयाची संधि आहे हे ती आग्रहपूर्वक सांगते (५) दुसऱ्याचा आपल्याप्रमाणे विचार करणे हे लोकतंत्राच्या तत्त्वज्ञानाचे सार आहे. व्यक्तीला स्वातंत्र्य याचा अर्थ कोणत्याही सत्तेच्या अमर्यादित-तेवर निर्बंध येथे कोणत्याही एका वर्णाला अमर्याद सत्तेचा दावा सांगता येत नाही (६) कोणताहि मनुष्य सामान्यत वर शिखरा-वर जाण्याची धडपड करतो याचे कारण त्याची अशी समजूत असते की, शिखराचे स्थान हे सुख, संपत्ति आणि सत्ता याचे स्थान आहे परंतु हिंदू पद्धतीत जो जो वर जावे तो तो जीवन अधिकाधिक कष्टमय व त्यागप्रधान बनत जाते हा विशेष आहे.

पाश्चात्य समाजात आर्थिक नियोजने व अर्थाच्या विनिमयाचे नियम गेल्या दोन तीन शतकातच वारंवार बदलावे लागले, व रक्तपातमय क्रांतीच्या गर्जनांनी व आक्रंदनांनी त्या प्रत्येक परि-वर्तनाच्या वेळी वातावरण निनादून गेल्याचे आढळते एकतंत्र शासन-पद्धतीपासून तर व्यक्तिस्वातंत्र्यवाद, समाजवाद, अराज्यवाद, साम्यवाद, फॅसिझम, नाझीझम, संघनिष्ठ, समाजवाद असे एकमेकांशी पूर्णपणे विसंवादी व दुसऱ्याच्या विनाशातच स्वत.चे जीवन पहाणारे अनेक वाद व प्रणालि तेथे उत्पन्न झाल्या पण त्यापैकी एकही पूर्ण शतकभर सुद्धा सर्वमान्य स्वरूपात टिकू शकलेली नाही कारण त्यापैकी कोणालाही अधिकार व भोगप्रवृत्ति याच्या संबंधात समाजात पूर्णपणे संतुलन उत्पन्न करता आलेले नाही इतकेच नव्हे तर या सर्व अर्थप्रक्रिया शासनयंत्राच्या भयावाचून व उग्र स्वरूपाच्या दंडावाचून दुसऱ्या कोणत्याही प्रेरणेने पाश्चात्य समाज-शास्त्रज्ञांना कार्यान्वित करता आलेल्या नाहीत केवळ शासनाचे भय ज्या ठिकाणी प्रेरक बनते त्या ठिकाणी अत्याचार व जुलूम हे काही ना काही प्रमाणात असतातच भारताच्या अर्थरचनेत अधिकारपरिभाषेचा आधारभूत असणारा अहंकार संयमांत

परिणत झाल्याचे व दुर्दान्त भोगवासनेच्या पोटी उत्पन्न होणाऱ्या स्पर्धेचे सहकारित्वात रूपांतर झाल्याचे आढळून येते तशी वस्तुस्थिति कोणत्याही पाश्चात्य अर्थव्यवस्थेला कधीही उत्पन्न करता आलेली नाही त्याच्या कारणाची मीमांसा आपण पुढे तौलनिक विचाराचा विस्तार करताना करू शासनसंस्थेचे भय भारतीय अर्थव्यवस्थेत कधीही प्रेरक ठरलेले नसून स्वयंस्फूर्त कर्तव्यबुद्धि हीच प्रेरक ठरल्याचे आढळून येतें. हा भारतीयाच्या अर्थप्रक्रियेचा चिन्तनीय विशेष आहे भारतीय अर्थप्रक्रियेचा दुसरा विशेष हा आहे की, त्यानी भोग्याबरोबरच भोक्ता याचाही विचार करून आपल्या योजना आखलेल्या आहेत. त्यामुळे केवळ योजना आखणे येवढे त्याचे सीमित कर्तव्यक्षेत्र राहिले नसून त्या योजना संपूर्णपणे, सुव्यवस्थित रीतीने व स्वयंप्रेरितपणे ज्याच्याकडून व्यवहारात येऊ शकतील असा समाज निर्माण करणे हेही त्यांच्या कार्यक्षेत्रात आवश्यक ठरले म्हणून भारतीय राष्ट्राच्या प्राचीन अर्थशास्त्राच्या मंदिरात शिरण्यापूर्वी त्याच्या पायाचे निरीक्षण करणे अत्यावश्यक ठरते

भारतीय अर्थशास्त्राची परिभाषा नीट ध्यानात घेतल्याविना त्यांच्या अर्थशास्त्राचा खरा उलगडा होणार नाही आजच्या परिभाषेत आपण अर्थशास्त्र हा शब्द ज्या अर्थाने उच्चारतो त्या अर्थाने तो भारतीय समाजशास्त्रीय साहित्यात वापरला जात नाही अर्थशास्त्र या शब्दाचा प्राचीन भारतीय परिभाषेतील अर्थ राज्यशास्त्र असा आहे, व ज्याला आज आपण अर्थशास्त्र असें म्हणतो त्याला भारतीयानी वार्ताशास्त्र असे नाव दिलेले आहे सुव्यवस्थित वार्ताशास्त्र अथवा अर्थशास्त्र ज्या समाजात नाही त्या समाजातील राज्यरचनेला प्राचीन वैदिक समाजशास्त्रज्ञानी गर्ह्य मानलेले आहे. धर्म व संस्कृतीच्या बहरलेल्या वेलीही भुकेच्या आगीने करपून जातात, म्हणून जीविकेच्या शास्त्राची उभारणी, धर्म व संस्कृतीच्या संरक्षणाचे अत्यंत महत्त्वाचे अंग म्हणून शास्त्रशुद्ध स्वरूपांत करण्याचा त्यांनी आटोकाट प्रयत्न केला आहे कारण

की, 'वार्तामूलो ह्यय लोको' 'सपूर्ण समाजजीवनाची आधारशिला म्हणजे अर्थशास्त्र होय' असा वैदिक समाजशास्त्राचा सिद्धान्त आहे. शासनसस्थेच्या कर्तव्यात शेती, उद्योगधदे, कला व व्यापार या सर्वाच्याच उत्तेजनाविषयी दक्षता घ्यावयास वारवार सागितले आहे पालन हा शब्द राज्यसस्थेचा आत्मा म्हणूनच भारतीय साहित्यात वारवार सागितलेला आहे ऋग्वेदात राजाचे विशेषण म्हणून येणारा 'जनस्य गोपा ' हा शब्द या दृष्टीने अत्यत महत्त्वाचा आहे. सामाजिक व आर्थिक प्रश्न सोडविणे हे तपस्विसस्थेचे व शासनसस्थेचे प्रथम श्रेणीचे कर्तव्य मानलेले आहे. सर्व वर्णांच्या, जातीच्या आणि वर्गांच्या लोकाच्या जीविकेच्या व्यवसायाना समृद्ध करण्याच्या आड जे जे येतील त्याना कठोर शिक्षा सागितलेल्या आहेत एका वर्गाने दुसऱ्या वर्गाच्या जीविकेच्या व्यवसायात हस्तक्षेप न करण्यासबधीची दक्षता कटाक्षाने घेण्यात आलेली आहे राजर्षि मनु म्हणतात –

यो लोभादधमो जात्या जीवेदुत्कृष्टकर्मभि ।
त राजा निर्धन कृत्वा क्षिप्रमेव प्रवासयेत् ॥९६॥
वर स्वधर्मो विगुणो न पारक्य स्वनुष्ठित. ।
परधर्मेण जीवन्हि सद्य पतति जातित ॥९७॥

—(मनुस्मृति अ १०)

(जो अधम मनुष्य लोभाने दुसऱ्या वर्गाची कर्मे उत्कृष्ट आहेत असें समजून त्या कर्मावर आपली उपजीविका करण्याचा प्रयत्न करतो त्याचे धन राजाने जप्त करून त्याला सीमापार करावे आपला जो जीविकेचा व्यवसाय असेल तोच करावा. परतु दुसऱ्याच्या व्यवसायात पदन्यास करू नये जे दुसऱ्या जातीच्या जीविकेच्या व्यवसायावर स्वत ची उपजीविका करतात ते जातिभ्रष्ट म्हणजेच समाजबहिष्कृत होतात गीतेतहि 'स्वधर्मे निधन श्रेय परधर्मो भयावहः' या शब्दानी हेच तत्त्व सागितलेले आहे या वार्ता शास्त्राचे अथवा आजच्या परिभाषेप्रमाणे अर्थशास्त्राचे महत्त्व भारतीय समाजशास्त्रज्ञाना वेदत्रयी व अध्यात्मशास्त्र याच्या

इतकेच वाटत होते. कौटिल्याने अर्थशास्त्रात दण्डाची आवश्यकता सागताना म्हटले आहे –

'आन्वीक्षिकीत्रयीवार्ताना योगक्षेमसाधनो दण्ड ।'

(अध्यात्मविद्या, वेदत्रयी व अर्थशास्त्र याच्या योगक्षेमाचे साधन म्हणजे दण्ड अथवा राज्य होय.) येथे कौटिल्याने अध्यात्म, वेदत्रयी व अर्थशात्र याचे जे सामानाधिकरण्य साधले आहे ते अर्थपूर्ण आहे. कामंदकीय नीतिशास्त्रात तर या तीनच गोष्टीना 'विद्या' असें म्हटले आहे (आन्वीक्षिकी त्रयी वार्ता सतीर्विद्या प्रचक्षते) महाभारतामध्ये तर समाजरचनेचा पाया अर्थशास्त्रच आहे, शेती, पशुसंरक्षण व व्यापार हे समाजजीवनाचे आधारस्तभ होत (कृषिगोरक्ष्यवाणिज्य लोकानामिह जीवनम्) असे सागून चातुर्वर्ण्यात्मक समाजरचनेचे धारणपोषण वार्ताशास्त्राच्या भरवशावरच होऊ शकते असा सिद्धान्त प्रस्थापित केला आहे. जो राजा या गोष्टीकडे लक्ष देणार नाही त्याला 'बलिषड्भागतस्कर' म्हणजे समाजाचा कर अकारण खाणारा चोर असे म्हटलेले आहे. राजर्षि मनू म्हणतात –

योऽरक्षन्बलिमादत्ते करशुल्क च पार्थिव ।
प्रतिभाग च दण्ड च स सद्यो नरक व्रजेत् ॥३०७॥
अरक्षितार राजान बलिषड्भागहारिणम् ।
तमाहु सर्वलोकस्य समग्रमलहारकम् ॥३०८॥

—(मनुस्मृति अ ८ वा)

(जो राजा प्रजेचे रक्षण न करिता प्रजापासून नजराणा, कर, शुल्क (व्यापारावरील कर) प्रतिभाग (फल, पुष्प, शाका, तृण यासबंधी प्रतिदिवशी घ्यावयाचा कर आणि दड घेतो तो मेल्यावर नरकास जातो. जो राजा प्रजाचें परिपालन करीत नाही आणि प्रजांपासून आपला सहावा भाग मात्र घेतो तो सर्व लोकाचा मल हरण करणारा पापिष्ठ होय.) महाभारतकारानी शासनसस्थेच्या कर्तव्यावर प्रकाश टाकताना म्हटले आहे 'भवितव्य सदा राज्ञा गर्भिणीसह धर्मिणा' ज्याप्रमाणे गरोदर स्त्री आपल्या मुलाच्या

रक्षणावाचून दुसऱ्या कशाचाही विचार करूं शकत नाही त्याच-प्रमाणे राजानेही प्रजेच्या उपजीवनावाचून स्वत विषयीच्या दुसऱ्या कोणत्याही विचारास आपल्या मनात स्थान देऊ नये कौटिल्या-पासून महाभारतापर्यंतच्या राज्यशास्त्रीय वाङमयात शासनसंस्थे-सबधीचा हा जो अभिप्राय व्यक्त करण्यात आलेला आहे तोच अथर्ववेद सहितेंतही आढळतो अथर्ववेदात म्हटले आहे –

'वर्ष्मन् राष्ट्रस्य ककुदि श्रयस्व ततो न उग्रो विभजा वसूनि ॥'

—(अथर्ववेद ३-४-२)

(तू राज्यातील परमोच्च व ऐश्वर्यशाली अशा राजपदावर आरूढ होऊन, वीर म्हणून विख्यात हो व आम्हा सर्व प्रजाजनांमध्ये धनाची योग्य विभागणी कर )

'अश्विना त्वाग्रे मित्रावरुणोभा विश्वेदेवा मरुतस्त्वा ह्वयन्तु ।
अधा मनो वसुदेवाय कृणुष्व ततो न उग्रो वि भजा वसूनि ॥४॥

—(अथर्ववेद ३-४-४)

(अश्विनीकुमार, मित्रावरुण, विश्वेदेव, मरुद्गण इत्यादि सर्व देवता तुला साहाय्यक होवोत तू स्थिर मनाने व दृढ निश्चयाने धनाचे वाटप कर व आम्हा प्रजामध्ये योग्य प्रकारे धनाची विभागणी कर.) उत्कृष्ट शासनसस्थेविषयीची आपली अपेक्षा व्यक्त करताना भारतीय राज्यशास्त्रज्ञानी म्हटले आहे – 'ज्या राष्ट्रात चोर व भिकारी नसतात ते राष्ट्र आदर्श राष्ट्र होय.' 'न मे स्तेनो जनपदे न कदर्यो न मद्यप ।' या छांदोग्योपनिषदातील वाक्यात हाच ध्वनि आहे. तात्पर्य, देश उत्पादनाच्या द्वारे समृद्ध करणे व समाजात वैषम्य व दारिद्र्य राहणार नाही अशी अर्थव्यवस्था असणे हे वैदिक राष्ट्राच्या राज्यसस्थेचे प्रधान कार्य समजण्यांत येत असे. त्या राष्ट्राच्या अर्थव्यवस्थेची तपासणी करताना विभजन-शास्त्राचें समालोचन करण्यापूर्वी उत्पादनवाढीची व्यवस्था, व्यवसाय अथवा उद्योगधदे, समृद्धि कोणत्या प्रकारची होती हें पाहणे आवश्यक आहे. वेदकालीन भौतिक सुधारणा व वैभव यासबधी निश्चित पुराव्याबद्दल ज्ञानकोशकार डॉ. केतकर यानी

लिहिले आहे की "यावर पुरावा दोन प्रकारचा आहे. एक पुराव वेदातील शब्द व वेदातील उल्लेख आणि दुसरा पुरावा म्हटल म्हणजे महाभारतादि ग्रथातील प्राचीन इतिहास याशिवाय तिसरा पुरावा आजच्या स्थितीत उपलब्ध नाही ' ऐश्वर्याचे प्रतीव म्हणजे सोने होय सोन्याला 'हिरण्य' असे वेदवाङमयात नाव आहे त्याला योग्य ते महत्त्व वैदिक कालातही प्राचीनतम गणण्यात येणाऱ्या ऋग्वेदकाळी प्राप्त झालेले होते वैदिक लोकानी सोन्याल अतिशय महत्त्व दिलेले असून ही धातु पुष्कळदा नदीच्या पात्रात सापडत असल्यामुळे सिधु नदीला सुवर्णयुक्त व सुवर्णजलयुक्त अशी नावे ऋग्वेदात दिलली आहेत पृथ्वीपासून सोने काढण्याची रीति व सोने शुद्ध करण्याची रीति लोकाना उत्तम परिचित होती हे ऋग्वेद व तैत्तिरीय सहितेवरून दिसते उदाहरणार्थ, ऋग्वेदातील पुढील उल्लेख पहा –

सुसुप्वास न निर्ऋतेरुपस्थे सूर्य न दस्रा तमसि क्षियन्तम् ।
शुभे रुक्म न दर्शत निखात उत् ऊपथुरश्विना वंदनाय ।।

–(ऋग्वेद १-११७-५

(शत्रूचा सहार करणाऱ्या हे अश्विनी देवानो! अपकर्षाच्या जणू पायथ्याशी झोपी गेलेला सूर्य, अधकारात गढलेला (जमिनीत म्हणजे खाणीत) सुदर सुवर्ण सचय ज्याप्रमाणे (उकरून) बाहेर काढतात त्याप्रमाणे, वदनाच्या कल्याणार्थ तुम्ही बाहेर काढला.)

वैदिक गायकाना सोने ही स्पृहणीय वस्तू वाटे गाई व अश्व याच्याबरोबर सोन्याच्या राशी (हिरण्यानि) उदार धनिक देत असत असे ऋग्वेदात विपुल उल्लेख आहेत. सोन्याचा उपयोग गळ्यांतील, हृदयावरील इत्यादि दागिने, कर्णभूषणे व यज्ञादि प्रसगी वापरावयाची भाडी करण्याकडे होत असे असा तैत्तिरीय सहितेत उल्लेख आहे. सोन्याच्या वजनाचा उल्लेख आढळतो त्यावरून सोन्याचे चलन प्रचारांत असून सोन्याची नाणी लोकांना चांगलींच परिचयाची होती असे सिद्ध होतें. अष्टाप्रुट या सोन्याच्या वजनाचाही तैत्तिरीय सहितेंत उल्लेख आढळतो. अशुद्ध धातूपासून रस गाळून

सोने काढीत असत अथर्ववेदातील भूमिसूक्तात पृथ्वीला **वसुधानी** व **हिरण्यवक्षा** असे म्हटले आहे वसुधानी म्हणजे हिरे व जवाहीर आदींची खाण व हिरण्यवक्षा म्हणजे सोन्याची खाण वक्षा व हिरण्य या शब्दाच्या एकीकरणाचा खाणीशिवाय दुसरा अर्थ होऊच शकत नाही शतपथ ब्राह्मणात लोखडापासून सोने काढतात असे म्हटले आहे अशुद्ध सोने शुद्ध करण्याच्या पद्धतीचा हा अलंकारिक निर्देश आहे मेगॅस्थेनिस भारताचे सुवर्णभूमि म्हणून जें वर्णन करतो ते वेदकाळी शब्दश खरे होतें असे मानावयास जागा आहे. याशिवाय रत्ने, मोती, जरतारी कापड यांचेहि उल्लेख ऋग्वेदात आहेत ब्रॉझ, शिसे, चादी, लोखड, कथील इत्यादि विविध धातूचे विपुल उल्लेख वेदसहितात असून धातूचा रस करणे ती आटविणे (बहुध्मातम्) इत्यादि क्रियाचे विपुल उल्लेख आहेत.

कृषि, वाणिज्य, व गोरक्षा म्हणजे शेती, व्यापार व पशुपालन ही राष्ट्राच्या समृद्धीची मूलभूत साधने होत हे सत्य आजच्या प्रमाणेच वेदकाळीही परिचित होते आपण प्रथम कृषि व शेतकी व्यवसायाच्या दृष्टीने वेदसहिताकडे पाहू. प्रत्यक्ष ऋग्वेदातच शेतीच्या व्यवसायाचे महत्त्व पुढीलप्रमाणे जिव्हाळ्याने वर्णिले आहे .—

अक्षैर्मा दीव्य कृषिमित् कृषस्व वित्ते रमस्व बहुमन्यमान. ।
तत्र गावः कितव तत्र जाया तत् मे विचष्टे सवितायमर्य ॥१३॥
—(ऋग्वेद १०–३४–१३)

" तू जुगार खेळू नकोस, तर शेती कर, आणि मग सपत्तीमध्ये रममाण हो, म्हणजे तू फार मानमान्यतेला चढशील तेथे (शेतीत) गाई मिळतील आणि बायकोही मिळून तेथे तुझा ससार होईल मला ही गोष्ट या भगवान् सूर्य नारायणाने अनुभवास आणून दिली " खास ऋग्वेदात कृषिकर्मविषयक व उपकरणविषयक आढळणारे उल्लेख पहाण्यासारखे आहेत. १ अष्ट्रा (चाबूक अथवा आसूड) (४ ५७ ४) आहाव. (विहीर १० १०१ ५) कीनाशा

(नागऱ्या ४.५७ ८) ४ कृष (कसणे ४ ५७ ८) ५ कृषि (शेती १०. ३४ १३) ६ क्षेत्र (शेत ४ ५७. २) ७ क्षेत्रपति (कृषि देवता ४ ५७ २) ८ खलम् (खळे १० ४८ ७) ९ तितः (सूप १०, ७१ २) १० पय (उदक ४ ५७. ८) ११ पर्जन्य (पाऊस ४ ५७ ८) १२ पर्ष (तुष १० ४८ ७) १३ फाल (फाळ ४ ५७ ८) १४ बीजम् (बी १० १०१ ३) १५ युग (जू १०. १०१ ३) १६ योनि (पाळी १०. १०१ ३) १७ लागलम् (नागर ४ ५७ ४) १८ वपेत (पेरा १० १०१. ३) १९ वरत्रा (लगाम ४ ५७ ४) २० वाहाः (बैल ४. ५७ ४) २१ व्रजम् (गोठा १०. १०१. ८) २२ श्रुष्टि (पीक १०. १०१ ३) २३ सीरा (नागर १० १०४) २४ सृणि (विळा १० १०१ ३)

उर्वरा आणि क्षेत्र असे दोन शब्द ऋग्वेदात आढळतात. त्याच अर्थ नागरट जमीन असा आहे अपनस्वतीव व आर्तना या शब्दाचे अर्थ अनुक्रमे सुपीक जमीन व पडीत जमीन असे असून ते ऋग्वेदात आहेत कालव्याच्या योगाने जमिनीची लागवड करीत, असे अनुमान काढण्यासारखे उल्लेख ऋग्वेद (या आप. दिव्याः उतव स्रवन्ति खनित्रिमा ७ ४९ २) व अथर्ववेदातून आहेत. क्षेत्र काळजीपूर्वक मोजणी केलेली असत व वैयक्तिक जमीन मालकीची प्रथा होती ऋग्वेदातील पुढील उल्लेख पहा :-

इमानि त्रीणि विष्टया तानि इन्द्र वि रोहय ।
शिरस्ततस्य उर्वराम् अदिद मे उपोदरे ॥५॥
असौ च या न उर्वरा आत् इमा तन्व मम ।
अथो ततस्य यत् शिर सर्वा ता रोमशा कृधि॥ ६ ॥

—(ऋग्वेद ८–८०)

(इद्रा, ही तीन स्थळे उत्तम स्थितीला आण. माझ्या पित्याचे मस्तक, त्याचे नागरून पेरलेले शेत आणि माझे ओटीपोट. आमचे जें नागरून पेरलेले शेत आहे ते आणि माझे अंग आणि माझ्या पित्याचे मस्तक या सर्वांना केशयुक्त कर.) या ठिकाणी सूक्तकर्ता

अपाला हिने आपल्या बापाचें डोके आणि त्याचे शेत यांचा एकत्र उल्लेख केला आहे जसे डोके, तसेच शेत ही खाजगी मालमत्ता असे असा या उल्लेखातून अर्थ निघतो यावरून उर्वरासा, उर्वराजित, क्षेत्रासा ही 'शेते जिकणारे' या अर्थाची विशेषणे ऋग्वेदांत आली असावी असे डॉ श्री व्य. केतकर याचें अनुमान आहे. शेते आणि मुले याचा एकाच भावनेने ऋग्वेद उल्लेख करतो. त्या वेळी शेतकरी नागरास बैल जुपून शेतात जात (शुन कीनाशा अभियन्तु वाहै. ४. ५७. ८) तेथे फाळाने भूमि नागरून चागली मोकळी व भुसभुशीत करीत (शुन नः फाला विकृषन्तु भूमिम् ४ ५० ८) नतर त्यात पाळचा पाडून त्यात बी पेरीत (कृते योनौ वपेतेह बीजम् १० १०१ ३) अर्थातच पावसाच्या अदाजाप्रमाणे ही पेरणी होई हे उघडच आहे आजचा शेतकरी जसा आकाशाकडे डोळे लावून पाऊस यावा म्हणून मनातल्या मनात देवाची प्रार्थना करतो तसेच ऋग्वेदकाळचा शेतकरीही करीत असे. (शुन पर्जन्य मधुना पयोभिः वर्षतु ४ ५७. ८) पाऊस चागला पडून जमीन चागली भिजली म्हणजे शेतीत पीकही भरभराटून येई (गिरा च श्रुष्टि सभरा असत् १० १०१. ३) ते पीक यथाकाल चागले तयार होऊन कापणीस आले म्हणजे त्यावर विळा चालवून त्याची कापणी करीत (नेदीय इत् सृण्य· पक्वमेयात् १० १०१ ३) नतर ते पीक एकत्र करून खळ्यावर आणून त्याची मळणी करून धान्य व कोडा वेगवेगळा करण्यात येई. (खलेन वर्षान् १० ४८ ७) नतर ते सुपात पाखडून घेण्यात आल्यावर (सक्तुमिव तितउना पुनन्तो १०. ७१ २) ते धान्य घरी आणून कणग्यात भरून ठेवीत व जरुरीप्रमाणे त्यातून पुन्हा काढून घेत. (निर्गा ऊषे यवमिव स्थिविभ्यः १०. ६८. ३) भारतीय शेतीची आजची पद्धति या ऋग्वेदीय पद्धतीहून भिन्न नाही. वेदकालीन राज्यसस्था व राष्ट्र आजच्यापेक्षांही अधिक जिव्हाळ्याने कृषिसुधारणेला व कृषि कर्माला राष्ट्रजीवनाचा मूलाधारस्तभ म्हणून किती महत्त्व देत असे यासबधी अथर्ववेद सहितेतील पुढील काही मत्र पहा —

सीरा युञ्जन्ति कवयो युगा वि तन्वते पृथक् धीरा देवेषु सुम्नयौ॥१

युनक्त सीरा वि युगा तनोत कृते योनौ वपतेह बीजम् ।
विराज श्रुष्टि सभरा असन्नो नेदीय इत् सृण्य पक्वमा यवन्॥२
लाङ्गल पवीरवत् सुशीम सोमसत्सरु ।
उदिद्वपतु गामवि प्रस्थावद् रथवाहन पीबरी च प्रफर्व्यम्॥३॥
इन्द्र. सीता नि गृह्णातु ता पूषाभि रक्षतु ।
सा नः पयस्वती दुहामुत्तरामुत्तरा समाम् ॥४॥
शुन सुफाला वि तुदन्तु भूमि शुन कीनाशा अनु यन्तु वाहान् ।
शुनासीरा हविषा तोशमाना सुपिप्पला ओषधी कर्तमस्मै ॥५॥
शुन वाहा शुन नरः शुन कृषतु लाङ्गलम् ।
शुन वरत्रा बध्यन्ता शुनमष्ट्रामुदिङ्गय ॥६॥
शुनासीरेह स्म मे जुषेथाम् ।
यद् दिवि चक्रथु पयस्तेनेमामुप सिञ्चतम् ॥७॥
सीते वन्दामहे त्वार्वाची शुभगे भव ।
यथा न सुमना असो यथा न सुफला भुव ॥८॥
घृतेय सीता मधुना समक्ता विश्वैर्देवैरनुमता मरुद्भि ।
सा न सीते पयसाभ्याववृत्स्वोर्जस्वती घृतवत् पिन्वमाना ॥९॥

(अथर्ववेद का ३ सू १७)

पद्भि सेदिमवक्रामन्निरा जङ्घाभिरुत्खिदन् ।
श्रमेणानड्वान्कीलाल कीनाशश्चाभि गच्छतः ॥१०॥

–(अथर्ववेद का ४ सू. ११)

(पृथिवी इत्यादि देवताच्या शक्तीवर विश्वास असणारे शहाणे लोक समृद्ध व्हावे म्हणून नागर सिद्ध करून व योग्य ठिकाणी जू बाधून शेती करण्यास्तव सिद्ध होतात लोकहो ! नागर वगैरे तयार करा जमीन खूप व्यवस्थित नागरून नतर तिच्यात बीजाची पेरणी करा त्यामुळे शेती खूप पिकून भरघोस पीक पदरात पडेल व तुम्ही धान्याने समृद्ध व्हाल नागर करताना त्याला लोखडाचे दृढ व तीक्ष्ण धारेचे फाळ लावा आणि हातात धरण्यासाठी

लांकडाची मूठ तयार करा. असा नागर सुलभतेने वापरता येतो, सर्वस्वी उपयुक्त ठरतो. या नांगराच्या भरवशावरच तर गाई बैल, शेळया, मेंढया, अश्व-अश्वतरी, स्त्री-पुरुष इत्यादिकांना भरपूर तृणधान्यादिकाची प्राप्ति होऊन त्याचें जीवन चालते. योग्य वेळी नागरलेल्या जमिनीत आवश्यक तितक्या पावसाची इन्द्रानें वृष्टि करावी व धान्याचें पोषण करणाऱ्या सूर्यानें योग्यवेळीं आवश्यक तितक्या तेजाने बीजाचे सरक्षण व सवर्धन करावें. ही भूमि आम्हाला प्रतिवर्षी उत्तम रसयुक्त धान्य नियमितपणे देत राहो. नांगरानें जमीन उत्तम नागरावी व त्यावेळी शेतकऱ्यांनीं बैलांच्या पाठीमागून जावें आमच्या हवनानें प्रसन्न होऊन वायू व सूर्य यानी या शेतीतून उत्तम फळाचे व रसयुक्त असें नानाविध ओषधि द्रव्य द्यावे बैल सुखी असावे सर्व मनूष्ये आनदांत असावी, व उत्तम प्रकारें नागर चालवून शेती करण्यांत यावी काढण्या (बैलाना) जिथे ज्या प्रकारे बाधणे आवश्यक आहे तिथे तशाच बाधण्यात येवोत व आवश्यक असेल तेथे आसूड वर करण्यात येवो वायु व सूर्य यानी माझ्या हवनाचा स्वीकार करावा व आकाशमडलात जे पाणी आहे त्याच्या वृष्टीनें पृथ्वीला सिंचित करावे भूमीच भाग्यसपन्न करणारी आहे याचे आम्हाला पूर्ण परिज्ञान असल्यामुळेच आम्ही तिच्या विषयी श्रद्धा बाळगतों ही भूमि आम्हाला उत्कृष्ट धान्य देत राहो भरपूर प्रमाणात मध व तूप याचे भूमीवर योग्य प्रकारे सिंचन जेव्हा होते व जलवायु आणि देवता यांची सर्वस्वी अनुकूलता जेव्हा लाभते त्या वेळी भूमि आम्हांला उत्तम व मधुर रसयुक्त धान्य, फळे व औषधी याचा लाभ करून देते. आपल्या पायानीं भूमीचें आक्रमण करीत, जांघेंतून अन्न उत्पन्न करीत व श्रमानें तें रसपूर्ण बनवीत बैल व शेतकरी पहा कसे सुदर दिसतात.)

कृषीप्रमाणेच गोरक्षा अथवा पशुपालनाच्या व्यवसायाला वैदिक राष्ट्रांत अत्यत महत्त्वाचे स्थान होतें. त्यांतहि गाय हा साऱ्या राष्ट्राचाच मानबिंदु असल्यामुळे गोसंरक्षणाला विशेषच

महत्त्वाचे स्थान होतें ज्याच्या शेतीला मध, घृत व दूध यांचे खत असे त्याच्या देशात गोधनाची अत्यत समृद्धि असली पाहिजे हे उघडच आहे प. सातवळेकर आपल्या अथर्ववेद भाष्यात लिहितात " पूनाके पेशवाओके समयमे कई आम इस पचामृतका खाद लेकर तैयार किये गये थे, उनमेसे एक आमका वृक्ष इस समयतक जीवित है और ऐसे मधुर और स्वादु फल दे रहा है कि उसका वर्णन शब्दोसे हो नही सकता ! ! ! पचामृत ( दूध, दही, घी, शहद और मिश्री ) के खादसे जो आम पुष्ट होता हो उसके फल भी वैसे ही अद्भुत अमृतरूप होगे इसमे सदेहही क्या है ? यह प्रत्यक्ष उदाहरण है । तथा वाईके एक पडितने आर्यकृषि शास्त्रके अनुसार दूधका खाद देकर एक वर्ष ज्वारीकी कृषि की थी, उससे इतना परिपुष्ट और स्वादु धान्य उत्पन्न हुआ कि उसकी साधारण धान्यसे तुलनाही नही हो सकती । यह वैदिक कृषिशास्त्रका अत्यत महत्त्वका विषय है, जो धनी पाठक इसके प्रयोग कर सकते है वे अवश्य करके देखे । साधारण जनोके लिये ये प्रयोग करना अशक्यही है क्यो कि जिन लोगोको पीनेके लिये दूध नही मिल सकता वे खादके लिये दूध, दही, घी, शहद और मिश्री कहासे ले आयेगे । पाठक ये वर्णन पढे और वैदिक कालकी कृषीकी मनसेही कल्पना करे और मनही मनमे उसका आस्वाद लेनेका प्रयत्न करे । " असो गाईसबंधी अथर्ववेदात म्हटले आहे :—

आ गावो अग्मन्नुत भद्रमक्रन्त्सीदन्तु गोष्ठे रणयन्त्वस्मे । प्रजावती· पुरुरूपा इह स्युरिन्द्राय पूर्वीरुषसो दुहाना. ॥१॥ न ता नशन्ति न दभाति तस्करो नासामामित्रो व्यथिरा दधर्षति । देवाश्च याभिर्यजते ददाति च ज्योगित्ताभि. सचते गोपति सह ॥३॥ न ता अर्वा रेणुककाटोऽश्नुते न संस्कृतत्रमुप यन्ति ता अभि । उरु गायमभय तस्य ता अनु गावो मर्तस्य वि चरन्ति यज्वन. ॥४॥ गावो भगो गाव इद्रो म इच्छाद्गाव: सोमस्य प्रथमस्य भक्षः । इमा या गाव स जनास इद्र: इच्छामि हृद्रा मनसा चिदिन्द्रम् ॥५॥

यूय गावो मेदयथा कृश चिदश्रीर चित्कृणुथा सुप्रतीकम् । भद्र गृहं कृणुथ भद्रवाचो बृहद्वो वय उच्यते सभासु ॥ ६ ॥ प्रजावती. सूयवसे रुशती शुद्धा अप सुप्रपाणे पिबंती । मा व स्तेन ईशत माघशस परि वो रुद्रस्य हेतिर्वृणक्तु ॥ ७ ॥

–(अथर्ववेद का ४ सू. २१)

(गाई आमच्या घरी आल्या आणि त्यानी आमचे सर्वतोपरी कल्याण केले. या गाईंनी आनदाने गोशाळेंत बसावे व आमचा आनद वाढवावा या गोशाळेत गाईना खूप सतति व्हावी व या नाना वर्णाच्या गाईनी ईश्वराच्या यज्ञासाठी प्रात काळी दूध द्यावे. आमच्या राष्ट्रात गाईचा कधी नाश होत नाही. चोर त्याना कधी चोरून नेत नाहीत व त्याना कोणीही कोणत्याही प्रकारे कष्ट देत नाहीत त्याच्या दुधाने ईश्वराप्रीत्यर्थ यज्ञ करण्यात येतो व गाईचा कर्तव्यदक्ष पालनकर्ता गाईच्या-सहित चिरकाल आनदात राहतो चपळ व तरुण घोडयाला उपयुक्ततेच्या दृष्टीने गाईची योग्यता प्राप्त होऊ शकत नाही जेथे अन्न शिजविण्यात येते त्या पाकशाळेत जाण्याचा प्रसग गाईवर कधीही येत नाही ( या राष्ट्रात कोणी गोमासभक्षक नाही व कोणी गोवधक नाही असा अर्थ. ) गोपालकाच्या सदैव रक्षणात असणाऱ्या या गाई सर्वत्र निर्भयपणे सचार करितात. गाय हेच मनुष्याचे खरे धन असून त्याचे दूध हेच त्यांचे सर्वोत्कृष्ट अन्न होय गाय हेच वैभव व बल असल्याची खात्री पटल्यामुळे मी अत करणपूर्वक त्याची सर्वतोपरि उन्नति व्हावी असे इच्छितो अत्यत दुबळ्या मनुष्याला देखील गाई आपल्या दुधानें पुष्ट करतात पाडुरोगाने निस्तेज झालेल्या मनुष्याला त्या सुदर व तेजस्वी बनवितात. गाईचा शब्द मनात आल्हाद उत्पन्न करणारा आहे. गाई ह्या आमच्या घराना मगलधाम बनवितात. म्हणून गाईंच्या यशाचे सभांसभातून गायन करण्यात येते. गाईंना उत्तम सतति होवो. त्याना उत्कृष्ट तृण भक्षण करण्यास मिळो त्यांना अत्यत शुद्ध स्थानातील पवित्र जल पिण्यास मिळो. त्याना

चोर व पापी याच्या अधीन होण्याचा कधीही प्रसंग न येवो व त्या सदैव सुरक्षित असोत ) या सूक्तातील वर्णनावरून गाईंचें केवढें महत्त्व वैदिक राष्ट्र मानीत होते व गोपालनाची किती उत्कृष्ट व्यवस्था होती याची कल्पना येते. गोशाळेसबधी अथर्ववेदांत म्हटले आहे.

' स वो गोष्ठेन सुषदा स रय्या स सुभूत्या । अहर्जातस्य यन्नाम तेना व: स सृजामसि ॥ १ ॥ सजग्माना अबिभ्युषीरस्मिन्गोष्ठे करीषिणी । बिभ्रती सोम्य मध्वनमीवा उपतेन ॥ ३ ॥ शिवो वो गोष्ठो भवतु शारिशाकेव पुष्यत । इहैवोत प्र जायध्वं मया व स सृजामसि ॥ ५ ॥ मया गावो गोपतिना सचध्वमय वो गोष्ठ इह पोषयिष्णु । रायस्पोषेण ब्रहुला भवन्तीर्जीवा जीवन्तीरुप व सदेम ॥ ६ ॥

–(अथर्ववेद का ३ सू १४)

गाईच्यासाठी उत्तम, प्रशस्त व स्वच्छ गोशाला बनवावी तेथे त्याना पिण्यासाठी देण्यात येणारे पाणी उत्कृष्ट व स्वच्छ असून ते तसें राखण्याची उत्तम व्यवस्था असावी गाईंना होणारी सतति उत्कृष्ट व उत्कृष्ट बीजाची कशी होईल या सबधात सदैव जागरूक असावे गाईवर इतके उत्कट प्रेम असावे की दिवसा तिच्या पोषणास योग्य असे उत्तमातील उत्तम पदार्थ मिळवून ते तिला अर्पण करावे ज्याचे उत्कृष्ट खत होऊ शकते असे शेण देणाऱ्या, अमृतासारखे दूध मानवाना देणाऱ्या, निरोगी व निर्भय स्थानी सचार करणाऱ्या गाईचे कळप या उत्कृष्ट गोशाळेमध्ये येऊन निवास करोत. ही गोशाळा गाईना सदैव कल्याणकारी होवो. येथील गाई सदैव परिपुष्ट व उत्कृष्ट सतान देणाऱ्या होवोत. या गाईंच्या कळपाचा व गोठ्याचा स्वामी, नोकराकडून नव्हे, तर स्वतः गाईच्या व्यवस्थेत निमग्न राहो गाई आपल्या धन्यासहित आनदाने मिळूनमिसळून राहोत ही गोशाला अत्यंत उत्कृष्ट असून येथे गाई परिपुष्ट होवोत आपली शोभा व पुष्टि वाढवीत स्वत चा सर्वतोपरि उत्कर्ष करून घेवोत आम्ही अत्यत उत्कृष्ट

गाईंचा सग्रह व पालन करू ) जशी गोपालन व पशुपालनाच्या सबधांत दक्षता आढळते तसेच त्याना होणारे रोग व त्या सबधाची सावधानताही आढळते अथर्ववेद म्हणतो –

'एकैकयैषा सृष्टया स बभूव यत्र गा असृजन्त भूतकृतो विश्वरूपा । यत्र विजायते यमिन्यपर्तु· सा पशून् क्षिणाति रिफती रुशती ॥१॥ एषा पसून्त्स क्षिणाति क्रव्याद् भूत्वा व्यद्वरी। उतैना ब्रह्मणे दद्यात् तथा स्योना शिवा स्यात् ॥२॥ शिवा भव पुरुषेभ्यो गोभ्यो अश्वेभ्य शिवा। शिवास्मै सर्वस्मै क्षेत्राय शिवा न इहैधि ॥३॥ इह पुष्टिरिह रस इह सहस्रसातमा भव । पशून यमिनि पोषय ॥४॥ यत्रा मुहार्द सुकृतो मदन्ति विहाय रोग तन्व स्वाया । त लोक यमिन्यभि सबभूव सा नो मा हिंसीन् पुरुषान् पशूश्च ॥५॥ यत्रा सुहार्दां सुकृतामग्निहोत्रहुता यत्र लोकः। तं लोक यमिन्यभिसबभूव सा नो मा हिसीत् पुरुषान् पशूश्च॥६॥

—(अथर्ववेद का ३ सू. २८)

(जगत्स्रष्टयाने अनेक रगरूपाच्या व विविध गुणधर्मांच्या गाई उत्पन्न केल्या एका वेळी त्या गाईना एकच सतान झाले पाहिजे. जेव्हा गाई ऋतूविरुद्ध आचरण करतात व एकाच वेळी त्याना एकाऐवजीं दोन बछडे होतात त्यावेळी ती रोगी होऊन घातक व नाशक ठरते ती आपल्याबरोबर ससर्गाने अन्य पशूचाही नाश करते जसे मास खाणारे हिंस्र पशू नाश करणारे असतात तशीच ही रोगी गायही विनाशकच ठरते. म्हणून गाईला रोग होताच वैद्यशास्त्रज्ञ व पशुचिकित्सकाकडे तिला तात्काळ पाठवावे की ज्या ठिकाणी तिच्यावर योग्य ते वैद्यकीय उपचार होऊन ती निरोगी व म्हणूनच सुखदायिनी होईल वस्तुत गाय ही मनुष्य, घोडे, बैल इत्यादि सर्वच प्राणिमात्रासाठी, या देशासाठी, आमच्यासाठी सुखकारक ठरली पाहिजे. वस्तुत· गाईच्या ठिकाणी अनेक पोषणकारक गुण आहेत, तिच्या ठिकाणी उत्कृष्ट अमृतरस आहे सहस्रावधि मार्गांनी ही मनुष्यांना लाभदायक आहे, सर्वप्राणिमात्राना आपल्या गोरसाने परिपुष्ट

करण्यासारखी तिची प्रकृति असणे आवश्यक आहे ज्या प्रदेशातील हवा इत्यादीच्या वातावरणाने शरीरातील रोग दूर होतात व शरीर निरोगी बनते, त्याचप्रमाणे ज्या प्रदेशात सुस्वभावी व पशुचिकित्सा कार्य उत्तम प्रकारे पार पाडणारे तज्ज्ञ लोक आहेत त्याच प्रदेशात या रोगी गाईला नेले पाहिजे तिथेच तिला ठेवले पाहिजे रोगट स्थितीत तिला यथे ठेवून इतर पशूंना व मनुष्याना व्यर्थ उपसर्ग पोचविण्यात अर्थ नाही ज्या प्रदेशात उदार हृदयाचे, शुभकर्म करणारे, अग्निहोत्री असे पशुचिकित्सातज्ज्ञ राहतात त्या प्रदेशांत या गाईने जावे व रोगमुक्त व्हावे ) तात्पर्य, पशुपालनविभागात येणारे रोगपरिज्ञान व पशुचिकित्साशास्त्र हे विषय वैदिक राष्ट्र घटकाना सुपरिचित होते हे या सूक्तावरून सिद्ध होण्यासारखे आहे ऋग्वेदातही गायीविषयी अत्यत मगल भावना वारवार प्रगट केलेल्या आहेत उदाहरणार्थ पुढील काही उल्लेख पहा – गाव भगः गाव इन्द्र मे अच्छान् गाव सोमस्य प्रथमस्य भक्ष । इमा या गावः स॰ जनासः इन्द्र इच्छामि इत् हृदा मनसा चित् इद्रम् ।।५।। यूय गाव मेदयथ कृशम् चित् अश्रीरम् चित् कृणुथ सुऽप्रतीकम् । भद्रं गृह कृणुथ भद्रवाच. बृहत् व. वयः उच्चते सभासु ।।६।। प्रजावती सुयवसम् रिशन्ति शुद्धा॰ अप. सुऽप्रपाने पिबन्ती । मा वः स्तेन ईशत मा अघऽशस परिव. हेति॰ रुद्रस्य वृज्या ।।७।।

—(ऋग्वेद ६–२८)

(भाग्यदाता देव मला धेनु देवो, इद्र मला गोधन देवो कारण धेनूचे दुग्ध हा सोमाचा आवडता पदार्थ आहे अशा ज्या ह्या धेनु आहेत. हे जन हो त्या इद्ररूपच (सामर्थ्यरूपच) होत व अत.-करणपूर्वक मला इन्द्रच (सामर्थ्यच) पाहिजे आहे धेनूनो, दुर्बळ झालेल्या मनुष्यास तुम्ही पुष्ट करिता आणि ज्याच्या तोडावर अगदी कळा नाही त्याला तजेलदार करून सोडता. तुमचा स्वर मगलकारक आहे; तर तुम्ही आमचे घर मगलमय करा. ह्या तुमच्या महान् सामर्थ्याची वाखाणणी लोकसभेतूनसुद्धा

होत असते तुम्हास वासरें पुष्कळ होऊन तुम्ही कोवळें कोवळे गवत खाता आणि पाणवठ्यावर शुद्ध निर्मल उदक पिता अशा तुम्ही आहात. चोराची मात्रा तुमच्यावर न चालो किंवा इतर पानकाने माजलेल्याचीही न चालो रुद्राचे शस्त्र तुम्हाला वगळून दुसरीकडेच वळो ) म्हणूनच ऋग्वेदाने असा संदेश दिला आहे की "प्र नु वोच चिकितुषे जनाय मा गामनेहसा मदितिं वधिष्ठ ।।" (अशी ही निष्पाप, उपयुक्त, मंगल व गरीब जी गाय, तिचा हे सुविचारवंतहो, तुम्ही वध करू नका. (कारण की) " माता रुद्राणा दुहिता वसूना स्वसादित्याना अमृतस्य नाभि " ( ती रुद्राची माता आहे ! वसूची दुहिता आहे ! आदित्याची बहीण आहे! आणि तशीच अमृताची खाण आहे ) येथे एक प्रश्न असा उत्पन्न होईल की वेदामध्ये तर गोमेध सांगितलेला आहे, गाईचें मांस हा खाद्य पदार्थ असल्यावाचून व ती वध्य असल्यावाचून तिचा यज्ञ कसा करावयास सांगत असतील ? यावर पुरुषमेधा-प्रमाणेच गोमेध हे एक रूपक असल्याचे पुष्कळ विद्वानांनी प्रति-पादन केलेले आहे पण ज्याना हे रूपक असल्याचे पटणार नाही त्याच्यासाठी रा गो. कोलगडे यानी आपल्या ऋग्वेददर्शनामध्ये दिलेले स्पष्टीकरण उपयुक्त ठरेल. मला त्याचे विवेचन ग्राह्य वाटतें ते म्हणतात :—

यज्ञात काही पशू मारावयाचे असतात त्याची यादी शतपथात दिली आहे. ती अशी – 'सर्वे वै पशव प्रजापति पुरुषोऽश्वो गौरविरज: ।।' –(शतपथ १०-२-१-१) प्रजापति, पुरुष, घोडा, बैल, बकरा व बोकड हे सर्व पशू म्हणजे देवाच्या अन्नस्थानीं आहेत (अन्न वै पशव:) येथे मूळ वचनात गौ असा शब्द असला तरी त्याचा अर्थ गाय असा न करता बैल असाच केला पाहिजे. त्याचें कारण असे की 'गो' या शब्दाचा अर्थ गाय अगर बैल असा होत असला तरी गाय ही अवध्य – अघ्न्या – आहे असें वेदात स्वच्छ सांगितले असल्यामुळे (शुक्ल यजुर्वेद संहिता व ऋग्वेद) त्या वचनाला बाध न येईल असाच अर्थ वरील शतपथ वचनांत

विवक्षित आहे असे धरून चाललें पाहिजे (शुक्ल यजुर्वेदात गाईला अवध्य म्हटलें आहे व शतपथ हे त्या वेदाचेच ब्राह्मण आहे.) शतपथातील गौचा अर्थ गाय असा केल्यास ऋग्वेद वचनाला बाध येतो. शिवाय हेही लक्षात घेतले पाहिजे की यज्ञात पशू मारतात, ते सगळे पुरुष पशूच असतात. स्त्री पशु मारीत नाहीत. प्रजापति, पुरुष, अश्व, बकरा, बोकड हे सर्व पुरुषपशूच असल्यामुळे तेथील गौः शब्दाचा अर्थ स्त्रीलिंगी गाय असा न करता पुल्लिंगी बैल असाच करणें युक्त आहे. आणि तसा केला तरच संगति नीट लागते व वेदवचनालाही बाध येत नाही हा सूक्ष्म फरक व यज्ञ-विषयक शास्त्रीय ज्ञान लक्षांत न घेतल्यामुळे पुष्कळ भारतीय व पाश्चात्य पंडितांचा गैरसमज होऊन त्यानी 'यज्ञात गाय मारली जाते' ही शास्त्रदुष्ट कल्पना आज लोकात पसरवून देण्याचें पाप केलें आहे ' -(ऋग्वेद दर्शन. पृ. ४६१)

या शिवाय हत्ती, घोडा, म्हैस, रेडा, शेळ्या, मेंढ्या, बकरा, कुत्रा इत्यादि पशूचें पालनहि उत्कृष्टपणे होत होते इमानीपणा-बद्दलची कुत्र्याची प्रसिद्धि ऋग्वेदापासून असून लोकरीचा धंदा यज्ञ-कर्मांशी संबद्ध असल्यामुळे मेंढपाळाचा व्यवसाय चालत असला पाहिजे हें उघडच आहे. पशू व विशेषत गाई यानाच प्राचीन भारतात खरे धन समजण्यात येत असे महाभारतांतील उत्तर-गोग्रहणाचा प्रसंग याच तत्त्वाने झाला असून ऋग्वेदात **पणि** नांवाचे लुटारू गाई पळवीत म्हणून इंद्राने त्याना शासन केल्याचा उल्लेख आहे. ऋग्वेद प्रार्थना करतो 'शं न करत्यर्वते- सुगं मेषाय मेष्ये। नृभ्यो नारिभ्यो गवे '(१-४३-६) (आमच्या घोड्याना, मेंढ्यांना, मेंढीला, पुरुषांना, स्त्रियांना व गाईना सुखी ठेव.)

याप्रमाणें कृषि व पशुपालन अथवा गोरक्षण या राष्ट्रसमृद्धीच्या साधनांच्या दृष्टीने वैदिक राष्ट्राचें आपण समालोचन केले. आतां तिसरें व सर्वांत महत्त्वाचें समृद्धीचे साधन जे व्यापार अथवा वाणिज्य त्याकडें वळू. त्यांत सर्वांत प्रथम वैदिक राष्ट्रांत किती प्रकारचे व्यवसाय चालत तें पाहणे आवश्यक आहे. शुक्ल

यजुर्वेदाच्या ३० व्या अध्यायात पुरुषमेधाचे प्रकरण असून तत्कालीन मनुष्यसमाजांतील सर्व थरातील एक एक मनुष्य पशु म्हणून स्वीकारलेला आहे अर्थात् हे सर्व मनुष्यरूपी यज्ञीय पशू सोडूनच द्यावयाचे आहेत. त्यातील नावावरून तत्कालीन जातिवार उद्योगधंद्याची कल्पना येते ते असे :– (१)अध्यापक (२)सैनिक (३) सामान्य व्यापारी (४) कामकरी (५) नर्तक (६) नट (७) गायक (८) विट (९) रथकार (१०) सुतार(तक्षा) (११) कुंभार (१२) लोहार (१३) मणिकार अथवा हिऱ्यांना पैलू पाडण्याचे काम करणारा कारागीर (१४) शेतकरी (१५) बाणकार (१६) धनुष्कार अथवा धनुष्ये तयार करणारा (१७) ज्याकार अथवा प्रत्यंचा म्हणजे धनुष्याची दोरी तयार करणारा (१८) दोऱ्या वळणारा (१९) पारधी (२०) कुत्री पाळणारा (२१) नदीत बुडालेले सामान बाहेर काढणारा (२२) निषाद (२३) विदलकार अथवा बुरुड (२४) नटी (२५)वेश्या (२६)वैद्य (२७)ज्योतिषी (२८)शकुन जाणणारा (२९) माहूत (३०) चाबुकस्वार (३१) गोपालनाचा धंदा करणारा मनुष्य (३२) मेंढपाळ (३३) बोकड पाळणारा मनुष्य (३४) मद्य तयार करणारा कलाल (३५) नाणी पाडणारा (३६) सारथ्याचा साहाय्यक (३७) डोंगरातून वा जंगलांतून लाकडाचा भारा आणण्याचा धंदा करणारा (३८)जळाऊ लाकडे विकणारा (३९) वाढप्याचा धंदा करणारा (४०) मूर्तिकार (४१) अंगमर्दन अथवा मालिश करण्याचा धंदा करणारा (४२) परीट अथवा धोबी (४३) रंगारी (४४) गुराची धार काढणारा (४५) लोखंड तापविणारा घिसाडी (४६) तापलेल्या लोखंडावर घण मारणारा (४७) नटीच्या डोळ्यांत सुरमा घालण्याचा धंदा करणारी स्त्री (४८) तरवारीचे म्यान तयार करण्याचा धंदा करणारा कारागीर (४९) चांभार (५०) कातडे कमावणारा (५१) पाणी अडवून मासे धरणारा कोळी (धीवर) (५२) पाश अथवा गळ टाकून मासे धरणारा कोळी.(५३)वैन्द

अथवा जाळे टाकून मासे धरणारा कोळी (५४) शौष्कल अथवा मासे विकून उपजीविका करणारा (५५) मार्गार अथवा पाण्याच्या तळाशी दोन्ही हातानी चाचपून मासे धरणारा (५६) कैवर्त अथवा माशाना एकत्र गोळा करून मारणारा (५७) आन्द अथवा पाण्यात काठ्या पुरून मासे धरणारा (५८) मासे धरण्याची जाळी तयार करणारा मैनाल (५९) पर्णक अथवा विष लावलेली झाडाची पाने पाण्यात टाकून मासे धरणारा (६०) हरिणाची पारध करणारा किरात (६१) सोनार (६२) वाणी (६३) लांकूड फोड्या (६४) द्यूतकार व द्यूतगृह चालविणारा (६५) वीणा वादक अथवा बीनकार (६६) तुणतुणे वाजवीत साथ करणारा (६७) शखवादक (६८) अरण्यपालक (६९) ताल धरण्याचा व्यवसाय करणारा (७०) 'तूणव' नावाचे वाद्य वाजविणारा (७१) मृदगवादक (७२) कोल्हाटी या शिवाय विणकर, न्हावी, इत्यादिकाची नावे ऋग्वेदात आहेतच या छोट्या व मोठ्या औद्योगिक जीवनाबरोबरच वैदिककाळी भारतीय राष्ट्राचा समुद्रावरून व्यापार चालत असे व पणी इत्यादि चाचेगिरी करणाऱ्या लोकाशी त्याना झगडावे लागे याचा उल्लेख मागे केलाच आहे. समुद्रावरून व्यापार म्हटला की नौका बाधण्याचा मोठ्या प्रमाणावरील धदा आलाच. या कलेतील वैदिक राष्ट्राच्या प्रगतीचा आढावा मागें युद्धनौकांच्या वर्णनांत घेतलेलाच आहे व्यापार हे देशाच्या समृद्धीचे अत्यत श्रेष्ठ साधन आहे व त्याचें हे महत्त्व ओळखून वैदिक राष्ट्राने त्याला कसें उत्तेजन देण्याचे व्रत चालविले होतें हें ध्यानांत येण्यासाठी अथर्ववेदातील पुढील काही उल्लेख पहा:—

इन्द्रमहं वणिज चोदयामि स न ऐतु पुर एता नो अस्तु ।
नुदन्नराति परिपन्थिन मृगं स ईशानो धनदा अस्तु मह्यम् ॥१॥
ये पन्थानो बहवो देवयाना अन्तरा द्यावा पृथिवी सचरन्ति ।
ते मा जुषन्ता पयसा घृतेन यथा क्रीत्वा धनमाहराणि ॥२॥
इध्मेनाग्न इच्छमानो घृतेन जुहोमि हव्य तरसे बलाय ।
यावदीशे ब्रह्मणा वन्दमान इमा धिय शतसेयाय देवीम् ॥३॥

इमामग्ने शरणिं मीमृषो नो यमध्वानमगाम दूरम् ।
शुनं नौ अस्तु प्रपणो विक्रयश्च प्रतिपण फलिन मा कृणोतु।
इदं हव्य संविदानौ जुषेथा शुन नो अस्तु चरितमुत्थितं च॥४॥
येन धनेन प्रपण चरामि धनेन देवा धनमिच्छमान ।
तन्मे भूयो भवतु मा कनीयोऽग्ने सातघ्नो देवान् हविषा नि षेध॥५।
येन धनेन प्रपण चरामि धनेन देवा धनमिच्छमान· ।
तस्मिन्म इन्द्रो रुचिमा दधातु प्रजापति सविता सोमो अग्नि ॥६॥
–(अथर्ववेद ३-१५)

(वाणिज्य व्यवसाय अथवा व्यापार याना साह्य करणाऱ्या परमेश्वराची मी प्रार्थना करतो की त्याने आमच्यामध्ये यावे व आमचा अग्रेसर व्हावे त्या प्रभूच्याच कृपेने व्यापारात आम्हाला धनलाभ होतो. त्या प्रभूने आमचे शत्रू जे वाटमारे, लुटारू व पाशवी शक्तीने आम्हाला पिळून काढणारे सत्ताधारी याना आमच्या मार्गातून दूर करावें. द्युलोक व पृथ्वीच्या मध्यभागी असणारे आमचे सर्व मार्ग दुधातुपाने भरून जावे (म्हणजे जेथें आम्ही पाऊल टाकू व ज्या व्यवसायास हात घालू तेथे आम्हास यशच यश व तेहि अल्प प्रयासाने मिळावे.) व्यापारात आम्हाला खूप लाभ होऊ शकेल असा आमचा संचार फलदायी व्हावा आम्हाला लाभ व्हावा व हवे ते कष्ट सोसण्याचे व साहस करण्याचे सामर्थ्य प्राप्त व्हावे व आमच्या मार्गातील सर्व अडचणीचा परिहार व्हावा म्हणून मी अग्नीमध्ये तूप व समिधा याचे हवन. करतो त्यामुळे मी ज्ञानप्राप्तिपूर्वक उत्तम बुद्धीने, प्रशस्त कर्म करीत अनेक प्रकारच्या व्यापारात पूर्णपणे यशस्वी होऊन लाभ प्राप्त करीन हे भगवता, आम्ही व्यापाराच्या निमित्ताने घरदार सोडून खूप लाब विदेशांत आलो आहोत येथे आमच्या वागणुकीत जर काही चुका झाल्या तर त्याबद्दल तू आम्हाला क्षमा कर. आम्ही या ठिकाणी जो व्यापार करीत आहोत त्यात आम्हाला पुष्कळ लाभ होऊं दे आम्हाला क्रयामध्येही (म्हणजे माल खरेदी करण्यांत) लाभ होऊ दे व विक्रयात तर पुष्कळ धन मिळू देच. आमच्या

प्रत्येक व्यवहारात आमचा लाभच होऊ दे आमचे हे देशातरीच्या सुदूर व्यापारी क्षेत्रातील आगमन व स्पर्धेच्या क्षेत्रात साहसाने चढाई करण्यासाठी उतरणे आम्हाला लाभदायकच ठरो तुझ्या प्रसन्नतेसाठी आम्ही हे हवन करीत आहोत या हविर्द्रव्याचा तू स्वीकार कर. मी मूलधनाच्या साहाय्याने हा व्यापार करीत आहे. व हे मी वापरीत असलेले धन माझ्या व्यवहारात मला पुरेसें ठरो. कमी न पडो हे भगवन्ता! माझ्यावर कृपा कर व माझ्या लाभाच्या आड येणारे जे कोणी असतील त्याना दूर कर आपल्या मूलधनाच्या (भाडवल) साहाय्याने व्यापार करून मी पुष्कळ धन प्राप्त करू इच्छितो. माझ्या या व्यवसायात छोटचा मोठचा विपत्तीनी न उमगणारी मनाची स्थिरता व अंतिम लाभापर्यंत मागे न हटण्याचा दृढ निश्चय माझ्यात उत्पन्न कर.) हें सूक्त मनन करण्यासारखे असून व्यापारी नीतीचे सर्व सिद्धान्त यात ग्रथित झालेले आहेत या सूक्तातील शब्द सपत्तीच पहा:—
(१) धन म्हणजे मूलधन अथवा ज्याने व्यापार प्रारभ होतो तें भाडवल (२) धन म्हणजे लाभ अथवा नफा म्हणून मिळणारी रक्कम (३) वणिक् म्हणजे व्यापारी अथवा क्रय-विक्रयाचा (खरेदी विक्री) व्यवहार करणारा मनुष्य (४) धनदा म्हणजे व्यापारासाठी मूलधन अथवा भाडवल पुरविणारा सावकार (५) प्रपण म्हणजे खरेदी अथवा माल विकत घेणे (६) विक्रय म्हणजे खरेदी केलेला माल विकणे (७) प्रतिपण म्हणजे प्रत्येक खरेदी (८) चरित म्हणजे सर्व परिस्थिति जाणून केलेली हालचाल (९) उत्थित म्हणजे चढाई अथवा प्रतिस्पर्ध्याबरोबर स्पर्धा करून वरचढ होण्याचा प्रयत्न करणे. भाडवलावरच कोणताहि व्यापार सुरू होतो हे भाडवल स्वत:जवळ नसले तर सावकार वा तत्सम व्यवहार करणाऱ्या सस्थाजवळून घ्यावे लागते व्यापार म्हणजे कोणता तरी माल प्रथम विकत घेऊन तो अधिक किमतीला विकणे त्यासाठी खरेदी कोठे केली असता कमी धनाचा व्यय होईल व विक्री कोठे केली असता खूप लाभ होईल, यासाठी वेळ

कोणती अनुकूल आहे हे ओळखणे यालाच चरित म्हणतात व खऱ्या व्यापारी बुद्धीचा येथेच कस लागतो या सर्वांत उत्थान अथवा चढाई ही महत्त्वाची गोष्ट आहे. ती व्यक्तिश व सघश अशी दोन्ही प्रकारची असू शकेल तिच्यात यशस्वी होण्यावरच खरा लाभ अवलबून असल्यामुळे तिला विशेष प्रकारची प्रतिभा आवश्यक असते व्यापारात ज्या कारणाने फसून मनुष्य नागवला जातो त्याचाही या सूक्तात उल्लेख आहे (१) व्यसन (२) चोर व लुटारूचा घाला (३) वागणुकीतील क्रूरता अथवा रूक्षपणा व केवळ स्वार्थमयता (४) कृपणता म्हणजे साहसास हात घालण्यासाठी आवश्यक तितके पैसे खर्च करण्याच्या सबधात टाळाटाळ करणे (५) भाडवल कमी पडणे यातून जो आपली व्यवहार-नौका सुरक्षितपणे नेईल तोच यशस्वी होईल म्हणून अथर्ववेदाने सावधपणाचे इषारे, माल विकृत होऊ नये या बाबींपासून गोड बोलून लोकाच्या पोटात शिरावे येथपर्यंत दिले आहेत. समृद्धीचा उपाय म्हणून अथर्ववेद म्हणतो 'पयस्वान् मामक वच' (माझी वाणी मधुर व अमृतस्रावी असो )

साराश, कृषि, वाणिज्य व पशुपालन ही राष्ट्रसमृद्धीची तिन्ही साधने वैदिक राष्ट्रात सिद्ध होती या साधनानी हे राष्ट्र किती समृद्ध होते याची कल्पना यावयास्तव ऋग्वेदामध्ये भारतीय राजानी दिलेल्या वैभवशाली दानाची वर्णने पहा —

"भाव्य राजाने आपल्या कक्षीवान् नावाच्या पुरोहिताला शभर सुवर्ण निष्क, शभर घोडे, दहा रथ, साठ सहस्र गाई व इतर सहस्रावधि प्रकारच्या देणग्या दिल्या (शत राज्ञो नाधमानस्य निष्कान् शतमश्वान् प्रयतान् सद्य आदम् । १ १२६ २) उप मा श्यावा स्वनयेन दत्ता वधूमन्तो दश रथासो अस्थु । षष्टि. सहस्रमनु गव्यमागात्) (१. १२६ ३) दिवोदास राजाने भरद्वाजास दहा घोडे, दहा कोष, दहा महावस्त्रे व दहा सुवर्णाचे गोळे दान म्हणून दिले (दशाश्वान्दशकोशान्दश वस्त्राधिभोजना । दशो हिरण्यपिण्डान् दिवोदासादसानिषम् ।) (६.४७.२३) दाभ्य राजाने श्यावाश्वासास दिलेल्या देणगीचें असेंच वर्णन आहे. अनेकविध स्वतंत्र राज्यांनी

व्यापलेल्या या राष्ट्रातील राजाचे नेहमीच अनेक यज्ञ चालत व त्या यज्ञातून ही भव्यदाने जे सहज देत, त्याची राज्ये केवढी समृद्ध असली पाहिजेत ! त्यासाठी आणखी वेगळ्या पुराव्याची काय आवश्यकता आहे?

याप्रमाणे वैदिक राष्ट्राच्या अर्थशास्त्राकडे वळताना योग, उत्पादन अथवा सपादन व समृद्धि याकडे आपण आतापर्यंत पाहिले आता विनिमय म्हणजे वैषम्य व दारिद्रय राहणार नाही अशा प्रकारे धनाचे विभजन करण्याचें शास्त्र कसे होते ते पाहिले म्हणजे अर्थशास्त्राची ही तपासणी पूर्ण होईल प्रथम आपण वैदिक राष्ट्राच्या या क्षेम अथवा विनिमयशास्त्राचे मूलभूत सिद्धान्त काय होते त्याकडे पाहू

या समृद्ध राष्ट्राच्या अर्थजीवनाचा शाश्वत व अविकपनीय असा स्थिर पाया जो भारतीयानी घातला, व विनिमयशास्त्राची उभारणी केली त्यातील सर्वांत महत्त्वाचा सिद्धान्त म्हणजे स्वत्वाचा सिद्धान्त होय

मनुष्याचे जीवन नीट रीतीने चालावयास त्याच्या गरजा समाजरचनेत सुव्यवस्थितपणे व आपल्या इच्छेनुसार भागविण्याची सोय त्याला उपलब्ध असण्याची अत्यत आवश्यकता असते. ज्या वस्तूचा त्याला उपयोग करून घ्यावयाचा असतो त्याना भोग्य पदार्थ असे म्हणतात कोणत्याही भोग्य वस्तूचा उपभोग घेण्याचा भोक्त्याला तेव्हाच खरा अधिकार प्राप्त होतो की ज्या वेळी ती वस्तू पूर्णपणे त्याची – त्याच्या मालकीची असते. अलीकडे ज्याला मालकी हक्क (Ownership )असे म्हणतात त्यालाच स्वत्व असे भारतीयानी म्हटले आहे. या स्वत्वाची मर्यादा कोणती हा प्रश्न सोडविणे आजच्या शास्त्रज्ञाना मोठे अडचणीचे होऊन बसले आहे भांडवलशाही समाजरचनेत उत्पादन व विनिमय या दोन्ही बाबतीत अनिर्बंध व्यक्तिस्वातत्र्य मान्य करण्यात आले असल्यामुळे स्वत्वाची अथवा मालकी हक्काची तेथील व्यवस्था बहुजन-हिताच्या नेमकी विरोधी ठरली आहे सपूर्ण समाजाची होणारी उपासमार प्रत्यक्ष डोळ्यानी पाहून सुद्धा कायद्याच्या परिभाषेत

तिला थाबविण्याची कोणतीही सोय या समाजरचनेत होऊ शकत नाही. इतर साम्यवादी ( Communism ) अथवा सघनिष्ठ (Guild Socialism) इत्यादि रचनातून वैयक्तिक मालकी हक्क उडवून देऊन स्वत्व अथवा मालकी हक्क केवळ राष्ट्राचा अथवा समाजाचा असेच ठरविण्यात आले असले तरी व्यवसायाच्या राष्ट्रीयीकरणाचे स्वरूप अथवा समाजाच्या मालकी हक्काचे स्वरूप वस्तुत. शासनसस्थेच्याच मालकी हक्कात परिणत होते या स्थितीत प्रत्येक व्यक्ति ही राष्ट्रातील शासनसस्थेवर जीविकेसाठी सर्वस्वी अवलबून राहून तिची नोकर अथवा गुलाम बनते त्यायोगे व्यक्तिस्वातत्र्याचे व व्यक्तिविकसनाचे सर्व मार्ग नष्ट होऊन सपूर्ण दास्य हेच व्यक्तिजीवनाचे स्वरूप बनते शासनसस्था ही शेवटी माणसानीच बनलेली असल्यामुळे व ती माणसेही आकाशातून पडलेली नसल्यामुळे विशिष्ट गटाची समाजजीवनावरील अनिर्बंध व अमर्याद मालकी हे तिचे भयानक स्वरूप बनते इटाली, जर्मनी व रशिया या देशातून हे दास्याचे घृणास्पद स्वरूप प्रगट झाले आहे. शिवाय कोणत्याही स्वरूपाच्या राष्ट्रीयीकरणात अथवा सामाजिक मालकी हक्कात श्रमजीवी व्यक्तीचे वैयक्तिक वेतन ठरवावेच लागते या वेतनावर त्या व्यक्तीची सपूर्ण मालकी असते, व त्या व्यक्तीच्या गुणोत्कर्षानुरूप आणि कर्तृत्वानुरूप मनुष्याचे वेतन कमी अधिक प्रमाणात ठरविले जाते या वेतनावर त्या व्यक्तीची सपूर्ण मालकी असते त्याचा विनियोग ती कोणतीही सामाजिक दृष्टि न ठेवता आपल्या इच्छेनुसार करू शकते, आणि या स्थितीत एक नवे वर्गवैषम्य जन्मास येते आज रशियात हे वर्गवैषम्य उत्पन्न झालेले आहे भारतीय अर्थशास्त्रज्ञानी हे दोष टाळून कर्तव्यासाठी कर्तव्य ही स्वयप्रेरित जीवननिष्ठा व्यक्त करण्यासाठी तीन सिद्धान्तावर आपल्या अर्थशास्त्राच्या मदिराची उभारणी केली आहे ते सिद्धान्त म्हणजे (१) सर्व समाजाचा निर्वाह होऊन अवशिष्ट जे राहील त्यावरच व्यक्तीचे स्वामित्व, (२) ईशस्वत्ववाद व (३) यज्ञप्रकृतिकता हे तीन होत त्यांवर उभारलेल्या या सिद्धाताचे स्वरूप व वैदिक राष्ट्राच्या अर्थमदिराची एकदर रचना याकडे पुढील व्याख्यानात वळ

## व्याख्यान एकोणिसावें

# वैदिक राष्ट्राची अर्थव्यवस्था

जग हे भोग्य व जीव हा भोक्ता असून जीव हे अनंत असल्यामुळे व सर्वांनाच भोग्य पदार्थांची आवश्यकता असल्यामुळे भोग्य पदार्थांच्या वाटपात अनुशासनाची व नियमनाची आवश्यकता उत्पन्न होते हे नियमन लादलेले असावे की स्वयंप्रेरित असावें हा प्रश्न आहे प्राचीन भारतीयांच्या ज्या सिद्धान्तत्रयीचा मागच्या व्याख्यानाच्या शेवटी मी उल्लेख केला आहे तिचा रोख हे नियमन शक्य तितके स्वयंप्रेरित करण्याकडे आहे, व त्यातच सहस्रावधि वर्षे एक समाजरचना स्थिर व क्रांतीपासून दूर राखण्याचे तिचे रहस्य साठलेले आहे या सिद्धान्त-त्रयीचे महत्त्व व स्वरूप ध्यानात येण्यासाठी प्रथम भारतीयांच्याही मनावर अलीकडे ज्यांनी विशेष प्रभाव गाजविलेला आहे त्या पाश्चात्य अर्थप्रक्रियांचे स्वरूप थोडक्यात पाहू.

पाश्चात्य समाजात जे वेगवेगळे विचारप्रवाह उत्पन्न झाले आहेत त्यांचे वर्गीकरण (१) व्यक्तिवाद, (२) समाजवाद, व (३) राष्ट्रवाद असे त्रिविध करता येईल आजच्या नव्या युगाची निर्मिति पाश्चात्य देशांतून फ्रेंच राज्यक्रांतीनंतर झालेल्या व्यक्तिवादाने केलेली आहे. आज परिस्थित्यनुसार तेथे व्यक्तिवादाला मुळीच स्थान नसलेल्या समाजवादी व राष्ट्रवादी विचारप्रणालींचे प्रभुत्व विशेष दिसत असले अथवा व्यक्तिवादी विचारसरणीचे पुरस्कर्ते आजच्या परिस्थितीचा विचार करून व्यक्तिवादाला काही मुरड घालण्याचा पुरस्कार करीत असले तरी युरोपच्या वातावरणाला पहिला धक्का या व्यक्तिवादी विचारप्रणालीनेच दिलेला आहे ही गोष्ट निर्विवाद आहे व्यक्तिवादी विचारप्रणालीचाच राजनैतिक स्वरूपातील आविष्कार म्हणजे लोकतंत्र

होय. व्यक्तिवादी अथवा लोकतन्त्रात्मक विचार प्रणालीचे सार थोडक्यात पुढीलप्रमाणे सागता येईल --

आपल्या गरजा व वासनाचा उपशम करणे हा व्यक्तिमात्राचा नैसर्गिक व सर्वाचाच समान अधिकार असून त्या सबंधात जन्मामुळे, वशामुळे अथवा अधिकारपदामुळे कोणालाही अडथळा आणता येत नाही या जगातील सर्व प्रकारची सुखे व विषय याचा उपभोग हे मनुष्याचे प्राप्तव्य असून ते साध्य करण्याचा अधिकार त्याला निसर्गत च आहे या आपल्या अधिकाराचा तो केव्हाही वापर करू शकतो मात्र एक महत्त्वाचे नियमन त्याने मान्य केलेच पाहिजे व ते म्हणजे हा अधिकार केवळ एका मनुष्याचा नसून तो मनुष्यमात्राचा असल्यामुळे दुसऱ्या कोणाच्या अधिकाराच्या आड त्याला येता येणार नाही पण मनुष्य स्वयस्फूर्तीने सामान्यत. असा वागत नाही त्यामुळे राजसत्तेनेच या नियमाला कार्यान्वित करणे आवश्यक ठरते मात्र राजसत्तेने आपल्या नियमनाची ही मर्यादा ओळखणे व त्या मर्यादेबाहेर येऊन व्यक्ति-स्वातत्र्यावर कोणत्याहि प्रकारे दडपण न आणणे या सबधात दक्ष राहिले पाहिजे या पद्धतीने प्रत्येकाने आपापले हित साधण्याचा अथवा स्वार्थसपादन करण्याचा प्रयत्न केला असता, व्यक्तिसमूह म्हणजेच समाज असल्यामुळे, आपोआपच त्यात समाजस्वार्थ व समाजहित साधले जाते

या विचारप्रणालीत व्यक्तीचे योगाच्या म्हणजे उत्पादनाच्या व क्षेमाच्या म्हणजे विनियमाच्या सबधातील स्वातत्र्य पूर्णपणे मान्य करण्यात आलेले असून सर्वाना समान सधि व प्रत्येकाचा अधिकार (Right) याना समति देण्यात आलेली आहे आर्थिक क्षेत्रात उत्पादन म्हटले की त्याला मूलधनाची आवश्यकता असते. व हे मूलधन अथवा भांडवल ज्याचे असेल त्याचा अर्थातच उत्पादनावर स्वत्वाचा अथवा स्वामित्वाचा अधिकार असतो. मग तें उत्पादन कोणत्याही साधनानी झालेले असो व कोणत्याही प्रमाणात झालेले असो. कारण प्रचड प्रमाणात उत्पादन करणाऱ्या

साधनाची जोड त्या व्यक्तीने आपल्या मूलधनाच्या (भांडवल) भरवशावरच केलेली असते, व हे मूलधन त्याचे स्वत चे असते म्हणून या विचारप्रणालीला योग्य नाव द्यावयाचे तर ते **मूलधन प्रभुत्ववाद** असे देता येईल ही विचारप्रणालि मुळात पाश्चात्या-मध्ये जुलमी राजसत्ता व पतित आणि दुराचारी धर्मसत्ता यांची प्रतिक्रिया म्हणून निर्माण झालेली आहे जोरकस क्रियेची प्रति-क्रियाही तितकीच जोरकस असते, व त्यामुळे विवेकाचा तोल त्या प्रतिक्रियेत सुटतो. अधिकाराचे तत्त्व (Principle of right) मान्य केल्यामुळे परस्परसवादिता व दुसऱ्यासाठी करावयाचा त्याग या उदात्त भावनाना या विचारप्रणालीत मूलत कोठेच स्थान उरलें नाही अधिकार म्हटला की त्याच्या पोटी अहकाराचा पुरस्कार आलाच अधिकाराची प्रखर जाणीव व अहकाराचा प्रबल उद्रेक यानी भरलेल्या दोन व्यक्तीचा सबध शुद्ध सवादी-पणाचा कसा असू शकणार ? विरोधाचेच फळ त्याला लागणार विरोध म्हटला की समान स्वार्थ असलेल्या लोकाचे गट पडण्यांत अथवा वर्ग निर्माण होण्यात तो पर्यवसित होतो या तत्त्वावर पडणाऱ्या गटात प्रेम, समन्वय व शाति कधीच नादू शकत नाही. उलट स्पर्धा, असूया याचा प्रादुर्भाव होऊन वर्गविग्रह हीच वस्तु-स्थिति बनते विग्रहात जे विफल होतात त्याचे अतिशय हाल होतात, तर जे तात्पुरते विजयी होतात त्याना आपले आसन टिकविण्यासाठी पुन्हा सघर्ष करावा लागतो या सततच्या स्पर्धा-त्मक झगड्यात अधम प्रवृत्तीशिवाय दुसऱ्या कशाचीच वाढ होत नसल्यामुळे मनुष्यात मुळातच असलेले पशुत्व आणखी रानटी स्वरूप धारण करू लागतें या प्रतिक्रियेत सृष्टीत मुळातच असलेल्या विषमतेचा अथवा पदार्थमात्राच्या न्यूनाधिक भावनाचा विचार करून प्रत्येकाला योग्य ते कर्तव्यक्षेत्र व योग्य तितकी सधि देण्याचा विवेक पूर्णपणे सुटलेला आहे सर्वांना हवे ते कर्तव्यक्षेत्र व समान सधि दिलेली आहे पण या अशास्त्रीय साम्याला निसर्ग मानीत नाही निसर्गांत सबल, दुर्बल, सुबुद्ध, निर्बुद्ध

इत्यादि अनेकविध वैषम्ये नादत असल्यामुळे समान मधीत जे समर्थ ते पुढे जाणार व जे असमर्थ ते मागे फेकले जाणार आर्थिक परिभाषेप्रमाणे जे धनी आहेत ते अधिकाअधिक धनी होत जाणे व जे दरिद्री आहेत ते अति दरिद्री होऊन भयानक स्वरूपाचा सघर्ष व तोहि जीवनार्थ सघर्ष सतत वर्धिष्णु असणे हा या विवेकहीन व अशास्त्रीय अशा समान मधीच्या सूत्राचा अटळ विपरिणाम आहे. तात्पर्य, पाश्चात्याच्या या विचारप्रणालीतील पहिल्या व्यक्तितत्त्ववादाची ही अवस्था आहे. माझ्या "भगवान् श्रीकृष्ण" या ग्रथात मी या विषयाचा अधिक विस्तारपूर्वक व तात्त्विक ऊहापोह केलेला असल्यामुळे येथे मी त्याचा अधिक विस्तार करीत नाही तात्पर्य मूलधनप्रभुत्ववादी अथवा व्यक्तिवादी आर्थिक प्रणालि (१) अधिकारवाद (Principle of right), (२) अशास्त्रीय व अनैसर्गिक समान सधि, व (३) असस्कारित व्यक्तित्वाचा अथवा स्वामित्वाचा (Principle of ownership) अनिबंध स्वीकार यामुळे समाजाला अहितकर व विघातक ठरून तिच्या पोटी वैचारिक व आचारात्मक क्रांति जन्मास येणे अपरिहार्य ठरले. ती क्रांति कार्ल मार्क्स प्रभृतीनी साम्यवादी व समाजवादी विचारप्रणालीच्या रूपाने केली. पण ती व्यक्तिवादाची प्रतिक्रियाच असल्यामुळे तिच्यातही तितकेच भयानक दोष शिरले मूलधन प्रभुत्ववाद (भाडवलशाही) अथवा व्यक्तित्ववाद विफल ठरण्याची जी वर उल्लेखिलेली खरी कारणे, त्याकडे या प्रतिक्रियावाद्यांचे लक्षच गेले नाही, व त्यामुळे भलत्या रोगावर भलती चिकित्सा असा प्रकार त्याच्या बाबतींत झाला. त्याच्या विचारप्रणालीचें थोडक्यात स्वरूप पुढीलप्रमाणे —

"अर्थजीवन हाच समाजजीवनाचा खरा आधार असून अर्थप्रक्रियेच्या परिवर्तनाबरोबरच समाजसस्कृतीही बदलते पहिली वस्तुस्थिति ज्याना सुखावह असते ते ती टिकवू पाहतात व ती ज्याना दुःखदायक असते ते तिच्यात बळाने परिवर्तन घडवू लागतात. वर्गयुद्ध या परिस्थितीत नेहमीच अटळ असते. मूल-

धनप्रभुत्ववादाने अमर्याद प्रमाणावर शोषण चालविलें असल्यामुळे वैयक्तिक स्वामित्वाचा त्याचा सिद्धान्त बदलवून समाजस्वत्वाचा सिद्धान्त प्रतिष्ठापित करणे व प्रत्यक्षात आणणे आवश्यक आहे यत्रस्वामी कामकऱ्याची श्रमशक्ति विकत घेऊन त्याला नियमित वेतन देतो याचा अर्थ असा की कामकऱ्याच्या श्रमाने उत्पन्न झालेली सपत्ति तो घेतो मूलधन त्याचे असते येवढ्यासाठी तो हा अपहार करीत असतो तो जी सपत्ति घेतो तिचे मोल तो कामकऱ्याला जे वेतन देतो त्याहून कितीतरी पटीने अधिक असते इतकेच नव्हे तर ते आयते अथवा अकष्टार्जित असते उत्पादनाची साधने जितकी अधिक प्रभावी तितका या यत्रस्वामीला मिळणारा अकष्टार्जित धनाचा अशही मोठा असतो श्रीमताची श्रीमती अधिकाधिक वाढणे व दरिद्री कामकऱ्याचे दारिद्र्य, दैन्य, दु ख व असतोष हे तितक्याच प्रमाणात अधिकाधिक वाढत जाणे या विषम दृश्याचे खरे कारण हे असे आहे यत्रस्वामीचा वर्ग हा आपापसातील स्पर्धेने उत्पादित वस्तूचे मूल्य कमी होऊ नये म्हणून आपापले मोठे सघ बनवितो व त्याच्या द्वारे वस्तूचे वाढलेले भाव स्थिर राखण्याचा प्रयत्न करतो, तर दरिद्रतेकडून अति दरिद्रतेकडे प्रवास करणारा श्रमजीवी यामुळे आवश्यक त्या भोग्य वस्तूची खरेदी करावयास असमर्थ ठरतो असे एक विलक्षण दृश्य जगात दिसू लागते की एका बाजूला भोग्यसपत्तीचे पर्वतप्राय ढीग वाढत चालले आहेत तर दुसऱ्या बाजूला खावयास मिळत नाही म्हणून लक्षावधि लोक उपाशी मरत आहेत. यत्रस्वामी उत्पादित वस्तूचा उठाव व्हावा म्हणून परराष्ट्राकडे वळतात, व हा उठाव निश्चितपणे व्हावा म्हणून दुसऱ्या देशावर आपली शोषणात्मक साम्राज्ये लादतात अशा रीतीने जगभर एका बाजूला सपत्तीत लोळणारे अल्पसख्य व दुसऱ्या बाजूला दैन्य-दारिद्र्याने पीडलेले बहुसख्य असा देखावा सर्वत्र दिसू लागतो. हे वैषम्य समूळ नष्ट करण्यासाठी मुळातच वैयक्तिक स्वामित्वाचा हक्क नष्ट करणे अत्यावश्यक आहे. अर्थातच यत्रस्वामीचा वर्ग ही गोष्ट उपदेशाने अथवा सामोप-

चाराने ऐकण्याचा काडीइतकाही सभव नाही यासाठी श्रमजीवी वर्गाने क्रातिकारक होऊन व हा वर्ग समूळ नष्ट करून राजसत्ता आपल्या हाती घेतली पाहिजे बहुसख्य वर्गाने वर्गभेद व हा वर्ग नष्ट केल्यावर निर्माण होणारा समाज अर्थात्च एकवर्गात्मक राहील या एकवर्गात्मक श्रमजीवी समाजात श्रम तेथें मोबदला हे तत्त्व कार्यवाहीत आल्यामुळे उत्पादनावर समाजाचे स्वामित्व प्रस्थापित होईल व व्यक्तिगत स्वत्वाचा अथवा खाजगी धन-सचयाच्या पद्धतीचा सपूर्णपणे अस्त होईल कारण तिची आवश्यकता रहाणार नाही याच क्रमाने आवश्यकता न राहिल्यामुळे राज्य-सस्थाही समाजविकसनात विलीन होईल (The state will wither away.) लेनिनने मार्क्सची ही विचारसरणी उचलून धरून रशियात क्रातिकारक समाजवादाचे राज्ययत्र उभारले त्याने असे घोषित केले की, "युरोपीय भाडवलशाहीत (१) निरनिराळ्या साम्राज्यवादी गटाचे व राष्ट्राचे परस्परविरोध (२) प्रत्येक साम्रा-ज्यातील जेते व जित या राष्ट्राचा परस्परविरोध व (३) प्रत्येक राष्ट्रातील कामगार व यत्रस्वामी याचा वर्गविरोध असा त्रिविध अतर्विरोध वाढीस लागलेला असून त्यात लवकरच यूरोपीय भांडवलशाहीची आहुति पडेल. त्या सधीचा जगातील सर्व साम्यवादी राष्ट्रानी फायदा घेऊन सार्वराष्ट्रीय समाजवादी सत्तेची प्रतिष्ठापना करावी, म्हणजे राज्यतत्रविहीन सुवर्णयुगाचा विश्वात उदय होईल" पण तसे काही घडून आले नाही लेनिन्च्या या वासतिक स्वप्नाचे थडगे स्टॅलिनने प्रत्यक्ष रशियांतच करून दाखविले. युरोपातील भाडवलशाही राष्ट्रे, या त्रिविध अंतर्विरोधाचा फारसा परिणाम न होता, अमेरिकेच्या नेतृत्वाखाली रशियन गटाशी दड थोपटीत स्वत च्या सामर्थ्यानेच उभी आहेत भाडवलशाही राष्ट्रात क्राति करण्याऐवजी स्टॅलिनने राष्ट्रवादी भूमिकेचा स्वीकार करून त्याच्याशी मित्रतेचा सधि केला. प्रत्यक्ष रशियातच आर्थिक व राजकीय सत्तेची केन्द्रे कामगार वर्गाच्या अधीन न राहता एका अनियत्रित अधिकारी वर्गाच्या हातात

आहेत व तेथे वेगळ्या नावाने वैयक्तिक स्वामित्व व वर्ग आहेत. श्रमजीवी व बुद्धिजीवी कामगाराच्या राहणीत फरक आहे अल्प-सख्य सत्ताधारी वर्गाची कुरघोडी चालू आहे व व्यक्तीव्यक्तीला राज्ययंत्राचे गुलाम करण्यात आले आहे रशियन साम्यवादी पक्षाचा कार्यवाह निकेता क्रुश्चेव्ह यानेच स्टॅलिन्शाहीचे जे विदारक चित्र नुकतेच माडले त्यामुळे या विचारसरणीतील वैफल्य स्पष्ट झालेच आहे मग साम्यवादाच्या भारतीय दासानी व वैतालिकानी स्पष्टीकरणाच्या कोलांटचा उडचा कितीही घेत बसाव्या ! याचे कारण ही विचारसरणी क्रोधातून निघालेली, भाडवलशाहीची केवळ प्रतिक्रिया होती त्यामुळे (१) अधि-कारवाद व (२) अनिर्बंध आणि असस्कारित स्वत्व या मूलधन-प्रभुत्ववादातील अथवा भाडवलशाहीतील खऱ्या दोषाकडे तिचे लक्षच गेले नाही त्यामुळे एका वर्गाचा काही प्रमाणात तिला सूड घेता आला तरी खरे समाजस्वत्व तिला प्रतिष्ठापित करतां आले नाही येथे केवळ आर्थिक प्रक्रियेपुरतेच मी समालोचन केले आहे या प्रणालीसंबधी माझ्या 'भगवान् श्रीकृष्ण' या ग्रथांत मी अधिक विस्तृत व शास्त्रीय विवेचन केलेले असल्यामुळे येथें अधिक विस्तार करण्याचे कारण नाही

समाजवादी आर्थिक प्रक्रियेची आणखी अपत्ये म्हणजे रशियन तत्त्वज्ञ बाकुनिन्चा अराज्यवाद ( Anarchism ), बर्न स्टाईन्चा सनदशीर समाजवाद व जी डी एच् कोल याचा सघनिष्ठ समाजवाद ( guild-socialism) ही होत. लेनिन्प्रभृति साम्य-वाद्याचे असे म्हणणे होते की, खाजगी धनीपणाच्या हक्कानतर वर्गभेद नष्ट झाले की, राज्यसस्थेचा विलय आपोआपच होईल याच्या उलट अराज्यवाद्याचे असे म्हणणे होते की प्रथम राज्य-सस्थाच नष्ट केली तर खाजगी स्वामित्व व वर्गभेद आपोआप नष्ट होतील. पण मानवी प्रवृत्तीच्या पूर्ण अज्ञानाशिवाय या विधानांत दुसरे काही दिसून येत नाही. व पशुत्वाच्या अमर्याद तांडवावांचून त्याची दुसरी फलनिष्पत्ति असू शकत नाही. 'वाईट राज्यसुद्धां

अराजकापेक्षा बरे' असे राज्यशास्त्रज्ञानी म्हटले आहे ते यासाठीच होय या विचारप्रणालीचा उल्लेख हेच तिचे खडन असल्यामुळे वेगळचा खडनाची आवश्यकताच नाही

सनदशीर समाजवाद म्हणजेच आजच्या समाजवादी पक्षाचा मूलभूत तात्त्विक दृष्टिकोन होय सनदशीर समाजवाद व सघनिष्ठ समाज या दोनच विचारप्रणालीत थोडे तथ्य आहे सनदशीर समाजवादाचे असे म्हणणे आहे की, "मार्क्सची इतिहासाची आर्थिक मीमासा अत्यत चुकीची आहे समाजाचा ध्येयवाद व त्याची सस्कृति याच्यातील परिवर्तनाचे केवळ आर्थिक घटना हे एकच कारण नसून नीतिमत्ता व बौद्धिक पातळी हीही कारणे असतात पुष्कळदा तर आपल्या नैतिक ध्येयानुसार लोक आर्थिक घटनावरही नियत्रणे घालू शकतात. केवळ अतिशय धनिक व अतिशय निर्धन असे दोनच वर्ग समाजात नसून बुद्धिजीवी मध्यम वर्गाचेही अस्तित्व समाजात आहे इतकेच नव्हे तर तो वाढतही आहे. उत्पादन साधनाचे स्वामित्व केवळ अल्पसख्य धनी वर्गाच्याच हातात नसून भांडवलाचे लहान लहान भाग (शेअर्सच्या रूपाने) काढल्यावर कामगार वर्गालाही भागीदारी मिळू लागल्यामुळे जमिनी व भाडवल याच्यावरील स्वामित्व समाजाच्या सर्वच थरात विखुरले जात आहे त्यामुळे साम्यवाद (Communism) म्हणतो त्याप्रमाणे रक्तपातमय हिंसेच्याच मार्गाचा क्रातीसाठी अवलब केला पाहिजे असे नाही सामाजिक समता व लोकसत्ता याच्या शाततामय व पद्धतशीर विकसनानेही ईप्सित साध्य करता येईल. आर्थिक क्षेत्रातील प्रत्यक्ष प्रक्रिया अशी:– (१) समाजातील प्रत्येक घटकाला चरितार्थाला आवश्यक अशी कमीत कमी सोय करून देण्याचा पतकर सरकारने घेणे. (२) सरकारी करांचा अधिकात अधिक भार धनिक वर्गावर लादून त्याची श्रीमती कमी करणे व कनिष्ठ वर्गावर कमीत कमी कर लादून त्याचे जीवन सुसह्य करणे व अशा रीतीने हळूहळू

समता प्रस्थापित करणे (३) वरिष्ठ वर्गाच्या भाडवलातील कांही अश काढून कनिष्ठ वर्गाची सुधारणा करणे. (४) औद्योगिक क्षेत्रात क्रमशः समाजाच्या स्वत्वाची प्रतिष्ठापना करणे, व त्याची पहिली पायरी म्हणून उद्योगधद्याचे हळूहळू राष्ट्रीयीकरण करणे

बुद्धीवादाने होणाऱ्या मतपरिवर्तनावर विश्वास असणाऱ्या या विचारप्रणालीनेही अधिकाराचे तत्त्व (principle of right ) व असस्कारित स्वत्व या दोन त्रुटीचा विचार केलेला नसल्यामुळे तिच्यातही आपला ध्येयवाद प्रत्यक्षात आणण्याचे सामर्थ्य नाही. शिवाय हे सारे परिवर्तन राजदण्डाच्या धाकाने घडवून आणावयाचे असून राजदण्ड हाती असणारे सत्ताधारी मात्र निरपवाद शुचि चारित्र्याचे असतील असे गृहीत धरण्यात आलेले आहे. ते तसे नसतील–कारण तसे चारित्र्य घडविण्याचे सामर्थ्य या सर्वच विचारप्रणालीच्या मुळाशी असलेल्या जडवादात नाही – तर उद्योग धद्याच्या राष्ट्रीयीकरणाचे पर्यवसान समाजस्वत्वाच्या प्रतिष्ठापनेत न होता स्वार्थी व निरकुश राजसत्ताधारी गटाचे सदाचे दास्य साऱ्या समाजावर लादण्यात होईल असे दास्य की जेथे स्वतत्र बुद्धीला स्वतत्र विचार व्यक्त करण्याचे सामर्थ्य नाही, स्वतंत्र परिवर्तनाची खटपट करण्याची शक्यता नाही व म्हणूनच केवळ भयाण भविष्यच अटळ होऊन बसले आहे. असो

जी डी एच् कोल प्रभृतीनी सघनिष्ठ समाजवाद (Guild socialism) म्हणून जी विचारप्रणालि माडली तिच्यात पद्धतशीर विचार अधिक प्रमाणात असून ती भारतीयाच्या जातवार पद्धतीने साधलेल्या आर्थिक विकेंद्रीकरणाशी बऱ्हशी जुळणारी आहे तिचे स्वरूप पुढीलप्रमाणे – (१) राज्यसंस्था कितीही आवश्यक असली तरी धनाचे उत्पादन, विभजन व विनिमय ही कार्ये राज्यसस्थेने प्रत्यक्ष आपल्या हाती न घेता ती समाजातील निरनिराळ्या सघाकडे सोपवावी. धनोत्पादनाची साधने समाजाच्या स्वामित्वाची रहावी, परतु धनोत्पादनाचे प्रत्यक्ष कार्य त्या धंद्यांत

असणाऱ्या सघाकडे अथवा गटाकडेच सोपविले पाहिजे. (२) धनोत्पादनाप्रमाणेच ज्ञानार्जन, सस्कृतिसवर्धन, धर्मप्रचार, समाज-सेवा इत्यादि निरनिराळे व्यवसाय करणाऱ्या लोकानी आपआपले व्यवसाय करून समाजाची सेवा करावी या सघाना आपआपल्या कार्यापुरते मर्यादित का होईना पण त्याच्या क्षेत्रात स्वातत्र्य दिले पाहिजे (३) हे सघ अथवा वर्ग एकमेकावर अत्याचार व कुरघोडी करीत नाहीत आणि आपला कारभार अनीतीने व वाममार्गाने चालवीत नाहीत येवढ्यापुरती त्याच्यावर देखरेख ठेवण्याचे व राष्ट्रात शातता राखण्याचे कार्य राज्यसस्थेकडे असावें (५) कोणत्याही पद्धतीने आर्थिक, राजकीय अथवा कोणतीही सत्ता केद्रित होऊ देऊ नये, विकेद्रीकरणाचेच धोरण व्यवहारात आणावे

विकेन्द्रीकरणाची यथार्थ कल्पना व वर्गसमन्वयाचे धोरण या दृष्टीने समाजवादाच्या वेगवेगळ्या प्रणालीत ही सघनिष्ठ समाज-वादाची विचारप्रणालि अधिक व्यवहार्य व शास्त्रीय आहे पण यातही अधिकाराच्या तत्त्वाच्या परिभाषेचा परित्याग केलेला नसून राजदण्डाच्या भयावाचून दुसरे प्रेरक या वादाच्या प्रवर्तकानाही आढळलेले नाही सत्तेवर अनुशासनाचा कोणताही अंकुश त्याना सागता आलेला नसून मत्तेचे स्वरूप दोषरहित असेल असे समाज-वादाप्रमाणेच गृहीत धरण्यात आले आहे

व्यक्तिवादी व समाजवादी अर्थप्रक्रियाचे स्वरूप आपण येथवर पाहिले यानतरचा तिसरा प्रवाह राष्ट्रवादी विचारप्रणालीचा होय या प्रणालीच्या प्रक्रियानाच फॅसिझम व नाझीझम असे म्हणतात आज या प्रणालीना प्रत्यक्ष महत्त्व काही नाही कारण त्याच्या पुरस्कर्त्या सत्ताचा – इटाली व जर्मनी याचा – अस्त झालेला असून जागतिक राजकारणात त्याची पुरस्कर्ती अशी कोणतीही सत्ता आज नाही. तरीपण त्याचा उदय व अस्त अगदीच ताजा असल्यामुळे त्याचे स्वरूप लक्षात घेणे वावगे ठरणार नाही.

फॅसी हा इटालियन शब्द असून त्याचा अर्थ लाकडाची मोळी असा आहे एकेक काष्ठ दुबळे पण त्याची बाधलेली मोळी

जशी मोडणें कठीण, तसेंच प्रत्येक व्यक्ति दुबळी असली तरी सघटित व्यक्तिसमूह म्हणजेच राष्ट्र मात्र बलशाली असते, व नेता ही राष्ट्राची आवळलेली मूठ होय असे या प्रणालीचे तत्त्व आहे. फॅसिझम् व नाझीझमला अनुक्रमे बलप्रधान तज्ज्ञ शासनवाद व राष्ट्रीयत्ववाद असे म्हणता येईल क्रातिकारक साम्यवादाला (Communism) विरोधी असे तत्त्वज्ञान या वादाने निर्माण केले फॅसिझमला जसा व्यक्तिवाद तसाच समाजवादही मान्य नाही धनोत्पादनाच्या साधनाचे खाजगी स्वत्व तो मान्य करतो परतु त्याबरोबर त्यावर सामाजिक दायित्वाचे बधन घालून स्वत्व व समाजसेवा याचा त्याने समन्वय साधलेला आहे त्याचे असे म्हणणे आहे की, अहममतेचे व त्याच्या पोटी येणाऱ्या स्वामित्व-भावनेचे (Instinct of ownership) मनुष्याच्या नैसर्गिक प्रवृत्तीत (Natural instinct) स्थान असून ती अजिबात उडवून लावणे अथवा नष्ट करणे मार्क्सवादालाच काय पण कोणालाही शक्य नाही त्यामुळे खाजगी मालकीचे तत्त्व मान्य केलेच पाहिजे पण खाजगी मालकाला सुद्धा राज्यापासून सरक्षण लागत असते व राष्ट्र नावाच्या समुदायाचा घटक म्हणून त्याचे एक विशिष्ट सामाजिक जीवनही असते. त्यामुळे त्याला राज्याच्या व समाजाच्या गरजाकडे लक्ष देऊन त्याच्या मिळती व त्याना गैरसोयीचे होणार नाही अशा पद्धतीनेच आपल्या खाजगी मालकी हक्काचा वापर केला पाहिजे वर्गयुक्त समाजरचना नैसर्गिक असल्यामुळे तिला फॅसिझम मान्यता देतो यावरून मार्क्सवादापेक्षा त्याचा पाया अधिक शास्त्रीय आहे ही गोष्ट स्पष्ट होते. आर्थिक समता ही जशी मानवी सस्कृतीच्या विकसनाला प्रतिबधक आहे त्याच-प्रमाणे लोकसत्ताही प्रतिबधक आहे असे फॅसिझमचे म्हणणे आहे हिटलरने आपल्या 'मेनकाफ' मध्ये लोकसत्तेच्या दोषाचे केलेले विश्लेषण अत्यत उद्‌बोधक आहे समाजांत श्रेष्ठ व्यक्ति निर्माण होणे यातच खरी मानवी सस्कृति व मानवी समाजाचा विकास आहे असें फॅसिझमचें म्हणणे असून तो अध्यात्म व धम

याना मानतो. मात्र धर्मसत्तेहून राजसत्तेला त्याने अधिक श्रेष्ठ मानलेले असून राष्ट्रधर्माहून जगातील कोणताही धर्म अधिक श्रेष्ठ नाही असे त्याचे मत आहे. यातच शुद्ध आर्यवशाच्या श्रेष्ठत्वाची कल्पना व त्या वशाच्या जर्मन शाखेची सर्वश्रेष्ठता व तिचा विश्वावर प्रभुत्व गाजविण्याचा जन्मसिद्ध अधिकार याची भर घातली म्हणजे नाझीझमची कल्पना परिपूर्ण होते हा सप्रदाय जडवादाला विरोध करणारा असून ईश्वराच्या अस्तित्वावरील विश्वासाचा पुरस्कार करणारा आहे त्याची राजकीय व आर्थिक प्रक्रिया पुढीलप्रमाणे :– (१) सर्वांचे अधिष्ठान असणारा ईश्वर हाच वस्तुत खरा राज्यकर्ता होय (२) राष्ट्र हे ईश्वराच्या प्रतिनिधीचें लौकिक स्वरूप होय (३) म्हणून प्रजेच्या पालनाचा खरा अधिकार राष्ट्राचाच आहे (४) यास्तव राष्ट्रपुरुषाच्या सामर्थ्याला धक्का लावणारी अथवा खच्ची करणारी जी जी कारणे असतील त्याचा उच्छेद करणे हे राष्ट्रनेत्याचे प्रधान कर्तव्य होय (५) जसा जसा लोकाचा नैतिक स्तर वाढून ते चारित्र्यसपन्न होत जातील व त्याच्या ठिकाणी समाजसरक्षणाची पात्रता वाढेल, तसा तसा शासनाचा अधिकार नेत्यानी हळू हळू त्यांजकडे सोपवावा या सबधात लोकानी बड करणे अथवा मागणी करणे म्हणजे स्वत ची अपात्रता सिद्ध करणेच होय (६) फॅसिझमच्या अर्थप्रक्रियेप्रमाणे प्रत्येकाला स्थावर सपत्तीच्या व्यक्तिगत मालकीचा अधिकार आहे. त्याचप्रमाणे ती सपादन करण्याचा, इतकेच नव्हे तर वशपरपरेने तिचा उपभोग घेण्याचा व देण्याचाही प्रत्येकाला अधिकार आहे (७) शेतकरी, बडे कारखानदार, विधिज्ञ (वकील), डॉक्टर इत्यादि व्यावसायिक वर्ग व कामकरी वर्ग या सर्वांनी अंतर्गत आपआपल्या वर्गात व इतर वर्गाशी सहकार्याने वागून आपापल्या वर्गांचा अभ्युदय करावा. यामुळे वेगळी खटपट न करता राष्ट्राचा अभ्युदय अनायासेच होईल. (८) धनाचे उत्पादन, विभजन व विनिमय आणि सर्व लहान मोठ्या उद्योग धद्याचे राष्ट्रीयीकरण करण्याच्या

समाजवादी नीतीचा फॅसिझम हा विरोधक आहे सरकारचे प्रतिनिधी व खाजगी उद्योगधद्याचे आणि त्यात काम करणाऱ्या कामकऱ्याचे प्रतिनिधी याच्या सहकार्याने प्रत्येक काम चालावे असे फॅसिझमचे मत आहे. कारखानदार व श्रमजीवी या दोघानाही राज्याकडून सरक्षणाची आवश्यकता असतेच. त्यामुळे कारखानदाराचे प्रतिनिधी, श्रमजीवी वर्गाचे प्रतिनिधी व सरकारचे प्रतिनिधी याचेमिळून एक सयुक्त मडळ असावे कारखानदार वर्गाने व श्रमजीवी वर्गाने राजसत्तेच्या प्रतिनिधीजवळ आपापल्या अडचणी व कागळचा माडाव्या आणि मार्गदर्शन घ्यावे. कामकऱ्याच्या बाजूने होणारे सप इत्यादि प्रकरणे व यत्रस्वामीच्या द्वारे होणारे पगारकपात, काढून लावणे, अधिक श्रमाची सक्ती करणे इत्यादि प्रकार हे राष्ट्रीय उत्पादनकार्यात अडथळा उत्पन्न करणारे असल्यामुळे नुसते अवैधच नव्हे तर राष्ट्रद्रोहाचेही व म्हणूनच कठोर दण्डाच्या कक्षेत येणारे आहेत (पण या सबधात साम्यवाद्यानी फॅसिझमला नावे ठेवण्यासारखे काही नाही कारण हेच काय, पण याहीपेक्षा अधिक कठोरतेची अमलबजावणी असलेले निर्बंध रशियन कामगारावर आहेत. फक्त वेगळ्या परिभाषेने भाडवलशाही व अन्य राष्ट्रात कामकऱ्यानी सप करणे क्रातिवादी असल्यामुळे योग्य, तर रशियातील साम्यवादी राज्ययत्र हेच क्रातिवादी असल्यामुळे तेथे करण्यात येणारे सप इत्यादि प्रकार हे प्रतिक्रातिवादी ठरत असल्यामुळे अवैध व दण्डयहि होत असे साम्यवाद्याचे पारिभाषिक समर्थन आहे ) (९) कोणतीहि मिळकत अथवा मालमत्ता सार्वजनिक विश्वस्तनिधि (Public trust) समजण्यात आली पाहिजे व म्हणूनच राष्ट्राच्या हिताला बाधक न होईल अशा पद्धतीनेच तिचा विनिमय झाला पाहिजे १०) सुसघटित समाजरचना आणि समाजाचे सुख व स्वास्थ्य याना बाधा उत्पन्न न होईल येवढ्या प्रमाणातच या निधीच्या किंवा सपत्तीच्या वाढीचे तत्त्व फॅसिझमला मान्य आहे याप्रमाणे सहकारी सस्थेच्या स्वरूपाचा समाज निर्माण करणे हे शासनसस्थेचे अथवा राज्याचें ध्येय आहे.

फॅसिझमच्या या स्वरूपाचा सूक्ष्म विचार केला तर त्याचे टीकाकार भासवितात त्याप्रमाणें ती केवळ राजकीय प्रक्रिया नसून मुळात एक आर्थिक प्रक्रिया आहे हे ध्यानात येईल फॅसिझम-मध्ये स्वत्वाचा समाजहिताशी मेळ घालून व सर्व समाजहिताच्या निर्वाहाचा स्वत्वाशी मेळ घालून व्यक्तिवादी व समाजवादी प्रक्रियापेक्षा शास्त्रीय दृष्टीने एक पाऊल पुढे टाकण्यात आले आहे कारण ते स्वत्वाच्या भावनेची नैसर्गिकता जशी मान्य करतात त्याचप्रमाणे ते समाजहिताच्या मिळती मर्यादित करणेही आवश्यक असल्याचे ओळखतात. पण फॅसिझममध्ये राजसत्ता अथवा नेतृत्व हे सर्वगुणसपन्न असून ते अकुशाच्या अतीत आहे हे गृहीत धरण्यात आलेले तत्त्व समाजहित धोक्यात आणणारे आहे नेतृसत्ता फॅसिझममध्ये गृहीत धरलेली आहे तशी ती निरपवाद असती तर गोष्ट वेगळी पण त्रिगुणात्मक जगात ही नित्याची गोष्ट असू शकत नाही. स्वार्थ व एषणा कोणालाही सुटलेल्या नाहीत व सर्व एषणात प्रभुत्वाची एषणा फारच तीव्र असन तिचे निरकुशत्व मान्य करणे अनर्थावहच होय दुसरे म्हणज फॅमिझम हा केवळ राष्ट्रधर्म असून सर्व मानवाच्या हिताच्या विचाराचे त्याला अधिष्ठान नाही किबहुना तो त्या कल्पनेच्याच विरोधी आहे. तिसरे म्हणजे राजदण्डाच्या भयाची प्रेरणाच येथेही कार्यप्रवणतेचे कारण आहे व कोणतीही भयात्मक प्रेरणा ही शेवटी क्रातीची प्रतिक्रिया निर्माण केल्याविना रहात नाही पात्रता व नैतिक स्तर हे अधिकारप्रदानाचे निकष निरकुश सत्तेच्या हातात देण्यात सत्ता निरपवाद असली तर लोकहित यथार्थतेने साधू शकते; पण त्याचप्रमाणे ती स्वार्थी व सापवाद असली तर जनतेला सदाची दास्यात ठेवण्याची या परिभाषेत सोयहि होऊ शकते.

या सर्व पाश्चात्य अर्थप्रक्रियाची नीट तपासणी केली तर या सर्व प्रक्रियाची प्रेरणा केवळ शासनसस्थेचे अथवा राजसत्तेचे भय हीच असल्याचे आढळून येईल. ही प्रेरणा हितावह नसून घातक आहे. कारण त्यात व्यक्तीचे हृदय उदार करण्याची

कोणतीहि व्यवस्था नाही तिचा दुसरा मोठा दोष म्हणजे कोणतीही समाजव्यवस्था खरी यशस्वी व्हावयास त्यातील प्रत्येक व्यक्तीच्या अहकाराचे ( self-assertion ) सयमात ( self-restraint ) व स्पर्धेचे (competition ) सहकारित्वात (co-operation) रूपातर होण्याची प्रणालि व व्यवस्था जो अत्यावश्यक आहे, तिची कोणतीही व्यवस्था नाही. त्यामुळे या तिन्ही विचारप्रणालीचे वर्णन श्रीमद्‌भागवताने कलियुगाचे जे वर्णन केलेले आहे त्याच्याशी पूर्णपणे जुळणारे आहे श्रीमद्‌भागवतात म्हटले आहे –

" दण्डन्यायव्यवस्थाया कारण बलमेव हि । "

(दड अथवा राज्य व न्याय याच्या कोणत्याही प्रक्रिया कार्यकारी व्हावयास कलियुगात सामर्थ्य अथवा बळ हेच एकमात्र साधन राहील ) या तथाकथित वादातही हेच गृहीत धरले आहे याचे कारण अर्थप्रक्रियेच्या पाश्चात्य प्रणालीत केवळ अर्धवट व अपूर्ण विचार आढळतो हे होय वार्ताशास्त्रात अथवा अर्थशास्त्रात भोक्ता व भोग्य या दोघाचाही विचार केल्यावाचून विभजन व विनिमयाच्या क्षेत्रातील कोणताही विचार परिपूर्ण होऊ शकत नाही पाश्चात्याच्या वरील तिन्ही प्रणालीत केवळ भोग्याचाच काय तो विचार केलेला आहे भोक्त्याचा अशत ही विचार नाही त्यामुळे अधिकारतत्त्वाचा सकोच स्वयप्रेरित करता येणे शक्य आहे या गोष्टीची जाणीवही तेथील अर्थशास्त्रज्ञाना कधी आलेली नाही त्यामुळे भोगलालसा व स्वार्थ याच्यावर त्याना तोडगा सागता येत नाही प्रथम व्यक्तिस्वार्थ, नतर वर्गस्वार्थ व त्यानतर राष्ट्रस्वार्थ या पायरीनें त्याच्यांत केवळ स्वार्थच सघटित होत गेला व त्याचा परिणाम रक्तपातमय परिवर्तनाची आवर्तने वारवार उद्‌घोषित करण्यांत व मानवतेला सकटाच्या छायेत ओढण्यात झाला आहे. प्रत्येक रचना तेथे प्रयोगावस्थेतच राहते व ती बदलण्याची आवश्यकता उत्पन्न होऊन लोक क्रातीच्या मार्गाकडे वळू पाहतात. ही क्राति फक्त सुसह कशी होईल येवढाच काय तो त्याच्यात विचारार्ह

प्रश्न असतो हा विचार करणारा एक पक्ष उत्क्रांतिवादी म्हणजे मतपरिवर्तनाच्या सनदशीर मार्गाने क्रांति करावी असे साग्रह प्रतिपादन करणारा आहे, तर दुसरा पक्ष सशस्त्र क्रांतीचा पुरस्कार करणारा आहे. उत्क्रांतीचा मार्ग शांततेचा व मानवतेचा असला तरी परिणामकारक नाही असा तेथील इतिहासाचा अनुभव असून सशस्त्र क्रांतीचा मार्ग परिणामकारक असला तरी त्यातून विनाशाविना दुसरे काही निर्माण होऊ शकत नाही भारतीय अर्थशास्त्राचे हे वैशिष्टय आहे की त्यानी विभजन व विनिमय याचा विचार करताना केवळ भोग्याचा विचार न करता भोक्त्याच्या विचाराला प्राधान्य दिले आहे अशी अर्थ-व्यवस्था आवश्यक आहे की जेथे भोगलालसा व अधिकाराचे तत्त्व यावरून भोक्त्याची दृष्टि चळून ती कर्तव्यनिष्ठेकडे केन्द्रित होईल, स्वामित्वाची प्रेरणा जेथ दडाच्या भयाने नियत्रित न होता स्वयंप्रेरणेनेच नियंत्रित होईल व समाजाभिमुख त्याग-प्रवणता हा भोक्त्याचा स्थायीभाव बनेल. भोक्ता या पद्धतीचा निर्माण करून त्यानी भोग्याकडे आपली दृष्टि वळविली आहे उपरिनिर्दिष्ट त्रिविध पाश्चात्य प्रणालीत काही गुण व ग्राह्याश आहेत भोग्य विचाराच्या दृष्टीने त्यातील ग्राह्याश घेऊन व दोष टाळून त्याचा अखिल मानवहिताशी समन्वय करण्याची आवश्यकता आहे भारतीय अर्थशास्त्राच्या मूल सिद्धान्ताकडे पाहिले तर ही आवश्यकता पूर्ण होण्याची शक्यता आहे असे आढळून येईल

भारतीय अर्थशास्त्रज्ञानी विभजन व विनिमयाच्या सबधात भोक्त्याला जे विचाराचा केद्र बनविले त्यातील पहिला महत्त्वाचा सिद्धान्त म्हणजे **स्वत्वाचा सिद्धान्त** होय भारतीय अर्थशास्त्रज्ञाची स्वत्वाची अथवा मालकी हक्काची (principle of ownership) व्याख्या अशी आहे की :—

> यावत् भ्रियेत जठर तावत्स्वत्व हि देहिनाम् ।
> अधिक योऽभिमन्येत स स्तेनो दडमर्हति ॥

(स्वतःच्या पोटाला लागणारे अन्न, शीतोष्णनिवारण व लज्जा-सरक्षण यासाठी लागणारे वस्त्र व विश्रातीला आवश्यक असणारी थोडीशी जागा येवढ्यावरच काय ते व्यक्तीचे स्वामित्व आहे याहून अधिक गोष्टी आपल्या स्वामित्वाच्या कक्षेत ओढण्याचा जो प्रयत्न करील तो सामाजिक चोर असून सर्वथा दण्डनीय आहे ) स्वत्वाची इतकी मर्यादित व त्यागपूर्ण व्यवस्था पृथ्वीच्या पाठी-वरील कोणत्याही विचारप्रणालीत आढळणार नाही. या व्याख्येच्या मुळाशी एक शास्त्रीय भूमिका आहे ती पुढीलप्रमाणे .– स्वत्व म्हणजे काय याचा विचार केला तर आपल्या इच्छेनुसार विनियोग करण्याचा जो अधिकार त्यालाच स्वत्व म्हणतात असे आढळून येईल असा अधिकार ज्याचा विनियोग करावयाचा त्या पदार्थांवर अथवा वस्तुजातावर आपली सपूर्ण मालकी असल्यावाचून सिद्ध होऊ शकत नाही तात्पर्य, स्वत्व स्वामित्वाशिवाय असू शकत नाही व स्वामित्व स्वत्वाशिवाय सभवू शकत नाही राजर्षि मनूने कोणत्या द्रव्यावर व्यक्तीचे स्वत्व असते हे स्पष्ट करून सागताना (मनुस्मृति १०–१५) म्हटले आहे की –

सप्त वित्तागमा धर्म्या दायो लाभ क्रयो जय. ;
प्रयोग कर्मयोगश्च सत्प्रतिग्रह एव च ।।

(१) दाय म्हणजे वाटणीच्या पद्धतीने मिळणारा आपला विभाग, (२) लाभ म्हणजे भूमिगत द्रव्य अकस्मात् मिळणे अथवा मित्रता, कोणाची अवचित प्रसन्नता इत्यादीमुळे मिळालेले, (३) क्रय म्हणजे मूल्य देऊन विकत घेतलेले, (४) जय म्हणजे जिकून मिळविलेले, (५) प्रयोग म्हणजे व्यापारधद्यात मिळालेले; (६) कर्मयोग म्हणजे शेतीव्यवसायाच्या भरवशावर मिळविलेले, व (७) सत्प्रतिग्रह म्हणजे शास्त्राज्ञेनुसार योग्य अशा व्यक्तीकडून दान म्हणून प्राप्त झालेले, असे सात मार्गांनी मिळालेले धन धर्म्य होय. याचा अर्थ मनूच्या मताप्रमाणे उपरिनिर्दिष्ट सात गोष्टी ह्या स्वत्वाच्या उत्पादक आहेत पण हा एक व्यवहार्य ठोकळ नियम आहे सूक्ष्म विचाराच्या दृष्टीने यात अनेक प्रश्न उत्पन्न

होतात. उदाहरणार्थ यातील पहिलाच दाय हा प्रकार घ्या. दाय म्हणजे वाटणीचे धन ते आपल्याकडे येण्याआधी त्याच्यावर दुसऱ्या कोणाचे स्वामित्व गृहीत धरलेले असते, व त्या स्वामित्वाच्या भरवशावरच आपला वाटणीवरील अधिकार सिद्ध होत असतो, व त्याचे तरी स्वामित्व व त्याचे कारण असणारे स्वत्व कसे सिद्ध झाले याची परपरा व मूळ पाहावयाचे ठरविल्यास मूळ स्वत्व हे समर्थनीय नसून लादलेले आहे असे बहुश: आढळून येईल दुसरे, जय हे स्वत्वाचे उत्पादक मानले तर सामर्थ्याच्या भरवशावरच जय प्राप्त होत असल्यामुळे वस्तुतः सामर्थ्य अथवा बळ हेच स्वत्वाचे उत्पादक ठरते, व तसें मानले तर विजेत्या राजापासून तर चोर, वाटमारे व दरवडेखोर या प्रत्येकाचेच जयसाधन बळ हेच असल्यामुळें प्रत्येकाचेच स्वत्व हे समर्थनीय ठरेल विकत घेतलेल्या मालावर तरी अगदी मुळात स्वत्व कसे उत्पन्न झाले हा प्रश्न शिल्लक राहतोच, व त्याची जर समाधानकारक उपपत्ति न लागली तर मुळात स्वत्व नसलेला माल एकाने दुसऱ्यास विकण्याचा व त्याने तो विकत घेण्याचा अनवस्था-प्रसंग उत्पन्न होतो लाभ, प्रयोग, कर्मयोग, सत्प्रतिग्रह इत्यादि बाबीसबधानेही त्या त्या पदार्थावर प्राथमिक स्वत्व कसे उत्पन्न झाले हा प्रश्न शिल्लक उरतोच, व त्याचें समाधानकारक उत्तर मिळू शकत नाही व तसे ते मिळाल्यावाचून खऱ्या विचारवताचे समाधान होण्याचीही शक्यता नाही सर्व प्रकारची भोग्यसपत्ति शेवटी पाचभौतिक सृष्टीतूनच घ्यावी लागते या पचमहाभूताच्या उत्पत्तीला मनूने सागितलेली कारणे काही कारण नव्हत अर्थातच त्याच्या ठिकाणी कोणाचेही स्वत्व सभवू शकत नाही मग त्याचा विकार म्हणून उत्पन्न झालेले जे नानाविध भोग्य पदार्थ म्हणजे त्याचेच कार्य असल्यामुळे त्याच्या ठिकाणी तरी दुसऱ्या कोणाचे स्वत्व कसे सिद्ध होणार ? मुळात चोरीचें असलेलें धन अप-समजाच्या वाटपामुळें पारम्परिक हक्कानें एखाद्यास प्राप्त झाले तर कांही माहीत नसल्याच्या सबबीवर त्याला निर्दोष मानता

येईल हे खरे, पण तेवढ्याने त्या पदार्थावरील अथवा धनावरील त्याचे स्वत्व नैतिक दृष्टीने निश्चितपणे सिद्ध होऊ शकत नाही तात्पर्य, सर्व भोग्यजाताचे उपादान कारण असलेल्या पचमहाभूतावर कोणाही जीवाचे स्वत्व कोणत्याही प्रकारे सिद्ध होऊ शकत नसल्यामुळे त्याची कार्ये असणाऱ्या सृष्टीवर अथवा भोग्यजातावर कोणाचेही स्वत्व कोणत्याही प्रकारे सिद्ध होऊ शकत नाही अर्थात मुळात स्वत्वच सिद्ध होण्यासारखे नसल्यामुळे, त्याच्यामुळे उत्पन्न होणारा आपल्या इच्छेप्रमाणे अथवा लहरीप्रमाणे पदार्थाचा हवा तसा विनियोग करण्याचा अधिकार कोणत्याही जीवाला आहे हेच मुळात सिद्ध होऊ शकत नाही अशा स्वत्व नसलेल्या भोग्यसपत्तीच्या सबधात अधिकाराची परिभाषा (Principle of right) लागू करून तिच्या पुरस्कारावर सघर्षयुगाची नादी प्रारम्भ करणाऱ्या व्यक्तिवाद्यापासून तर साम्यवाद्यापर्यंतच्या 'वाद्या'ची भूमिकाच कशी चुकलेली आहे हे ध्यानात येईल कारण अधिकाराची परिभाषा लागू करावयास आवश्यक ते भोग्य सपत्तीवरील स्वत्वच मुळात सिद्ध होण्यासारखे नाही यावर असा एक युक्तिवाद करता येईल की भोग्य सपत्तीचे उपादान कारण असणारी पचमहाभूते जरी जीवाने निर्माण केलेली नसून प्राकृतिक असल्यामुळे त्याच्या ठिकाणी जीवाचे स्वत्व नसले तरी त्याच्यापासून निर्माण होणारी भोग्यसपत्ति ही मनुष्याच्या श्रमसामर्थ्याने, बुद्धिसामर्थ्याने व धनसामर्थ्याने निर्माण केलेली असल्यामुळे त्यावर, या कारणास्तव त्याचे स्वत्व निर्माण होऊं शकते. पण त्यावर असे उत्तर आहे की, मुळात आपले नसलेले व चोरी अथवा वाटमारी करून मिळविलेले धनही श्रमशक्ति, बुद्धिसामर्थ्य व धनसामर्थ्य (साथीदाराना वाटा देणे) यामुळेच प्राप्त होणारे असल्यामुळे या युक्तिवादाने चोरदरवडेखोराचे अपहृत सपत्तीवरील स्वामित्वहि न्याय्य म्हणून मान्य करावे लागेल. यावर स्वाभाविकपणेच असा प्रश्न उत्पन्न होईल की भोगाची इच्छा जीवाला नैसर्गिकपणेच असते व जगण्यासाठी त्याला भोग्यपदार्थांच्या उपयोगाची आवश्यकताही असते

त्याशिवाय तो जिवत राहणेच अशक्य आहे. त्यामुळेच तो कार्य-प्रवृत्त होतो मग जीवाच्या जगण्याची व्यवस्था व त्याच्या कार्य-प्रवृत्त होण्याची प्रेरक शक्ति कोणती? यावर असे उत्तर आहे की सर्व पचमहाभूतात्मक सृष्टि ही सर्व जीवाना आवश्यक ते भोग देण्यासाठीच उत्पन्न झालेली असल्यामुळे सर्व जीवाचेच भोग्य पदार्थजातावर सारखेच स्वत्व आहे कोणत्याही एका व्यक्तीला, वर्गाला, राष्ट्राला अथवा केवळ मानव समाजाला सृष्टीतील भोग्य-जातावर केवळ माझाच अधिकार आहे व माझ्या इच्छेवर इतरांचे भोगाधिकार अवलबून आहेत असे कधीही म्हणता येणार नाही, व त्यामुळेच आपल्या इच्छेप्रमाणे विनियोगाचा येथे कोणालाही अधिकार नाही त्याने नेहमीच आपल्या उपभोगाचा विचार करताना ही भावना हृदयात बाळगली पाहिजे की –

सर्वेऽत्र सुखिन सन्तु सर्वे सन्तु निरामयाः ।
सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चिद् दु खमाप्नुयात् ।।

(जगात सर्व जीव सुखी व निरोगी असावेत. सर्वांचे कल्याण व्हावे व कोणीही दु खी असू नये.) हीच धारणा ज्ञानदेवानी पुढील शब्दात व्यक्त केली आहे ‘ जो जे वाञ्छील तो ते लाहो । प्राणिजात ।।’ तात्पर्य, सृष्टि सर्व जीवासाठी प्रवृत्त झालेली असल्यामुळे सर्व जीवाचा निर्वाह होऊन जे अवशिष्ट उरेल, त्यावरच व्यक्तीच्या स्वत्वाचा, भोग्यत्वाचा व इच्छेप्रमाणे विनियोग करण्याचा अधि-कार असू शकतो मग ती भोग्यसपत्ति कोणाच्याही श्रमशक्तीने, सामर्थ्याने व धनविनिमयाने उत्पन्न झालेली असो म्हणून अर्थ-शास्त्रातील महान् व विवाद्य प्रमेय जे स्वत्व, त्या सबधांत भारतीयाचा असा सिद्धान्त आहे की आपल्या धनबळाने, शारीरिक बळाने, अथवा बुद्धिबळाने जरी भोग्य सपत्तीची हवी तेवढी निर्मिति आपण केलेली असली तरी सर्व जीवाचा निर्वाह साध-ण्याच्या सबधात मुळीच बाधा उत्पन्न होणार नाही अशा मर्यादेतच तिचा उपभोग घेण्याचे स्वत्व नि स्वामित्व व्यक्तीला आहे. स्वामित्वाच्या अधिकाराचा इच्छेनुसार वापर कोणालाही करतां

येणार नाही. निर्वाहाची सर्वांनाच आवश्यकता असल्यामुळे व्यवहाराच्या सौकर्यासाठी वर उल्लेखिलेला 'निवार्हापुरते अन्न आच्छादन' हा सर्वांचाच नैसर्गिक अधिकार भारतीय अर्थशास्त्रज्ञ स्थूलमानानें मान्य करतात भारतीयांच्या स्वत्वाच्या सिद्धान्ताचे व स्वामित्वाच्या सिद्धान्ताचे स्वरूप (१) सर्व जीवांचा निर्वाह होऊन अवशिष्ट उरेल त्यावर व्यक्तीचे स्वत्व व (२) सर्वांचेच भोग्य पदार्थांच्या उपभोगावर श्रमशक्ति, धनशक्ति व बलशक्ति-निरपेक्ष स्वामित्व, हे आहे व्यक्तिवादी व समाजवादी विचार-धारेने न सुटणारे अधिकारवादाचे कोडे व तज्जन्य संघर्ष या दृष्टिकोनाने सुटू शकतात भारतीयांचे असे म्हणणे आहे की, भोग्य संपत्ति अमाप प्रमाणात निर्माण करण्याचे सामर्थ्य असणाऱ्या व्यक्तीचीही स्वत्वाची मर्यादा 'निर्वाहापुरते अन्नआच्छादन' येवढीच आहे. उरलेल्याचे संरक्षण व त्याचा विनियोग इतरांसाठीच झाला पाहिजे

अर्थशास्त्राचे मंदिर उभारताना स्वीकारलेला हा सिद्धान्त पूर्णपणे त्यागात्मक धारणेचा द्योतक आहे हे स्पष्टच आहे याचाच अर्थ केवळ भोग्य संपत्तीऐवजी तिच्याहून अधिक महत्त्वाचा व प्रत्यक्ष कार्यकारी असलेला भोक्ता हा भारतीय विचाराचे केन्द्र बनलेला आहे ही त्यागस्फूर्ति जीवाच्या अथवा मनुष्याच्या ठिकाणी स्वयंस्फूर्त अथवा स्वयंप्रेरित असू शकत नाही. ती संस्कारांनी निर्माण करावी लागते भोगेच्छेचे जीवमात्राच्या ठिकाणी विलक्षण प्राबल्य असून वासनाचे शमन भोग्य पदार्थांचे केवढेहि इंधन पुरविले तरी होऊ शकत नाही सर्वांना सारख्या मोलाची भोग्य संपत्ति मिळूही शकत नाही सर्व जमिनीचे सारखे वाटप केले तरी काहींना अतिशय सुपीक जमीन वाटयास येईल; तर दुसऱ्या कित्येकांना केवढेहि श्रम घेतले तरी फारशी दाद न देणारी जमीन वाटयास येईल. सुपीक जमीन व लावण्यसंपन्न स्त्री कोणास नको असते? पण जमीन म्हटली की ती सुपीक असलीच पाहिजे व स्त्री म्हटली की ती लावण्यवती असलीच पाहिजे

असे कांही म्हणता येणार नाही सर्वच पदार्थांच्या सबधांत ही गोष्ट आहे गुणसपत्तीच्या दृष्टीने श्रेष्ठ असलेल्या पदार्थांची जगात नेहमीच मर्यादित निर्मिति होते व तेच पुष्कळदा कलहाचे बीज पेरतात. ते ज्याच्या वाटचास येतील ते जसे अत्यत आनदांत राहतील त्याचप्रमाणे वर्ग व सख्या तीच पण ते गुणधर्म नाहीत असे पदार्थ ज्याच्या वाटचास येतील त्याच्या मनात मत्सर, द्वेष व कलहप्रवृत्तीना स्थान मिळाल्यावाचून रहात नाही. त्यामुळे केवळ विनिमय व उपभोग याच्याशीच सबद्ध असणाऱ्या स्वत्व व स्वामित्वाच्या सिद्धान्तानी काम भागत नसून त्याना जगाकडे व पदार्थमात्राकडे पाहण्याची एका विशिष्ट दृष्टिकोनाची पार्श्वभूमि आवश्यक असते पाश्चात्य प्रणालीत भोग्यवस्तू या एकाच दृष्टीने जगाकडे पाहण्यात आल्यामुळे त्याना शासनभयापलीकडे दण्ड-न्याय व्यवस्थेचे दुसरे साधन उपलब्ध होऊ शकले नाही भारतीयानी यासाठी सर्वभूतहितात्मक ध्येय साधावे म्हणून जगाकडे पाहण्याचा जो सिद्धान्त सागितला तो म्हणजे ईशस्वत्ववाद होय स्वत्व व स्वामित्वासबधीच्या त्याच्या सिद्धान्ताना कार्यकारी होण्यासाठी ईशस्वत्ववादाने सामर्थ्य पुरविले आहे असें भारताचा सास्कृतिक इतिहास सागतो. त्याचें स्वरूप पुढीलप्रमाणे —

**ईशस्वत्ववाद** ईशावास्योपनिषदाच्या पहिल्याच मंत्रांत असे म्हटले आहे :–

ईशावास्यमिद सर्व यत्किच जगत्या जगत् ।
तेन त्यक्तेन भुञ्जीथा मा गृध कस्यस्वित् धनम् ॥

(हे जे जगत् म्हणून आहे ते सर्व ईश्वरानेच आच्छादिलेले म्हणजे वस्तुत. ईश्वरच आहे म्हणून तू त्याच्या चरणी सर्व समर्पण करूनच उपभोग घे व कोणाच्याही धनाची अत:करणात इच्छा करू नकोस ) दिसायला या ब्रह्माडात जड व चेतन असे भाग वाटत असले तरी वस्तुत या दोन्ही रूपानें परमेश्वर नटलेला आहे. त्याचें जड स्वरूप (ज्याला आतांपर्यंत भोग्यजात

असें आपण म्हणत आलो) डोळ्यानी दिसते म्हणून ते मूर्त आहे, तर चेतन स्वरूप डोळ्यानी दिसण्यासारखे नसल्यामुळे तें अमूर्त आहे. बृहदारण्यकोपनिषदात दोन ठिकाणी म्हटले आहे "द्वेवाव ब्राह्मणो रूपे मूर्त चैवामूर्त च ।।" (बृहदारण्यक २ ३ १ व ३ ७ २) व या औपनिषदिक सिद्धान्ताचाच अनुवाद करताना श्रीमद्-भागवतात म्हटले आहे –

"सरित्समुद्राश्च हरे शरीर यत्किं च भूत प्रणमेदनन्य" (नद्या समुद्र इत्यादिकासहित जे जे वस्तुजात आहे, ते ते सर्व परमेश्वर-स्वरूपच असल्यामुळे त्याच्या ठिकाणी नेहमी प्रणामयुक्त असावे. 'जे जे भेटे भूत ते ते मानी भगवत' या शब्दात सतानीही हाच सिद्धान्त सागितलेला आहे याप्रमाणे हे सर्व जगत् परमेश्वराचें लीलाविलसितच असल्यामुळे त्यातील अणरेणूवर वस्तुत त्याचाच अधिकार आहे. व म्हणूनच सर्वान्तर्यामी समष्टिरूप परमेश्वराच्या आराधनासाठीच जगाची उत्पत्ति आहे व त्याचे आराधनीय द्रव्य या दृष्टीने भोग्यजाताकडे पाहणे व भोग्य जातानी त्याचे प्रत्यक्ष आराधन करणे हेच मनुष्याचे वास्तविक कर्तव्य आहे यालाच ईशस्वत्ववाद असे म्हणतात या ईश्वर-स्वत्ववादाची धारणा दृढ झाली की भोक्ता हा यज्ञप्रकृतिक झाल्याविना रहात नाही वैदिक राष्ट्र यज्ञप्रकृतिक होते हे काही कोणास सागावयास नको पण यज्ञप्रकृतिकता म्हणजे काय?

श्रमशक्ति, धनसामर्थ्य व शारीरिक सामर्थ्य यानी सपादिलेल्या सर्व भोग्य पदार्थाचा व धनाचा विनियोग स्वार्थासाठी न करता केवळ समष्टिरूप अशा परमेश्वराच्या आराधनेसाठीच करणे व अवशिष्ट राहिलेल्याचा अथवा वाट्यास आलेल्याचाच प्रसाद म्हणून आनदाने स्वीकार करणे यालाय ज्ञप्रकृतिकता असे म्हणतात शुक्ल यजुर्वेदात म्हटले आहे –

त पत्नीभिरनुगच्छेम देवा पुत्रैर्भ्रातृभिरुत वा हिरण्यै ।
नाक गृभ्णाना सुकृतस्य लोके तृतीये पृष्ठे अधि रोचने दिवः ।।

प्रस्तुत मत्रात देवाची अशी प्रार्थना केली आहे की, धन, पुत्र,

भ्राते, पत्नी इत्यादि आमचे जे जे काही जड व चेतन वस्तुजात आहे तें ते सर्व केवळ यज्ञासाठीच असून यज्ञाचेंच आम्ही अनुगमन करू. तरी आपण आम्हाला आमची ही जीवननिष्ठा कधी कंपित होणार नाही असा वर द्या. सारे जीवन यज्ञात्मक धारणेचे बनावे ही केवढी उदात्त अभिलाषा आहे! पण तिचें खरे स्वरूप ध्यानात येण्यासाठी यज्ञाचे स्वरूप स्पष्ट केले पाहिजे. यज्ञाचा लोकात रूढ असलेला अर्थ अग्नीमध्ये हवन करणे असा आहे. पण तो अर्थ येथें विवक्षित नाही व यज्ञाचा तो खरा अर्थही नाही देवतेच्या उद्देशाने कर्तव्य म्हणून करावयाचा जो त्याग त्याचे नाव यज्ञ असें आहे; व अशा रीतीने ज्या द्रव्याचा त्याग केलेला आहे त्याचा विधिपूर्वक अग्नीत प्रक्षेप म्हणजे होम होय याप्रमाणे वैदिक परिभाषेप्रमाणे यज्ञ व होम या दोन गोष्टी परस्परभिन्न आहेत. यज्ञात होम दिसत असला तरी यज्ञात त्यागाचे प्राधान्य आहे; होमाचे नव्हे यास्तव यज्ञप्रकृतिकतेचा व मानवी कर्तव्याचा उपदेश करताना गीतेन (अ ३) भगवतानी म्हटले आहे :--

यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽय कर्मबन्धन ।
तदर्थं कर्म कौन्तेय मुक्तसग समाचर ॥
सहयज्ञा प्रजा सृष्ट्वा पुरोवाच प्रजापति ।
अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ॥१० ॥
देवान् भावयतानेन ते देवा भावयन्तु व ।
परस्पर भावयन्तः श्रेय परमवाप्स्यथ ॥ ११ ॥
इष्टान्भोगान्हि वो देवा दास्यन्ते यज्ञभाविता ।
तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुक्ते स्तेन एव स ॥ १२ ॥
यज्ञशिष्टाशिन सतो मुच्यन्ते सर्वकिल्बषै ।
भुञ्जते ते त्वघ पापा ये पचन्त्यात्मकारणात् ॥ १३ ॥

यज्ञासाठी जे कर्म करितात त्याखेरीज इतर कर्मांने हा लोक बांधिलेला आहे. तदर्थ म्हणजे यज्ञार्थ करावयाचे कर्मदेखील तू आसक्ति किंवा फलाशा सोडून करीत जा ( यज्ञ शब्द केवळ श्रौत यज्ञापुरताच या ठिकाणी वापरला नसून त्यात स्मार्त यज्ञाचा

आणि चातुर्वर्ण्यादि यथाधिकार सर्व व्यावहारिक कर्मांचा समावेश होतो हे या प्रकरणी वाचकाने नेहमी लक्षात ठेवलें पाहिजे.) पूर्वी यज्ञासह प्रजा निर्माण करून ब्रह्मदेव त्यास म्हणाला की या यज्ञाच्या योगाने तुम्ही वृद्धि पावा हा तुमची कामधेनु म्हणजे इच्छित मनोरथ पूर्ण करणारा होवो या यज्ञाने देवाची सभावना म्हणजे समृद्धि तुम्ही करीत जा. व ते देव उलट तुमची सभावना म्हणजे समृद्धि करोत याप्रमाणे परस्पराची सभावना करीत दोघेही परम श्रेय म्हणजे कल्याण प्राप्त करून घ्या कारण, यज्ञाने सतुष्ट झालेले देव इच्छिलेले सर्व भोग तुम्हाला देतील त्यांनी दिलेले त्याना परत न देता जो केवळ स्वत च उपभोगितो तो खरोखरच चोर होय. यज्ञ करून अवशिष्ट राहिलेल्या भागाचें ग्रहण करणारे सद्गृहस्थ सर्व पापापासून मुक्त होतात परन्तु यज्ञ न करतां केवळ आपल्यासाठीच जे अन्न शिजवितात ते पापी लोक पाप भक्षण करतात )

यज्ञ याचा अर्थ चातुर्वर्ण्यात्मक समाजरचनेतील वाटचास आलेली व्यक्तीची व वर्गाची कर्तव्यकर्मे त्यागपूर्वक करणे होय व समाजाचें धारण पोषण होण्यास ही यज्ञकर्मे किंवा यज्ञचक्र म्हणजेच प्रत्येकाने आपले विहित कर्तव्यकर्म सतत करीत राहणे हाच मार्ग आहे हे काही कोणास सागावयास नको. यज्ञ म्हणजे कर्तव्य-बुद्धीने त्याग करणे व समाजामिळती जे अवशिष्ट राहील तेंच सतोषाने ग्रहण करणे होय असें न करता स्वार्थबुद्धीने जो स्वत -पुरतेंच पाहतो व उपभोगण्याची वृत्ति ठेवतो तो आपले पाप खाणारा आहे हे भगवान् श्रीकृष्णानी सागितलेलें तत्त्व नवे नसून राजर्षि मनूनेही ते पुढील शब्दात सागितलेले आहे --

अघ स केवल भुक्ते य पचत्यात्मकारणात् ।
यज्ञशिष्टाशन ह्येतत्सतामन्न विधीयते ।।

—(मनुस्मृति ३. ११८)

( जो आपल्याकरिताच अन्न शिजवितो तो केवळ पापभक्षण करितो. यज्ञ करून जे शेष राहील त्यास 'अमृत' आणि इतर

सर्व जेवून जे शेष राहील त्यास ' विघस ' असें नांव असून मनूच्या मताप्रमाणे तेच अन्न शिष्ट लोकास विहित आहे. पण मनु किंवा श्रीकृष्ण यानी वेदाचाच वस्तुत अनुवाद केलेला आहे. ऋग्वेद म्हणतो --

नार्यमण पुष्यति नो सखाय केवलाघो भवति केवलादी ॥

—(ऋग्वेद १० ११७ ६)

जो अर्यमा किवा सखा याचे पोषण करीत नाही, एकटाच भोजन करितो, तो केवळ पापी समजावा ) ही समाजाभिमुख कर्तव्यपरायणता व समाजामिळती मिळेल त्यात आनद मानण्याची प्रवृत्ति ज्याच्यात नाही त्याच्यासबधाने भगवान् श्रीकृष्ण पुढीलप्रमाणे तिरस्कार व्यक्त करितात –

एव प्रवर्तितं चक्र नानुवर्तयतीह य ।
अघायुरिन्द्रियारामो मोघ पार्थ स जीवति ॥१६॥

--(श्रीभगवद्गीता अ. ३)

(याप्रमाणे जगाच्या धारणार्थ सुरू केलेले चक्र या जगात जो पुढे चालवीत नाही त्याचे आयुष्य पापरूप असून या इद्रियलपटाचे म्हणजे देवाला अथवा सर्वातर्यामी समष्टिरूप ईश्वराला अर्पण न करता स्वत च चैन करणाऱ्याचे जिणे, हे पार्था ! व्यर्थ होय )

या ठिकाणच्या यज्ञ शब्दाचा अर्थ होम असा जे लोक करीत असतील त्याच्या पाडित्याला हात जोडणेच बरे ! युद्धात परावृत्त झालेल्या अर्जुनाला युद्धप्रवृत्त करण्यासाठी केलेल्या उपदेशात ' तू यज्ञप्रकृतिक हो ' असे जे म्हटले आहे ते कुरुक्षेत्रावर होमकुड निर्माण करण्यासाठी नसून रणकुंड निर्माण करण्यासाठी होय हे स्पष्टच आहे.

याप्रमाणे (१) सर्वजीवनिर्वाहपूर्वक अवशिष्टत्व, (२) ईशस्वत्ववाद, व (३) यज्ञप्रकृतिकता अथवा त्यागात्मक कर्तव्य परायणता या तीन मूलभूत सिद्धान्तावर भारतीयाच्या प्राचीन वार्ताशास्त्राच्या (अर्थशास्त्राच्या) मदिराची उभारणी झालेली आहे

अर्थातच भोग्यवस्तु म्हणून भोग्यजाताकडे न पाहता 'यज्ञार्थ' अथवा यज्ञाची सामग्री म्हणूनच त्यानी पाहिले. राष्ट्रवादी अथवा समाजवादीही ज्याचें जें कर्तव्य आहे ते त्याने करीत रहावें व फळ समाजाच्या अथवा राष्ट्राच्या पदरात निरपेक्ष बुद्धीने पडावें, कर्त्याने केवळ आपल्या निर्वाहापुरतेच पहावे असेच अपेक्षितात. भारतीयाचे हेच म्हणणे आहे की, फलाशा सोडून आपल्या वाट्याला येणारे कर्तव्यकर्म परमेश्वराराधनबुद्धीने करावे. निर्वाह समष्टिजीवनात होतोच. राष्ट्रवादी व समाजवादी केवळ शासनाच्या भयाने ही गोष्ट करू इच्छितात तर ती भारतीय कर्त्या-च्याच ठिकाणी कर्तव्याची स्वयप्रेरणा उत्पन्न करून करतात हा त्यांच्यात भेद आहे म्हणून पहिले प्रयोग फसले, तर दुसरा सहस्रावधि वर्षे एक समाजरचना टिकविण्यात पर्यवसित झाला हो प्रवृत्ति विशद करताना गीतेत म्हटले आहे --

यत प्रवृत्तिर्भूताना येन सर्वमिद ततम् ।
स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धि विन्दति मानव ।।४६

—(श्रीभगवद्गीता अ १८)

ज्ञानदेव याचे स्पष्टीकरण करतात – 'तया सर्वात्मका ईश्वरा। स्वकर्मकुसुमाची वीरा। पूजा होय अपारा। तोषालागी।।'

या जगात स्वत खेरीज इतर सर्व पदार्थांकडे मनुष्य भोग्य म्हणून पाहतो व आपल्या स्वतस मात्र भोक्ता समजतो भारतीयांना ही गोष्ट मान्य नसून जगातील प्रत्येक ( स्वतः सुद्धा ) पदार्थ हा भोग्य व भोक्ता अशा दोन्ही भूमिकांचा आहे असें त्याचें म्हणणे आहे. स्वतः आपणसुद्धा भोग्यच असून इतर सर्व पदार्थांप्रमाणेच आपलीही उत्पत्ति यज्ञासाठीच झालेली आहे. यालाच भारतीय अर्थशास्त्रज्ञ स्वात्मभोग्यत्वाचा सिद्धान्त असे म्हणतात. वेदामध्ये याच अभिप्रायाने मनुष्याला देवाचा पशु असे म्हटले असून खरी कर्तव्यपरायणतेची प्रेरणा या भूमिकेतूनच निष्पन्न होते

या चार सिद्धान्तांवर भारतीयानी राजा आणि प्रजा व प्रजा-तील सीमित नि वर्गबद्ध व्यावसायिक क्षेत्र याच्यातील विभजन व विनिमयशास्त्राची उभारणी केलेली आहे भोगाकरितां कर्तव्य ही भारतीयाची प्रेरणा नसून कर्तव्याकरिता कर्तव्य व यथाप्राप्त भोग ही त्यांची धारणा आहे

या मूल सिद्धान्तावर उभारलेल्या भारतीयाच्या विनिमय-शास्त्राकडे पाहिले तर पहिली ही महत्त्वाची गोष्ट ध्यानात येते की त्याचे आर्थिक जीवनाचे निर्बंध राजसत्तेने निर्माण केलेले नसून स्थितप्रज्ञ, कामगंधहीन व विश्वात्मधारणेच्या तपस्व्यानी केलेले आहेत राजसत्तेतील परिवर्तनाने ते मुळीच बदलत नव्हते तर राज्यानुशासन त्याच्या सरक्षणासाठी व अमलबजावणीसाठीच असे. तात्पर्य, ते शाश्वत होते मनूने म्हटले आहे —

स्वे स्वे धर्मे निविष्टाना मर्वेषामनुपूर्वश ।
वर्णानामाश्रमाणा च राजा सृष्टोऽभिरक्षता ।। (मनु. ७-३५)

(आपापल्या कर्तव्यकर्मात दक्ष असलेल्या वर्णाश्रमयुक्त प्रजेचे रक्षण हेच राजाचे कर्तव्य होय ) तात्पर्य, राजा हा रक्षिता आहे, निर्बंधाचा निर्माता नाही. आपण राजा व प्रजा याच्या सबधात आर्थिक अनुशासन काय होते ते प्रथम पाहू .—

**राजा व प्रजा** यातील पहिली गोष्ट म्हणजे करपद्धति होय. प्रजेने आपल्या उत्पन्नातून राजसत्तेस कर द्यावा व तो घेऊन राजसत्तेने प्रजेचे सरक्षण करावे ही व्यवस्था सर्वत्र व त्रिकालाबाधित आहे पण विकासाच्या नावाखाली नवे नवे कर काढून शोषण करण्याचे स्वातत्र्य वैदिक राज्यसस्थेला नव्हते जितकी सपन्नता त्या मानाने कर व व्यावसायिकाच्या अथवा व्यापाऱ्याच्या लाभावर कर-उत्पन्नावर नव्हे हे भारतीय अर्थ-शास्त्राचे सूत्र आहे मनू म्हणतात —

क्रयविक्रयमध्वान भक्त च सपरिव्ययम् ।
योगक्षेमं च सप्रेक्ष्य वणिजो दापयेत्करान् ।।१२७।।
यथा फलेन युज्येत राजा कर्ता च कर्मणाम् ।
तथावेक्ष्य नृपो राष्ट्रे कल्पयेत्सतत करान् ।।१२८।।

यथाल्पाल्पमदन्त्याद्य वार्योकोवत्सषट्पदा ।
तथाल्पाल्पो गृहीतव्यो राष्ट्राद्राज्ञाब्दिक. कर ॥१२९॥
पचाशद्भाग आदेयो राज्ञा पशुहिरण्ययो ।
धान्यानामष्टमो भाग षष्ठो द्वादश एव वा ॥१३०॥
आददीताथ षड्भाग द्रुमासमधुसर्पिषाम् ।
गधौषधिरसाना च पुष्पमूलफलस्य च ॥१३१॥
पत्रशाकतृणानां च चर्मणा वैदलस्य च ।
मृण्मयाना च भाडाना सर्वस्याश्ममयस्य च ॥१३२॥
यत्किंचिदपि वर्षस्य दापयेत्करसज्ञितम् ।
व्यवहारेण जीवत राजा राष्ट्रे पृथक्जनम् ॥१३७॥
कारुकान् शिल्पिनश्चैव शूद्राश्चात्मोपजीविन ।
एकैक कारयेत्कर्म मासि मासि महीपति ॥१३८॥
– ( मनु अ ७ वा )

(माल कोणत्या भावाने घेतला, विक्री कोणत्या भावाने झाली, व दूरदेशाहून किती माल आणला, तो आणण्याला व चोरादिकापासून रक्षण करण्याला खर्च किती आला, भोजनात किती खर्चला गेला, आणि त्यापासून याला निव्वळ नफा किती झाला या सर्वाचा विचार करून व्यापाऱ्यापासून कर घ्यावा शेतकरी व व्यापारी याना अनुक्रमे शेती व व्यापाराच्या क्षेत्रात फळ (लाभ-नफा) मिळून आपल्यालाही त्या फळाचा लाभ कितपत होऊ शकेल याचा पूर्ण विचार करूनच राजाने त्याच्यावर कराची आकारणी करावी ज्याप्रमाणे जळवा, वत्स किवा भ्रमर हे क्रमाने रक्त, दूध, किवा मकरद थोडा थोडा भक्षण करतात त्याचप्रमाणे राजानेही मूळ भाडवलाचा उच्छेद जेणेकरून मुळीच होणार नाही अशी काळजी घेऊनच प्रजापासून थोडा थोडा वार्षिक कर घ्यावा. पशू व हिरण्य म्हणजे सोने याच्या लाभातून (नफ्यातून) पन्नासावा भाग राजाने घ्यावा. धान्याचा सहावा, आठवा किवा बारावा भाग भूमि उत्तम, मध्यम व कनिष्ठ असेल व लागवडीच्या खर्चाचें न्यूनाधिक प्रमाण असेल ते नीट पाहूनच योग्य असेल तदनुसार

घ्यावा. वृक्ष, मास, मधु, तूप, गंध, औषधी, रस, पुष्प, मूल' फल, पत्र, शाक, तृण, चर्म, वाबूची पात्रे, मृत्तिकापात्रे, पाषाण-पात्रे या सर्वांचा सहावा भाग लाभातून (नफ्यातून) घ्यावा. भाजी, पाने इत्यादि हलक्या वस्तूची देवघेव करून उपजीविका करणारे असे जे गरीब लोक त्यापासून राजाने जो वार्षिक कर घ्यावयाचा तो अतिशय स्वल्प प्रमाणात घ्यावा सुतार, कोष्टी, न्हावी, परीट, चाभार, कारागीर, लोहार, व अन्य शरीरकष्ट करून उपजीविका करणारे भोई इत्यादि जे श्रमजीवी लोक त्याच्यापासून राजाने प्रत्येक महिन्यातील एकेक दिवस विनावेतन चाकरी घ्यावी व तोच त्याचा कर असे समजावे ) यावरून तीन सूत्रावर भारतीय करपद्धति उभारलेली होती असे दिसते ती तीन सूत्रे (१) आर्थिक स्थितीच्या मानाने कराचे प्रमाण, (२) लाभावर (नफ्यावर) कर, व (३) श्रमजीवी वर्गावर शारीरिक श्रमाचाच अल्प कर ही ती तीन सूत्रे होत. तपस्विवर्गाचे व्यवसाय पूर्णपणे अनुत्पादक असल्यामुळे त्याच्यावर कराची आकारणी नाही. (म्रियमाणोऽप्याददीत न राजा श्रोत्रियात्करम्) जशी कराची तशीच अपराध्यास द्यावयाच्या दण्डाचीही व्यवस्था आहे. ब्राह्मणाला अपराधासबधीचे ज्ञान अधिक असण्याचा संभव असल्यामुळें त्याला दण्डही अधिक सागितलेला आहे अज्ञानी माणसाने केलेल्या अपराधाबद्दल त्याला जितका दण्ड त्यापेक्षा सोळा पट अधिक दण्ड ब्राह्मणाला व सहस्रपट अधिक दण्ड राजाला अशी ही अधिकारभेदानुरूप व्यवस्था भारतीयांनी सांगितलेली आहे.

तिसरी महत्त्वाची बाब म्हणजे वेतनपद्धति होय राजसत्तेला ज्याच्यापासून काम प्रत्यक्ष घ्यावयाचे असतें त्या सेवकाचे बुद्धि-जीवी व केवळ श्रमिक असे दोन भाग नेहमीच व प्रत्येक शासन-सचालित विभागात पडतात त्याच्या वेतनाचे प्रमाण व यज्ञांतील ऋत्विजाच्या दक्षिणेचें प्रमाण सम असावें असें भारतीय समाज-शास्त्रज्ञाचे मत आहे. हें प्रमाण सागतांना राजर्षि मनु म्हणतात.—

सर्वेषामर्धिनो मुख्यास्तदर्धेनार्द्धिनोऽपरे ।
तृतीयिनस्तृतीयांशाश्चतुर्थांशाश्च पादिन ॥२१०॥
सभूय स्वानि कर्माणि कुर्वद्भिरिह मानवै ।
अनेन विधियोगेन कर्तव्यांशप्रकल्पना ॥२११॥
–(मनुस्मृति अ ८)

( ज्योतिष्टोम यज्ञात यजमानाला शभर गाईरूप द्रव्य सोळा ऋत्विजात वाटावे लागतें. सोळा ऋत्विजामध्ये वाटावयाच्या या शभर गाईचे वाटप पुढीलप्रमाणे होईल. सोळा ऋत्विजामध्ये अध्वर्यू, ब्रह्मा, होता व उद्गाता हे जे चार मुख्य ऋत्विज त्याना अर्ध विभागाचे समसमान विभाग द्यावे म्हणजे प्रत्येकाला बारा बारा गाई याप्रमाणे अठ्ठेचाळीस गाई येतील दुसरे मैत्रावरुण, प्रतिप्रस्थाता, ब्राह्मणाच्छसी, व प्रस्तोता हे अर्ध्या भागाच्या अर्ध्याचे म्हणजे चोवीस गाईचे समविभागी होतील म्हणजे प्रत्येकाच्या वाट्यास सहा सहा गाई येतील तिसरे जे अच्छावाक्, नेष्टा, आग्नीध्र व प्रतिहर्ता हे चार ऋत्विज ते तृतीयांशाचे म्हणजे सोळा गाईचे समविभागी होतात म्हणजे प्रत्येकाच्या वाट्यास चार चार गाई येतात चौथे म्हणजे ग्रावस्तुत, उन्नेता, पोता व सुब्रह्मण्य हे जे ऋत्विज ते चतुर्थांशाचे म्हणजे बारा गाईचे समविभागी होतात म्हणजे प्रत्येकाच्या वाट्यास तीन तीन गाई येतात अनेक लोक एकत्रित येऊन एकाच प्रकारच्या व्यवसायात भागीदारीने जेव्हा काम करतात तेव्हा या यज्ञदक्षिणाविधीच्या पद्धतीचा आश्रय करूनच लाभाचे वाटप करावे नियत वेतनासबधीचेही हेच प्रमाण होय ) ऋत्विजांच्या दक्षिणेचे हे प्रमाण १२, ६, ४ व ३ असे शास्त्रकारानी ठरविलेले आहे हे आपण पाहिले हेच प्रमाण श्रेष्ठ कनिष्ठ कामकऱ्यांच्या साहाय्याने केलेल्या एखाद्या मोठ्या व्यवसायातील अथवा चालविलेल्या विभागातील त्या त्या अधिकाराच्या व्यक्तीच्या वा पदाच्या वेतनाचे असावे असा नियम असे हे वेतनाचें प्रमाण कनिष्ठास एक, तर श्रेष्ठास सहा असें असावे असेंही मनूने (अ. ७-१२६)

(पणो देयोऽवकृष्टस्य षडुत्कृष्टस्य वेतनम्) म्हटले आहे. याच्या उलट साम्यवादी रशियात सुद्धा आज हे प्रमाण एकास शभर असे आहे रशियाची दृष्टि अधिक सम आहे की आमच्या धर्मशास्त्र-काराची हे यावरून सहज लक्षात येण्यासारखे आहे

चौथी महत्त्वाची बाब म्हणजे भूस्वामित्वाची, व्यवसायस्वत्वाची कल्पना व राजसत्तेचा त्या सबधातील अधिकार ही होय भारतीय धर्मशास्त्रकारांनी या सबधात राजसत्तेची भूमि व व्यवसाय यावरील मालकी पूर्णपणे नाकारलेली आहे जमिनीच्या मालकी-हक्काच्या बाबतीत धर्मशास्त्रकाराचा निर्णय पुढीलप्रमाणे आहे –

पृथोरपीमा पृथिवी भार्या पूर्वविदो विदु ।
स्थाणुच्छेदस्य केदारमाहु शल्यवतो मृगम् ॥४४॥
– (मनुस्मृति अध्याय ९.)

(इतिहासवेत्त ऋषि पृथ्वीला पृथूची भार्या असेही म्हणतात. त्याचे असे म्हणणे आहे की साफ करून कसेल त्याची जमीन व जो पहिला वार करील त्याची शिकार असणे हेच न्यायाचे आहे.) या दृष्टीने पेशवाई राज्य ताब्यात आल्यानतर पुण्याचा रेसिडेट माउट स्टुअर्ट एल्फिन्स्टन याने दि. २५ ऑक्टोबर १८१९ रोजी पाठविलेल्या वृत्तातील पुढील परिच्छेद महत्त्वाचा आहे –

" That a large portion of the rayats are the proprietors of their estates, subject to the payment of a fixed land tax to Government; that their property is hereditary and they are never dispossessed while they pay their tax. Their land tax is fixed That the king has no property in the soil but has a right merely to the revenue arising from the soil, is also found clearly stated in a passage in stoke's Hindu Law books P 44 as follows :— In conquest also where the property of the conquered consists of farms, lands, money or the like, there alone(ownership) is acquired by the conquerer, but only in revenues of the conquered. "

(रयतेंतील बहुसख्य लोक आपल्या इस्टेटीचे मालक आहेत, व ठरलेला कर सरकारला देणे येवढ्यापुरतेच सरकारशी बाधलेले आहेत. त्याची सपत्ति परपरेनेच त्याच्याकडे आलेली असून ते कर देत असल्याने त्याच्या संपत्तीला त्याना कधीहि मुकावे लागले नाही. त्याचा जमिनीचा खड ठरलेला आहे राजाची मालकी जमिनीवर राहू शकत नसून जमिनीपासून होणाऱ्या उत्पन्नावर ठरलेला खड घेणे येवढाच त्याचा अधिकार आहे ही गोष्ट स्टोकने आपल्या हिंदू कायद्यावरील पुस्तकात पुढीलप्रमाणे नमूद केलेली आहे. तो म्हणतो, 'युद्धात विजय सपादन केल्यानतर जेत्याला जिताची घरे, जमीन, पैसे व तत्सम अन्य सपत्तीवर मालकी प्राप्त होते, पण खड व कर घेणे येवढ्यापुरतीच त्या मालकीची खरी मर्यादा आहे ) करपद्धतीचे विवेचन करताना त्या सबधातील मनूने सागितलेल्या ज्या नियमाचा उल्लेख केला आहे त्यावरून ब्रह्मर्षि अण्णासाहेब पटवर्धन यानी काढलेला निष्कर्ष याच स्वरूपाचा आहे उपरिनिर्दिष्ट मनूचा उतारा देऊन ब्रह्मर्षि अण्णासाहेब पटवर्धन म्हणतात –

The above-mentioned rules conclusively show that the sovereign authority is not entitled to claim a share in the corpus of any land of the realm Accordingly, it may be stated as a general rule that so far as the Indian soil is concerned, the state or sovereign authority cannot properly be considered to have any proprietory right, at any rate, in any cultivated land or soil Under the Hindu Law, the sovereign power has only the right to receive a share of the produce of land

मनूच्या या अनुशासनावरून ही गोष्ट स्पष्ट होते की राजसत्तेला कोणत्याही जमिनीच्या उत्पादनावर मालकी हक्क सांगता येत नाही त्या त्या पदार्थावर राजसत्तेचे स्वत्व नसून तेथे श्रम करणाऱ्याचेच स्वत्व असते राजसत्तेचे त्यावर स्वत्वहि नाही व तें स्थापन करण्याचा तिला अधिकारही नाही. हिंदू धर्मशास्त्राप्रमाणे सार्वभौम सत्तेला जमिनीवरील केवळ कर घेण्याचा

अधिकार आहे या खडाचे स्वरूप ठरलेले होतें हे आपण मागे पाहिलेंच आहे

एखाद्या जमीन मालकानें कर न दिल्यास त्याला दण्ड करण्याचा अधिकार राजसत्तेला असे पण जमीन काढून घेण्याचा नसे. जमीनीवरील व इतर सपत्तीवरील मालकी याप्रमाणे ती कमावणाऱ्याची वैयक्तिक असली तरी तिच्यामुळे पाश्चात्य समाजाप्रमाणे व्यक्तीच्या ठिकाणी धनाचे केंद्रीकरण कधीही भारतांत झालें नाही कारण पाश्चात्याप्रमाणे व्यक्तीला भारतीय समाजरचनेत स्वतत्र स्थान नसून कुलाचा व कुटुबाचा घटक म्हणूनच आहे व ते नुसते तत्त्वात नसून दायविभागातही अनुस्यूत असल्यामुळें धनाचे अपरिमित केंद्रीकरण होऊच शकत नाही. Hindu Law and usage या आपल्या ग्रथात M. Mayne यानी या सबधांत केलेले विवेचन (पृ २९३) पाहण्यासारखे आहे ते म्हणतात –

The student who wishes to understand the Hindu system of property must begin by freeing his mind from all previous notions drawn from English Law They would not only be useless, but misleading. In England, ownership as a rule, is simple, independent, and unrestricted, but only in special instances, and under special provisions. In India, on the contrary, joint ownership is the rule, and will be presumed to exist in each individual case until the contrary is proved If an individual holds property in severalty, it will, in the next generation, relapse into a state of joint tenancy Absolute, unresticted ownership such as enables the owner to do anything he likes with his property, is the exception The father is restrained by his sons, the brother by his brothers, the woman by her successors If property is free in the hands of the acquirer, it will resume its fetters in the hands of his heirs. Individual property is the rule in the West Corporate property is the rule in the East.

(ज्याला हिंदूच्या दायविभाग पद्धतीचे खरे ज्ञान करून घ्यावयाचे असेल त्याने इग्लडची दायभाग कल्पना व त्याच्या अमलबजावणीच्या कल्पना डोक्यातून पूर्णपणे काढून टाकल्या पाहिजेत. त्याचे डोक्यातील सस्कार घेऊन हिदू दायपद्धति समजावून घेण्याचा प्रयत्न नुसता अनुपयुक्तच नव्हे तर विघातकही ठरेल इग्लडमध्ये स्वामित्व हे अनिर्बध, स्वतत्र व व्यक्तिगत आहे क्वचित् तें सयुक्तही दिसेल पण प्रथम ते विभक्त व स्वतत्रच आहे. प्रसगविशेषी ते निर्बधबद्धही असेल, पण अपवाद म्हणूनच होय. हिंदूचे याच्या अगदी उलट आहे अविभक्त, सामायिक, निर्बंधबद्ध व अस्वतत्र असेच येथील स्वामित्व असून अपवाद सोडून दिल्यास सर्वत्र हाच नियम आहे एखाद्या ठिकाणी कोणाचे स्वामित्व विभक्त, व्यक्तिगत व स्वतत्र आढळले तरी त्याच्यानतर त्याच्या पुढच्याच पिढीत त्या स्वामित्वाचे स्वरूप सयुक्त सामायिकतेत परिणत होते जेथे धनी आपल्या सपत्तीचा यथेच्छ विनियोग वा व्यय करू शकतो अशा प्रकारचे अप्रतिबध स्वतंत्र स्वामित्व हा हिदुसमाजरचनेत क्वचितच आढळणारा अपवाद होय. हा प्रतिबध पित्याला पुत्राचा, भावाना भावाचा, स्त्रीला तिच्या उत्तराधिकाऱ्याचा अशा स्वरूपाचा आहे सपत्ति ज्याने स्वत मिळविली असेल त्याचे तिच्यावर निरकुश स्वामित्व असले तरी पुढच्याच पिढीत अविभक्तपणाचे सारे नियम त्या सपत्तीला लागतात. तात्पर्य, सपत्तीचे व्यक्तिगत निरकुश स्वामित्व हा पाश्चात्यांचा कायदा आहे, तर सामायिक स्वामित्व हा भारताचा कायदा आहे. )

तात्पर्य, जातिव्यवस्थेमुळे वर्गविशिष्ट धनाचे केंद्रीकरण ज्याप्रमाणे वैदिक समाजरचनेने टाळले त्याचप्रमाणे सामाजिक दायविभाग पद्धतीमुळे वैयक्तिक धनाचे केंद्रीकरणही होऊ दिलेले नाही धनाच्या केंद्रीकरणांतून उत्पन्न होणारे भाडवलशाही, साम्यवाद, क्राति इत्यादि प्रकार हिदुराष्ट्राच्या सहस्रावधि वर्षांच्या सामुदायिक व वैयक्तिक जीवनात जे उत्पन्न होऊ शकले नाहींत त्याची ही कारणे आहेत.

सपत्तीचा सचय, हा जमिनीचा खड, व्यापारातील लाभ व मूल धनावरील व्याज या तीन रूपानी वाढत असतो वैदिक समाजशास्त्रज्ञानी जमिनीचा मालकीहक्क व व्यापारातील लाभ यांच्या सबधात दायविभाग पद्धति व जातिव्यवस्था याच्या द्वारे धनाचें विकेद्रीकरण साधले हे आपण पाहिले मूलधनावरील व्याजासबधाने त्याची दृष्टि काय होती हे आपण पाहिले म्हणजे त्यांच्या अर्थशास्त्रमदिराचे निरीक्षण पूर्ण होईल राजर्षि मनु या सबधात म्हणतात –

> कुसीदवृद्धिर्द्वैगुण्य नात्येति सकृदाहृता ।
> धान्ये सदे लवे वाह्ये नतिक्रामति पचताम् ॥१५१॥
> कृतानुसारादधिका व्यतिरिक्ता न सिध्यति ॥१५२॥
> नातिसांवत्सरी वृद्धि न चादृष्टा पुनर्हरेत् ।
> चक्रवृद्धि कालवृद्धि कारिता कायिका च या ॥ १५३ ॥
>
> —(मनुस्मृति. अ ८ वा)

जे एक वार कर्ज दिले असेल त्याचे व्याज दुपटीहून अधिक घेऊ नये. धान्य, फळफळावळ, लोकर व चमरीचे केश यापासून तयार झालेली धाबळी, शालजोडी, काबळी इत्यादि वस्त्रे (लव), व बैल, घोडा इत्यादिकाची पराकाष्ठा म्हणजे पाचपट होय. शास्त्रोक्त व्याजाहून अधिक व्याज घेऊ नये विपरीत व्याज घेणें म्हणजे वाममार्ग होय एक महिन्याने अथवा दोन महिन्यानी किवा तीन महिन्यानी व्याज देण्याची कबुली ऋणकोने केली असेल तर त्याप्रमाणे एक वर्षपर्यंतच व्याज घ्यावे वर्षानतर पूर्वोक्त नियमानें व्याज घेऊ नये चक्रवृद्धि (व्याजालाहि पुन्हा व्याज लावणे) कालवृद्धि (दरमहा व्याज घेणे) कारिता वृद्धि (कुळाकडून मुदत वाढविण्यासाठी अधिक व्याजाची कबुली घेणे) कायिका वृद्धि (रोजीच्या हिशेबाने व्याज घेणे) हा धनाचा अशास्त्रीय अपहार होय.

वस्तुत व्याज हे अकष्टोपार्जित धन असल्यामुळे त्याचा उपयोग आपल्या विलासासाठी न करता समाजाची सांपत्तिक स्थिति सुधारण्यासाठीच करावा असे भारतीय समाजशास्त्रज्ञांचें मत आहे. महाभारतात म्हटलें आहे.

अतिरिक्तैः सविभजेद् भोगैरन्यानकिंचनान् ।
एतस्मात्कारणाद् धात्रा कुसीद सप्रवर्तितम् ।।२३।।
—(शातिपर्व अ. २६०)

(एखाद्या व्यक्तीला व्याजासारख्या अकष्टार्जित धनापासून जर अतिरिक्त उपभोग मिळाले तर त्याचे विभाजन दुसऱ्या निर्धन लोकात करावे या कारणाकरिताच ब्रह्मदेवानें कुसीदाचे म्हणजे व्याजाचें प्रवर्तन केले आहे.) जे व्याजाचें तेंच व्यापारातील लाभ व जमिनीचा खड याचेहि आहे. कारण गरजेच्या वस्तूचा सर्व जीवांत समविभाग व्हावा असा शास्त्रकाराचा कटाक्ष आहे **दान प्रवृत्ति** हे धर्मानुशासन यासाठीच प्रवृत्त झाले वैदिक समाज-शास्त्रज्ञ म्हणतात --

द्वावभसि प्रवेष्टव्यौ कण्ठे बध्वा दृढां शिलाम् ।
धनवतमदातार ब्राह्मण चातपस्विनम् ।।

(ब्राह्मण असून तपस्या न करणारा व धनवत असून आपल्या धनाचा दानात विनियोग न करणारा अशा दोघानाही राजसत्तेनें मोठी शिला गळ्यात बाधून जलसमाधि द्यावी )

करग्रहणपद्धति, दानपद्धति याचे प्रत्यक्ष वेदसहितातूनच उल्लेख आहेत. ऋग्वेदात म्हटले आहे – अथोत इन्द्रः केवली-र्विशो बलिहृतस्करत् ।।" (१०. १७३ ६) "इन्द्र हा असे करील की तुझे एकनिष्ठ प्रजानन तुलाच सतत करभार देत राहतील. अथर्ववेदात करपद्धतीचे महत्त्व पुढीलप्रमाणे सागितले आहे –

"यद् राजानो विभजन्त इष्टापूर्तस्य षोडश यमस्यामी सभासदः । अविस्तस्मात् प्र मुञ्चति दत्त शितिपात् स्वधा ।।१।। सर्वान् कामान् पूरयत्याभवन् प्रभवन् भवन्। आकूतिप्रोऽविर्दत्त शितिपान्नोप दस्यति।।२।। यो ददाति शितिपादमवि लोकेन समितम् । स नाकम-भ्यारोहति यत्र शुल्को न क्रियते अबलेन बलीयसे ।।३।।
—(अथर्ववेद, काड ३ सू. २९)

(नियमाने प्रजेचे पालन करणाऱ्या राजाच्या राजसभेचे हे सभासद वस्तुत खरे राजेच आहेत ते प्रजेच्या सपत्तीचा सोळावा

भाग कररूपाने घेतात राजाला दिलेला हा कर राष्ट्राचें सरक्षण करतो, जे प्रजापीडक असतील त्याना दण्ड देऊन दडपून टाकतो, प्रजांची धारक शक्ति वाढवितो व भयापासून त्याची मुक्तता करतो. हा दिलेला कर प्रजेच्या अभ्युदयाच्या सकल्पाना पूर्ण करतो, दुष्टाचे दमन करतो, सज्जनाचे परिपालन करतो, राष्ट्राचा विस्तार करतो, वीराचा प्रभाव वाढवितो, जातीचे अस्तित्व स्थिर राखतो व सर्व प्रकारे जनतेचे मनोरथ पूर्ण करून कोणत्याही प्रकारे प्रजेचा नाश होऊं देत नाही कराचे हे महत्त्व ओळखून सर्व लोक राजाला आनदाने कर देतात जे, दुर्जनविनाशक व सज्जन प्रतिपालक असा हा कर राजाला देतात ते सुखपूर्ण स्थान प्राप्त करतात. त्यामुळे अशी सुस्थिति प्रस्थापित होते की जेथे बलवान् दुर्बळाचे धन अपहरण करीत नाही व कोणत्याहि निर्बल मनुष्याला बलवतासमोर उगाच लोटागण घालण्याची हीनता पत्करावी लागत नाही.) कर पद्धति व तिचे महत्त्व सहिताकाळी पूर्ण प्रस्थापित झाले होते, याचे हे सूक्तमत्र निदर्शकच होत दायभागपद्धतीसबधाने ऋग्वेदात पुढील उल्लेख आढळतात "वर्तिस्तोकाय तनयाय यातम्" (८ ९. ११) म्हणजे 'आमच्या सर्व मिळकतीचा वारसा आमच्या मुलाबाळाकडे जावो' पुत्र जन्मल्याबरोबर त्याला जन्मतःच पित्रार्जित मिळकतीत हक्क उत्पन्न होतो (पित्रोर्यज्जात पित्रोरधीयति) असें म्हटले आहे कन्यासततीविषयी असे म्हटले आहे की "न जामये तान्वो रिक्थ मारैक्" (३ ३१. २) औरस मुलगा आपल्या पित्रार्जित मिळकतीत बहिणीला हिस्सा देत नाही" चकार गर्भ सनितुर्निधानम्" (३ ३१ २) 'ती बहिण अविवाहित असल्यास तिचा विवाह करून देऊन तिला नीट ससारास लावण्याचे दायित्व भावाकडे आहे' वैदिक समाजशास्त्राने वारसा हक्काचा निर्णय धर्माशी सबद्ध असा केला आहे. मनुष्य मेल्यावर त्याची और्ध्वदेहिक क्रियाकर्मे व नियतकाळी करावयाची पैतृक कर्मे करावयाचे दायित्व ज्याच्यावर आहे त्याच्याकडे मिळकतीचा वारसा आहे म्हणून वारसा पुत्रसततीकडे जातो, कन्या

सनतीकडे जात नाही समाजरचनेत कुल या घटकाला प्राधान्य आहे व पुत्र सततीच कुळ चालवीत असते कन्या ही पतिकुळाची घटक आहे, पितृकुळाची नव्हे ऋग्वेदातील या उल्लेखात हिंदू दायविभाग पद्धतीची मुख्य सूत्रे आलेली आहेत व हल्लीच्या हिंदूकोड बिलाच्या निर्मितीपर्यंत हिंदूदाय विभागाचे हेच स्वरूप चालत आले असल्याची कबुली महायुद्धोत्तरच्या आतरराष्ट्रीय न्यायालयाचे एक न्यायाधीश श्री राधाविनोद पाल यानीही दिलेली आहे असो वेदसहितातून याप्रमाणें पद चिन्हेच आढळावयाची त्याचे स्वरूप व तात्त्विक भूमिका धर्मसूत्रे, मनुस्मृति व इतिहासग्रथ याच्या आधारे येथे माडलेली आहेत

वैदिक अर्थशास्त्राच्या मदिराचे जे येथवर समीक्षण केले त्यावरून पुढील सिद्धान्त निष्पन्न होतात :—

(१) वैदिक राष्ट्राच्या अर्थशास्त्रात पाश्चात्याप्रमाणे केवळ भोग्याचा विचार नसून भोक्ता व भोग्य अशा दोन्ही अर्थशास्त्रीय घटकांचा पायाशुद्ध विचार केलेला आहे (२) सर्वजीवनिर्वाहपूर्वक अवशिष्टत्व हे वैदिक अर्थशास्त्रात स्वत्वाचे लक्षण केले आहे. (३) ईशस्वत्ववाद व स्वात्मभोग्यत्ववाद हे त्यानी अधिकाराची परिभाषा व स्वार्थाची प्रेरणा यावर दोन तोडगे काढलेले आहेत (४) भोक्त्याची यज्ञप्रकृतिकता (५) मोक्ष हा परम पुरुषार्थ ठरविल्यामुळे अमर्याद सपत्ति व यथेष्ट भोग याची प्रबल प्रेरणा व्यक्तीच्या मनात तितकी रहात नाही (६) जातिसस्थेची उभारणी करून, वर्गाविर्गातील स्पर्धेचे क्षेत्र कमी केले. व त्या द्वारे उपजीवनाची निश्चितता उत्पन्न करून धनाचे सामाजिक स्वरूपात विकेन्द्रीकरण केले वर्गसमन्वयाचे हेच वास्तविक स्वरूप आहे (७) सर्व समाजापुढे अपरिग्रही व ज्ञाननिष्ठ ब्राह्मण्याचा आदर्श उभारून परिग्रहप्रधान सामाजिक मनोवृत्तीतील भोगप्रवणतेला स्वयप्रेरित नियत्रण उत्पन्न केले. (८) या आदर्श वर्गापुढेंहि सर्वभूतहितरत सन्यासी हा चतुर्थाश्रमातील परमहसाचा आदर्श ठेवल्यामुळे सपत्तीच्या जागी मूल्यनिष्ठ अकिचनत्व

हेच ध्येय समाजासमोर राहिले (९) जातिसंस्थेमुळे जसे सामाजिक जीवनात धनाचे विकेन्द्रीकरण साधण्यात आले, तसेच व्यक्ती-ऐवजी कुल व कुटुब हा घटक समजून जी सामायिक अथवा सयुक्त मालकीची दायविभागपद्धति निर्माण करण्यात आली तिने व्यक्ति-जीवनातही धनाच्या विकेन्द्रीकरणाची परिपूर्ण व्यवस्था करण्यात आली (१०) इतके निर्बंध असूनहि ज्याच्याजवळ धनसचय राहील त्याच्यावर यज्ञ व दान हे कर्तव्याचे बंधन घालण्यात आले. या कर्तव्य बधनाने स्वार्थावर नियत्रण बसून व्यक्तीनें सचित केलेल्या द्रव्याचा विनियोग सर्व समाजाकडे होतो कोणालाही धनसंचयाला प्रतिबध करण्यापेक्षा तो योग्य प्रमाणात करण्याची मोकळीक ठेवून त्याचा समाजात विनियोग होईल अशी व्यवस्था करणें हेच अधिक श्रेयस्कर आहे. त्यायोगे राष्ट्राची सपत्ति वाढून तिचा विनियोग राष्ट्रातच होतो या धनसचयाची व खाजगी मिळकतीची भारतांतील पाश्चात्य वळणाच्या लोकाना जी निदा करावीशी वाटते तिचे कारण भारतीय दायविभागपद्धतीची रचना त्यांना नीट माहीत नसते हे आहे खाजगी मिळकत ही सस्था भोगाकरता नसून कुटुबाची सुस्थिति आणि कुल, वश व सस्कृति त्याच्या सरक्षणाकरता आहे.

याप्रमाणे वैदिक राष्ट्राच्या अर्थव्यवस्थेच्या मदिराचे स्वरूप आहे. राष्ट्रातील बुद्धिबल (ब्राह्मण), शरीरबल (क्षत्रिय), धनबल (वैश्य) व श्रमबल (शूद्र) या सर्वांचा समन्वय साधून ते सर्व समष्टिरूप परमेश्वराला अखड त्यागपूर्वक समर्पण करण्याची स्वयप्रेरित अनुशासनबद्ध योजना हे तिचे स्वरूप आहे हे यावरून ध्यानात येईल. आतापर्यंत आपण वैदिक राष्ट्राचे दर्शन घेतले या राष्ट्राने निर्माण केलेल्या विचारप्रणालीचा व जीवनप्रणालीचा सर्व विश्वावर केवढा विलक्षण प्रभाव पडला हे आपण पुढच्या व्याख्या-नांत इतिहासाच्या आधारे पाहून या विषयाचा उपसहार करू

✦ ✦ ✦

## व्याख्यान विसावे

# वैदिक राष्ट्राचा विश्वविजय

आतापर्यंत आपण वेदवाङ्मयाच्या आधारे वैदिक राष्ट्राच्या आतर व बाह्य जीवनाचें दर्शन घेण्याचा प्रयत्न केला. आपले राष्ट्र कसें असावें याची वैदिक धारणा तैत्तिरीय सहितेंत पुढील-प्रमाणें वर्णन केलेली आहे :--

"आ ब्रह्मन् ब्राह्मणो ब्रह्मवर्चसी जायतामस्मिन्राष्ट्रे । राजन्य इषव्य. शूरो महारथो जायताम् । दोग्ध्री धेनुर्वोढाऽनड्वानाशुः सप्तिः पुरंधिर्योषा जिष्णूरथेष्टा सभेयो युवा । अस्य यजमानस्य वीरो जायताम् । निकामे निकामे न पर्जन्यो वर्षतु । फलिन्यो न ओषधयः पच्यन्ताम् योगक्षेमो न कल्पताम् ।।"

(या राष्ट्रातील ब्राह्मण धगधगीत ब्रह्मतेजानें युक्त असे असोत. या राष्ट्रातील क्षात्रवर्ण शस्त्रास्त्रविद्येत पहिल्या प्रतीचा प्रवीण, शूर महारथी असा असावा गाई पुष्कळ दूध देणाऱ्या असोत बैल समर्थ व घोडे अत्यत चपळ व वेगवान् असोत स्त्रिया शालिनी, सुदर व गृहस्वामिनी असोत व गृहस्थाश्रमी लोकवीर व सभेतून चमकणाऱ्या कीर्तिमान् पुत्रानी युक्त असोत. आमच्या राष्ट्रात आवश्यक व योग्य त्या वेळी योग्य प्रमाणात पर्जन्यवृष्टि होवो. औषधि व वृक्ष फलसपन्न व सरस असोत व आमच्या या राष्ट्राचे आर्थिक जीवन सुसपन्न असो ) या उत्स्फूर्त वैदिक राष्ट्र-गीतात ज्या भावना व्यक्त केलेल्या आहेत. अथवा राष्ट्रजीवनाचा जो आदर्श प्रकट केला आहे तोच दोन सस्कृत श्लोकात आपल्या पूर्वजानी ग्रथित केला असून प्रार्थनेच्या रूपाने ते श्लोक दैनदिन जीवनांत म्हणावे अशी अपेक्षा बाळगलेली आहे. ते श्लोक असे :--

काले वर्षंतु पर्जन्य. पृथिवी सस्यशालिनी ।
देशोऽय क्षोभरहितो ब्राह्मणा. सन्तु निर्भया ॥

अपुत्राः पुत्रिणः सन्तु पुत्रिण सन्तु पौत्रिण ।
अधना सधना सन्तु जीवन्तु शरद शतम् ॥

(पाऊस योग्य वेळी पडावा सपूर्ण भूमि धनधान्यसपन्न असावी राष्ट्रामध्ये बाह्य आपत्तीमुळे अथवा अतर्गत आपत्तीमुळें कोणत्याही प्रकारचा क्षोभ नसावा ब्रह्मवेत्ते तपस्वी लोक सर्वथा निर्भय राहतील अशी परिस्थिति असावी निपुत्रिकाना पुत्र असावे. कुल व वश याची परपरा सतत टिकून असावी. कोणीहि दरिद्री असू नये व कोणीहि अल्पायुषी न राहता सर्वांना परिपूर्ण शभर वर्षे आयुष्य लाभावे.) वैदिक राष्ट्र या स्वरूपाचे होतें हे आपण त्याच्या नैतिक व आध्यामिक अतरगापासून तर शिक्षणपद्धति, स्त्रीजीवन, जीवनवाद, राज्यशास्त्र, युद्धशास्त्र, अर्थशास्त्र, वैभव इत्यादिकाची तपासणी करून पाहिले आहे. ब्राह्मण व क्षत्रिय या मार्गदर्शक व सरक्षक वर्गांत धनाचे केन्द्रीकरण न होऊं देण्यात व धनार्जक आणि श्रमशक्तिशाली वर्गात सामर्थ्य व सत्ता केन्द्रित न होऊ देण्यात त्यानी अपूर्व बुद्धिकौशल्य प्रकट केले आहे आध्यात्मिक मूल्यावर आधारलेल्या या सर्व समाजरचनेला त्यानी दिक्कालातीत शाश्वत धारणेप्रमाणेच सुसघटित व वैभवशाली राष्ट्रजीवनाचे जे स्वरूप दिले ते आश्चर्यमुग्ध करणारे आहे नैसर्गिक वैषम्याची जाणीव ठेवून वर्णव्यवस्थेच्या द्वारे त्यांनी तिच्यातूनच विकसनोन्मुख सुव्यवस्था निर्माण केली आदर्श समाजाच्या निर्मितीसाठी सस्कारगर्भ आश्रमसंस्था निर्माण करून व्यक्तिजीवनात समन्वयाचे सगीत साधले भारतीय राष्ट्राच्या अमरतेचे रहस्य या वर्णाश्रम व्यवस्थेत आहे हे जस्टिस वुड्राफचे म्हणणे मागे उद्धृत केलेच आहे राष्ट्रांतील भिन्न भिन्न घटकाच्या व वर्गाच्या जीवनात आवश्यक असणाऱ्या एकात्मतेच्या सगीताचे स्वर ऋग्वेद व अथर्ववेदांतून पुढीलप्रमाणें उमटले आहेत :—

सगच्छध्व सवदध्व स वो मनासि जानताम् ।
देवा भाग यथा पूर्वे सजानाना उपासते ।।२।।
समानो मत्र समिति समानी समान मन सहचित्तमेषाम् ।
समान मत्रं अभिमत्रये व समानेन व हविषा जुहोमि ।।३ ।।
समानीव आकूतिः समाना हृद्रयानि वः ।
समानमस्तु वो मनो यथा व सुसहाऽसहि ।।४।।

—(ऋग्वेद मडळ १०, सु १९१)

(मित्रानो, तुम्ही देखील एकत्र होऊनच कार्य करा, आणि परस्पर विचारविनिमय करण्यासाठी सवाद करीत जा, आणि पूर्वकाळी देव ज्याप्रमाणे एकत्र येऊनच हविर्भागाचा स्वीकार करीत असत, त्याप्रमाणे तुम्हीही एकत्र बसून एकमेकाचे विचार समजावून घ्या तुमच्या सर्वाच्या मनातील उद्देश एकसारखाच असू द्या. तुमची सर्वाची सभा एका जागीच करीत जा त्या योगाने तुमचे मन आणि तुम्ही विचाराने ठरविलेली गोष्ट हीही एकसारखीच राहतील, म्हणून तुम्हा सर्वासाठी मी आता एकच मत्र सागतो; आणि सर्वाचा मिळून एकच हविर्भाग अग्नीला अर्पण करितो. ती तत्त्वाची गोष्ट ही की, तुमचा विचार आणि योजना एकच असू द्या; तुमची अत करणे एकसारखी, एकाच भावनेने परिपूर्ण असू द्या तसेच तुमचे मनही सारखे एकाच ध्येयाकडे लागलेले असू द्या म्हणजे तुम्हाला पाहिजे असेल ती गोष्ट सहज साध्य होईल )

"स स स्रवन्तु सिन्धव स वाता सं पतत्रिण ।
इम यज्ञ प्रदिवो मे जुषन्ता सस्राव्येण हविषा जुहोमि ।।१।।
इहैव हवमा यात म इह सस्रावणा उतेम वर्धयता गिरः ।
इहैतु सर्वो य पशुरस्मिन् तिष्ठतु या रयि ।।२।।
ये नदीना सस्रवन्त्युत्सास. सदमक्षिता ।
तेभिर्मे सर्वै. सस्रावैर्धनं स स्रवयामसि ।।३।।
ये सर्पिषः संस्रवन्ति क्षीरस्य चोदकस्य च ।
तेभिर्मे सर्वैः सस्रावैर्धनं स स्रावयामसि ।।४।।

—(अथर्ववेद, काड १,सू. १५)

(नद्या मिळून वाहतात, वायू मिळून सचार करितात, पक्षीहि मिळून उडतात, त्याचप्रमाणे दिव्य सामर्थ्यांनी माझ्या या यज्ञा-मध्ये मिळून समीलित व्हावे. कारण की, मी सघटन वाढविणाऱ्या समर्पणात्मक आचरणानेच हा यज्ञ उभारला आहे सघटनाच्या उद्देशाने (त्यात देवाचे साहृच मिळावे म्हणून) मी हा महायज्ञ प्रारम्भ केला आहे. तेथे या, व सघटनकार्य यशस्वी करू शकणाऱ्या वक्त्यांनो! तुम्ही आपल्या वक्तृत्वाच्या सामर्थ्याने सघटन वाढवा आमचा सर्व पशुभाव या यज्ञात नष्ट होवो व दिव्य भाव चिरकाल आमच्या जीवनात नादो जो नद्याचा अक्षय प्रवाह वहात आहे, त्या प्रवाहाच्या सर्व उपप्रवाहानी सघटनाच्या द्वारे आमचे वैभव वाढो. दूध, जल, घृत याच्या धारानी आमच्यात एकात्म सघटनाचा भाव निर्माण करून आमचे वैभव वाढवावे )

असो याप्रमाणे एका शाश्वत समाजरचनेचा व चिरतन जीवनमूल्याचा जो पाया मानवतेच्या महामदिराची उभारणी करण्यासाठी आमच्या प्राचीन वैदिक पूर्वजानी घातला, त्याचा प्रभाव जगातील प्रत्येक सुसस्कृत राष्ट्राच्या जीवनावर सदाचा उमटलेला आहे. पृथ्वीच्या पाठीवर एकही असे सुसस्कृत राष्ट्र प्राचीन व मध्ययुगीन कालखडात दाखवून देता येत नाही की, ज्याच्यावर भारताचें सास्कृतिक ऋण नाही. एक प्रकारे प्राचीन भारताने हा अभूतपूर्व असा सास्कृतिक विश्वविजयच सपादन केलेला आहे. अर्थात्च सिधुबदी व सचारबदीच्या आत्मनाशक बेडया या विजयी राष्ट्रास मान्य नव्हत्या हे स्पष्टच आहे आम्ही भारतीय लोक खुरट्या मनोवृत्तीचे, आपला प्रदेश सोडून सहसा बाहेर न पडणारे व डबक्यात राहणाऱ्या माशाप्रमाणे आपल्या भोवतालच्या वातावरणांतच रममाण होणारे असल्याची समजूत परकीयाची तर आहेच, पण आमचीही आमच्या स्वत.विषयी तीच धारणा असून तिच्या संबंधीचा एक विचित्र स्वरूपाचा सुप्त अहंकारही आमच्या मनात असे. कै. धर्मवीर डॉ. मुजे हे स्वत: अनुभविलेली म्हणून एक गोष्ट सांगत असत. ती अशी की नागपूरचे एक सुप्रसिद्ध

नागरिक कर्नल कुकडे हे परदेशातून आल्यावर त्याना पक्तिपावन करून घेण्यासाठी त्याचे वडील, नागपूरचे तत्कालीन धर्माचार्य व महापडित भट्टजीशास्त्री घाटे याच्याकडे समुद्रगमनाचे प्रायश्चित्त विचारावयास गेले. त्याबरोबर बराच वेळ विचार करून भट्टजीशास्त्री घाटे गभीर मुद्रेने त्याना म्हणाले, 'या पातकास देहान्त प्रायश्चित्ताशिवाय दुसरे प्रायश्चित्त नाही.' कै. घाटेशास्त्री याचें हे उत्तर आमच्या स्वतःच्याच मनात ही विकृत धारणा किती दृढमूल झाली होती हे सिद्ध करावयास पूर्णपणे समर्थ आहे ही समजूत मध्ययुगीन साहित्यातूनही किती दृढमूल झाली होती या गोष्टीचे प्रत्यतर कविकुलगुरु कालिदासाच्या रघुवश काव्यातील रघूच्या दिग्विजयाचे वर्णन वाचताना येते. भारताबाहेर जाऊन रघुनें केलेला दिग्विजय वर्णन करताना, रघूने या दिग्विजयाच्या वेळी समुद्रपर्यटनाचें पाप केले होते की काय अशी शका कोणाला येऊ नये म्हणूनच जणू कालीदास आवर्जून सागतो, 'प्रतस्थे स्थलवर्त्मना' (रघू समुद्रमार्गाने न जाता भूमार्गानेच गेला.) वैदिक राष्ट्राला समुद्रयानादि गोष्टी निषिद्ध तर नव्हत्याच; पण युद्धनौका, विहारनौका इत्यादि नौकलेत त्याची चागलीच प्रगति झाली असून ते उत्तम समुद्रसचार करीत हे आपण यापूर्वी पाहिलेंच आहे साऱ्या जगाला गवसणी घालण्याच्या विजयाकाक्षेनें ही सस्कृति प्रेरित झाल्याचे व ती परिपूर्ण केल्याचें इतिहास सांगतो. हा अपसमज निर्माण होण्याचे कारण भारतीयाची **यज्ञीय** व **अयज्ञीय देश** ही भूभागविषयक परिभाषा होय. यज्ञीय व अयज्ञीय म्हणजे यज्ञ करण्यास योग्य व यज्ञ करण्यास सर्वस्वी अयोग्य असे जगातील भूप्रदेशाचे द्विविध वर्गीकरण भारतीय सस्कृतीनें केलेले असून अयज्ञीय देश हा आर्यांनी राहण्यास अयोग्य व यज्ञीय देश हाच राहण्यास योग्य असा स्मृतिकाराचा सकेत आहे. आर्यांनी राहण्यास सर्वथा योग्य अशी पुण्यभूमि कोणती याचा निर्देश करताना राजर्षि मनु म्हणतात :—

'कृष्णसारस्तु चरति मृगो यत्र स्वभावतः ।
स ज्ञेयो यज्ञियो देशो म्लेच्छदेशस्ततः परः ।।मनुस्मृति २-२३

(ज्या ठिकाणी कृष्णसार मृग स्वाभाविक रीतीने राहतो ते **देश यज्ञीय** होत इतर म्लेच्छ देश होत. हा कृष्णसार मृग सरस्वती व दृषद्वती नद्यांच्या मधील ब्रह्मावर्तातच सापडतो अशा समजुतीने ब्रह्मावर्त प्रांतापुरतीच यज्ञभूमीची संकुचित कल्पना मागण्यात येत असे. पण कृष्णसार मृग दक्षिणेतही आढळत असल्यामुळे संपूर्ण भारतच **यज्ञभूमि** म्हणून म्हटला पाहिजे पण भारतेतर भूभागांना यज्ञभूमि कधीच होण्याची शक्यता नाही काय ? मनुस्मृतीचा तेजस्वी टीकाकार मेधातिथि या प्रश्नाचे उत्तर देताना म्हणतो, 'यदि कश्चित् क्षत्रिय द्विजातीय राजा म्लेच्छान् पराजयेत् चातुर्वर्ण्य वासयेत्, म्लेंच्छाश्च आर्यावर्ते इव चाण्डालान् व्यवस्थापयेत् तदा सोऽपि स्याद् यज्ञियो देश' (जर कोणी क्षत्रिय, त्रैवर्णिकांपैकी एक असलेला राजा (परदेशात जाऊन) म्लेच्छांचा पराभव करील, चातुर्वर्ण्यात्मक समाजव्यवस्थेची वसाहतीच्या रूपाने तेथे प्रतिष्ठापना करील व आर्यावर्तात चाण्डालांची ज्या पद्धतीने व्यवस्था करण्यात आलेली आहे तशीच तेथील म्लेच्छांची व्यवस्था करील तर त्याबाहेरच्या भूप्रदेशालाही यज्ञीयभूमि असे म्हणता येते ) मेधातिथीचे हे उद्गार श्रेष्ठ विजिगीषु प्रवृत्तीचे निदर्शक आहेत, यात शंका नाही. जेथपर्यंत भारतीयांच्या बाणाचा प्रक्षेप होऊ शकेल व भारतीयांच्या समाजव्यवस्थेचे लोण जाऊन पोहोचू शकत असेल ती सारी यज्ञभूमि मानण्याची तेजस्वी धारणा प्राचीन भारतीय बाळगीत. मेधातिथीने यज्ञीय देशाची जी विजिगीषु व्याख्या केलेली आहे तिला प्राचीन ब्राह्मण ग्रंथातूनही आधार मिळतो 'एषा उर्वी एव स भूम्यन्तः यद्वेद्यन्त' 'सर्व पृथ्वी हीच (यज्ञवेदीप्रमाणे पवित्र आहे) कारण भूमीचें टोक म्हणजे यज्ञवेदीचेच शेवटचें टोंक होय' असें ऐतरेय ब्राह्मणात म्हटले आहे. पृथ्वीचीच वेदी बनवून देवत्वासाठी सर्वस्व समर्पण करणाऱ्या यज्ञप्रकृतिक प्राचीन भारतीयांनी जगतातील पशुत्व नष्ट करून देवत्वाची निर्मिति करण्यासाठी साऱ्या जगभर प्रवास करून प्रत्येक ठिकाणीं आपल्या

सास्कृतिक विजयाची पताका फडकाविली आहे भारतातील व अन्य राष्ट्रातील पुरातत्त्वविषयक प्राचीन साहित्य, भिन्न भिन्न राष्ट्रातील सस्कृतीचे व तत्त्वज्ञानाचे इतिहास आजही या गोष्टीची जिवतपणाने साक्ष देत आहेत पूर्वीच्या काळी पराक्रमी राजे यज्ञाच्या निमित्तानेच ज्ञात विश्वावर विजय सपादन करीत. हे विजिगीषु सम्राटाचे यज्ञ म्हणजे **अश्वमेध** व **राजसूय** होत त्याचे स्वरूप समजण्यासाठी येथे यज्ञसस्थेची थोडक्यात माहिती देणे उपयुक्त ठरेल.

वैदिक माणसाचे सर्वच जीवन यज्ञमय होते हे त्याच्या धार्मिक आचारावरूनही दृष्टोत्पत्तीस येते वैदिक धर्मीय गृहस्थाला रोजच्या दैनदिन जीवनात पचमहायज्ञ करावे लागतात. ते म्हणजे (१) भूतयज्ञ अथवा वैश्वदेव (यालाच बलिकर्मही म्हणतात.) (२) पितृयज्ञ म्हणजे स्वधा (३) देवयज्ञ अथवा दैनदिन होम (४) ब्रह्मयज्ञ म्हणजे स्वाध्याय व (५) मनुष्ययज्ञ म्हणजे अतिथिसत्कार हे होत. या पचमहायज्ञाशिवाय दैनदिन गृहस्थजीवन सपन्न होऊच शकत नाही. त्यानतर वैवाहिक अग्नि अथवा स्मार्ताग्नि म्हणून जो गृहस्थाश्रमी माणसाला ठेवावा लागतो त्याला अनुलक्षून सात स्मार्तयज्ञ असतात त्याना सप्तपाकसस्था असे म्हणतात त्या पुढीलप्रमाणे – (१) अष्टका (२) पार्वणस्थालीपाक (३) मासिक श्राद्ध (४) श्रावणी (५) आग्रहायणी (६) चैत्री, व (७) आश्वयुजी. या स्मार्ताग्नीनतर प्रत्येक गृहस्थानें त्याला वैदिक कर्माचा खरा अधिकार प्राप्त व्हावा म्हणून त्रेताग्नि परि-ग्रह करावयाचा असतो. त्रेताग्नि परिग्रह म्हणजे तीन अथवा पाच कुडाचे अग्निहोत्र घेणे. 'जातपुत्र. कृष्णकेश: अग्नीनादधीत' (ज्याला पुत्र झालेला आहे व ज्याचे केस अजून काळे आहेत अशा मनुष्याने अग्निहोत्र घ्यावे) असें वेदवचन आहे. गृहस्थाश्रमांत रुळलेल्या व कर्म करण्याचे सामर्थ्य असलेल्या गृहस्थाचा हा निर्देश आहे हे उघडच आहे. अग्निहोत्र घेतल्यानतर करावयाच्या सात हविसस्था असतात. म्हणजे सात प्रकारचे, सोम सोडून इतर हविर्द्रव्याने करावयाचे यज्ञ असतात त्यांची नावें पुढीलप्रमाणे –

(१) अग्न्याधान (२) अग्निहोत्र होम (३) दर्शपूर्णमास (४) चातुर्मास्य (५) आग्रयणेष्टि (६) निरूढपशुबध, व (७) सौत्रामणि यानतर ज्यात सोमवल्लीरूपी द्रव्याचा प्राधान्ये करून उपयोग केलेला असतो असे सात महत्त्वाचे यज्ञ असतात. सोमवल्लीचें महत्त्व, समाधीची आनदमयावस्था अनुभवून देणारी दिव्य सिद्धौषधि हे तिचें स्वरूप व हिमप्रलयाच्या विपत्तीत तिचे सदाचे नष्ट होणे या गोष्टीचे सविस्तर वर्णन मी पूर्वार्धात केलेच आहे. हल्ली सोमाचा प्रतिनिधीच वापरतात सप्त सोमसस्थाची अथवा सात प्रकारच्या सोमयागाची नावे पुढीलप्रमाणे आहेत:– (१) अग्निष्टोम (२) अत्यग्निष्टोम (३) उक्थ (४) षोडशी (५) अतिरात्र (६) आप्तोर्याम व (७) वाजपेय सहा यज्ञानी व्यक्तिविकसन साधल्यावर सातव्या वाजपेयात समाजजीवन सपन्न करण्याचा सकल्प करावयाचा असतो. पुण्यास नुकताच झालेला भव्य वाजपेय यज्ञ आपणा सगळ्याच्या स्मरणात आहेच. राजसूय व अश्वमेध हे सामान्य यज्ञ नसून ते महाक्रतु आहेत. व ते केवळ विजिगीषु क्षत्रियासाठीच असतात. प्रथम आपण सक्षेपतः अश्वमेधाचें स्वरूप पाहू. अश्वमेध हा लक्षावधि लोकांच्या भयकर सहारासारख्या पातकापासूनसुद्धा मुक्त करणारा महायज्ञ म्हणून त्याचें पुराण वाङमयातून वर्णन येते महेन्द्राने वृत्रादि दस्यूचा वध केल्यावर प्रायश्चित्त म्हणून हा यज्ञ केल्याची कथा आहे. कुरु युद्धांतील सहाराच्या पातकामुळे दुःखी असणाऱ्या युधिष्ठिराला प्रायश्चित्त सागताना महर्षि व्यास म्हणतात –

'अश्वमेधो महायज्ञ प्रायश्चित्तमुदाहृतम् ।
तमाहर महाराज विपाप्मैव भविष्यसि ॥३८॥

–(महाभारत, शान्तिपर्व, अ. ३३)

(या संहारकर्मांचे प्रायश्चित्त म्हणजे अश्वमेध यज्ञ होय. तू अश्वमेध कर म्हणजे शुद्ध होशील.) अश्वमेध यज्ञाची वैदिक परंपरा ऋग्वेदापासून तर सम्राट् पुष्यमित्र व महापराक्रमी सम्राट् समुद्रगुप्त याच्यापर्यंत अविच्छिन्नपणे आढळते. ऋग्वेदातील

सुप्रसिद्ध दाशराज्ञ युद्ध हे भरतकुलोत्पन्न राजा सुदासाच्या अश्वमेध यज्ञामुळेच भडकले असे ऋग्वेदात वर्णन आढळते पुरोहित विश्वामित्राच्या चेतावणीवरून राजा सुदासाने अश्वमेध यज्ञ केला, व त्यात त्याच्या प्रस्थापित झालेल्या सर्वश्रेष्ठत्वामुळे चिडून जाऊन अनेक राजानी त्याच्यावरच चढाई केली. पुढे वसिष्ठाच्या साहाय्याने राजा सुदासाच्या या आपत्तीचे निवारण झाले अश्वमेध यज्ञात मुख्य जो अश्व तो श्यामकर्ण लागत असे. श्यामकर्ण म्हणजे काळ्या कानाचा व शुभ्र वर्णाचा घोडा होय वसतऋतूमध्ये चैत्री पौर्णिमेला हा यज्ञ प्रारभ करीत. यथाविधि दीक्षा घेतल्यानतर या श्यामकर्णाचे पूजन करून त्याला मोकळा सोडीत असत त्या घोड्याने वर्षभर आपल्या इच्छेनुसार देशोदेशी सचार करावयाचा असे. अश्वमेधाचा हा घोडा जो आपल्या राज्यातून सत्कारपूर्वक जाऊ देईल त्याला माडलिक समजण्यात येत असे व जो अडवील त्याच्याशी घनघोर युद्ध करून त्याला माडलिक करण्यात येई. यासाठी अश्वाच्या सरक्षणार्थ विख्यात कीर्तिवीराला कडवे सैन्य बरोबर देऊन सचारास्तव पाठविण्यात येई सैन्य व सेनापति याच्या इच्छेनुसार अश्वाचा सचार होत नसे; तर अश्वाच्या इच्छेनुरूप त्याना सचार करावा लागे या अश्वाला आपल्या राज्याचे उल्लघन करून जाऊं देणे हा वीर पुरुष व पराक्रमी सत्ता आपला मोठा अपमान समजत असत; व म्हणून अश्वमेधात युद्ध हे अपरिहार्य असे. ज्याने अश्वमेधकर्त्याच्या बळाचा धाक घेऊन शरणागति पत्करली असेल अथवा युद्धात पराभव होऊन ज्याने शरणागति पत्करली असेल त्या राजाचे सैन्य व तो स्वत अथवा त्याचा कोणी लढवय्या प्रतिनिधी हे मूळ अश्वरक्षक सैन्यात दाखल होत व अशा रीतीने सरक्षक सैन्याचे बळ वाढत जाई मर्यादापुरुषोत्तम रामचद्राच्या अश्वमेधाच्या वेळी शृगारलेल्या घोड्याच्या मस्तकावर रामचद्राच्या पराक्रमाचा निर्देश करणारी व शत्रूच्या अंत करणात धाक उत्पन्न करणारी पुढील पत्रिका होती –

अयमश्व पताकेय अथवा वीरघोषणा ।
सप्तलोकैकवीरस्य दशकण्ठकुलद्विष ॥

(हा अश्व, अथवा जणू वीरघोषणाच अशी ही पताका रावणाच्या कुळाचा नायनाट करणाऱ्या व सप्तलोकात सर्वश्रेष्ठ वीर ठरलेल्या रामचद्राची आहे ) या अश्वाच्या सरक्षणासाठी, इद्रजिताचा निहन्ता म्हणून विख्यात असलेल्या धनुर्धर लक्ष्मणाची नियुक्ति करण्यात आलेली होती युधिष्ठिराच्या अश्वमेध यज्ञात अश्वसरक्षक म्हणून धनुर्धर पार्थ गेला होता अशा सरक्षक सेनापतीबरोबर उपाध्याय असे श्रीमद्वाल्मीकीय रामायणाच्या बालकाण्डात (सर्ग ८ १४) राजा दशरथाच्या अश्वमेधाचें जे वर्णन आहे तेथे दशरथाची आज्ञा पुढीलप्रमाणे आहे :–

समर्थाधिष्ठितश्चाश्व सोपाध्यायो विमुच्यताम् ।

( अश्वाच्या सरक्षणासाठी कोणी समर्थ सेनापति व त्याच्याबरोबर पुरोहित पाठवावा ) महाभारतात अर्जुनाबरोबर गेलेल्या पुरोहिताचे वर्णन पुढीलप्रमाणे आढळते –

याज्ञवल्क्यस्य शिष्यश्च कुशलो यज्ञकर्मणि ।
प्रायात्पार्थेन सहित शान्त्यर्थं वेदपारग ॥१८॥

– (महाभारत, आश्वमेधिकपर्व अ ७३)

(यज्ञ करण्यात कुशल, व वेदविद्येत पारगत असलेला याज्ञवल्क्याचा शिष्य अर्जुनासहित शातिकर्माप्रीत्यर्थ गेला.) अश्वाच्या पूजनानंतर हवन करून त्याला सचारास्तव सोडताना पुढील प्रार्थना करीत :––

विभूर्मात्रा प्रभू पित्राश्वोऽसि हयोऽस्यत्योऽसि मयोऽस्यर्वासि सप्तिरसि वाज्यसि वृषासि नृमणा असि । ययुर्नामासि शिशुर्नामास्यादित्याना पत्वान्विहि देवा आशापाला एत देवेभ्योऽश्वं मेधाय प्रोक्षित रक्षते हरन्तिरिह रमतामिह धृतिरिह स्वधृति स्वाहा ॥

– (वाजसनेयि सहिता अ. २२, कण्डिका १९ मंत्र ६)

(हे अश्वा, तू भूमातेपेक्षा थोर आणि द्युलोकरूपी पित्यापेक्षा श्रेष्ठ आहेस. तू सर्वापेक्षा चदी अधिक खाणारा घोडा आहेस. तू धावणारा आहेस, सतत चालणारा आहेस, सर्वदा आनदी वृत्तीचा आहेस, धन्याच्या सूचनेप्रमाणे चालणारा आहेस, सैन्यात घुसणारा आहेस, आवश्यकतेप्रमाणे निरनिराळ्या चालीनी चालणारा आहेस, उत्तम मादीचा तुला लाभ होतो, धन्यावर तू प्रेम करणारा आहेस, अत्यत जलद चालणारा म्हणून प्रसिद्ध आहेस आणि प्रशसनीय गुणसपन्न म्हणूनही तू प्रसिद्ध आहेस अदितीचे पुत्र असलेले देव ज्या मार्गांनी जात त्याच मार्गांनी तू जा दिशाचे रक्षण करणाऱ्या आणि स्वपराक्रमाने रणागणावर चमकत असणाऱ्या राजपुत्रानो, यज्ञामध्ये देवाना समर्पण करण्यासाठी स्वच्छ धुतलेला आणि योग्य असा सस्कार केलेला हा अश्व तुम्ही सरक्षण करा. हे अग्ने, या ठिकाणी अश्वाचे मन रमावे म्हणून ही आहुति तुला अर्पण असो. हे अश्वा, तू येथे आनदात निमग्न होऊन रहा हे अग्ने, या ठिकाणी अश्वाने आनदात मग्न असावे म्हणून तुला ही आहुति समर्पण असो. या ठिकाणी राहण्याचे अश्वाला धैर्य व्हावे म्हणून हे अग्निदेवा, तुला ही आहुति अर्पण असो ) अश्व बरोबर एक वर्षाने सचार करून परत येई. हे सपूर्ण वर्ष अश्वमेध यज्ञाच्या जागी रोज निरनिराळे होमहवन, विद्वानाचे वादविवाद, धर्मपरिषदा व चर्चा, कलात्मक विविध कार्यक्रम व रोज सहस्रावधि लोकाना अन्नदान यात घालवीत अश्वसचार सपला म्हणजे ज्ञात जगाचे साम्राज्य कर्त्याला मिळाले असे सिद्ध होई त्यानतर अश्वाला मारून त्याच्या निरनिराळ्या अगाचे हवन व मुख्यत वपेचे हवन करण्यांत येत असे अश्वाच्या प्रत्येक हालचालीच्या वेळी सुवर्णाचा भरपूर प्रमाणात वापर करीत त्याला मारतानाही सुवर्णाचे तुकडे त्याच्या शरीराखाली पसरीत असत अश्वाबरोबर आणखीही पशूचे हवन असे. अश्वाला मारताना पुढील मत्र म्हणत —

न वा उ एतन्म्रियसे न रिष्यसि देवॉऽइदेषि पथिभि सुगेभि ।
यत्रासते सुकृतो यत्र ते ययु तत्र त्वा देव सविता दधातु ।।
– (वाजसनेयि सहिता अ. २३ कडिका १६ म १)

(हे अश्वा, लौकिक दृष्टीने आम्ही तुला मारीत आहोत हे खरे; परतु तत्त्वदृष्टीने विचार करशील तर तू मरत नाहीस व शरीरानेही नष्ट होणार नाहीस उलट, सुलभ व सुगम अशा मार्गांनी तू देवाच्यापाशी जाऊन पोहोचशील पुण्यकर्मे केलेले लोक जेथे असतात किवा जेथे ते पुण्यकर्मे करणारे लोक जाऊन पोहोचतात त्या ठिकाणी सविता देव तुला नेऊन पोहोचवो.) अश्वमेध यज्ञाच्या विधिकर्मात महाराणीने अश्वाबरोबर शयन करणे व राजाने शिजत असलेल्या त्याच्या वपेच्या गधाचे अवघ्राण करणे हे दोन विधि मुख्य आहेत. सचाराला निघालेल्या अश्वाचें ऋग्वेद व वाजसनेयि सहितेतील पुढील वर्णन पाहिले म्हणजे अश्वमेध हे दिग्विजयाचे साधन किती प्राचीन काळापासून मानलें जाई याची कल्पना येते. ते असे —

उप प्रेत कुशिकाश्चेतयध्वमश्व राये प्र मुञ्चता सुदास ।
राजा वृत्र जघनत् प्रागपागुदगथा यजाते वर आ पृथिव्याः ।।
विश्वामित्रास्य रक्षति ब्रह्मेद भारत जनम् ।।
–(ऋग्वेद ३ ५३. ११-१२)

(अहो कुशिकानो, अश्वाजवळ चला ! त्या अश्वाचे रक्षण करणारे असे जे वीर आहेत त्याना सावध करा ! सुदास राजाचा हा जो घोडा आहे त्याला दिग्विजय करून सपत्ति मिळविण्यासाठीं पृथ्वीवर मोकळा सोडून द्या ! राजा इंद्र जो आहे. तो तुमच्या कार्यात अडथळा करणाऱ्या दुष्टाला पूर्वेस, पश्चिमेस, उत्तरेस, कोणत्याही बाजूने तो आला तरी त्यास ठार मारील, काळजी करू नका. अश्व सोडा घोडा फिरून आल्यावर सुदास राजा मग पृथ्वीवरील उत्तम अशा यज्ञस्थानावर यज्ञसमारभ ( मोठ्या थाटाने) साजरा करील आणखी येथे हेही सागतो की तुम्ही गेल्यावर (मी विश्वामित्र येथे इद्राचे सुदर स्तोत्र गात बसतो आणि ते माझे स्तोत्र तुम्हा भरतजनांचे रक्षण करील.)

अनु त्वा रथो अनु मर्यो अर्वन्ननु गावो नु भग: कनीनाम् ।
अनुव्रातासस्तव सख्यमीयुरनुदेवा ममिरे वीर्य ते ॥१॥
– (वाजसनेयि सहिता अ २९, कडिका १९)

(हे वेगवान् अश्वा, रथ तुझ्या मागोमाग चालतो. सारथि झालेला माणूस तुझ्या मागूनच मार्ग आक्रमितो गाई तुझ्याच अनुरोधाने चालत असतात, इतकेच नव्हे तर अविवाहित अशा मुलीचे भाग्यही तुझ्या अनुरोधानेच वाट चालत असते मानवाचे कित्येक सघ तुझ्या सख्यत्वाला प्राप्त झाले आहेत. किबहुना देवानी देखील तुझे अपार सामर्थ्य अजमाविले आहे.) अश्वमेध यज्ञ करणाऱ्याच्या आकाक्षेचे वेदवाङमयातील चित्रणहि विचार करण्यासारखे आहे. वाजसनेयि सहितेत म्हटले आहे :—

इमानुक भुवना सीषधामेन्द्रश्च विश्वे च देवा: ॥
वसुरग्निर्वसुश्रवा अच्छानक्षि द्युमत्तम रयि दा. ॥
–(वाजसनेयि सहिता अ २५ क ४६ व ४७ म. १)

अनुवीरैरनु पुष्यास्म गोभिरन्वश्वैरनु सर्वेण पुष्टै. ।
अनुद्विपदानु चतुष्पदा वय देवानो यज्ञमृतुथा नयन्तु ॥१९॥
– (वाजसनेयिसहिता अ २६ कडिका १९ म १)

(जगात उत्पन्न झालेल्या स्थावर जगमात्मक सर्व वस्तु आम्ही आपल्याशा करून घेऊ इद्र आणि इतर सर्व देव आमच्यासाठी औषधाप्रमाणे हितकर असे यज्ञफल निर्माण करोत अष्टवसु-स्वरूप, गमनशील आणि धनप्रद म्हणून ज्याची कीर्ति गाजली आहे अशा हे अग्निदेवा ! तू आम्हाला सर्व बाजूनी व्यापून रहा व अत्यत तेजस्वी असे सुवर्णमौक्तिकादि धन आम्हाला दे. आम्ही पराक्रमी पुत्राच्या योगाने पुष्ट होऊ गाईच्या योगानें आम्ही पुष्ट होऊ घोड्याच्या योगाने आम्ही पुष्ट होऊ आवश्यक अशा गृहधनादि सर्व पदार्थांनी आम्ही पुष्ट होऊ. चाकर माणसाच्या योगाने आम्ही पुष्ट होऊ आणि ऐश्वर्याचें प्रतीक असणाऱ्या हत्ती वगैरे बहुमोल पशूच्या योगानेंही आम्ही पुष्ट

होऊ वेळच्या वेळी देव आमचा यज्ञ सिद्धीस नेवोत ) जगतांतील सर्व स्थावर जगमात्मक वस्तूवर स्वामित्व प्रस्थापित करण्याच्या आकाक्षेची पूर्तता करणारा हा **अश्वमेध**, पराक्रमी भारतीय सम्राटाच्या विश्वविजयाचे केवढे अमोघ साधन होता हे अश्वमेधाच्या या वर्णनावरून सहज ध्यानात येईल आता आपण **राजसूयाच्या** स्वरूपाकडे वळू

अश्वमेध हा अत्यत व्यापक अशा घोर सहारात्मक पातकाच्या विनाशासाठी मुख्यत असला, तर राजसूय हा मुख्यतः चक्रवर्तित्वाच्या अथवा साम्राज्याच्या प्रतिष्ठापनेसाठी आहे. भारतीय साहित्यात सम्राटाचे लक्षण पुढीलप्रमाणे आहे --

येनेष्ट राजसूयेन मण्डलस्येश्वरश्च य ।
शास्ति यश्चाज्ञया राज्ञ स सम्राडिति शब्द्यते ।।

(जो राष्ट्राचा अधीश्वर आहे, जो अनेक राजाच्यावर आपले अनुशासन चालवितो व त्याना आज्ञा करू शकतो व ज्याने राजसूय महाक्रतु केलेला आहे त्याला सम्राट् असे म्हणतात ) स्वत.च्या शस्त्रप्रतापाने सर्व राजसत्ताना जिकून राजाचाही राजा म्हणून स्वत. अभिषेक करवून घेणे ही राजसूयातील प्रधान गोष्ट असते. अनेक राजे लोकाना सम्राटाच्या या यज्ञात प्रत्यक्ष काम करावे लागते. महाभारतांतील पाडवाच्या राजसूय यज्ञात राजे लोकाना देण्यात आलेल्या वेगवेगळ्या कामाचें वर्णन आढळते माघ कवीने आपल्या शिशुपालवध काव्यात तर राजसूयास उद्युक्त झालेल्या युधिष्ठिराला आश्वासन देणाऱ्या भगवान् श्रीकृष्णांच्या तोंडीं पुढील श्लोक घातलेला आहे :--

यस्तवेह सवनेन भूपति कर्म कर्मकरवत् करिष्यति ।
तस्य नेष्यति वपु कबन्धता बधुरेष जगता सुदर्शन ।।

(जो कोणी राजा तुझ्या या राजसूय यज्ञात एखाद्या कर्मकराप्रमाणें सोपविलेले काम करणार नाही त्याचा, जगताचा बन्धु असलेले माझे हें सुदर्शन चक्र अवश्य शिरच्छेद करील )

श्रीकृष्णाच्या या उद्गारात, राजसूय यज्ञात मांडलिकांच्या कडून असणारी अपेक्षाच एक प्रकारे व्यक्त झालेली आहे असें

पुढच्या इतिहासावरूनही दिसून येते कनोजचा राजा जयचद याने केलेल्या राजसूय यज्ञात दिल्लीश्वर पृथ्वीराज चव्हाण हा उपस्थित नव्हता म्हणून राजा जयचदाने हातात वेनाची छडी घेऊन द्वारपाळाचे काम करीत असलेल्या अवस्थेतील पृथ्वीराजाची सुवर्णप्रतिमाच आपल्या दारावर उभी केली होती सर्व राजसत्ता निर्विवादपणे जिकून व याप्रमाणे अकित करूनच राजसूय करण्यात येत असल्यामुळे राजसूयात अनेक स्वाभिमानी राजसत्ता अपमानित होत, व ज्याच्या सामर्थ्यासमोर त्याना वाकावे लागले त्याच्या विनाशाविषयी ते अर्थातच डोळ्यात तेल घालून जागरूक असत अश्वमेधात अकितत्वाची व शत्रूच्या श्रेष्ठत्वाची इतकी सलणारी जाणीव होत नाही की जितकी राजसूयात होते म्हणूनच राजसूयासबधी महाभारतात पुढीलप्रमाणे इषारे देण्यात आले आहेत :—

बहुविघ्नश्च नृपते क्रतुरेष स्मृतो महान् ।
छिद्राण्यस्य तु वाञ्छन्ति यज्ञघ्ना ब्रह्मराक्षसा ।।२९।।
युद्ध च क्षत्रशमन पृथिवीक्षयकारणम् ।
किचिदेव निमित्त च भवत्यत्र क्षयावहम् ।।३०।।

—(महाभारत सभापर्व अ. १२)

(या महाक्रतूत पावलोपावली अनेक विघ्ने असतात यज्ञाचा विनाश करणारे ब्रह्मराक्षस या यज्ञाची छिद्रे डोळ्यात तेल घालून पहात असतात. बहुधा या यज्ञातून साऱ्या जगताचा विनाश ज्याला म्हणता येईल असे क्षत्रियाचा सहार करणारे अमर्याद भीषण महायुद्ध निर्माण होते, व येवढा मोठा विनाश घडवून आणणारे युद्ध उत्पन्न व्हावयास काही मोठे महत्त्वाचे कारणच उपस्थित व्हावे लागते असे नाही, तर फुसके निमित्त सुद्धा पुरते )अपमानित होणाऱ्या राजसत्ताचा असतोष हेच क्षत्रविनाशक युद्धाचे खरे कारण होय कुरुपाण्डव युद्धाचे कारण सुद्धा राजा युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञातूनच निर्माण झाले होते धृतराष्ट्रानें आपल्या कारस्थानीपणाने पाडवाच्याच अधिकाराचे अर्धे राज्य

स्वतःच्या अधीन करून घेतले तरी इंद्रप्रस्थात राहणाऱ्या पांडवांच्या हातून भगवान् श्रीकृष्णांनी राजसूय यज्ञ करविताच कौरव राजसत्ता आपोआपच पांडवांची मांडलिक बनली दुर्योधनादिकांना या यज्ञात कामे करावी लागली

दुर्योधनस्त्वर्हणानि प्रतिजग्राह सर्वशः ।

–(महाभारत, सभापर्व अ ३५ श्लोक ९)

दुर्योधनाकडे यज्ञात येणारे नजराणे व भेटी सभाळण्याचे काम होते असे महाभारतात म्हटले आहे स्वाभाविकपणेच मत्सराग्नि भडकला त्याचा पहिला भडका श्रीकृष्णाच्या अग्रपूजेच्या वेळी शिशुपालाच्या नेतृत्वाखाली उडाला पण भगवान् श्रीकृष्णांनी आपल्या सामर्थ्याने शिशुपालाचा शिरच्छेद करून बडखोराचे काय होते ते दाखवून दिल्यामुळे तो तेथेच उपशम पावला. पण शेवटी कुरापत वाढत जाऊन त्याने दुर्योधनाकरवी द्यूत घडवून आणून शेवटी कुरुयुद्धाच्या रूपाने सारी क्षत्रिय पिढी रणकुंडात भस्म करून टाकली ज्या वंशात राजसूय झाला असेल त्या वंशातील कोणालाही राजसूय करणाऱ्याच्या मृत्यूवाचून अगर वधावाचून राजसूय करता येत नसे या निर्बंधामुळेच पांडव वनात गेल्यानंतर कर्णाच्या भरवशावर सम्राट झालेल्या दुर्योधनाला इच्छा असूनही राजसूय करता न येऊन विष्णुयाग करून दुधाची तहान ताकावर भागवावी लागली याचा उल्लेख मी माझ्या महाभारतावरील ग्रंथात केला आहे राजसूय करण्याच्या पूर्वी सर्व ज्ञात राजसत्तांना जिंकून दिग्विजय करावा लागे दिग्विजयानंतर सर्व राजसत्तांना कसोशीने यज्ञात उपस्थित होण्याविषयी निमंत्रित करण्यांत येई सम्राटाला नजराणे व भेटी समर्पण करण्याचा एक मोठा समारंभ होत असे व त्याच वेळी सम्राट् यज्ञदीक्षा घेई त्यानंतर अभिषेचनीयाच्या दिवशी जो सर्व गुणांनी सर्वश्रेष्ठ पुरुष असेल त्याचा व त्यानंतर योग्यतेच्या श्रेणीनुसार उपस्थित असलेल्या सर्वश्रेष्ठ पुरुषाचा सत्कार करण्यात येई. यालाच अग्रपूजा असे म्हणत व या अग्रपूजेचा मान भगवान्

श्रीकृष्णानाच दिल्यामुळे महाभारतात मोठे प्रकरण उपस्थित झालेलें आहे यानतर अनेक प्रकारच्या इष्टी व आवश्यक ते यज्ञकर्म क्रमश झाल्यावर पृथ्वीच्या एकछत्री साम्राज्याच्या सम्राटाला अभिषेक होई " राष्ट्रममुष्मै दत्त " या अक्षरानी सपणाऱ्या मंत्रानी चतु समुद्र व नाना तीर्थे याच्या पवित्र जलाने हा अभिषेक करण्यात यत असे नतर हवन करून सम्राटाच्या हाती शस्त्रे दिल्यावर पुरोहित घोषणा करी –

आविर्मर्याऽआवित्तोऽअग्निर्गृहपतिरावित्तऽइद्रो वृद्धश्रवाऽआवित्तौ मित्रावरुणौ धृतवतावावित्त. पूषा विश्ववेदाऽआवित्ते द्यावापृथिवी विश्वशम्भुवावावित्तादितिरुरुशर्मा ॥ सोमस्य त्वा द्युम्नेनाभिषिञ्चाम्यग्नेर्भ्राजसा सूर्यस्य वर्चसेन्द्रस्येन्द्रियेण । क्षत्राणा क्षत्रपतिरेध्यति दिद्यून् पाहि ॥

–(वाजसनेयि सहिता अ १० कडिका ९ व १७ म ७व४)

(हा यजमान अखिल राष्ट्राचा अधिपति झाला आहे हे तुम्ही जाणलेच आहे. गृहपति अग्नीने हे जाणलेच आहे ज्याची कीर्ति एकसारखी वृद्धिगत होत आहे अशा इद्राने हे जाणले आहे कर्तव्यपालनाचे व्रतच ज्यानी चालविले आहे अशा मित्रावरुणानी हे जाणले आहे सर्वज्ञ अशा पूषाने हे जाणले आहे ज्याच्यामुळे सर्व जगाला सुख होते त्या द्यावापृथिवीनी हे जाणले आहे इतकेच नव्हे तर सर्वांना अत्यत सुखप्रद अशा देवमाता अदितीनेही, 'हा यजमान अखिल राष्ट्राचा एकमेव अधिपति झाला' हे जाणले आहे हे यजमान चद्राच्या यशाने मी तुला अभिषेक करतो. चंद्राच्या यशाने अभिषिक्त झालेला तू सर्व क्षत्रियाचा क्षत्रियेश्वर हो आणि शत्रूनी तुझ्यावर टाकलेल्या बाणाचे अतिक्रमण करून तू स्वत च्या शरीराचे रक्षण कर हे यजमान अग्नीच्या तेजाने मी तुला अभिषेक करतो सूर्याच्या कातीने मी तुला अभिषेक करतो इद्राच्या सामर्थ्याने मी तुला अभिषेक करतो ) यानतर सम्राटांकडून पुढील विजयशाली घोषणा करवीत –विष्णोर्विक्रमणमसि । विष्णोर्विक्रान्तमसि । विष्णोः क्रान्तमसि ।

—(वाजसनेयि सहिता अ. १० कडिका १९ म. ४)

( मी टाकलेल्या पहिल्या पावला, तू त्रिविक्रम विष्णूनें पहिले पाऊल टाकून जिकलेला जणू भूलोकच आहेस. मी टाकलेल्या दुसऱ्या पावला, तू त्रिविक्रम विष्णूनें दुसरे पाऊल टाकून जिकलेला जणू, अतरिक्ष लोकच आहेस. मी टाकलेल्या तिसऱ्या पावला, तू त्रिविक्रम विष्णूने तिसरे पाऊल टाकून जिकलेला जणू स्वर्गलोकच आहेस ) केवढी विजिगीषा व सामर्थ्याचा आत्मप्रत्यय या घोषणेत आहे ! यानतर अवभृथ-स्नान व अभ्यागताचा यथोचित सत्कार होऊन हा यज्ञ समाप्त होई. राजसूयाचे हे स्वरूप व त्यातील प्रत्येक विधिविधानातून व्यक्त होणारी सामर्थ्य व दर्पाची जाणीव याचा विचार केला तर तो कलहात्मक का आहे याची कल्पना येते

वैदिक धर्मीय त्रैवर्णिकाच्या जीवनातील यज्ञमयतेला यज्ञोप-वीत धारणापासून प्रारभ होतो, तर ती शेवटच्या अत्येष्टि-संस्कारानेच सपते यज्ञसस्थेतील मूलतत्त्व आधिदैविक क्षेत्रातील दैवी शक्तीची मानवी जीवनाला जोड मिळवून द्यावी हे आहे वैदिक सस्कृति ही नुसती आध्यात्मिक सस्कृति नसून, ती सामर्थ्याची उपासना करणारी आधिदैविक सस्कृति आहे. सामर्थ्यसपादनाचा मार्ग म्हणजे यज्ञ असून तो स्वाभाविक मार्ग आहे असे तिचे म्हणणे आहे याच अभिप्रायाने गीतेंत श्रीभग-वतांनी म्हटले आहे –

सहयज्ञा प्रजा सृष्ट्वा पुरोवाच प्रजापति ।
अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ।।
देवान्भावयतानेन ते देवा भावयन्तु व ।
परस्पर भावयत श्रेय परमवाप्स्यथ ।।

( प्रजापतीने यज्ञासह प्रजा निर्माण करून त्यांना सागितले की तुम्ही यज्ञाच्या साधनाने सामर्थ्यसपन्न व्हा. हा तुमच्या सर्व इच्छा पूर्ण करो या साधनानें तुम्ही देवांना संतुष्ट करा व देव तुमच्या सर्व इच्छा पूर्ण करोत. या साधनाने तुम्ही दैवी शक्तीशी दळणवळण ठेवून परस्परकल्याण करून घ्या. )

भौतिक सृष्टीच्या पलीकडे आधिदैविकाचा थर असून त्या क्षेत्रात तेहेतीस ज्योतिर्मय व ज्ञानमय शक्ति आहेत त्यानाच तेहेत्तीस कोटी देव असे म्हणतात त्याच्याशी सबध जोडून सामर्थ्यसपन्न होण्यासाठी मानवी जीवनाला ईश्वराने दिलेले साधन म्हणजे यज्ञ होय. विजिगीषा व साम्राज्यविस्तार याची ही गुफण अश्वमेध व राजसूय या महायज्ञाच्या प्रक्रियेत करून प्राचीन भारतीयानी त्याच्यातील पशुत्व नष्ट केले कारण अश्वमेध व राजसूयाच्या द्वारे होणारा दिग्विजय काम व अर्थ अथवा वासना व शोषण यासाठी नसून केवळ बलाच्या प्रस्थापनासाठी अथवा पराक्रमी म्हणून होणाऱ्या कीर्तिलाभासाठी होता या निमित्ताने भारतीय सम्राट् जेथे जात तेथे केवळ पशुत्वाला निर्मूल करीत आजच्या अर्थाचे शोषक साम्राज्य त्यानी कधीही प्रस्थापित केले नाही उलट भारतातील सम्राट्, तत्त्वज्ञ, तपस्वी यानी आपल्या जीवनादर्शाने एक महान् धारणेचे जीवन मात्र, ज्याच्या ज्याच्याशी त्याचा सबध आला तेथे तेथे उत्पन्न केले वैदिक धर्माने व त्याचेच बडखोर बालक असलेल्या बुद्धादि सप्रदायानी हा जो सास्कृतिक विश्वविजय केला त्याचे विहगमावलोकन अनेक दृष्टीनी स्फूर्तिप्रद आहे. सम्राट् अशोकाच्या काळापासून तर त्याचे प्रकट पुरावेच आढळतात

सम्राट् अशोकाच्या तेराव्या शिलालेखात म्हटले आहे की "प्रियदर्शनाने दयाधर्माचा प्रसार सर्वत्र केला आहे. सहाशे योजने दूर, जेथे यवनाचा राजा अँटिओक राहतो तेथपर्यंत व तेथून त्याच्या उत्तरेला तुरमयोमक, अतकिनी व अलिक सुदरो हे चार राजे राहतात तेथवरही केला आहे." अशोकाने तर धर्मप्रसारच केला, पण भारतीय सस्कृतीच्या इतर प्रनोदानी सुदूर प्रदेशात आपल्या वसाहती स्थापून स्थिर सस्कृतीची प्रतिष्ठापना करून दाखविली आहे. ब्रह्मदेशचा प्राचीन इतिहास पाहिला तर तेथे सहाव्या शतकांत असलेल्या राजाच्या नावाच्या शेवटी विक्रम व वर्मा या उपाधि असलेल्या आढळून येतात. सयाम अथवा थायलड येथे पचवीसशे

वर्षांपूर्वी गादीवर आलेल्या राजाचे नाव 'सहावा राम' असे आहे अर्थातच त्या गादीवर यापूर्वी राम या नावाचे पाच राजे होऊन गेले असले पाहिजेत हे स्पष्ट आहे तेथील विधिमडळाचे नाव **राजपांडीय सभा** असे होते व अगदी अलीकडेपर्यंत तेथील राजे लोक प्रजादीपक इत्यादि बिरुदे धारण करीत असत सहाव्या शतकात तेथील राज्याचे नावच **द्वारावती राज्य** असे होते भारतीय स्थळाचीं व महापुरुषाची नावे गौरवास्पद म्हणून उपयोगात यावी इतका या प्रदेशावर भारतीय सस्कृतीचा प्रभाव होता याचे हे स्पष्ट निदर्शनच होय आजच्या अनामचे प्राचीन नाव चपादेश असे होते तेथे तिसऱ्या शतकापासून तर पधराव्या शतकापर्यंत म्हणजे जवळ जवळ तेराशे वर्षे हिंदू धर्माचे राज्य होते तेथे संस्कृत भाषेतील अनक प्राचीन लेख व वेदातील देवतांची मदिरे उपलब्ध होतात काबोडियाचे प्राचीन नाव कबुज देश असे होते. हे राष्ट्र कौडिन्य नावाच्या ब्राह्मणाने वसविले इ. स च्या ४ थ्या शतकात तेथील राजाचे नावही कौडिन्य असेच होतें तेथील राजाच्या नामावलीत जयवर्मा, सूर्यवर्मा इत्यादि भारतीय नावे आढळतात तेथे इ सनाच्या पाचव्या शतकात गुणवर्मा नावाच्या राजाने गयेच्या धर्तीवर विष्णुपदाची स्थापना केली तेथील ईश्वरवर्मा नावाच्या राजाचा मुख्य प्रधान साख्य, न्याय इत्यादि भारतीयाच्या दर्शनशास्त्रात निष्णात पडित होता या प्रदेशांत जी मदिरे आढळतात त्यावरील शिल्पात समुद्रमथन, कुरु - पाण्डव युद्ध, शेषशायी विष्णु, गोवर्धनधारी श्रीकृष्ण हे प्रसग चित्रित केलेले आहेत मलाया द्वीपकल्पात तर इ सनाच्या पाचव्या शतकापासून पधराव्या शतकापर्यंत म्हणजे जवळ जवळ एक सहस्र वर्षे भारतीयाचे राज्यच होते सुमात्रा बेटामध्ये हिंदू देवताच्या मूर्ति सापडलेल्या असून तेथील राजधानीचे 'श्रीविजय' हे नाव ध्यानात घेण्यासारखे आहे. हल्लीच्या जावा बेटाचे नाव पूर्वी यवद्वीप होते. इ. सनाच्या दुसऱ्या शतकात तेथे असलेल्या राजाचे नाव देववर्मा असें असून तेथें महाभारतादि आमचे सास्कृतिक ग्रथ उपलब्ध झालेले

आहेत फाहियान् हा चिनी प्रवासी असें उल्लेखितो की, 'पाचव्या शतकात या प्रदेशात ब्राह्मणी वर्चस्व होतें बलिद्वीपामध्यें तर उपनिषदादि भारतीय तत्त्वज्ञानाचे मूलग्रंथच सापडले आहेत बोर्नियो येथे इ स च्या चवथ्या शतकात **मूलवर्मा** या नावाचा राजा राज्य करीत असे. तो मोठा दानशूर व धार्मिक प्रवृत्तीचा होता त्याच्या यज्ञाचा यूपस्तभ तेथे असून त्यावर पुढील सस्कृत श्लोक आहे ––

श्रीमूलवर्मराजेन्द्रो यष्टवान् बहुसुवर्णकम् ।
तस्य यज्ञस्य यूपोऽय द्विजेन्द्रैः सम्प्रकाशित ॥

(श्रीमूलवर्म राजेन्द्राने अनेक सुवर्ण राशी खर्च करून यज्ञ केले. त्याच्या यज्ञाचा हा यूपश्रेष्ठ ब्राह्मणानी त्याची कीर्ति चिरकाल रहावी म्हणून स्थापन केलेला आहे ) फिलिपाईन्स बेटातील भाषेत अनेक सस्कृत शब्द आढळतात जपान व चीन या राष्ट्राचे सास्कृतिक गुरुत्व भारताकडे आहे हे काही कोणास सागावयास नको. जपान-मधील मूळच्या, केवळ श्रद्धेवर आधारलेल्या पितृपूजाप्रधान सिंटो धर्माला व त्याने निर्माण केलेल्या जपानी संस्कृतीला जीवनाच्या मूलभूत दृष्टिकोनाचा व तात्त्विक पार्श्वभूमीचा लाभ भारतात जन्म पावलेल्या बौद्ध सप्रदायाच्या अगीकारामुळेच झालेला आहे हे काही कोणास सागावयास नको चीनचीही तीच स्थिति आहे ज्या बौद्ध सम्प्रदायाचा कोणताही प्रभाव भारतावर न पडता त्याला उलटे सीमापार व्हावे लागले त्याचा हा विश्व-विजय पाहिला की ताण्डव नृत्याच्या वेळी भगवान् श्रीशकरांनी डाव्या पायाने दूर सारलेल्या सपत्तीला कवळून आपले भाडार समृद्ध करणाऱ्या धनपति कुबेराची आठवण झाल्याविना रहात नाही. कश्यप मातग हिंदुस्थानातून या प्रदेशात गेलेला पहिला धर्मप्रचा-रक होय अशिया मायनरमध्ये ज्या प्राचीन इष्टिका सापडलेल्या आहेत त्यापैकी काही इष्टिकावर (भाजलेल्या विटा) प्राचीन राजाची काही सधिपत्रे कोरलेली आहेत. त्या संधिपत्रांवर इन्द्र, वरुण इत्यादि वैदिक देवतांच्या साक्षी टाकलेल्या आहेत. वॉडेल,

हॉलिंगस्वर्थ व हिल्टन यंग याच्या कमिशनने तर आपल्या प्रति-वृत्तात असें म्हटले आहे की, आफ्रिका व इजिप्त या देशावर अति प्राचीन काळापासून हिंदू वर्चस्व होते. बळीचा विख्यात मुलगा बाणासुर याची राजधानी शोणितपूर ही आफ्रिका खडात असावी असा संशोधकाचा तर्क आहे. भगवान् श्रीकृष्णाचा नातू अनिरुद्ध याला बाणासुराची मुलगी उषा ही दिली होती हे लक्षात घेतले म्हणजे शोणितपूर आफ्रिकेत असल्याचा तर्क जर खरा असेल तर या सुदूर भूप्रदेशाचे व भारताचे सबध फार प्राचीन काळापासून अत्यत निकटचे होते असे म्हणावे लागतें. इडोनेशियाची माहिती देणाऱ्या आपल्या केसरीतील लेखमालेत सौ. मालिनी श्रीधर देशपाडे लिहितात. "जकार्ता शहर शतकानुशतके राजधानी म्हणून चालत आल आहे. पूर्वी या भागात प्रजारजन नावाच हिंदू राज्य होत. आणि त्या वेळी राजधानीच नाव 'सुडाकेलापा' अस होत पुढं १५२७ साली येथे बटामच्या मुसलमान सुलतानाच राज्य सुरूं झाल, आणि त्याच सुमाराला या शहराला जयकर्ता अस नवीन नाव देण्यांत आल. जकार्ता येथील म्यूझियमच्या मधल्या प्रांगणात चौफेर दगडी मूर्ति आणि शिल्पकलेचे नमुने ओळीने लावून ठेवलेले होते. त्याची एक प्रदक्षिणा केल्यावर आम्हाला फार आश्चर्य वाटल कारण त्या मूर्तीमध्ये आपल्या चिरपरिचयाचे अनेक जण आम्हाला आढळले डाव्या आणि उजव्या सोडेचे श्रीगणेश, ब्रह्मदेव विष्णु, दुर्गा, सावित्री, शिवमहादेव, सूर्य नारायण, सरस्वती याच्या मूर्ति आमच्याकड पाहून अर्थपूर्ण नजरेन हसत होत्या. येथे कोणी आपला माणूस भेटला व त्याच्याशी सभाषण सुरू झाल की, बहुतेक पहिला प्रश्न आम्ही हमखास विचारीत असू 'तुम्ही येथे कव्हां आला?' उत्तर येई 'सहा महिने' अथवा 'वर्ष' वा 'चार वर्ष' मी ज्या वेळी हाच प्रश्न आमच्या ओळखीच्या गणपति, विष्णु, सरस्वती इत्यादीच्या मूर्तींना विचारला तेव्हा त्यानी उपहासान हंसून उत्तर दिल 'फार काही नाही, सारीं उणी पुरी बाराशें

वर्षंच झाली आम्हाला येथे येऊन! ' मूर्तींच्या खाली पुढील नांव होती. हरिहर, ब्रह्माशिव, महादेव, शिवगुरु, दुर्गा, गणेश, गायत्री बोधिसत्त्व, मजुश्री, रत्नसभवा, सरस्वती, भैरव इत्यादि या मूर्तीमध्ये एक ऋषीची मूर्ति आमच्या अतिशय वारवार पाहण्यात आली ती म्हणजे अगस्त्य महामुनीची. इतर अनेक ऋषि-मुनी आपल्या हिंदू पौराणिक ग्रथात उल्लेखिलेले असूनसुद्धां त्याचे कोणाचे पुतळे येथे नाहीत पण अगस्त्य महामुनीचे पुतळे मात्र खूप आढळतात. अस का, असा प्रश्न मनात उद्‌भवला अगस्त्य महामुनीनी समुद्रच पिऊन टाकला अशी कथा आहे एवढच नव्हे तर जावामधील अगस्ति ऋषीच्या पुतळयात त्याच पोट जलोदर झाल्यासारख मोठ दाखविल आहे लाक्षणिक अर्थाने या कथेचा अर्थ घ्यावयाचा तर तो असा दिसतो की, हिंदुस्थानपासून जावा सुमात्रापर्यतचा मोठा महासागर उल्लघून त्यांनी इकडे आपल्या वसाहती केल्या म्हणजेच समुद्राच अस्तित्वच नाहीसं केल."

अमेरिकेतील मेक्सिकन् सरकारच्या पुराण वस्तु सशोधन खात्याच्या मते तर फार प्राचीन काळापासून भारतीय पेरू व मेक्सिकोमध्ये होते असे आहे. आजहि जोधपूरच्या महाद्वारावर जे सतीचे हस्ततल चिन्ह आढळते तेच मेक्सिको येथील मायन् लोकांच्या मदिरावर आढळते. इ स पूर्वी २९०० वर्षे निर्माण झालेल्या 'शतपथ ब्राह्मणात' बाल्हीक राजाचा उल्लेख आहे. महाभारतातील पाडवाचा चुलत पणजा व पितामह भीष्माचा चुलता बाल्हीक मध्य आशियाचे राज्य करीत होता व तें त्याला त्याच्या चुलत पणजाकडून वारसा हक्काने मिळालें असा महाभारतात निर्देश आहे इराणापर्यंत पसरलेले पारशी लोक मूळ भारतातीलच होते इतकेंच नव्हे तर ज्यू लोकही भारतीय होते असे पुरावे आढळतात. ए जे. एडमडस् आणि एम्. अनेसाकी याच्या Buddhist and Christian Gospels ह्या पुस्तकात असे म्हटले आहे की जाझेफसच्या ग्रथावरून असें समजतें की ॲरिस्टॉटलला विश्वसनीय यहुदी पडितांकडून यहुदी लोक हिंदुस्थानांतील

ब्राह्मणाचे वशज आहेत'असें समजले होते. ह्या गोष्टीचे महत्त्व वाटून त्यानें आपला शिष्य सोलीचा क्लेर्चस् याला ती गोष्ट नमूद करावयास सांगितली. एडमडस व आनेसाकी आपल्या टीपेंत म्हणतात "Clearchus of solı, the authorıty here considered the jews themselves of Hındu orıgın; but allowıng for thıs exaggeration, the fact underneath ıt probably ıs that a certain sect had such an orıgın" कितीही टाळण्याचा प्रयत्न केला तरी शेवटी काही बाबतीत मान्यता दिल्यावाचून अहकारी पाश्चात्यानाही कसे गत्यतर उरत नाही याचा हा उतारा म्हणजे एक नमुनाच होय

भारताच्या विचारऋणाचा लाभ न घेतलेली तर एकही प्राचीन सस्कृति दाखविता येणार नाही रोमन कॅथॉलिकाचा आचारधर्म व ख्रिश्चन धर्मातील कित्येक महत्त्वाची गूढे म्हणजे भारतीय सास्कृतिक सिद्धातातील न समजून केलेली उसनवारीच होय ख्रिश्चन धर्मातील कित्येक गूढे तर त्याच्या मुळाशी असलेल्या भारतीय कल्पना नीट समजावून न घेतल्या तर उलगडत नाहीत त्यातील एका गूढाचे प्रत्यक्ष उदाहरणच मी येथे देतो. बायबल-मध्ये असे सागितले आहे की आदम आणि ईव्ह हे मानवाचे आदि पूर्वज एकदा परमेश्वराच्या उद्यानात फिरत असता ईश्वराने त्याना इतर सर्व वृक्षाची फळे खा, पण ज्ञानवृक्षाच्या फळाला मुळीच स्पर्श करू नका म्हणून बजावून सागितले. त्याना कसलेहि ज्ञान-नसल्यामुळे सकोचादि भावनाही नव्हत्या व ते नग्नावस्थेतच उद्यानात हिडत होते ईश्वर तेथून निघून गेल्यावर सैतानाच्या प्रेरणेनें त्या जोडप्याने त्याच्या आज्ञेचा भग करून नेमके ज्ञान-वृक्षाचें फळ भक्षण केले त्याबरोबर आपण नग्न आहोत या गोष्टीची जाणीव होऊन त्याना सकोच वाटू लागला व लज्जासरक्षणासाठी त्यानी वृक्षाची पाने आपल्या कटिभागाभोवती झाकली मागाहून ईश्वर उद्यानात येताच त्यांचा तो अवतार त्यानें पाहिला. व आपली आज्ञा मोडली म्हणून त्याने क्रोधानें त्याना देवभूमीतून

पृथ्वीवर ढकलून दिले अजूनहि मानवाच्या त्या पूर्वजानी केलेल्या आज्ञाभगाचा राग ईश्वर विसरलेला नाही हे सारे वर्णन चमत्कारिक वाटणारे आहे. फुसक्या कारणासाठी अखड क्रुद्ध राहणाऱ्या शक्तीला ईश्वर म्हणावे की सैतान असे विचारी माणसाला वाटल्याविना राहणार नाही पृथ्वीवरील सामान्य पितासुद्धा आपल्या मुलानी ज्ञानसपन्न व्हावे म्हणून हवे ते प्रयत्न करीत असतो पण जगत्पित्याचा मात्र आपल्या मुलानी ज्ञानवृक्षापासून चार हात दूरच राहिले पाहिजे असा येथे आग्रह आहे हे गूढ काय आहे ते ख्रिश्चन धर्माच्या वाङमयातून उलगडणारे नाही, त्यासाठी ज्या भारतीय कल्पनेचे तें विकृत रूपातर आहे ती कल्पनाच नीट समजावून घेतली पाहिजे ती कल्पना वेदवाङमयातील आहे हा सारा ससार म्हणजे एक वृक्ष असून तो नित्य बदलणारा असल्यामुळे त्याला अश्वत्थ (नश्वत्थ ) असें नाव भारतीय तत्त्वज्ञानी दिलेले आहे या वृक्षावर जीव व शिव अथवा ईश्वर या नावाचे दोन पक्षी राहतात. त्याचे वर्णन पुढीलप्रमाणे आहे –

द्वा सुपर्णा सयुजा सखाया समान वृक्ष परिषस्वजाते ।
तयोरन्य पिप्पल स्वाद्वत्ति अनश्नन्नन्यो अभिचाकशीति ।

(दोन परस्परांचे सखे असलेले पक्षी एकाच वृक्षावर राहतात त्यातील एक स्वादु फळ खातो व (शक्तिहीन असतो) दुसरा मात्र त्या वृक्षाचें फळ मुळीच न खाता आपल्या तेजाने तळपतो ) येथे फळ खाणे याचा अर्थ फलाशेने कर्म करणे असा आहे. जीव मीपणाची भावना न टाकता फलाशेने कर्म करीत राहतो व म्हणून तो कर्मसूत्राच्या बधनात सापडतो याच्या उलट शिवाच्या ठिकाणी अहममत्वाच्या असणाऱ्या विलयामुळे अशी कोणतीच भावना नसल्यामुळे तो कर्मसूत्राच्या बंधनापासून व जन्ममरणाच्या चक्रापासून सदैव अलिप्त असतो असा या वर्णनाचा अर्थ आहे. हा भारतीय सिद्धान्त नीट समजावून घेतला व बायबलमधील ज्ञानवृक्ष म्हणजे भेद ज्ञानाचा प्रपचवृक्ष होय हे रहस्य ध्यानात घेतले म्हणजे वरील गूढ खरें उलगडते.

यशू ख्रिस्ताच्या उपदेशावर बौद्ध धर्माची दाट छाया पडलेली आहे याचें कारण स्वामी विवेकानदाच्या शब्दात सागावयाचें तर 'ख्रिश्चन धर्म ही बुद्धधर्माची केवळ छाया मात्र आहे ' बुद्ध सम्प्रदाय वैदिक धर्माचेच बडखोर बालक असल्याचा उल्लेख मागें केलाच आहे येशू ख्रिस्त हिंदुस्थानात १९ वर्षे घालवून व बुद्ध सम्प्रदायाच्या लोकाकडून धर्मदीक्षा घेऊन गेल्याचे किती तरी पुरावे हल्ली उपलब्ध झाले आहेत बायबलच्या नव्या करारामध्ये ख्रिस्ताच्या चार शिष्यानी ख्रिस्ताच्या चरित्राची माहिती दिलेली आहे. पण आपल्या वयाच्या बाराव्या वर्षापासून तिसाव्या वर्षा-पर्यंत ख्रिस्त कोठे होता आणि काय करीत होता याचा त्यानी कोठेच खुलासा केला नाही भाविक ख्रिस्तभक्त या अवधीत ख्रिस्त कोठे तरी अध्यात्मचितन करीत होता असे मोघमपणे मानतात. ख्रिस्ताच्या चरित्राच्या या अज्ञात कालखडामध्ये ख्रिस्त भारतामध्यें आला होता अशी माहिती इ स. १८९४ च्या सुमारास निकोलस नोटोव्हिश या रशियन प्रवाशाने प्रथम प्रकाशात आणली. निकोलस नोटोव्हिस हा आपल्या विश्वयात्रेत तिबेटमध्ये गेला असता त्याला ख्रिस्ताच्या जीवनातील या अज्ञात भागासबधानें तिबेटमध्ये कांही विशेष माहिती असल्याचे कळले तेव्हा कुतूहलाने त्यानें तेथील 'लामाची ' भेट घेऊन 'हिमिस ' या ठिकाणच्या बौद्ध मठांत असलेले ख्रिस्त चरित्र त्याच्या साहाय्याने पाहिले त्या ख्रिस्ताच्या अथवा सत इसमाच्या अज्ञात हस्तलिखित चरित्रात त्याला अशी माहिती कळली की 'इसाचा जन्म एका निर्धन पण धर्मनिष्ठ कुटुबात झाला लहानपणापासून त्याची धार्मिक प्रवृत्ति होती. त्यामुळे तो घरातून व्यापाऱ्याच्या ताडचाबरोबर सिधमध्ये आला त्याने जगन्नाथ, राजगृह, आणि बनारस या ठिकाणी धर्माचा अभ्यास केला नतर त्याने बुद्ध भिक्षूचा आश्रय घेऊन पाली भाषेचा अभ्यास केला बौद्ध धर्माचे त्यानें चागले ज्ञान सपादन केले पुढे इराण मार्गे तो जुडियाला गेला व तेथे त्याने प्रवचने करण्यास प्रारम्भ केला. तेथील गव्हर्नर पायलेट याने त्याला पकडून तुरुंगांत

टाकले. त्याला क्रूसावर मारण्याची आज्ञा गव्हर्नराने दिली क्रूसा-वर त्यास मृत्यू आला पण तीन दिवसानी त्याचे थडगे उघडे झालेले आढळले, आणि ख्रिस्त नाहीसा झालेला आढळला ' आपले हे पुस्तक नोटोव्हिशने प्रथम फ्रेंच भाषेत प्रसिद्ध केले पुढे त्याचा इग्रजी अनुवादहि झाला रशियन चित्रकार निकोलस रोरिश याने आपल्या 'Heart of Asia' या ग्रथातहि लडाख, सिकियाग, तिबेट, काश्मीर व मगोलिया येथील पुराव्याच्या आधारे ख्रिस्ताच्या जीवनातील ही अज्ञात वर्षे त्याने भारतात धर्माध्ययनात घालविली असेच प्रतिपादन केले आहे ख्रिस्ती भटाना त्याच्या जीवनातील या अज्ञात काळासबधाने स्वत: काही सागता येत नाही व भारता-कडून आपल्या धर्मसस्थापकाने धर्मदीक्षा घेतली होती हे त्याचा अहगड त्याना उघड रीतीने मान्य करू देत नाही म्हणून त्यानी कित्येक गैरसोयीच्या गोष्टी लपवून ठेवून विपर्यस्त गोष्टीचा प्रसार केला. रोमच्या धर्मपीठाजवळची सबधित कागदपत्रे यासाठीच गुप्त राखण्यात येत असतात. आपल्या जीवनाच्या उत्तरार्धातहि ख्रिस्त क्रूसावर न मरतां पळून काश्मीरमध्ये आला व तेथे पुष्कळ वर्षे जगल्यावर त्याला स्वाभाविक मृत्यू आला त्याचे थडगे आजहि काश्मीरमध्ये असून त्यावर 'जोफेसच्या पुत्राला येथ दफन करण्यात आले ' असा कोरीव लेखहि आहे. पण त्याच्या उत्तरा-युष्यासबधी व मृत्युसबधी आपल्याला येथे काही करावयाचे नसून त्याच्या पूर्वायुष्यात त्यानें भारतात येऊन धर्मदीक्षा घेतली होती की नाही येवढेच पहावयाचे आहे. व त्याचे जे पुरावे वर दिले आहेत त्यावरून भारताचें ख्रिस्तावर व ख्रिश्चन धर्मावर केवढें ऋण आहे व स्वामी विवेकानंदांच्या म्हणण्यांत केवढे सत्य साठविलेलें आहे याची निश्चिति पटते.

ख्रिश्चन धर्म तर काय, पण आजच्या सपूर्ण युरोपला तत्त्व-ज्ञानाची व जीवनदृष्टीची दीक्षा ज्याने दिली व ज्याच्या सबधानें सर हेन्री मेन यानें असें दर्पपूर्ण विधान केलें आहे की, " निसर्ग-निर्मित पंचमहाभूतांखेरीज ग्रीक लोकांपासून उत्पन्न झाली नाही

अशी कोणतीच वस्तू या जगात नाही." त्या ग्रीक राष्ट्राला देखील तत्त्वज्ञान व जीवनदृष्टीचे पाठ भारतानेच दिलेले आहेत हें सूक्ष्म निरीक्षणाती ध्यानात येते आपण सृष्टिनिर्माण शास्त्र व तत्त्वज्ञानाचे सिद्धान्त यातील अशी साम्यस्थळेच पाहू विश्वाच्या मूलतत्त्वाचे लक्षण मागताना तैत्तिरीयोपनिषदात म्हटले आहे, यतो वा इमानि भूतानि जायन्ते येन जातानि जीवन्ति यत्प्रयन्त्य-भिसविशन्ति तद्विजिज्ञासस्व तद्ब्रह्म' 'ज्यापासून भूतमात्रे निर्माण होतात व उत्पन्न झाल्यावर ज्यामुळे तो जिवत राहतात व शेवटी ज्यात ती लीन होतात तेच ब्रह्म असे जाणावे. ॲरिस्टॉटल्च्या प्रतिपादनाप्रमाणे प्राचीन ग्रीक तत्त्ववेत्त्यानी मूलतत्त्वाविषयी हेच म्हटले आहे श्वेताश्वतरोपनिषदात प्रारभीच असा प्रश्न उपस्थित केलेला आहे की 'आम्ही कोणापासून उत्पन्न झालों आहोत, कोणामुळे जिवत आहोत व आमचें अधिष्ठान कोणतें ? ( कि कारण ब्रह्म कुत स्म जाता जीवाम केन क्व च सप्रतिष्ठा ) ग्रीक तत्त्ववेत्ता हिसिअड् हा आपल्या 'थिऑगनी' या ग्रथाच्या आरभी हेच विचारतो थिऑगनी म्हणजे देवो-त्पत्तीचा इतिहास. 'जग उत्पन्न होण्यापूर्वी सर्व जलमय होतें' (आप एवेदमग्र आसु ) असे बृहदारण्यकोपनिषदात म्हटले आहे. ग्रीक तत्त्ववेत्ता थेलीज् यानेही हेच प्रतिपादन केले आहे 'वायू-मध्ये सर्व भूते लीन होतात' (वायुर्वावससर्ग ) हे छादोग्योप-निषदातील रैक्वाचे मत व ग्रीक तत्त्वज्ञ अनॅक्झिमिनीज् याचें तत्त्वज्ञान यात पुष्कळ साम्य आहे 'अग्नीने विश्वात शिरून अनेक रूपे धारण केली' (अग्निर्यथैको भुवन प्रतिष्ठो रूपरूपं प्रतिरूपो बभूव) या कठोपनिषदातील सिद्धाताशी ग्रीक तत्त्वज्ञ हिरॅक्लायटस याचे असेच साम्य आहे 'आकाश हे जगताचें मूल कारण आहे' (सर्वाणि वा इमानि भूतान्याकाशादेव जायन्ते) हें सर्वात परिणत असे छादोग्योपनिपदातील मत, इतर उपरिलिखित मतानतर फॉयलोसच्या काळी ग्रीक तत्त्वज्ञांनी प्रतिपादन केलें आहे. 'अगदी प्रथम असत् होते' (असद्वा इदमग्र आसीत्) या

छांदोग्योपनिषदातील सिद्धान्ताचेच प्रतिबिंब ग्रीक तत्त्वज्ञाच्या शून्य अथवा रात्रिवर्णनात पडलेले असून प्लेटो व ॲरिस्टॉटल् सारख्या दार्शनिकानीसुद्धा या असत्चा विचार केलेला आहे. 'अॅड्रास्टिया' हा ग्रीक वाङमयातील नियतिवाचक शब्द संस्कृत 'अदृष्ट' या शब्दापासून निघाला असे तर आता मोठमोठे तत्त्वज्ञही म्हणू लागले आहेत प्लेटोच्या तत्त्वज्ञानावर भारतीय तत्त्वज्ञानाचा व विचारप्रणालीचा केवढा खोलवर ठसा उमटलेला आहे हे त्याचे चित्सूर्याचे अथवा समाधिस्थितीचे वर्णन पाहिले की ध्यानात येते ते त्याने स्थितप्रज्ञावस्था व योगदर्शनातील समाधिप्रकरण यापासून उचललेले आहे नेमॅटिकाय, सुखिकॉय व ऑगिकॉय या तीन गुणाची त्याची कल्पना ही सांख्याच्या त्रिगुणाची उसनवारी होय व चतुर्वर्गात्मक समाजरचनेची प्लेटोची कल्पना तर भारतीयाच्या चातुर्वर्ण्यापासून अर्धवटपणाने उसनी घेतलेलीच कल्पना आहे हे मागे दाखविलेच आहे छांदोग्योपनिषदातील असत् व सत् कल्पनाचे प्रतिबिंब गॉजिअस् व पार्मेनायडीज् याच्या प्रतिपादनात पडले आहे पृथ्वी जगास आधार आहे हे मुंडकोपनिषदातील मत हिसियड्च्या ग्रंथात प्रतिबिंबित झाले आहे तैत्तिरीयोपनिषदातील ऊर्ध्व व अधोमार्गाचे वर्णन व छांदोग्योपनिषदातील त्रिवृत्करणाची कल्पना याचे प्रतिबिंब हिरॅक्लायटस् व अॅनॅक्झॅगोरस याच्या ग्रंथात पडले आहे प्लेटोचे 'मियॉन्' व भारतीय दार्शनिकाची माया' यातील ध्वनिसादृश्य, शब्दसादृश्य व अर्थसादृश्यही चिंतनीय आहे ऋग्वेदातील 'ऋक्' पासूनच ग्रीक परिभाषेतील 'लॉगॉस' हा शब्द निघाल्याचे मागे दाखविलेच आहे थेलीज् प्रभृति ग्रीक तत्त्वज्ञ सृष्ट्युत्पत्ति व तत्त्वज्ञान याचा विचार करू लागण्याच्या सहस्रावधि वर्षे पूर्वी वेद व उपनिषदातील तत्त्वज्ञान उच्च शिखरास पोहोचून जगभर प्रसरण पावू लागले होते हे ध्यानात घेतले व ही साम्यस्थळे पाहिली म्हणजे ग्रीकानी भारताचे विचारधन घेतले होतें यात तिळमात्रही संशय रहात नाही. तक्षशिलेच्या विद्यापीठात ग्रीस-

पासूनचे विद्यार्थी येत हें ध्यानांत घेतलें तर भारतीय विचारांचे लोण ग्रीसपर्यंत कसें पोहोचले असेल हे ध्यानात येतें. स्वत: ग्रीक लेखकाचीच या सबधांतील माहिती लक्षात घेतली व न्यूनगण्डाची जवनिका फेकून दिली तर ग्रीक सस्कृतीवरील भारताच्या ऋणाची यथार्थ कल्पना आल्याविना रहात नाही. ग्रीक तत्त्वज्ञाचा चरित्र-कार डायोजिनीस व प्लेटोच्या शिष्य जाब्लिकस या दोघांनी 'थेलीज् व पायथॅगोरस याच्यासारखे प्राचीन ग्रीक तत्त्वज्ञ हिंदु-स्थानांतील ब्राह्मणाना भेटावयास गेले होते ' असे स्पष्टच सांगितले आहे

प्राचीन भारताचा हा देदीप्यमान सास्कृतिक विश्वविजय कोणत्याही जातिवत भारतीयाच्या अत.करणात केवढ्या प्रखर स्वाभिमानाची निर्मिति करील ! हा आपल्या तेजस्वी पूर्वजांचा दीप्तिमान् विश्वविजय नवजात स्वतंत्र भारताला आज नव्या विजयी कर्तृत्वाची प्रेरणा देणार नाही काय ?

## उपसहार

झाले ! माझी ही सकल्पित व्याख्यानमाला या व्याख्यानानें पूर्ण करून मी सद्गुरूच्या चरणारविंदी समर्पण करीत आहे. वैदिक राष्ट्रदर्शनाच्या या उत्तरार्धाने मला वेदांतून घडलेले राष्ट्रदर्शन मी पूर्ण करीत आहें. या व्याख्यानमालेच्या पूर्वार्धांत आपण वैदिक राष्ट्रजीवनाचे अंतरग दर्शन घेतले व उत्तरार्धांत बहिरग दर्शन घेतले आहे. त्यावरून या राष्ट्राच्या अस्मितेंत साऱ्या मानवतेची विकसनोन्मुख पुना रचना करण्याचे आजही सामर्थ्य असून जगातील संघर्षयुगाचा अत या अस्मितेशिवाय दुसरे कोणीही करू शकणार नाही हे स्पष्टच होतें या अस्मितेच्या अधिष्ठानावर आपण भारतीयांनी तिचे खरे प्रतिनिधि या नात्याने आपले जीवन उभारून नवराष्ट्र निर्मिति केली तर प्राचीन भारताचा विश्वगुरुत्वाचा वारसा या विसाव्या शतकांतही आपलाच आहे. या अस्मितेची मूलतत्त्वे पुन्हा एकदां उल्लेखितो.

(१) सर्वत्र एकच चैतन्यमय तत्त्व भरलेलें आहे ( एकमेवाद्वितीय ब्रह्म) (only the unconditioned Absolute one and none else

(२) 'सर्व खल्विदं ब्रह्म' हे सर्व काही परब्रह्म आहे. ( The unconditioned Absolute one manifests in many. )

(३) सर्व काही गतिरूप आहे (The one is dynamic )

(४) सर्व काही ज्ञानमय आहे (The one is conscient. )

(५) ही गति नियमबद्ध आहे कर्मतत्त्वाने ती नियन्त्रित आहे आणि पुनर्जन्म हे त्या कर्मतत्त्वाशी सलग्न असे तत्त्व आहे. (Laws of cosmic motion, the Laws of Karma and rebirth. )

(६) सप्तलोकात्मक विश्व व त्याची घन विरल अवस्थेनुसार विभागणी (The cosmos and its seven planes. )

(७) विश्वाचे परस्पराश्रयत्व (Inter dependence, inter-penetration and reciprocity

(८) योग आणि यज्ञ (The science of yoga and sacrifice.)

(९) अनुभूतिवाद (The science of realisation )

(१०) साधनानामनेकता.

(११) विश्वात्म होऊन राहणे व जगासही तसे करणे हा ध्येयवाद.

(१२) ईशस्वत्ववाद.

(१३) चातुर्वर्ण्यात्मक समाजरचना व तिच्या रूपाने बुद्धिबल शरीरबल, धनबल व श्रमबल समष्टिरूप परमेश्वराच्या चरणीं समर्पण करण्याची योजनाबद्ध आखणी.

(१४) भोगत्यागात्मक समाजरचना व वर्गसमन्वय

(१५) भौतिक व आधिदैविक सामर्थ्यसपन्नता व देवजीव नाच्या निर्मितीसाठी तिचा विनियोग.

प्राचीन वैभवशाली भारतीय राष्ट्राच्या अस्मितेची ही पधरा सूत्रे होत. भारतीय, वैदिक अथवा हिंदू राष्ट्राची ही मूलतत्त्वे

म्हणजे आधारशिला होय. या प्राचीनतम, वैभवशाली व जगद्गुरु राष्ट्राचा आपल्या संतानांना असा संदेश आहे की :–

ईशावास्यमिदं सर्वं यत्किंच जगत्यां जगत् ।
तेन त्यक्तेन भुञ्जीथा मा गृधः कस्यस्विद्धनम् ॥१॥
कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेत् शतं समाः ।
एवं त्वयि नान्यथेतोऽस्ति न कर्म लिप्यते नरे ॥२॥
यस्मिन्सर्वाणि भूतान्यात्मैवाभूद्विजानतः ।
तत्र को मोहः कः शोक एकत्वमनुपश्यतः ॥७॥
अन्धं तमः प्रविशन्ति ये विद्यामुपासते ।
ततो भूय इव ते तमो य उ विद्यायां रताः ॥१२॥
विद्यां च विद्यां च यस्तद्वेदोभयं सह ।
अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्ययाऽमृतमश्नुते ॥१४॥

–(ईशावास्योपनिषद्)

" अखिल विश्वामध्ये हे जे काही स्थावर जंगमात्मक वस्तुजात दिसत आहे, तें सर्व ईश्वराने आपल्या सत्तेने व्यापलें आहे त्यानें सत्त्वाचा त्याग करून दिलेल्या वस्तूचाच तू संतोषानें उपभोग घे. कोणाचेही धन घेण्याची तू इच्छा करू नको प्रत्येक मनुष्यानें कर्तव्यकर्म करीत शंभर वर्षे जगण्याची आकांक्षा बाळगावी अशा आकांक्षेने तू कर्म करीत राहिलास तर कोणतेंही कर्म तुला बंधनकारक असणार नाही. कर्तव्याचरणाखेरीज कर्मबंधापासून सुटण्यास दुसरा मार्गच नाही. जो विश्वात्मक झाला तो सर्वत्र आत्माच पहात असल्यामुळे त्याला शोक व मोह कशाचा? जे केवळ जीवाजीव सृष्टिविषयक ज्ञानाचीच उपासना करतात ते गाढ अंधकारात जाऊन पडतात आणि जे केवळ ब्रह्मविद्येमध्येच गढून गेलेले असतात ते त्याहीपेक्षां गाढ अशा अंधारात रखडत राहतात जो तत्त्वज्ञान व भौतिक शास्त्रे या दोहोंना बरोबरच जाणतो तो भौतिक शास्त्रज्ञानाच्या योगानें अधःपात व दीनतारूपी मृत्यूवर विजय संपादन करून विद्येच्या योगानें अमृतत्वाला प्राप्त होतो " या औपनिषदिक संदेशाने मी ही व्याख्यानमाला संपवितो.

पुण्याच्या वाक्पीठावर मी देत असलेली ही पाचवी व्याख्यानमाला होय. या वाक्पीठाचा अधिकार साऱ्या भारतांत अग्रगण्य आहे. त्यामुळे या वाक्पीठावर येणे हे जसें सन्मानाचे तसेच दायित्वाचेही आहे वेदासारख्या कठीण विषयावरील या द्विवर्षात्मक ज्ञानसत्राला आपण इतक्या सख्येने उपस्थित राहून पुण्यपत्तनाची सास्कृतिक श्रेष्ठता सिद्ध केली आहे या ज्ञानसत्राने वेदांपासून महाभारत काळापर्यंतच्या भारतवर्षाच्या सास्कृतिक इतिहासाचे मी सकल्पित केलेले प्रतिपादन पाच व्याख्यानमालांत पूर्ण केले आहे. माझ्यावर पितृतुल्य प्रेम करणारे प पू तीर्थ-स्वरूप तात्यासाहेब करदीकर यानी याही व्याख्यानमालेला उपस्थित राहून व महाराष्ट्राचे आचार्यपीठ असलेल्या केसरी सस्थेच्या वतीने माझा सत्कार करून जे माझे वात्सल्यगर्भ कौतुक केले त्यातून मी अनृणी होणे कठीण. या माझ्या सर्व ज्ञान-सत्रांचे संयोजक व ती ग्रथनिविष्ट करून त्याना शाश्वत स्वरूप देणारे माझे जिवलग मित्र श्री श रा. उपाख्य मामासाहेब दाते याचे मी आभार मानणे त्याना राग आणणारे होईल म्हणून त्यानी जे कांही सौहार्द वारवार दाखविले ते 'मदंगे जीर्णता यातु' एवढेच मी म्हणतो दैनिक भारताने या महत्त्वपूर्ण व्याख्यान-मालेतील प्रत्येक व्याख्यानाला भरपूर प्रसिद्धि देऊन तिचे लोण महाराष्ट्रांत सुदूर पोहोचविले, याविषयी त्याचा सचालक वर्ग व सपादक श्री. गीत याना धन्यवाद द्यावे तितके थोडेच आहेत पुनश्च एकदा माझ्या श्रोतृवृन्दाना मी धन्यवाद देतो

हें जे काही मी माझ्या अध्ययनानुरूप वेदासारख्या सर्वश्रेष्ठ विषयावर विवेचन केले त्या सबधात --

"तरी न्यून ते परते। अधिक ते सरते। करोनि घ्यावे हे तुमते। विनवीतु असे॥ जैसा स्वभावो मायबापाचा। अपत्य बोले जरी बोबडी वाचा। तरी अधिक तयाचा। सतोषु आथी॥" येवढेंच मी आपणांस श्रीज्ञानराजाच्या शब्दात सागतो.

शेवटीं श्री ज्ञानदेवाच्या शब्दात विश्वेश्वराची पुढील प्रार्थना करून मी आपला निरोप घेतो –

" आता विश्वात्मके देवे । येणे वाग्यज्ञे तोषावे ।
तोषोनिया मज द्यावे । पसायदान हे ।
दुरिताचे तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्ये पाहो ।।
जो जे वाछिल तो तें लाहो । प्राणिजात ।।
चद्रमे जे अलाछन । मार्तंड जे तापहीन ।
ते सर्वाही सदा सज्जन । सोयरे हेतू ।
करोनि सद्‌भावाची अजुली । मिया ओविया फुले मोकळी ।
अर्पिली अध्रि युगली । विश्वरूपाचिया ।।

स मा प्त